॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# अथाष्टादशोऽध्यायः

## अवतरणिका

*श्रीभगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या एकोणचाळीसाव्या श्लोकात "**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु**" पदांनी जो सांख्ययोग आणि कर्मयोग सांगितला, त्यालाच तीसऱ्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात सांख्यनिष्ठा आणि योगनिष्ठा नावांनी म्हटले आहे. त्या दोन्ही निष्ठांची तत्त्वे वेगवेगळ्या रूपात योग्य रीतीने जाणण्याची इच्छा अर्जुनाच्या मनात होती. परंतु ज्याप्रमाणे भगवंतांना सातव्यापासून पंधराव्या अध्यायापर्यंत दैवी-संपत्ती आणि आसुरी-संपत्ती सांगण्यास संधी मिळाली नाही, त्याचप्रमाणे अर्जुनालाही तीसऱ्यापासून सतराव्या अध्यायापर्यंत त्या दोन्ही निष्ठांच्या विषयात आपली जिज्ञासा प्रकट करण्यास संधी मिळाली नाही.*

*तीसऱ्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात भगवंतांनी दोन निष्ठा सांगून चौथ्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात सांगितले की, मी हा अविनाशी योग सूर्याला सांगितला होता. यावर अर्जुनाने प्रश्न केला की, "आपला जन्म तर आत्ताचा आहे, तर मग आपण सृष्टीच्या आरंभी सूर्याला उपदेश कसा केला?" उत्तरात भगवंतांनी आपले अवतार व कर्मयोग यांच्या तत्त्वाचे वर्णन केले. चौथ्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला ज्ञान प्राप्त करून घेण्याची आज्ञा केली.—"**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया**" आणि बेचाळीसाव्या श्लोकात योगात स्थित होण्याची आज्ञा केली—"**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत**". या दोन वेगवेगळ्या आज्ञा मिळाल्यामुळे अर्जुनाने पाचव्या अध्यायाच्या आरंभी ह्या दोन्हीपैकी आपल्यासाठी एक निश्चित कल्याणकारक साधन विचारले. याच्या उत्तरात भगवंतांनी पाचव्या अध्यायाचा पूर्ण विषय सांगून स्वतःहून सहाव्या अध्यायाचा विषय आरंभ केला.*

*सहाव्या अध्यायाच्या तेहतीसाव्या, चौतीसाव्या श्लोकात अर्जुनाने मनाच्या चंचलतेविषयी प्रश्न केला. त्याचे उत्तर भगवंतांनी फार संक्षेपाने दिले. त्यानंतर अर्जुनाने सदतीसाव्यापासून एकोणचाळीसाव्या श्लोकापर्यंत योगभ्रष्ट पुरुषाच्या गतीविषयी प्रश्न केला. त्याचे उत्तर देत असताना भगवंतांनी सहाव्या अध्यायाचा विषय समाप्त केला. सहाव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकात भगवंतांनी आपला भक्त संपूर्ण योग्यांमध्ये परम श्रेष्ठ असल्याचे सांगितले. त्याचाच संदर्भ घेऊन भगवंतांनी सातव्या अध्यायाचा विषय आरंभ केला आणि त्यात भक्तीचे विशेष वर्णन केले.*

*सातव्या अध्यायाच्या शेवटी आलेल्या ब्रह्म, आध्यात्म इत्यादींना अनुसरून अर्जुनाने आठव्या अध्यायाच्या आरंभी सात प्रश्न केले. त्यापैकी सहा प्रश्नांची संक्षिप्त उत्तरे देऊन अंतकालीन गतिविषयक सातव्या प्रश्नाच्या उत्तरात भगवंतांनी आठव्या अध्यायात विषय विस्ताराने सांगितला. त्यानंतर सातव्या अध्यायात जो विषय सुटलेला होता त्याच विषयाचे वर्णन नवव्या अध्यायात तसेच दहाव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकापर्यंत केले. दहाव्या अध्यायाच्या नवव्या, दहाव्या आणि अकराव्या श्लोकांत भक्त आणि भक्तावर होणारी भगवंताची कृपा याविषयीचे वर्णन ऐकून अर्जुन फार प्रसन्न आणि प्रभावितही झाले. म्हणून अर्जुनांनी बाराव्यापासून अठराव्या श्लोकापर्यंत भगवंताची स्तुती केली आणि आपल्या सर्व विभूती विस्ताराने सांगण्याची प्रार्थना केली. भगवंतांनी आपल्या मुख्य मुख्य विभूती सांगत असताना दहाव्या अध्यायाच्या शेवटी म्हटले की, "हे अर्जुन! तुला जास्त जाणून काय करावयाचे आहे ? मी संपूर्ण जगत् आपल्या एका अंशात व्याप्त करून स्थित आहे." हाच संदर्भ लक्षात घेऊन अकराव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनांनी भगवंतांना आपले विश्वरूप दाखविण्याची प्रार्थना केली. आपले विश्वरूप दाखवून भगवंतांनी अकराव्या अध्यायाच्या शेवटी म्हटले की, अनन्यभक्तीने माझे दर्शन, ज्ञान आणि माझ्यात प्रवेश—ह्या तिन्ही गोष्टी होतात.*

*अकराव्या अध्यायाच्या शेवटी भगवंतांनी भक्तीचे माहात्म्य सांगितले आणि त्या अगोदर ४।३४-३७, ५।*

*१३-२६, ६, २४-२८ आणि ८।११-१३) निर्गुण-तत्त्वाच्या उपासनेचे माहात्म्य सांगितले. त्या दोघांत कोण श्रेष्ठ आहे, ? ही गोष्ट अर्जुनाने बाराव्या अध्यायाच्या आरंभी विचारली होती. उत्तरात भगवंतांनी बाराव्या अध्यायात भक्तीचे आणि तेराव्या चौदाव्या अध्यायात निर्गुण-साधनांचे वर्णन केले. चौदाव्या अध्यायाच्या एकवीसाव्या श्लोकात अर्जुनाने गुणातीताचे लक्षण, आचरण आणि गुणातीत होण्याचा उपाय विचारला. तर भगवंतांनी गुणातीताची लक्षणे आणि आचरण सांगून, आपली अव्यभिचारी भक्ती हा गुणातीत होण्याचा उपाय सांगितला. त्याच (अव्यभिचारिणी भक्तीच्याच) वर्णनात भगवंतांनी पंधराव्या अध्यायाचा विषय सांगितला. पंधराव्या अध्यायाच्या शेवटी* **''स सर्वविद् भजति मां सर्वभावेन भारत''** *पदांनी ही गोष्ट सांगितली कीं, दैवी-संपत्तीचे पुरुष माझे भजन करतात आणि अर्थान्तरात आसुरी-संपत्तीचे पुरुष माझे भजन करीत नाहीत. या पूर्वीही सातव्या अध्यायाच्या पंधराव्या श्लोकात आणि नवव्या अध्यायाच्या बाराव्या-तेराव्या श्लोकांत संकेतरूपाने दैवी आणि आसुरी-संपत्तीचे वर्णन झाले होते. म्हणून दैवी आणि आसुरी-संपत्तीचे विस्ताराने वर्णन करण्यासाठी सोळाव्या अध्यायाचा आरंभ झाला.*

*सोळाव्या अध्यायाच्या उपान्त्य श्लोकाच्या अनुषंगाने सतराव्याच्या आरंभी अर्जुनाने निष्ठेच्या विषयात प्रश्न केला. उत्तरात भगवंतांनी तीन प्रकारच्या श्रद्धेचे वर्णन करून अध्यायाचा विषय पूर्ण केला. सतराव्या अध्यायानंतर आता अर्जुन तीसऱ्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात सांगितलेल्या दोन निष्ठांचे तत्त्व वेगवेगळे व स्पष्ट जाणण्यासाठी भगवंताजवळ आपली जिज्ञासा प्रगट करीत आहेत.*

*अर्जुन उवाच*

**सन्न्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम्।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन॥ १ ॥***

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महाबाहो** | = हे महाबाहो! | **सन्न्यासस्य** | = (मी) संन्यास | **तत्त्वम्** | = तत्त्व |
| **हृषीकेश** | = हे हृषीकेश! | **च** | = आणि | **प्रथक्** | = वेगवेगळे |
| **केशिनिषूदन** | = हे केशिनिषूदन! | **त्यागस्य** | = त्यागाचे | **वेदितुम** | = जाणू |
| | | | | **इच्छामि** | = इच्छितो. |

* अर्जुनाच्या ह्या जिज्ञासेच्या समाधानार्थ ज्या ज्या गोष्टी सांगितल्या त्यांच्या आधारे अर्जुनाच्या मनात आलेल्या अन्य जिज्ञासांचेही अनुमान लावले जाऊ शकते. ते पुढील प्रमाणे-

(क) संन्न्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम्—

(१) संन्यास कशाला म्हणतात ? उत्तर—कोणत्याही कर्माविषयी कर्तेपणाचा भाव न राहणे आणि बुद्धी कोठेही लिप्त न होणे-(१८।१७)

(२) संन्यासी कसा असावा ? उत्तर—रागरहित, अनहंवादी, धैर्य आणि उत्साहयुक्त तसेच सिद्धी-असिद्धीत निर्विकार असावा. (१८।२६)

(३) संन्यासाचे साधन कसे असावे ? उत्तर—सात्त्विक बुद्धीचे, वैराग्यवान्, एकांत सेवी, इंद्रियनियामक, शरीर-वाणी-मन यांना संयत करणारे इत्यादी असावे (१८।५१-५३)

(४) संन्याशाचे आचरण कसे असावे ? उत्तर—कर्तृत्वाभिमान व राग-द्वेषरहित होऊन कर्म करणे असे असावे (१८।२३)

(५) संन्याशाचा भाव कसा असावा ? उत्तर—संपूर्ण विभक्त प्राण्यांमध्ये विभागरहित एक परमात्मतत्त्व पाहणे (१८।२०)

(६) संन्यासाचे फल काय ? उत्तर—परमात्मतत्त्वात प्रविष्ट होणे (१८।५५)

(ख) त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन—

(१) त्याग कशाला म्हणतात ? उत्तर—कर्म आणि कर्मफलासक्ती यांचा त्याग करून कर्तव्यकर्म करणे. (१८।६)

(२) त्यागी कसा असावा् ? उत्तर—कर्मफलाचा त्यागी असावा (१८।११)

(३) त्यागाचे साधन कसे असावे ? उत्तर—कर्म आणि फलाच्या आसक्तीचा त्याग (१८।९)

(४) त्याग्याचे आचरण कसे असावे ? उत्तर-अकुशल कर्माचा द्वेष न करणे आणि कुशल कर्मात आसक्त न होणे. (१८।१० पूर्वार्ध)

(५) त्याग्याचा भाव कसा असावा ? उत्तर—केवळ कर्तव्यकर्म करणे (१८।९)

(६) त्यागाचे फल कोणते ? उत्तर—परमात्मतत्त्वात स्थित होणे (१८।१० उत्तरार्ध)

*व्याख्या*—**सन्न्यासस्य महाबाहो....पृथक्केशिनिषूदन**—येथे ''**महाबाहो**'' संबोधन सामर्थ्याचे सूचक आहे. अर्जुनाकडून दिलेल्या संबोधनाचा भाव असा आहे की, आपण सर्व विषय सांगण्यास समर्थ आहात म्हणून ज्यायोगे मला विषय अगदी सोपेपणाने समजू शकेल, अशा तऱ्हेने माझ्या जिज्ञासेचे समाधान करा.

''**हृषीकेश**'' संबोधन अंतर्यामीचा वाचक आहे. हा प्रयोग करण्याचा भाव असा आहे की, मी संन्यास आणि त्यागाचे तत्त्व जाणू इच्छितो. म्हणून यासंबंधी ज्या आवश्यक गोष्टी आहेत, त्या सर्व (मी न विचारलेल्यासुद्धा) आपण सांगाव्यात.

''**केशिनिषूदन**'' संबोधन विघ्न दूर करण्याचे सूचक आहे. हा प्रयोग करण्यात अर्जुनाचा भाव असा आहे की, ज्याप्रमाणे आपण आपल्या भक्तांची संपूर्ण विघ्ने दूर करता त्याप्रमाणे माझीही विघ्ने अर्थात् शंका व संशय दूर करावेत.

जिज्ञासा प्राय: दोन प्रकाराने प्रकट केली जाते—

(१) आपल्या आचरणात आणण्यासाठी आणि (२) सिद्धांताला समजण्यासाठी. जे केवळ शिकण्यासाठी सिद्धांत समजून घेतात, ते केवळ पुस्तकी विद्वान होऊ शकतात आणि नवीन पुस्तकेही लिहू शकतात, परंतु आपले कल्याण करू शकत नाहीत.* आपले कल्याण तर, जे सिद्धांताला समजून त्यानुसार आपले जीवन बनविण्यात तत्पर असतात, तेच करू शकतात.

येथे अर्जुनाची जिज्ञासा देखील केवळ सिद्धांताला जाणण्यासाठीच नाही, तर सिद्धांताला जाणून त्यानुसार आपले जीवन घडविण्यासाठीच आहे.

''**एषा तेऽभिहिता सांख्ये**'' (गीता २।३९) मध्ये आलेल्या ''सांख्य'' पदालाच येथे ''संन्यास'' पदाने म्हटले गेले आहे. भगवंतांनीही सांख्य आणि संन्यासाला पर्यायवाची मानले आहे. जसे पाचव्या अध्यायाच्या दुसऱ्या श्लोकात ''**संन्यासः**'', चौथ्या श्लोकात ''**सांख्ययोगौ**'', पाचव्या श्लोकात ''यत्सांख्यैः'' आणि सहाव्या श्लोकात ''**संन्यासस्तु**'' पदांचा एकाच अर्थाने प्रयोग झाला आहे. म्हणून येथे अर्जुनानेही सांख्यालाच संन्यास म्हटले आहे.

त्याचप्रमाणे ''**बुद्धिर्योगे त्विमां शृणु**'' (२।३९) मध्ये आलेल्या ''योग'' पदालाच येथे ''त्याग'' पदाने म्हटले गेले आहे. भगवंतांनीही योग (कर्मयोग) आणि त्याग ह्याला पर्यायवाची मानले आहे. जसे दुसऱ्या अध्यायाच्या अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात ''**सङ्गं त्यक्त्वा**'' तसेच एक्कावन्नाव्या श्लोकात ''**फलं त्यक्त्वा**'', तीसऱ्या अध्यायाच्या तीसऱ्या श्लोकात ''**कर्मयोगेन योगिनाम्**'', चौथ्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकात ''**त्यक्त्वा कर्मफलासङ्गम्**'', पाचव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात ''**योगौ**'', पाचव्या श्लोकात ''**तद्योगैरपि गम्यते**'', अकराव्या श्लोकात ''**सङ्गं त्यक्त्वा**'' तसेच बाराव्या श्लोकात ''**कर्मफलं त्यक्त्वा**'', बाराव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात ''**त्यागात्**'' पदांचा एकाच अर्थाने प्रयोग झाला आहे. म्हणून येथे अर्जुनाने कर्मयोगालाच त्याग म्हटले आहे.

तात्पर्य, प्रकृतीची वस्तू पूर्णपणे प्रकृतीला देणे (सोडून देणे) आणि विवेकद्वारा प्रकृतीशी आपला सर्वथा संबंध-विच्छेद करून घेणे अशा उत्तम नियोजनास ''संन्यास'' म्हणतात—''**सम्यक् न्यासः संन्यासः**''.

कर्म व फलाची आसक्ती सोडून देण्याचे नाव ''त्याग'' आहे. सहाव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकात आले आहे की, जो कर्म आणि कर्मफलात आसक्त नसतो, तो योगारूढ होतो.

**परिशिष्ट भाव**—कर्मयोग आणि ज्ञानयोग यांच्या विषयात अर्जुनाने तीसऱ्या अध्यायाच्या आरंभी भगवंतापुढे तक्रार मांडली, पाचव्या अध्यायाच्या आरंभी दोन्हीत कोण श्रेष्ठ आहे हे जाणू इच्छिले आणि येथे त्या दोन्हीचे तत्त्व जाणू इच्छितात.

***संबंध***—*अर्जुनाच्या जिज्ञासेच्या उत्तरात प्रथम भगवान् पुढील दोन श्लोकांत इतर दार्शनिक विद्वानांची चार मते सांगत आहेत.*

*श्रीभगवानुवाच*

**काम्यानां कर्मणां न्यासं सन्न्यासं कवयो विदुः।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः॥ २॥**
**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः।**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे॥ ३॥**

* असत्‌ला असत् जाणूनही जोपर्यंत मनुष्य सत् प्राप्ती हेच आपल्या जीवनाचे सर्वोपरी लक्ष्य बनवीत नाही तोपर्यंत सत्‌ची प्राप्ती होत नाही.

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कवयः** | = (काही) विद्वान् | **त्यागम्** | फलाच्या त्यागाला | **दोषवत्** | = दोषाप्रमाणे |
| **काम्यानाम्** | = काम्य | **त्यागम्** | = त्याग | **त्याज्यम्** | = त्याग करावा. |
| **कर्मणाम्** | = कर्मांच्या | **प्राहुः** | = म्हणतात. | **च** | = आणि |
| **न्यासम्** | = त्यागाला | **एके** | = काही | **अपरे** | = काही विद्वान् |
| **सन्न्यासम्** | = संन्यास | **मनीषिणः** | = विद्वान् | **इति** | = असे (म्हणतात की,) |
| **विदुः** | = समजतात (आणि) | **इति** | = असे | **यज्ञज्ञानतपः-** | = यज्ञ, दान आणि |
| **विचक्षणाः** | = (काही) विद्वान् | **प्राहुः** | = म्हणतात की, | **कर्म** | तपरूपी कर्मांचा |
| **सर्वकर्मफल-** | = संपूर्ण कर्मांच्या | **कर्म** | = कर्मांचा | **न, त्याज्यम्** | = त्याग करू नये. |

*व्याख्या*—दार्शनिक विद्वानांची चार मते आहेत—

**(१) काम्यानां कर्मणां न्यासं सन्न्यासं कवयो विदुः**— कित्येक विद्वान् म्हणतात की, काम्य कर्मांचा त्याग म्हणजे "**संन्यास**". अर्थात् इष्टाची प्राप्ती आणि अनिष्टाच्या निवृत्तीसाठी जे कर्म केले जाते, त्याच्या त्यागाला "संन्यास" म्हणतात.

**(२) सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः**— कित्येक विद्वान् म्हणतात की, संपूर्ण कर्मफलाच्या इच्छेच्या त्यागाला "**त्याग**" म्हणतात अर्थात् फलेच्छा न ठेवता कर्तव्यकर्म करीत राहण्याचे नाव "त्याग" आहे.

**(३) त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः***— कित्येक विद्वान् म्हणतात की, संपूर्ण कर्मांचा दोषाप्रमाणे त्याग केला पाहिजे.

**(४) यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे**—इतर विद्वान् म्हणतात की, दुसऱ्या सर्व कर्मांचा त्याग केला तरी चालेल परंतु यज्ञ, दान आणि तपरूपी कर्मांचा त्याग करू नये.

उपर्युक्त चार मतात दोन विभाग दिसून येतात. पहिले व तीसरे मत "**संन्यास**" (सांख्ययोग) याचे आहे. तसेच दुसरे आणि चौथे मत "**त्याग**" (कर्मयोग) याचे आहे. या दोन विभागातही थोडा थोडा फरक आहे. पहिल्या मतात केवळ काम्यकर्मांचा त्याग आहे आणि तीसऱ्या मतात संपूर्ण कर्मांचा त्याग आहे. तसेच दुसऱ्या मतात कर्मांच्या फलाचा त्याग आहे आणि चौथ्या मतात यज्ञ, दान आणि तपरूपी कर्मांच्या त्यागाचा निषेध आहे.

दार्शनिकांच्या उपर्युक्त चार मतांमध्ये कोण कोणत्या उणीवा आहेत आणि भगवंताच्या मतात कोण कोणत्या विलक्षणता आहेत. याचे विवेचन पुढील प्रमाणे—

**(१) काम्यानां कर्मणां न्यासं सन्न्यासम्**— संन्यासाच्या ह्या पहिल्या मतात केवळ काम्यकर्मांचा त्याग सांगितला गेला आहे. परंतु या व्यतिरिक्तही नित्य, नैमित्तिक इत्यादी आवश्यक कर्तव्यकर्म बाकी राहतात.† म्हणून हे मत

* "दोषवत्" पद व्याकरणाच्या "वति" व "मतुप्" दोन्ही प्रत्ययांनी बनते परंतु दोन्हींचा अर्थ दोन प्रकारचा होतो. "वति" प्रत्यय लावून "दोषवत्" पदाचा अर्थ कर्मांचा दोषाप्रमाणे त्याग करावा असा होतो आणि "मतुप्" प्रत्यय केल्याने "दोषवत्" पदाचा अर्थ दोषयुक्त कर्मे सोडावीत असा होतो. परंतु येथे "वति" प्रत्ययाचाच अर्थ घेतला पाहजे, "मतुप्" प्रत्ययाचा नव्हे; कारण "मतुप्" प्रत्ययाचा अर्थ भगवंतांच्या मतानुसार आहे (१८। ४८) दार्शनिकांच्या मतानुसार नाही.

दुसरा फरक असा आहे की "वति" प्रत्यय अव्यय होऊन क्रिया विशेषण होते आणि "मतुप्" प्रत्यय कर्ता आणि कर्म याचे विशेषण बनते.

† कर्मे पाच प्रकारची असतात—

(१) नित्यकर्म—शास्त्राज्ञानुसार प्रतिदिन जी आवश्यक दैनिक कर्म केली जातात त्यांना "नित्यकर्म" म्हणतात. जसे संध्या, गायत्री इत्यादी.

(२) नैमित्तिक कर्म—देश, काळ, परिस्थिती इत्यादी एखाद्या निमित्ताने जी कर्म केली जातात, त्यांना "नैमित्तिक कर्म" म्हणतात. जसे गंगा, प्रयाग, नैमिषारण्य, पुष्कर, इत्यादी तीर्थावर जाऊन जी शास्त्रविहित कर्म केली जातात. ती "देशकृत नैमित्तिक कर्म" आहेत, एकादशी, पौर्णिमा, अमावस्या, व्यतिपात, ग्रहण, होळी, दिवाळी, अक्षय तृतीया, इत्यादी दिवशी जी शास्त्रविहित कर्म केली जातात, ती "कालकृत नैमित्तिक कर्म" आहेत. पुत्रोत्पत्तीच्या वेळी, कन्या व पुत्राच्या विवाहप्रसंगी, कोणाचा मृत्यू झाल्यास, संत महात्म्यांचा सत्संग उपलब्ध झाल्यास जी शास्त्रविहित कर्म केली जातात, ती "परिस्थिती- कृत नैमित्तिक कर्म" होत.

(३) काम्य कर्म—आपला मान-सन्मान व्हावा, लोकांत आपली प्रसिद्धी व्हावी, पुत्र व्हावा, खूप धनाची प्राप्ती व्हावी, मनोकामना पूर्ण व्हावी इत्यादी इष्ट प्राप्तीसाठी आणि रोग नाहीसा व्हावा, संकट टळावे, कर्जरहित व्हावे इत्यादी अनिष्ट निवृत्तीसाठी जी शास्त्रीय अनुष्ठाने केली जातात, ती सर्व "काम्य कर्म" म्हणविली जातात.

(४) प्रायश्चित्त कर्म—आपल्याकडून झालेल्या पापांच्या निवारणार्थ जी कर्म केली जातात, ती सर्व "प्रायश्चित्त कर्म" म्हटली जातात. याचे दोन भेद आहेत. विशेष प्रायश्चित्त, सामान्य प्रायश्चित्त. जसे एखाद्याकडून उंदीर, मांजर, कबूतर इत्यादी मारले गेले तर ह्या ज्ञात पापांना दूर करण्यासाठी धर्मसिन्धू, निर्णयसिन्धू इत्यादी धर्मग्रंथात सांगितलेल्या प्रायश्चित्त कर्मांचे अनुष्ठान करणे यांना "विशेष प्रायश्चित्त कर्म" म्हटले जाते आणि ज्ञात-अज्ञात

पूर्ण नाही. कारण यात कर्तृत्वाचा त्यागही सांगितला नाही आणि स्वरूपात स्थितीही दाखविली नाही. परंतु भगवंताच्या मतामध्ये कर्मांत कर्तृत्वाभिमान राहत नाही आणि स्वरूपात स्थिती होते. जसे याच अध्यायाच्या सतराव्या श्लोकात ''ज्यात अहंकृतभाव नाही आणि ज्याची बुद्धी कर्मफलात लिप्त होत नाही''—असे म्हणून कर्तृत्वाभिमानाचा त्याग सांगितला आहे आणि ''जरी त्याने सर्व प्राण्यांना ठार केले तरी तो मारीतही नाही आणि बांधलाही जात नाही'' असे म्हणून स्वरूपात स्थिती दाखविली आहे.

**( २ ) त्याज्यं दोषवदित्येके**—संन्यासाच्या या दुसऱ्या मतात सर्व कर्मांना दोषाप्रमाणे त्यागण्याविषयी सांगितले आहे. परंतु संपूर्ण कर्मांचा त्याग कोणीही करूच शकत नाही (३।५) आणि संपूर्ण कर्मांचा त्याग केल्यास जीवननिर्वाह-ही होऊ शकत नाही (३।८) म्हणून भगवंतांनी नियत-कर्मांचा स्वरूपाने त्याग करण्यास राजस व तामस त्याग म्हटले आहे. (१८।७-८)

**( ३ ) सर्वकर्मफलत्यागम्**—त्यागाच्या या पहिल्या मतात केवळ फलाचा त्याग सांगितला आहे. या फल-त्यागाच्या अंतर्गत केवळ कामना त्यागाबद्दलच म्हटले आहे. *ममता आसक्तीचा त्याग यात अंतर्भूत घेऊ शकत नाही. कारण असे केल्यास दार्शनिक आणि भगवंत यांच्या मतात मग काही फरकच राहणार नाही. भगवंताच्या मतात कर्मांची आसक्ती आणि फलाची आसक्ती—या दोन्हींचाही त्याग सांगितला आहे—''**सङ्गं त्यक्त्वा फलानि च**'' (१८।६)

**( ४ ) यज्ञदानतपःकर्म न त्याज्यम्**—त्याग अर्थात् कर्मयोगाच्या या दुसऱ्या मतात यज्ञ, दान आणि तप या कर्मांचा त्याग करू नये असे म्हटले आहे. परंतु या तिन्ही व्यतिरिक्त वर्ण, आश्रम, परिस्थिती यानुसार येणारी जितकी कर्म आहेत ती करावी की करू नये याविषयी काहीही म्हटले गेले नाही; हा यात अधूरेपणा आहे. भगवंताच्या मताने या कर्मांचा त्याग तर सोडाच उलट ती कर्म करत नसाल तर ती जरूर केली पाहिजेत आणि या व्यतिरिक्त तीर्थ, व्रत इत्यादी कर्मांनाही फल आणि आसक्तीचा त्याग करून केले पाहिजे. (१८।५-६)

***संबंध***—*मागील दोन श्लोकांत दार्शनिक विद्वानांची चार मते संगितल्यानंतर आता भगवान् पुढील तीन श्लोकांत पहिल्या त्यागाच्या विषयात आपले मत सांगत आहेत.*

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः सम्प्रकीर्तितः ॥ ४ ॥†**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भरतसत्तम्** | = हे भरतवंशीयांत श्रेष्ठ अर्जुन! (तू) | **त्यागे** | = त्यागाच्या विषयात | **पुरुषव्याघ्र** | = हे पुरुषश्रेष्ठ! |
| **तत्र** | = संन्यास आणि त्याग —या दोन्हीपैकी प्रथम | **मे** | = माझा | **त्यागः** | = त्याग |
| | | **निश्चयम्** | = निश्चय | **त्रिविधः** | = तीन प्रकारचा |
| | | **शृणु** | = ऐक, | **सम्प्रकीर्तितः** | = सांगितला गेला आहे. |
| | | **हि** | = कारण | | |

सर्व पापांना दूर करण्यासाठी गंगास्नान, एकादशीव्रत, नामजप, सेवा इत्यादी जी शुभकर्म केली जातात ती ''सामान्य प्रायश्चित कर्म'' म्हटली जातात.

(५) आवश्यक कर्तव्यकर्म—शेती, व्यापार, नोकरी इत्यादी जीवननिर्वाहासाठी आणि खाणे-पिणे, झोपणे-जागणे इत्यादी शरीरासाठी जी कर्म केली जातात ती ''आवश्यक कर्तव्यकर्म'' म्हटली जातात.

* जेथे फलत्यागाबद्दल सांगितले गेले आहे, तेथे फलाच्या कामनेचा त्यागच समजला पाहिजे. कारण फलाचा त्याग होऊच शकत नाही. प्रत्येक कर्म फलरूपात परिणत होते असा नियम आहे. जसे एखादा शेती करतो तर तो पिकाचा (धान्याचा) त्याग कसा करील? व्यापार करीत असेल तर नफ्याचा त्याग कसा करील? जसे धान्य पिकणे शेतीचे फल आहे तसेच धान्य न पिकणे हेही शेतीचे फल आहे. जसे नफा होणे व्यापाराचे फल आहे, तसेच नुकसान होणे हेही व्यापाराचे फल आहे. परंतु कामनेच्या त्यागाने फलाशी आपोआप संबंध-विच्छेद होतो (१८।१२). म्हणून भगवंतांनी सिद्धी आणि असिद्धी दोन्हीमध्ये सम राहण्यास योग अर्थात् समता म्हटले आहे (२।४८); कारण सिद्धी आणि असिद्धी दोन्हीही कर्मफल आहे. सिद्धी आणि असिद्धीमध्ये सम राहण्याचे तात्पर्य कर्मफलात ममता-आसक्ती न ठेवणे अथवा कर्मफलाशी आपला संबंध न जोडणे—हे आहे.

† या श्लोकाच्या पूर्वार्धाच्या व्याख्येच्या रूपात भगवंतांनी आपले मत पाचव्या आणि सहाव्या श्लोकात सांगितले आहे आणि उत्तरार्धाच्या व्याख्येच्या रूपात सातव्यापासून नवव्या श्लोकापर्यंत तीन प्रकारच्या त्यागाचे वर्णन केले आहे.

ज्याप्रमाणे शरीर आणि शरीरी यांचा विवेक सर्व योग्यांसाठी परम आवश्यक असल्यामुळे भगवंतांनी त्याचे वर्णन गीतेत सर्वप्रथम (२।११-३० मध्ये) केले आहे, त्याचप्रमाणे फलाची कामना आणि कर्माच्या आसक्तीचा त्याग सर्व योग्यांसाठी अत्यंत अवश्यक असल्यामुळे येथे भगवान् ''त्यागा'' चे वर्णन सर्वात प्रथम आरंभ करतात.

*व्याख्या*— **निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम**— हे भरतवंशीयांमध्ये श्रेष्ठ अर्जुन! आता मी संन्यास आणि त्याग—दोन्हीपैकी पहिल्या त्यागाच्या विषयात स्वतःचे मत सांगतो. ते तू ऐक.

**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः सम्प्रकीर्तितः**—हे पुरुषव्याघ्र! त्याग तीन प्रकारचा सांगितला गेला आहे. सात्त्विक, राजस आणि तामस. वास्तविक भगवंताच्या मताने ''सात्त्विक त्याग'' हाच खरा त्याग आहे. परंतु त्याबरोबर राजस आणि तामस त्यागाचेही वर्णन करण्याचे तात्पर्य असे आहे की, त्याशिवाय भगवंताला अभीष्ट असलेल्या अशा सात्त्विक त्यागाची श्रेष्ठता स्पष्ट होत नाही. कारण कोणत्याही वस्तूची श्रेष्ठता सिद्ध करण्यासाठी परीक्षा किंवा तुलना करून दुसऱ्या वस्तू समोर ठेवाव्याच लागतात.

तीन प्रकारचा त्याग दाखवण्याचे तात्पर्य, साधकाने सात्त्विक त्यागाचा स्वीकार करावा आणि राजस व तामस त्यागाचा अस्वीकार करावा.

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत्।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम्॥ ५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यज्ञदानतपः- कर्म** | = यज्ञ, दान, आणि तपरूपी कर्मांचा | **कार्यम्, एव** | = केलीच पाहिजेत, (कारण) | **तपः, एव** | = तप—हे तिन्हीही कर्म |
| **न, त्याज्यम्** | = त्याग करू नये (उलट) | **यज्ञः** | = यज्ञ, | **मनीषिणाम्** | = मनीषिनां |
| | | **दानम्** | = दान | **पावनानि** | = पवित्र करणारी आहेत. |
| **तत्** | = ती | **च** | = आणि | | |

*व्याख्या*— **यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत्**—येथे भगवंतांनी दुसऱ्यांचे मत योग्य असल्याचे म्हटले आहे (१८।३). भगवान् कठोर शब्दांनी कोणाच्याही मताचे खंडन करीत नाहीत. आदर करण्याच्या दृष्टीने भगवान् दुसऱ्याच्या मताचा वास्तविक अंश स्वीकारतात आणि त्यात आपले मतही समाविष्ट करतात. येथे भगवंतांनी दुसऱ्याच्या मतानुसार म्हटले आहे की, यज्ञ, दान आणि तपरूप कर्म त्यागू नयेत. याबरोबर भगवंतांनी आपले स्वतःचे मत सांगितले आहे की, एवढेच नव्हे तर ही कर्म करीत नसाल तर ती अवश्य केली पाहिजेत—''**कार्यमेव तत्**''. कारण यज्ञ, दान आणि तप—तिन्ही कर्म मनीषींना पवित्र करणारी आहेत.

**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम्**—येथे ''**चैव**'' पदाचे तात्पर्य हे आहे की, नित्य, नैमित्तिक जीविकेसंबंधी, शरीरसंबंधी इत्यादी जितकी काही कर्तव्यकर्म आहेत, तीही अवश्य केली पाहिजेत कारण तीही मनीषींना पवित्र करणारी आहेत.

जी माणसे समत्त्वबुद्धियुक्त होऊन कर्मजन्य फलाचा त्याग करतात, ती मनीषी आहेत—''**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः**'' (२।५१) अशा मनीषींना ती यज्ञादी कर्म पवित्र करतात. परंतु जे वास्तविक मनीषी नाहीत, ज्यांची इंद्रिये वश नाहीत अर्थात् आपल्या सुखभोगासाठीच जे यज्ञ, दानादी कर्म करतात, त्यांना ती कर्म पवित्र करीत नाहीत, उलट ती कर्म बंधनकारक होतात.

या श्लोकाच्या पूर्वार्धात ''**यज्ञदानतपःकर्म**'' असे समासयुक्त पद आले आहे आणि उत्तरार्धात ''**यज्ञो दानं तपः**'' असे वेग-वेगळे पद दिले आहेत. याचे तात्पर्य, भगवंतांनी समासयुक्त पदाने हे सांगितले आहे की, यज्ञ, दान आणि तप यांचा त्याग करू नये, उलट ती कर्म अवश्य करावीत आणि वेग-वेगळ्या पदांनी हे सांगितले आहे की, त्यापैकी एक एक कर्म देखील मनीषीला पवित्र करणारे आहे.

**परिशिष्ट भाव**—मनीषीचा अर्थ आहे—विचारशील. जे कर्म स्वतःची कोणती कामना न ठेवता दुसऱ्याच्या हितासाठी केली जातात, ती कर्म पवित्र करणारी होतात अर्थात् दुर्गुण-दुराचार, पाप इत्यादी मल यांना नाहीसे करून महान् आनंद देणारी होतात. परंतु तीच कर्म जर स्वतःची कामना ठेवून आणि दुसऱ्याचे अहित करण्यासाठी केली जातील तर ती अपवित्र करणारी अर्थात् लोक-परलोक दोन्हीत महान् दुःख देणारी होतात.

**एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम्॥ ६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पार्थ | = हे पार्थ! | | (कर्मांना) | कर्तव्यानि | = केले पाहिजे— |
| एतानि | = या (यज्ञ, दान आणि तपरूपी) | सङ्गम् | = आसक्ती | इति | = हे |
| | | च | = आणि | मे | = माझे |
| कर्माणि | = कर्मांना | फलानि | = फलांच्या इच्छेचा | निश्चितम् | = निश्चित केलेले |
| तु | = तसेच | | | उत्तमम् | = उत्तम |
| अपि | = (दुसऱ्या) ही | त्यक्त्वा | = त्याग करून | मतम् | = मत आहे. |

*व्याख्या*— **एतान्यपि तु कर्माणि..............निश्चितं मतमुत्तमम्**—येथे "**एतानि**" पदात पूर्व श्लोकात सांगितलेली यज्ञ, दान व तपरूप कर्म तसेच "**अपि**" पदाने शास्त्रविहित पठन-पाठन, शेती, व्यापार इत्यादी जीविकेची कर्म, शास्त्र मर्यादेनुसार खाणे-पिणे, उठणे-बसणे, झोपणे-जागणे इत्यादी शारीरिक कर्म आणि परिस्थितीनुसार समोर आलेली आवश्यक कर्तव्यकर्म—ह्या सर्वांचा समावेश केला जावा. ही संपूर्ण कर्म आसक्ती आणि फलांचा त्याग करून अवश्य केली पाहिजेत. आपली कामना, ममता आणि आसक्ती यांचा त्याग करून केवळ प्राणीमात्राच्या हितार्थ कर्म केल्याने कर्मांचा प्रवाह संसारासाठी आणि योग आपल्यासाठी होतो. परंतु कर्म आपल्यासाठी केल्यास ती कर्म बंधनकारक होतात—आपल्या व्यक्तित्वाला नष्ट होऊ देत नाहीत.

गीतेमध्ये कोठे संगाच्या (आसक्ती) त्यागाविषयी सांगितले आहे तर कोठे कर्मफलाच्या त्यागाविषयी सांगितले आहे. या श्लोकात संग आणि फल या दोन्हींच्या त्यागाविषयी सांगितले आहे. याचे तात्पर्य असे आहे की, गीतेत जेथे संगाच्या त्यागाविषयी म्हटले आहे तेथे त्याबरोबर फलाचा त्यागही समजावा आणि जेथे फलाच्या त्यागाविषयी म्हटले आहे तेथे त्याबरोबर संगाचा त्यागही गृहीत धरावा. येथे अर्जुनाने त्यागाचे तत्त्व विचारले आहे. म्हणून भगवंतांनी त्यागाचे असे तत्त्व सांगितले आहे की, संग (आसक्ती) आणि फल—दोन्हींचाही त्याग केला पाहिजे, त्यामुळे साधकाला ही गोष्ट स्पष्ट समजेल की, कर्माविषयीही आणि फलाविषयीही आसक्ती राहू नये. आसक्ती न राहिल्याने मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर इत्यादी कर्म करण्याची साधने (करण) तसेच प्राप्त वस्तू ह्याविषयी ममता राहत नाही (५ । ११)

संग (आसक्ती अथवा संबंध) सूक्ष्म असतो आणि फलेच्छा स्थूल असते. संग अथवा आसक्तीची सूक्ष्मता, जो-पर्यंत चेतन-स्वरूपाने नाशवानाशी संबंध जोडला आहे तो-पर्यंत असते. तेथूनच आसक्ती उत्पन्न होते. त्यामुळेच जन्म-मरण सर्व अनर्थ होतात—"**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**" (१३ । २१). आसक्तीचा त्याग झाल्यास नाशवानाशी जडलेल्या संबंधाचा विच्छेद होतो आणि स्वतः स्वाभाविक असणाऱ्या असंगतेचा अनुभव येतो.

या विषयात आणखी एक गोष्ट समजून घ्यावयाची आहे की, कित्येक दार्शनिक या नाशवान् संसाराला असत् मानतात् कारण हा पूर्वीही नव्हता आणि नंतरही राहणार नाही म्हणून वर्तमानातही हा नाहीच, जसे—स्वप्न ! कित्येक दर्शनकारांचे असे मत आहे की, संसार परिवर्तनशील आहे, नेहमी बदलत राहतो, कधी एकरूप राहत नाही—जसे आपले शरीर ! कित्येकजण असे मानतात की, परिवर्तनशील असला तरीही संसाराचा कधी अभाव होत नाही उलट तत्त्वाने सदा राहतो. जसे—पाणी ! (पाणीच बर्फ, ढग, वाफ आणि परमाणुरूपाने बदलते पण स्वरूपाने नष्ट होत नाही) अशा प्रकारचे अनेक मतभेद आहेत. परंतु नाशवान जडाचा आपल्या अविनाशी चेतन स्वरूपाशी कोणताही संबंध नाही, यात कोण्याही दर्शनकाराचा मतभेद नाही. "**सङ्गं त्यक्त्वा**" पदांनी भगवंताने त्याच संबंधाचा त्याग सांगितला आहे.

प्रकृती सत् आहे किंवा असत् आहे अथवा सत्-असत्हून विलक्षण आहे ? अनादी सांत आहे अथवा अनादी अनंत आहे ? या भानगडीत पडून साधकाने आपला अमूल्य वेळ खर्च करू नये, उलट या प्रकृतीशी तसेच प्रकृतीचे कार्य शरीर-संसाराशी आपला संबंध-विच्छेद करावा, जो सहज होतच आहे. आपोआप होणाऱ्या संबंध-विच्छेदाचा केवळ अनुभव करायचा आहे की, शरीर तर प्रत्येक क्षणाला बदलत राहते आणि स्व निर्विकाररूपाने सदा जसाच्या तसा राहतो

आता प्रश्न असा आहे की, फल म्हणजे काय? प्रारब्ध कर्मानुसार आता आम्हाला जी परिस्थिती, वस्तू, देश, काळ इत्यादी प्राप्त आहेत, ते सर्व कर्मांचे "प्राप्त फल" आहे आणि भविष्यात जी परिस्थिती, वस्तू इत्यादी प्राप्त होणाऱ्या आहेत, ते सर्व कर्मांचे "अप्राप्त फल" आहे. प्राप्त तसेच अप्राप्त फल ह्यात आसक्ती राहिल्यामुळेच प्राप्ताविषयी ममता आणि अप्राप्ताविषयी कामना होते.

म्हणून भगवंतांनी "**त्यक्त्वा फलानि च**"* म्हणून फलांचा त्याग करण्याविषयी सांगितले आहे.

कर्मफलाचा त्याग का करावा? कारण कर्मफल आमच्याबरोबर राहणारे नाहीच. कारण ज्या कर्मांनी फल बनते, त्या कर्मांचा आरंभ आणि अंत होतो, म्हणून त्यांचे फलही प्राप्त आणि नष्ट होणारेच आहे. म्हणून कर्मफलाचा त्याग करावयाचा आहे. फलाच्या त्यागात वास्तविक फलाच्या आसक्तीचा, कामनेचाच त्याग करावयाचा आहे. वास्तविक आसक्ती आमच्या स्वरूपात नाही, केवळ मानलेली आहे.

दुसरी गोष्ट, जे आपले स्वरूप आहे त्याचा त्याग होत नसतो. जसे प्रज्वलित अग्नी उष्णतेचा आणि प्रकाशाचा त्याग करू शकत नाही. जी वस्तू आपली नसते, तिचाही त्याग होत नाही. जसे संसारात अनेक वस्तू पडून आहेत परंतु त्यांचा आम्ही त्याग करावा असे म्हणता येत नाही, कारण त्या वस्तूं आमच्या नाहीतच. म्हणून त्याग त्याचाच होतो जे वास्तविक आपले नाही परंतु आपण त्याला आपले मानले आहे. तसेच प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीर इत्यादी आमचे नाहीत, असे असूनही त्यांना आपण आपले मानतो, तर या आपलेपणाच्या मान्यतेचाच त्याग करायचा आहे.

मनुष्यासमोर कर्तव्यरूपाने जे कर्म येईल, ते फल आणि आसक्तीचा त्याग करून सावध राहून तत्परतेने केले पाहिजे—"**कर्तव्यानि**". कर्मयोगात विधी-निषेधाचा "अमुक करावे, तमुक करू नये" हा विचार तर केलाच पाहिजे परंतु "अमुक काम श्रेष्ठ आणि अमुक काम कनिष्ठ" असा विचार करू नये. कारण जर कर्म आणि त्याच्या फलाशी आपला काही संबंधच नाही, तर हे कर्म श्रेष्ठ आहे, हे कर्म कनिष्ठ आहे, या कर्माचे फल मोठे आहे, या कर्माचे फल लहान आहे असा विचार येऊच शकत नाही. कर्म मोठे किंवा लहान हे फलाच्या इच्छेमुळेच दिसते परंतु कर्मयोगात फलेच्छेचा त्याग सांगितलेला आहे.

कर्म करणे आसक्ती पूर्तीसाठीही केले जाते आणि आसक्ती निवृत्तीसाठीही केले जाते. कर्मयोगी आसक्ती निवृत्तीसाठी अर्थात् करण्याविषयीची आसक्ती मिटविण्यासाठीच संपूर्ण कर्तव्यकर्म करतो—"**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते**" (६।३), "**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते**" (३।४). आपल्यासाठी कर्म केल्याने करण्याची आसक्ती वाढते. म्हणून कर्मयोगी कोणतेही कर्म आपल्यासाठी करीत नाही, तर केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच करीत असतो. त्याच्या स्थूलशरीराकडून होणाऱ्या "क्रिया", सूक्ष्मशरीरात होणारे "परहित चिंतन" तसेच कारणशरीरात होणारी "स्थिरता"—तिन्हीही दुसऱ्यांच्या हितासाठीच होतात, आपल्यासाठी नव्हे. म्हणून त्याची करण्याची आसक्ती सुगमतेने समाप्त होते. परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीत संसाराची आसक्तीच बाधक आहे. म्हणून आसक्ती समाप्त झाल्यावर कर्मयोग्याला परमात्मतत्त्वाची प्राप्ती आपोआप होते (४।३८).

"कर्तव्य" शब्दाचा अर्थ होतो—जे आम्ही करू शकतो, तसेच जे अवश्य केले पाहिजे आणि जे केल्याने उद्देशाची सिद्धी अवश्य होते. उद्देश तोच म्हणविला जातो, जो नित्यसिद्ध आणि अनुत्पन्न आहे अर्थात् जो अनादी आहे आणि ज्याचा कधी विनाश होत नाही. त्या उद्देशाची सिद्धी मनुष्यजन्मातच होते आणि त्याच्या सिद्धीसाठीच मनुष्यशरीर मिळाले आहे, कर्मजन्य परिस्थितीनुरूप सुख-दुःख भोगण्यासाठी नव्हे. कर्मजन्य परिस्थिती ती असते जी उत्पन्न आणि नष्ट होते. ती परिस्थिती तर मनुष्याव्यतिरिक्त पशु-पक्षी, कीट-पतंग, वृक्ष-लता, नारकीय-स्वर्गीय इत्यादी योनींच्या प्राण्यांनाही प्राप्त होत असते जेथे कर्तव्याचा कोणता-च प्रश्न राहत नाही आणि जेथे उद्देशाच्या पूर्तीचा अधिकार-ही नसतो.

भगवंताद्वारा आपल्या मताला "**निश्चितम्**" म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, या मतात संशयाला मुळीच जागा नाही, हे मत अटळ आहे अर्थात् किंचिन्मात्रही इकडे-तिकडे होऊ शकत नाही आणि "**उत्तमम्**" म्हणण्याचे तात्पर्य, या मतात शास्त्रीय दृष्टीने कोणतीही उणीव नाही, तर हे पूर्णतेला प्राप्त करविणारे आहे.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकात कर्मासक्ती आणि फलासक्ती—दोन्हीही त्यागाविषयी विचार आला आहे. कर्मासक्ती आणि फलासक्ती हेच खास बंधन आहे, ज्याच्यातून सुटल्यावरच मनुष्य योगारूढ होतो—'**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते.......**' (गीता ६।४).

शुभ कर्मसुद्धा निष्कामभाव झाल्यासच कल्याणकारक होतात. जर निष्कामभाव नसेल तर शुभकर्मसुद्धा बंधनकारक होतात—'**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन**' (गीता ८।१६).

* येथे "फलानि" शब्दात बहुवचन यासाठी दिले आहे की, सकामभावाने कर्म करणारात अनेक फलांची इच्छा असते. "बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्।" (२।४१), ते ह्या लोकी सुख-आराम, मान-सन्मान, यश-प्रतिष्ठा इत्यादींची इच्छा करतात आणि परलोकी स्वर्गादिकांच्या प्राप्तीची इच्छा करतात. भगवंताच्या मतात ह्या सर्व फलेच्छांचा त्याग आहे.

*संबंध—याच अध्यायाच्या चौथ्या श्लोकात भगवंतांनी तीन प्रकारचा त्याग सांगितला होता. आता त्याच त्रिविध त्यागाचे वर्णन पुढील तीन श्लोकांत करीत आहेत.*

**नियतस्य तु सन्न्यासः कर्मणो नोपपद्यते।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **नियतस्य** | = नियत- | **न, उपपद्यते** | = उचित नाही. | **परित्यागः** | = त्याग करणे |
| **कर्मणः** | = कर्माचा | | | **तामसः** | = तामस |
| **तु** | = तर | **तस्य** | = त्याचा | **परिकीर्तितः** | = म्हटले गेले आहे. |
| **सन्न्यासः** | = त्याग करणे | **मोहात्** | = मोहपूर्वक | | |

*व्याख्या—* [तीन प्रकारच्या त्यागाचे वर्णन भगवान् यासाठी करतात की, अर्जुन कर्मांचा स्वरूपाने त्याग करू इच्छित होते—"**श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके**" (२।५) म्हणून त्रिविध त्याग सांगून अर्जुनाला जागृत करायचे होते आणि भविष्यात मनुष्यमात्रास हे दाखवायचे होते की, नियतकर्मांचा स्वरूपाने त्याग करणे भगवंताना मान्य (अभीष्ट) नाही. भगवान् तर सात्त्विक त्यागालाच वास्तविक त्याग मानतात. सात्त्विक त्यागाने संसाराच्या संबंधाचा सर्वथा विच्छेद होतो.

दुसरी गोष्ट, सतराव्या अध्यायातही भगवंतांनी गुणांनुसार श्रद्धा, आहार इत्यादींचे तीन तीन प्रकार सांगितले आहेत, म्हणून येथेही अर्जुनाकडून त्यागाचे तत्त्व विचारल्यावर भगवंतांनी त्यागाचे तीन प्रकार सांगितले आहेत.]

**नियतस्य तु सन्न्यासः कर्मणो नोपपद्यते**—पूर्व श्लोकात भगवंतांनी त्यागाच्या विषयात आपले जे निश्चित उत्तम मत सांगितले आहे त्यापेक्षा हा तामस त्याग अत्यंत विपरीत आहे आणि पूर्णपणे निकृष्ट आहे, हे दाखविण्यासाठी येथे "तु" पद आले आहे.

नियतकर्मांचा त्याग करणे केव्हाही उचित नाही कारण ते तर अवश्य कर्तव्य आहे. बलिवैश्वदेव इत्यादी यज्ञ करणे, कोणी अतिथी आला तर गृहस्थी धर्मानुसार त्याला अन्न-पाणी देणे, विशेष पर्व अथवा श्राद्ध-तर्पणाचे दिवशी ब्राह्मणांना भोजन करविणे आणि दक्षिणा देणे, आपल्या वर्णाश्रमानुसार सकाळ-संध्याकाळ संध्या करणे इत्यादी कर्मांना न मानणे आणि न करणे नियतकर्मांचा त्याग आहे.

**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः**—अशा नियतकर्मांचा मूढतेने अर्थात् अविवेकाने त्याग करण्यास तामस त्याग म्हणतात. सत्संग, सभा, समितीस जाणे आवश्यक होते परंतु आळसाने पडून राहिले, आराम करू लागले, अथवा झोपले, घरी आई वडील आजारी आहेत, त्यांच्यासाठी वैद्याला बोलावणे किवा औषध आणण्यासाठी जात असता रस्त्यातच खेळ तमाशा पाहत बसले व तेथेच स्वतः खेळत बसले, वैद्याला बोलावणे किंवा औषध आणणे विसरून गेले. कोर्टात केस चालू होती तेथे उपस्थित राहण्याऐवजी हास्य विनोद, खेळ तमाशात लागून राहिले आणि समय संपला. शरीरासाठी शौच-स्नान इत्यादी जी आवश्यक कर्तव्य आहेत त्यांना आळस आणि प्रमादाने सोडून दिले—ही सर्व तामस त्यागाची उदाहरणे आहेत.

विहितकर्म आणि नियतकर्म ह्यात काय फरक आहे? शास्त्रांनी जी कर्म करण्याची आज्ञा दिली आहे ती सर्व "विहितकर्म" म्हटली जातात. त्या संपूर्ण विहितकर्मांचे पालन एक व्यक्ती करूच शकत नाही कारण शास्त्रात संपूर्ण वार तिथींच्या व्रतांचे विधान येते. जर एकच मनुष्य हे सर्व वार आणि तिथींचे व्रत करू लागेल तर मग तो भोजन केव्हा करील? यावरुन हे सिद्ध झाले की, मनुष्याला सर्व विहित-कर्म लागू नाहीत. परंतु त्या विहितकर्मातही वर्ण, आश्रम आणि परिस्थितीनुसार ज्याला जे कर्तव्य आवश्यक असते त्याच्यासाठी ते "नियतकर्म" म्हणविले जाते. जसे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शुद्र—चार वर्णांपैकी ज्या ज्या वर्णासाठी जीविका आणि शरीरनिर्वाहसंबंधी जितके काही नियम आहेत, त्या त्या वर्णासाठी ते सर्व "नियतकर्म" आहेत.

नियतकर्मांचा मोहपूर्वक त्याग केल्याने तो त्याग "तामस" होतो. तसेच सुख आणि आरामासाठी त्याग केल्याने तो त्याग "राजस" होतो. सुखेच्छा, फलेच्छा तसेच आसक्तीचा त्याग करून नियतकर्मांना केल्याने तो त्याग "सात्त्विक" होतो. तात्पर्य हे आहे की, मोहात गुंतून पडणे तामस पुरुषाचा स्वभाव आहे, सुख आरामात गुंतून राहणे राजस पुरुषाचा स्वभाव आहे आणि या दोन्हींनी रहित होऊन सावधानतेने निष्कामभावाने कर्तव्य करणे सात्त्विक पुरुषाचा स्वभाव आहे. या सात्त्विक स्वभावाने अथवा सात्त्विक त्यागानेच कर्म आणि कर्मफलाशी संबंध-विच्छेद होतो. राजस आणि तामस त्यागाने नव्हे, कारण राजस आणि तामस त्याग वास्तविक त्याग नाहीच.

लोक सामान्यपणे स्वरूपाने कर्म सोडून देण्यासच त्याग मानतात कारण त्यांना प्रत्यक्षात तोच त्याग दिसतो. कोणती व्यक्ती कोणते काम कोणत्या भावनेने करीत आहे, याचा त्यांना पत्ताच लागत नसतो. परंतु भगवान् अंत:-करणातील कामना, ममता-आसक्तीच्या त्यागालाच त्याग मानतात कारण हेच जन्म-मरणाला कारण आहेत. (१३।२१)

जर बाह्य त्यागालाच खरा त्याग मानला गेला तर सर्व मरणाऱ्यांचे कल्याण व्हावयास हवे कारण त्यांच्या तर संपूर्ण वस्तू सुटल्या जातात, अधिक तर काय, त्यांचे म्हणविले जाणारे शरीरही सुटून जाते आणि त्यांना ह्या वस्तूंची बहुतेक आठवणही राहत नाही. म्हणून अंतरातील त्यागच खरा त्याग आहे. अंतरातील त्याग झाल्यावर बाह्य वस्तू आपल्याजवळ राहोत अथवा न राहोत मनुष्य त्यांनी बांधला जात नाही.

**परिशिष्ट भाव**—'विहित' यापेक्षा 'नियत' कर्मात व्यक्तीची विशेष जिम्मेदारी असते. जसे, एखाद्याला पहाऱ्यावर उभे केले अथवा पाणी पाजण्यासाठी प्याऊवर बसविले तर ते त्याच्यासाठी नियतकर्म झाले, ज्याची त्याचेवर विशेष जिम्मेदारी असते. नियतकर्माच्या त्यागाचा अधिक दोष लागतो. नियताच्या त्यागाने अव्यवस्था होते. म्हणून पैसे कमी मिळोत अथवा अधिक मिळोत, आराम कमी मिळो अथवा अधिक, आपल्या नियतकर्माचा कधीही त्याग करू नये. नियतकर्म न केल्यामुळेच आजकल समाजात अव्यवस्था होत आहे. ज्याची ज्या कामासाठी नियुक्ती केली त्याने ते काम नाही केले तर काय दशा होईल? नियताचा मोहपूर्वक त्याग करणे तामस आहे, ज्याचे फल अधोगतीची प्राप्ती आहे—'**अधोगच्छन्ति तामसाः**' (गीता १४। १८).

## दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत्।
## स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत्॥ ८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे काही | **कायक्लेश-** | = शारीरिक परिश्रमाच्या | **त्यागम्** | = त्याग |
| **कर्म** | = कर्म आहे (ते) | **भयात्** | भयाने (त्याचा) | **कृत्वा, एव** | = करूनही |
| **दुःखम्, एव** | = दुःखरूपच आहे— | **त्यजेत्** | = त्याग केला, (तर) | **त्यागफलम्** | = त्यागाचे फल (त्याला) |
| **इति** | = असे (समजून एखाद्याने) | **सः** | = तो | **लभेत्** | = प्राप्त होत |
| | | **राजसम्** | = राजस | **न** | = नाही. |

*व्याख्या*— **दुःखमित्येव यत्कर्म**—यज्ञ, दान इत्यादी शास्त्रीय नियत कर्मांना करण्यात केवळ दुःखच भोगावे लागते आणि त्यात आहेच काय ? कारण ती कर्म करण्यात अनेक नियमांच्या बंधनात राहवे लागते आणि खर्चही करावा लागतो—अशा प्रकारे राजस पुरुषाला त्या कर्मांत केवळ दुःखच दुःख दिसते. दुःख दिसण्याचे कारण हे आहे की, त्यांची परलोकावर, शास्त्रांवर, शास्त्रविहितकर्मांवर आणि त्या कर्मांच्या परिणामावर श्रद्धा-नसते विश्वास नसतो.

**कायक्लेशभयात्त्यजेत्**—राजस माणसाला शास्त्र-मर्यादा आणि लोकमर्यादेनुसार वागण्यात शरीराला क्लेशाचा अर्थात् परिश्रमाचा अनुभव होतो.* राजस माणसाला आपला वर्ण, आश्रम इत्यादींच्या धर्मपालनात आणि माता-पिता, गुरू, स्वामी, इत्यादींच्या आज्ञापालन करण्यात पराधीनता आणि दुःखाचा अनुभव होतो तसेच त्यांची आज्ञा भंग करून मनाला वाटेल तसे वागण्यात स्वाधीनता आणि सुखाचा अनुभव होतो. राजस माणसाचे असे विचार असतात की, "गृहस्थीमध्ये आराम मिळत नाही, स्त्री-पुत्र आमच्या अनुकूल नाहीत अथवा सर्व कुंटुंबीजन मेले आहेत, घरी काम करण्यासाठी कोणी राहिला नाही, स्वतःला कष्ट सोसावे लागतात, त्यापेक्षा साधू बनलो तर मजेत राहू. अन्न, वस्त्र सर्व फुकट प्राप्त होतील, काहीही परिश्रम करावे लागणार नाहीत. एखादी सरकारी नोकरी मिळाली तर कमी काम करून आरामाने पैसे मिळतील. आम्ही काम जरी नाही केले तरी कोणी आम्हाला नोकरीवरुन काढू शकणार नाही. आम्ही नोकरी सोडू तेव्हा पेन्शन मिळत राहणार" इत्यादी. अशा विचारांमुळे त्यांना घरचा काम-धंदा करणे आवडत नाही आणि ते त्याचा त्याग करतात.

येथे शंका अशी येते की, ज्ञानप्राप्तीच्या साधनेत दुःखाकडे आणि दोषाकडे वारंवार पाहण्याविषयी सांगितले आहे (१३।८) आणि येथे कर्मांत दुःख पाहून त्यांचा त्याग करणे राजस त्याग म्हटले आहे अर्थात् कर्मांच्या त्यागाचा निषेध केला आहे. या दोन गोष्टीत परस्पर विरोध प्रतीत होतो. याचे समाधान असे आहे की, वास्तविक या दोन्हीत विरोध नाही तर या दोन्हींचा विषय वेगवेगळा आहे. तेथे (१३।८)

* क्लेशाचा अनुभव येण्याचे कारण शरीराची ममता आणि आसक्ती हेच आहे.

मध्ये भोगात दुःख आणि दोष पाहण्याविषयी म्हटले आहे आणि येथे नियत कर्तव्यकर्मांत दुःख पाहण्याविषयी म्हटले आहे. म्हणून तेथे भोगांचा त्याग करण्याविषयी म्हटले आहे आणि येथे कर्तव्यकर्मांचा त्याग करण्याचा विषय आहे. भोगांचा तर त्याग केला पाहिजे परंतु कर्तव्यकर्मांचा त्याग कधीही करू नये. कारण ज्या भोगामध्ये सुखबुद्धी आणि गुणबुद्धी होत आहे त्या भोगांत वारंवार दुःख आणि दोषाला पाहिल्याने भोगाविषयी वैराग्य होईल, त्यामुळे परमात्म-तत्वाची प्राप्ती होईल. परंतु नियत कर्तव्यकर्मांत दुःख पाहून त्या कर्मांचा त्याग करण्याने सदा पराधीनता आणि दुःख भोगावे लागेल.—**''यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः''** (३।९) तात्पर्य हे झाले की, भोगांत दुःख आणि दोष पाहण्याने भोगासक्ती सुटेल, त्यामुळे कल्याण होईल आणि कर्तव्यात दुःख पाहिल्याने कर्तव्य सुटेल, त्यामुळे पतन होईल.

कर्तव्यकर्मांचा त्याग करण्यात तर राजस आणि तामस हे दोन प्रकार होतात परंतु परिणामात (आळस, प्रमाद, अतिनिद्रा इत्यादी) दोन्ही एक होतात अर्थात् परिणामी दोन्हीही तामस होतात. ज्याचे फल अधोगती असते—**''अधो गच्छन्ति तामसाः''** (१४।१८)

एक शंका अशीही येऊ शकते की, सत्संग भगवत्कथा, भक्तचरित्र ऐकल्याने एखाद्याला वैराग्य झाले तर तो प्रभूच्या प्राप्तीसाठी आवश्यक कर्तव्यकर्मांचाही त्याग करतो आणि केवळ भगवद्भजनात लागतो. म्हणून त्याचा तो कर्तव्यकर्मांचा त्याग राजस म्हटला जावा का. ? अशी गोष्ट नाही. सांसारिक कर्मांना त्यागून जो भजनात लागतो त्याचा त्याग राजस अथवा तामस होऊ शकत नाही. कारण भगवत्प्राप्ती मनुष्यजन्माचे ध्येय आहे. म्हणून त्या ध्येयाच्या सिद्धीसाठी कर्तव्यकर्मांचा त्याग करणे वास्तविक कर्तव्याचा त्याग करणे नव्हे तर खरे कर्तव्य करणे आहे. ते खरे कर्तव्य करत असताना आळस, प्रमाद, इत्यादी दोष येऊ शकत नाहीत कारण त्याची आवड भगवंतात असते. परंतु राजस आणि तामस त्याग करणाऱ्यांत आळस, प्रमाद इत्यादी दोष येतीलच कारण त्याची आवड भोगात राहते.

**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत्**—त्यागाचे फल ''शांती'' आहे. राजस माणसास त्याग करूनही त्यागाचे फल (शांती) मिळत नाही. कारण त्याने जो त्याग केला आहे तो स्वतःच्या सुखासाठी आरामासाठीच केला आहे. असा त्याग तर पशु-पक्षी इत्यादीही करतात. आपल्या सुख आरामासाठी शुभकर्मांचा त्याग केल्याने राजस मनुष्याला शांती तर मिळत नाही, पण शुभकर्माच्या त्यागाचे फल दंडरूपाने अवश्य भोगावे लागते.

**परिशिष्ट भाव**—त्यागाचे फल शांती आहे—**'त्यागाच्छान्तिरनन्तरम्'** (गीता १२।१२) आणि आसक्तीचे फल 'दुःख' आहे—**'रजसस्तु फलं दुःखम्'** (गीता १४।१५). राजस मनुष्याला त्यागाचे फल 'शांती' तर मिळत नाही, परंतु आसक्तीचे फल 'दुःख' तर मिळतेच.

## कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन।
## सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अर्जुन** | = हे अर्जुन! | **कर्म** | = कर्म | **क्रियते** | = केले जाते |
| **कार्यम्, एव** | = 'केवळ कर्तव्य म्हणून करायचे आहे—' | **सङ्गम्** | = आसक्ती | **सः, एव** | = तो |
| | | **च** | = आणि | **सात्त्विकः** | = सात्त्विक |
| **इति** | = असे (समजून) | **फलम्** | = फलेच्छेचा | **त्यागः** | = त्याग |
| **यत्** | = जे | **त्यक्त्वा** | = त्याग करून | **मतः** | = मानला गेला आहे. |

***व्याख्या*—कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन**—येथे ''**कार्यम्**'' पदाबरोबर ''**इति**'' आणि ''**एव**'' ही दोन अव्यये लावल्याने असा अर्थ निघतो की, केवळ कर्तव्य म्हणून करावयाचे आहे. ते करण्यात कोणती फलासक्ती नाही, कोणता स्वार्थ नाही आणि कोणता क्रियाजन्य सुखभोगही नाही. अशा प्रकारे केवळ कर्तव्य म्हणून केल्याने कर्त्याचा त्या कर्माशी संबंध-विच्छेद होतो. असे झाल्याने ते कर्म बंधनकारक राहत नाही अर्थात् संसाराशी संबंध जडला जात नाही. कर्म तसेच त्याच्या फलात आसक्त झाल्यानेच बंधन होते—**''फले सक्तो निबध्यते''** (५।१२)

शास्त्रविहित कर्मांमध्येसुद्धा देश, काळ, वर्ण, आश्रम, परिस्थिती यानुसार ज्या ज्या कर्मात ज्याची ज्याची नियुक्ती केली जाते, ती सर्व नियतकर्म म्हटली जातात. जसे साधूने असे वागावे, गृहस्थीने असे केले पाहिजे, ब्राह्मणाने अमुक

काम करावे, क्षत्रियाने अमुक काम केले पाहिजे इत्यादी. ती कर्म प्रमाद, आळस, उपेक्षा, उदासीनता इत्यादी दोषरहित होऊन तत्परता आणि उत्साहपूर्वक केली पाहिजेत. म्हणूनच भगवंतांनी कर्मयोगाच्या प्रसंगात जाग-जागी "**समाचर**" शब्द दिला आहे. (३।९, १९)

**सङ्गं त्यक्त्वा फलं चैव**—संगाच्या त्यागाचे तात्पर्य हे आहे की, कर्म, कर्म करण्याचे साधन (करण) यांच्याविषयी आसक्ती, प्रियता, ममता इत्यादी नसावी आणि फलाच्या त्यागाचे तात्पर्य, कर्माच्या परिणामाशी संबंध नसावा अर्थात् फलाची इच्छा नसावी, हे आहे. या दोन्हीचे तात्पर्य कर्म आणि फलात आसक्ती तसेच इच्छेचा त्याग व्हावा, हे आहे.

**स त्यागः सात्त्विको मतः***—कर्म आणि फलात आसक्ती तसेच कामनेचा त्याग करून केवळ कर्तव्य समजून कर्म करण्याने तो त्याग सात्त्विक होतो. राजस त्यागात शरीरास क्लेश होण्याच्या भीतीने आणि तामस त्यागात मोहपूर्वक कर्मांचा स्वरूपाने त्याग केला जातो, परंतु सात्त्विक त्यागात कर्मांचा स्वरूपाने त्याग केला जात नाही, उलट कर्म सावधपणे, तसेच तत्परतेने, विधिपूर्वक, निष्कामभावनेने केली जातात. सात्त्विक त्यागाने कर्माशी आणि कर्मफलरूप शरीर-संसाराशी संबंध-विच्छेद होतो. राजस आणि तामस त्यागात कर्मांचा स्वरूपाने त्याग करण्याने केवळ बाहेरुन कर्माशी संबंध-विच्छेद झालेला दिसतो, परंतु वास्तविक (अंत:करणातून) संबंध-विच्छेद होत नाही. याचे कारण असे आहे की, शरीराच्या कष्टाच्या भीतीने कर्मांचा त्याग करण्याने कर्म तर सुटतात, परंतु आपल्या सुख आरामाशी संबंध जडलेलाच राहतो. तसेच मोहपूर्वक त्याग करण्याने कर्म तर सुटतात, परंतु मोहाशी संबंध जडलेला राहतो. तात्पर्य हे झाले की, कर्मांचा स्वरूपाने त्याग करण्याने बंधन होते आणि कर्म तत्परतेने, विधिपूर्वक केल्यास मुक्ती (संबंध-विच्छेद) होते.

**परिशिष्ट भाव**—तमोगुणात मूढता (मूर्खता) आहे आणि रजोगुणात स्वार्थबुद्धी आहे, तर सत्त्वगुणात मूढताही नाही किंवा स्वार्थबुद्धीही नाही, तर संबंध-विच्छेद आहे. सात्त्विक मनुष्य केवळ कर्तव्य समजून सर्व नियतकर्म करतो. एक मार्मिक गोष्ट आहे की, केवळ कर्तव्य समजून जे काही कर्म केले जाते त्याने संबंध-विच्छेद होतो. लौकिक साधन कर्मयोग आणि ज्ञानयोग यात शरीर-संसाराशी संबंध-विच्छेद मुख्य आहे. म्हणून साधकाने प्रत्येक कर्म कर्तव्यमात्र समजून करावे. स्वरूपाने कर्मांचा त्याग केल्याने तर बंधन होते, परंतु संबंध न जोडल्यास केवळ कर्तव्य समजून कर्म केल्यास मुक्ती प्राप्त होते.†

येथे शंका होऊ शकते की, प्रस्तुत श्लोकात तर कर्म करण्याची गोष्ट आली आहे, त्यागाची गोष्ट आलीच नाही, मग हा सात्त्विक त्याग कसा झाला? याचे समाधान असे आहे की, सात्त्विक कर्त्यात मोहही नाही, स्वार्थही नाही, फलेच्छाही नाही, केवळ कर्तव्यमात्र आहे. म्हणून कर्माशी कर्त्याचा कोणताही संबंध नसल्याने हा 'त्याग' झाला. कर्तव्यमात्र जड विभागातच राहिले, चेतनाशी संबंध झाला नाही. जेव्हा चेतन (शरीरी) शरीराशी संबंध जोडतो, तेव्हा शरीरद्वारा होणाऱ्या कर्माशी त्याचा संबंध जडतो. जर तो शरीराशी संबंध जोडणार नाही केवळ कर्तव्यमात्र करेल तर त्याचा कर्माशी संबंध जडणार नाही. शरीर-संसाराशी संबंध-विच्छेद झाल्यामुळे याचे नाव 'त्याग' झाले. यात कर्म आणि फल दोन्हीशी संबंध-विच्छेद आहे.

***संबंध**—सहाव्या श्लोकात "**एतानि**" आणि "**अपि तु**" पदांनी सांगितलेले यज्ञ, दान, तप इत्यादी शास्त्रविहित कर्म करण्यात आणि शास्त्रनिषिद्ध तसेच काम्यकर्मांचा त्याग करण्यात कोणता भाव असावा? हे पुढील श्लोकात सांगतात.*

---

* संपूर्ण गीतेत जेथे कोठे (७।१२; १४।५-१८, २२; १७।१,२, ८-१०, ११-१३, १७-२२ आणि १८।२०-२८, ३०-३५, ३७-३९ मध्ये) गुणांचे वर्णन आले आहे तेथे सत्त्व, रज आणि तम—असाच क्रम ठेवला गेला आहे. केवळ येथेच (१८।७-९ मध्ये) व्यतिक्रम झाला आहे अर्थात् तम, रज आणि सत्त्व—असा क्रम ठेवला गेला आहे. याचे कारण (१) जर सहाव्या श्लोकानंतरच (सातव्या श्लोकात) सात्त्विक त्यागाचे वर्णन केले असते तर भगवंताच्या निश्चित मतामध्ये आणि सात्त्विक त्यागामध्ये पुनरुक्तीचा दोष आला असता (२) कोणत्याही वस्तूची उत्तमता, त्या वस्तूच्या अगोदर अनुत्तम वस्तूंचे वर्णन केल्यानेच, सिद्ध होते. म्हणून भगवान् सात्त्विक त्यागाची उत्तमता सिद्ध करण्यासाठी प्रथम अनुत्तम तामस आणि राजस त्यागाचे वर्णन करतात. (३) पुढे दहाव्यापासून बाराव्या श्लोकापर्यंत "सात्त्विक त्यागी" याचे वर्णन झाले आहे. जर सात्त्विक त्यागाचे वर्णन सात्त्विक त्यागीजवळ (नवव्या श्लोकात) दिले नसते तर तामस त्यागाजवळ झाल्याने सात्त्विक त्यागी याचा संबंध जुटला नसता.

†अलौकिक साधन (भक्तियोग) यात भगवंताशी संबंध जोडणे मुख्य आहे. म्हणून भक्ताने जप, ध्यान, कीर्तन इत्यादी कर्तव्य समजून करू नये, तर आपल्या प्रियतमाचे काम (सेवा-पूजन) समजून त्यांच्या प्रसन्नतेसाठी प्रेमपूर्वक करावे. भगवंताची प्रत्येक वस्तू (नाम, रूप इत्यादी) प्रिय लागावी. भगवंताचे काम करण्यात आनंद यावा. जसे, औषध कर्तव्य समजून घेतले जाते, परंतु भोजन कर्तव्य समजून केले जात नाही, तर स्वत:ची भूक शमन व्हावी यासाठी केले जाते. म्हणून भक्ताने जप, ध्यान कर्तव्यमात्र समजून त्यागाच्या उद्देशाने करू नये तर भगवंताशी संबंध जागृत करण्यासाठी करावे. जर तो जप आणि ध्यान इत्यादीही कर्तव्य समजून करेल तर भगवत्संबंध जागृत होणार नाही, प्रेमाचा उदय होणार नाही.

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः॥ १०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अकुशलम्** | = (जो) अकुशल | **कुशले** | = कुशल कर्मात | **मेधावी** | = बुद्धिमान्, |
| **कर्म** | = कर्मांशी | **न, अनुषज्जते** | = आसक्त होत नाही, | **छिन्नसंशयः** | = संदेहरहित (आणि) |
| **न, द्वेष्टि** | = द्वेष करीत नाही (आणि) | **त्यागी** | = (तो) त्यागी | **सत्त्वसमाविष्टः** | = आपल्या स्वरूपात स्थित असतो. |

*व्याख्या*— **न द्वेष्ट्यकुशलं कर्म**—जी शास्त्रविहित शुभकर्म फलाच्या कामनेने केली जातात आणि परिणामी ज्यांच्यामुळे पुनर्जन्म होतो (२।४२-४४; ९।२०-२१) तसेच जी शास्त्रनिषिद्ध पापकर्म आहेत आणि परिणामी ज्यामुळे नीच योनीं आणि नरकांत जावे लागते (१६।७-२०), ती सर्वच कर्म "अकुशल" म्हटली जातात. साधक अशा अकुशल कर्मांचा तर त्याग करतो पण द्वेषपूर्वक नव्हे! कारण द्वेषपूर्वक त्याग करण्याने कर्माशी तर संबंध सुटतो परंतु द्वेषाशी संबंध जडला जातो, जो शास्त्रविहित काम्य कर्मांपेक्षा तसेच शास्त्रनिषिद्ध पापकर्मांपेक्षाही भयंकर आहे.

**कुशले नानुषज्जते**—शास्त्रविहित कर्मांमध्ये सुद्धा जी वर्ण, आश्रम, परिस्थिती इत्यादीनुसार नियत आहेत आणि जी आसक्ती आणि फलेच्छेचा त्याग करून केली जातात, तसेच परिणामी ज्यांच्याने मुक्ती प्राप्त होते, अशी सर्व कर्म "कुशल" म्हटली जातात. साधक अशा कुशल कर्मांना करून सुद्धा त्यात आसक्त होत नाही.

**त्यागी**—कुशल कर्म करण्यात ज्याची आसक्ती नसते आणि अकुशल कर्म त्यागात ज्याचा द्वेष नसतो, तोच वास्तविक त्यागी आहे* परंतु, जेव्हा कर्म करणे अथवा न करणे यामुळे त्याच्यात कोणताही फरक पडत नाही अर्थात् निरंतर निर्लिप्तता कायम राहते, तेव्हाच तो त्याग पूर्णपणे सिद्ध होतो (३।१८; ४।१८). असे झाल्यास साधक "योगारूढ" होतो (६।४)

**मेधावी**—ज्याची संपूर्ण कार्य सांगोपांग होतात आणि संकल्प आणि कामनारहित असतात तसेच ज्ञानरूपी अग्नीने संपूर्ण कर्म ज्याने भस्म केली आहेत त्याला पंडित देखील पंडित (मेधावी अथवा बुद्धिमान्) म्हणतात. (४।१९) कारण कर्म करूनही कर्मांशी लिप्त न होणे ही मोठी बुद्धिमत्ता आहे.

याच मेधावीला चौथ्या अध्यायाच्या अठराव्या श्लोकात "**स बुद्धिमान्मनुष्येषु**" पदांनी संपूर्ण मनुष्यांत बुद्धिमान् म्हटले गेले आहे.

**छिन्नसंशयः**—त्या त्यागी पुरुषात कोणताही संदेह राहत नाही. तत्त्वात अभिन्नभावाने स्थित राहत असल्यामुळे त्याच्या ठिकाणी कोणत्याही प्रकारचा संदेह राहण्याची शक्यताच राहत नाही. जेव्हा अर्धवट ज्ञान असते अर्थात् काही जाणतो आणि काही जाणत नाही, तेव्हाच संदेह राहतो.

**सत्त्वसमाविष्टः**—आसक्ती इत्यादीचा त्याग झाल्याने त्याची आपल्या स्वरूपात, चिन्मयतेत आपोआप स्थिती होते. म्हणून त्याला "**सत्त्वसमाविष्टः**" म्हटले गेले आहे. यालाच पाचव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकात "**तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः**" पदांनी परमात्म्यात स्थित सांगितले गेले आहे.

**परिशिष्ट भाव**—या श्लोकाचे तात्पर्य राग-द्वेषाचा त्याग करण्यात आहे. मनुष्याचा स्वभाव असा असतो की, तो आसक्तीपूर्वक ग्रहण आणि द्वेषपूर्वक त्याग करतो. राग आणि द्वेष—दोन्हीपासूनही संसाराशी संबंध जडतो. भगवान् म्हणतात की, वास्तविक तोच मनुष्य श्रेष्ठ आहे, जो शुभ कर्माचे तर ग्रहण करतो परंतु आसक्तीपूर्वक नव्हे आणि अशुभ कर्माचा त्याग तर करतो परंतु द्वेषपूर्वक नव्हे.

***संबंध**—कर्म करण्यात राग नसावा आणि त्यागण्यात द्वेष नसावा इतकी भानगड कराच कशाला? कर्मांचा पूर्णपणेच त्याग का करू नये? ही शंका दूर करण्यासाठी पुढील श्लोक सांगतात.*

---

* दोषबुद्ध्योभयातीतो निषेधान्न निवर्तते। गुणबुद्ध्या च विहितं न करोति यथार्भकः॥

(श्रीमद्भा० ११।७।११)

"जो पुरुष अनुकूलता-प्रतिकूलतारूपी द्वंद्वांच्या पलीकडे जातो, तो शास्त्रनिषिद्ध कर्मांचा त्याग करतो परंतु द्वेषबुद्धीने नव्हे आणि शास्त्रविहित कर्म करतो परंतु गुणबुद्धीने अर्थात् रागपूर्वक नाही. जसे गुडघ्यावर रांगणाऱ्या मुलाची प्रवृत्ती आणि निवृत्ती राग-द्वेषपूर्वक नसते, तसेच उभयातीत पुरुषाची प्रवृत्ती आणि निवृत्तीसुद्धा रागद्वेषपूर्वक नसते (मुलात तर अज्ञता असते परंतु राग-द्वेषरहित पुरुषात विज्ञता असते)".

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते॥ ११॥**

**हि** = कारण
**देहभृता** = देहधारी मनुष्याद्वारा
**अशेषतः** = संपूर्ण
**कर्माणि** = कर्मांचा
**त्यक्तुम्** = त्याग करणे
**न, शक्यम्** = संभव नाही.
**तु** = म्हणून
**यः** = जो
**कर्मफलत्यागी** = कर्मफलाचा त्यागी आहे
**सः** = तोच
**त्यागी** = त्यागी आहे—
**इति** = असे
**अभिधीयते** = म्हटले जाते.

*व्याख्या*— **न हि देहभृता* शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः**— देहधारी अर्थात् देहाशी तादात्म्य ठेवणाऱ्या मनुष्याकडून कर्मांचा संपूर्णपणे त्याग होणे शक्य नाही, कारण शरीर प्रकृतीचे कार्य आहे आणि प्रकृती स्वाभाविक क्रियाशील आहे. म्हणून शरीराशी तादात्म्य (ऐक्य) ठेवणारा क्रियारहित कसा होऊ शकतो ? मात्र हे होऊ शकते की, मनुष्य यज्ञ, दान, तप, तीर्थ इत्यादी कर्मांचा त्याग करेल परंतु तो खाणे-पिणे, चालणे-फिरणे, येणे-जाणे, उठणे-बसणे, झोपणे-जागणे, इत्यादी आवश्यक शारीरिक क्रियांना कसा त्यागू शकतो ?

दुसरी गोष्ट, अंत:करणातून कर्मांचा संबंध सोडणेच वास्तविक त्याग आहे. बाहेरुन संबंध सोडला जाऊ शकत नाही. जरी बाहेरुन संबंधाचा त्याग झाला तरी तो किती वेळपर्यंत टिकून राहिल? जसे एखाद्याने समाधी लावली त्यावेळी बाहेरच्या क्रियांशी संबंध सुटतो. परंतु समाधीसुद्धा एक क्रिया आहे, एक कर्म आहे, कारण यात प्रकृतीजन्य कारणशरीराचा संबंध राहतो. म्हणून समाधीतूनही व्युत्थान होते.

कोणताही देहधारी मनुष्य कर्मांचा स्वरूपाने संबंध-विच्छेद करू शकत नाही. (३।५) कर्मांचा आरंभ केल्याशिवाय निष्कर्मता (योगनिष्ठा) प्राप्त होत नाही आणि कर्मांचा केवळ त्याग केल्याने सिद्धी (सांख्यनिष्ठा) ही प्राप्त होत नाही. (३।४)

### मार्मिक गोष्ट

पुरुष (चेतन) सदा निर्विकार आणि एकरस राहणारा आहे परंतु प्रकृती विकारी आणि सदा परिवर्तनशील आहे. जिच्यामध्ये चांगल्या प्रकारची क्रियाशीलता असते तिला ''प्रकृती'' म्हणतात—''**प्रकर्षेण करणं (भावे ल्युट्) इति प्रकृतिः।**''

त्या प्रकृतीचे कार्य शरीर ह्याच्याशी जोपर्यंत पुरुष आपला संबंध (तादात्म्य) मानत राहील, तोपर्यंत तो कर्मांचा पूर्णपणे त्याग करूच शकत नाही. कारण शरीराविषयी अहंता, ममता असल्यामुळे मनुष्य शरीराकडून होणाऱ्या प्रत्येक क्रियेला आपली क्रिया मानतो, म्हणून तो कधीही कोणत्याही अवस्थेत क्रियारहित होऊ शकत नाही.

दुसरी गोष्ट, केवळ पुरुषानेच प्रकृतीशी आपला संबंध जोडला आहे. प्रकृतीने पुरुषाशी संबंध जोडला नाही. जेथे विवेक राहतो, तेथे पुरुषाने विवेकाची उपेक्षा करून प्रकृतीच्या संबंधाची सद्भावना करून घेतली अर्थात् संबंधाला सत्य मानले. संबंधाला सत्य मानल्यानेच बंधन झाले आहे. तो संबंध दोन प्रकारचा असतो. आपणाला शरीर मानणे आणि शरीराला आपले मानणे. आपणाला शरीर मानल्याने ''अहंता'' आणि शरीराला आपले मानल्याने ''ममता'' होते. या अहंता-ममतारूपी संबंधाची घनिष्ठता होणे हेच देहधाऱ्याचे स्वरूप आहे असा देहधारी पुरुष कर्मांचा सर्वथा त्याग करू शकत नाही.

**यस्तु† कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते**—जो कोणत्याही कर्म आणि फलाशी आपला संबंध ठेवीत नाही, तोच त्यागी आहे. जोपर्यंत मनुष्य कुशल-अकुशल, चांगल्या-वाईटाशी आपला संबंध ठेवतो तोपर्यंत तो त्यागी नाही.

हा पुरुष ज्या प्राकृत क्रिया आणि पदार्थास आपले मानतो, त्यात त्याची प्रियता होते. त्याच प्रियतेला ''आसक्ती'' म्हणतात. ही आसक्तीच वर्तमानातील कर्माविषयी ''कर्मासक्ती'' आणि भविष्यात मिळणाऱ्या फलाच्या इच्छेला अनुसरून ''फलासक्ती'' म्हटली जाते. जेव्हा मनुष्य फलत्यागाचा उद्देश निश्चित करतो तेव्हा त्याची सर्व कर्म संसाराच्या हितासाठी होऊ लागतात, आपल्यासाठी

† येथे ''देहभृता'' पदाला देहाभिमानी अर्थात् देहाशी तादात्म्य मानणाऱ्या सामान्य पुरुषांचेच वाचक समजावे. गुणातीत महापुरुषाच्या देहाकडूनही क्रिया होत राहतात परंतु देहाशी तादात्म्य नसल्याकारणाने त्याचा त्या क्रियांशी कोणताही संबंध नसतो अर्थात् तो त्या क्रियांचा कर्ता बनत नाही.

* येथे ''तु'' अव्ययाचा प्रयोग करण्याचे तात्पर्य हे आहे की जे सामान्य संसारी पुरुष आहेत, त्यांच्यापेक्षा कर्मफलाचा त्याग करणारा श्रेष्ठ आहे, विलक्षण आहे. कारण त्याचा उद्देश परमात्मतत्त्वाची प्राप्ती करण्याचा अर्थात् आपले कल्याण करण्याचा असतो.

नव्हे. कारण त्याला ही गोष्ट चांगल्या रीतीने समजून येते की, कर्म करण्याची सर्वची सर्व सामुग्री संसारापासून मिळाली आहे आणि संसाराचीच आहे, आपली नव्हे. या कर्मांचाही आदी आणि अंत होतो तसेच त्यांचे फलसुद्धा उत्पन्न आणि नष्ट होणारे आहे. परंतु स्व सदा निर्विकार राहतो. तो उत्पन्नही होत नाही, नष्टही होत नाही आणि कधी विकृतही होत नाही. असा विवेक झाल्यास फलेच्छेचा त्याग सुगमतेने होतो. फलाचा त्याग करण्यात त्या विवेकी मनुष्याला कधी अभिमानही येत नाही, कारण कर्म आणि त्याचे फल—दोन्हीही आपल्यापासून प्रत्येक क्षणाला वियुक्त होत आहेत. म्हणून त्यांच्याशी आपला संबंध वास्तविक आहेच कोठे ? म्हणूनच भगवान् म्हणतात की, जो कर्मफलाचा त्यागी आहे, तोच त्यागी म्हटला जातो.

निर्विकाराचा विकारी कर्मफलाशी संबंध कधी नव्हता, आत्ता नाही, होऊ शकत नाही आणि होण्याची शक्यताही नाही. केवळ अविवेकामुळे संबंध मानला होता. तो अविवेक नष्ट झाल्यामुळे मनुष्याची अभिधा अर्थात् त्याचे नाव "त्यागी" होते "**स त्यागीत्यभिधीयते**".

मानलेल्या संबंधाच्या विषयात दृष्टांतरूपाने एक गोष्ट सांगितली जाते. एक व्यक्ती घर-परिवार सोडून अगदी मना-पासून साधू-संन्यासी होतो. त्यानंतर परिवाराची कितीही उन्नती झाली अथवा अवनती झाली अथवा ते सर्व मेले, नामशेष झाले तरीसुद्धा त्याच्यावर काहीच परिणाम होत नाही. आता यात विचार करा की, त्या व्यक्तीचा परिवाराशी जो संबंध होता, तो दोन्ही बाजूंनी मानलेला होता अर्थात् तो परिवाराला आपले मानीत होता आणि परिवार याला आपले मानीत होता. परंतु पुरुष आणि प्रकृतीचा संबंध केवळ पुरुषाकडून मानलेला आहे, प्रकृतीकडून मानलेला नाही. जर दोन्हीकडून मानलेला (व्यक्ती आणि परिवाराचा) संबंधसुद्धा एकीकडून सोडल्याने सुटतो, तर मग केवळ एका बाजूनेच मानलेला (पुरुष आणि प्रकृतीचा) संबंध सोडल्यावर सुटून जाईल यात काय संशय ?

**परिशिष्ट भाव**—हा श्लोक कर्मयोगाच्या दृष्टीतून म्हटला गेला आहे. कर्मयोगात कर्मफलाच्या इच्छेचा त्याग असतो आणि ज्ञानयोगात कर्तृत्वाभिमानाचा त्याग असतो.

'कर्मफलत्याग' याचे तात्पर्य आहे—कर्मफलाच्या इच्छेचा त्याग. कारण कर्मफलाचा त्याग होऊच शकत नाही. जसे—शरीरही कर्मफल आहे, मग त्याचा त्याग कसा होईल? भोजन केल्यास तृप्तीचा त्याग कसा होईल! शेती केल्यास धान्याचा त्याग कसा होईल? म्हणून साधकाने कर्मफलाच्या इच्छेचा त्याग करावा. फलेच्छेचा त्याग केल्यास साधक सुखी-दु:खी होणार नाही. म्हणून गीतेत फलेच्छेच्या त्यागालाच फलाचा त्याग म्हटले गेले आहे.

बाह्यत्याग वास्तविक त्याग नव्हे, तर अंत:करणातील त्याग हाच त्याग आहे. कोणी बाह्यत्याग करून जर एकांतात जाईल तरीही संसाराचे बीज असलेले शरीर तर त्याच्याबरोबर आहेच. मरणाऱ्याचा स्वत:च्या शरीरासहित सर्व वस्तूंचा त्याग होतो, परंतु त्यापासून मुक्ती प्राप्त होत नाही. म्हणून आपली कामना-ममता-आसक्ती याच बांधणाऱ्या आहेत, संसार नव्हे. म्हणून स्वत: साठी काही न केल्यास कर्मांशी संबंध-विच्छेद होतो—'**यज्ञायाचरत: कर्म समग्रं प्रविलीयते**'. (गीता ४। २३)

***संबंध**—पूर्व श्लोकात सांगितले गेले की, कर्मफलाचा त्याग करणाराच वास्तविक त्यागी आहे. जर मनुष्याने कर्मफलाचा त्याग केला नाही तर काय होते हे पुढील श्लोकात सांगतात.*

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मण: फलम्।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु सन्न्यासिनां क्वचित्॥ १२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अत्यागिनाम्** | = कर्मफलाचा त्याग न करणाऱ्या मनुष्यांना | **च** | = आणि | **तु** | = परंतु |
| | | **मिश्रम्** | = मिश्रित— | **सन्न्यासिनाम्** | = कर्मफलाचा त्याग करणाऱ्याला |
| **कर्मण:** | = कर्मांची | **त्रिविधम्** | = (अशी) तीन प्रकारची फले | | |
| **इष्टम्** | = ईष्ट, | | | **क्वचित्** | = कुठेही |
| **अनिष्टम्** | = अनिष्ट | **प्रेत्य** | = मृत्यूनंतरही मिळतात. | **न** | = फल मिळत नाही. |

*व्याख्या*— **अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मण: फलम्**—कर्माचे फल तीन प्रकारचे असते— इष्ट, अनिष्ट आणि मिश्र. मनुष्य ज्या परिस्थितीचा इच्छुक असतो ते "**इष्ट**" कर्मफल आहे, ज्या परिस्थितीची इच्छा माणसाला नसते ते "**अनिष्ट**" कर्मफल आहे आणि ज्या परिस्थितीत काही भाग इष्टाचा आणि काही भाग अनिष्टाचा असतो ते

"**मिश्र**" कर्मफल आहे. वास्तविक पाहिले तर संसारात मिश्रच फल मिळत असते. जसे धन असल्यास अनुकूल (इष्ट) आणि प्रतिकूल (अनिष्ट) दोन्ही परिस्थिती येतात. धनाने निर्वाह होतो—ही अनुकूलता आहे आणि कर लागतो, धन नष्ट होते चोरी होते—ही प्रतिकूलता आहे. तात्पर्य हे आहे की, इष्टातही आंशिक अनिष्ट आणि अनिष्टातही आंशिक इष्ट राहतच असते. कारण संपूर्ण संसार त्रिगुणात्मक आहे. (१८।४०) हा जन्मसुद्धा दु:खालय (८।१५) आणि सुखरहित (९।३३) आहे. म्हणून मग इष्ट (अनुकूल) परिस्थिती असो अथवा अनिष्ट (प्रतिकूल) परिस्थिती असो, ती संपूर्णपणे अनुकूल अथवा प्रतिकूल नसतेच. येथे इष्ट आणि अनिष्ट म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, इष्टात अनुकूलतेची आणि अनिष्टात प्रतिकूलतेची प्रधानता असते. वास्तविक कर्मांचे फल मिश्रितच असते. कारण कोणतेही कर्म सर्वथा निर्दोष नसते (१८।४८).

**भवत्यत्यागिनां प्रेत्य**—उपर्युक्त सर्व फले अत्यागींना अर्थात् फलाची इच्छा ठेवून कर्म करणाऱ्यांनाच मिळतात, संन्यासी व्यक्तींना नव्हे. कारण जितकी काही कर्म होतात ती सर्व प्रकृतीद्वारा अर्थात् प्रकृतीचे कार्य शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धिद्वाराच होतात तसेच फलरूप परिस्थितीसुद्धा प्रकृतीद्वाराच बनते. म्हणून कर्मांचा आणि त्यांच्या फलांचा संबंध केवळ प्रकृतीशी आहे "स्व" शी (चेतन स्वरूप) नव्हे परंतु जेव्हा "स्व" त्यांच्यापासून, संबंध तोडून घेतो तेव्हा तो भोगी होत नाही उलट त्यागी होतो.

अत्यागी म्हणजे मागील दोन (दहाव्या-अकराव्या) श्लोकांत ज्या त्यागी व्यक्तीबद्दल सांगितले आहे, त्यांच्या-सारखा जो त्यागी नाही अर्थात् ज्यांनी कर्मफलाचा त्याग केला नाही, अशा अत्यागी माणसांसमोर इष्ट, अनिष्ट आणि मिश्र तिन्ही कर्मफले अनुकूल व प्रतिकूल परिस्थितीच्या रूपाने येत राहतात. ज्यामुळे ते सुखी-दु:खी होत राहतात. त्यांच्यापासून सुखी-दु:खी होणे हेच वास्तविक बंधन आहे.

वास्तविक, अनुकूलतेने सुखी होणे हेच प्रतिकूलतेत दु:खी होण्याला कारण आहे. कारण परिस्थितीजन्य सुख भोगणारा कधीही दु:खापासून बचाव करूच शकत नाही. जोपर्यंत तो सुख भोगत राहील तोपर्यंत तो प्रतिकूल परिस्थितींत दु:खी होतच राहील. चिंता, शोक, भय, उद्वेग, इत्यादी त्याला कधी सोडू शकत नाहीत आणि तोही यांच्यापासून कधी सुटू शकत नाही.

**प्रेत्य भवति**—म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जे कर्मफलाचे त्यागी नाहीत, त्यांना इष्ट, अनिष्ट आणि मिश्र—ही तिन्ही कर्मफले मृत्यूनंतर जरूर मिळतात. परंतु त्याचबरोबर "**न तु सन्यासिनां क्वचित्**" पदांत म्हटले गेले आहे की, जे कर्मफलाचे त्यागी आहेत त्यांना कोठेही अर्थात् येथे आणि मृत्यूनंतरसुद्धा कर्मफल मिळत नाही. यावरुन सिद्ध होते की, अत्यागींना मृत्यूनंतर तर कर्मफल मिळतच असते परंतु येथेही जिवंतपणीसुद्धा कर्मफल मिळू शकते.

**न तु सन्यासिनां क्वचित्**—संन्यासींना (त्यागी व्यक्तींना) कोठेही अर्थात् इहलोकी अथवा परलोकी, या जन्मात अथवा मृत्यूनंतरसुद्धा कर्मफल भोगावे लागत नाही. मात्र पूर्वजन्मात केलेल्या कर्मानुसार या जन्मात त्यांच्यासमोर अनुकूल, प्रतिकूल परिस्थिती तर येते, परंतु ते आपल्या विवेकाच्या बलाने त्या परिस्थितींचे भोगी होत नाहीत. त्यांपासून सुखी-दु:खी होत नाहीत अर्थात् सर्वथा निर्लिप्त राहतात.

संन्यासींना (त्यागी व्यक्तींना) फल का भोगावे लागत नाही? कारण ते आपल्यासाठी काहीच करीत नाहीत. त्यांचा चांगल्या प्रकारे असा विवेक असतो की, आपले जे सत्स्वरूप आहे, त्याला कोणतीही क्रिया आणि वस्तूची आवश्यकताच नाही. आपल्यासाठी मिळविण्याच्या इच्छेने साधक जे काही करतो तर तो आपल्या व्यक्तित्वालाच स्थिर ठेवतो कारण तो संसाराच्या हिताहून आपले हित वेगळे मानतो. जेव्हा तो संपूर्ण संसाराच्या हिताहून आपले हित वेगळे मानीत नाही अर्थात् सर्वांच्या हितातच आपले हित मानतो, तेव्हा तो आपोआप "**सर्वभूतहिते रता:**" होतो. मग त्याच्या स्थूल शरीराकडून होणाऱ्या क्रिया, सूक्ष्मशरीराने होणारे परहित चिंतन आणि कारणशरीराने होणारी स्थिरता—तिन्हीही संपूर्ण संसारातील प्राण्यांच्या हितासाठीच होत असतात. कारण शरीरादी सर्वची सर्व सामुग्री संसाराशी अभिन्न आहे. त्या सामुग्रीपासून आपले हित इच्छितो हीच चूक आहे, जी आपल्या परिच्छिन्नतेत हेतू आहे.

येथे "**संन्यासिनाम्**" पदात त्यागी (कर्मयोगी) आणि संन्यासी (सांख्ययोगी)—दोघांची एकता केली गेली आहे. जसे कर्मयोगी कर्माशी असंग राहतो तर सांख्ययोगी-सुद्धा कर्मांशी सर्वथा निर्लिप्त राहतो. कर्मयोगी (निष्कामभावनेने) कर्म करूनही फलाशी संबंध ठेवीत नाही तर सांख्ययोगी संपूर्ण कर्मांशी किंचित्मात्रही संबंध ठेवीत नाही. कर्मयोगी फलाशी संबंध-विच्छेद करतो अर्थात् ममतेचा त्याग करतो तर सांख्ययोगी कर्तृत्वाभिमान अर्थात् अहंतेचा त्याग करतो. ममतेचा त्याग झाल्यास अहंतेचाही आपोआप त्याग होतो आणि अहंतेचा त्याग झाल्यास ममतेचाही आपोआप त्याग होतो. म्हणून भगवंतांनी

कर्मयोगात ममतेच्या त्यागानंतर अहंतेचा त्याग सांगितला आहे—"**निर्ममो निरहङ्कारः**" (२।७१) आणि सांख्ययोगात अहंतेच्या त्यागानंतर ममतेचा त्याग सांगितला आहे—"**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्। विमुच्य निर्ममः .......**" (१८।५३) 'या दोघांच्या त्याग करण्याच्या प्रक्रियेत तर फरक आहे परंतु परिवर्तनशील प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य—यापैकी कोणाशीही या दोघांचा संबंध राहत नाही अर्थात् तत्त्वाने कर्मयोगी आणि सांख्ययोगी दोन्ही एक होतात.

अर्जुनाने यापूर्वी असे विचारले होते की, "मी संन्यासाचे आणि त्यागाचे तत्त्व जाणू इच्छितो" म्हणून भगवंतांनी येथे "**संन्यासिनाम्**" पदाने दोन्हींचे असे तत्त्व सांगितले की, कर्मयोग्याचा असा भाव असतो की, आपले काहीही नाही, आपल्यासाठी काहीही नको आणि आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही. तसेच सांख्ययोग्याचा हा भाव राहतो की, आपले काहीही नाही आणि आपल्यासाठी काहीही नको. सांख्ययोगी प्रकृती आणि प्रकृतीच्या कार्याशी किंचित्मात्रही आपला संबंध मानीत नाही. म्हणून त्याच्यासाठी "आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही" असे म्हणता येत नाही.

येथे "**त्यागिनाम्**" पद न देता "**संन्यासिनाम्**" पद देण्याचे हे तात्पर्य आहे की, जी निर्लिप्तता सांख्ययोगाने होते तीच निर्लिप्तता त्यागाने अर्थात् कर्मयोगानेही होते (५।४-५). दुसरी गोष्ट भगवंतांनी आत्तापर्यंत कर्मयोगाने निर्लिप्तता दाखविली. आता "**संन्यासिनाम्**" पद देऊन पुढे सांख्ययोगाने निर्लिप्तता दाखविण्याचे बीज पेरीत आहेत.

## कर्मासंबंधी विशेष गोष्ट

पुरुष आणि प्रकृती—हे दोन आहेत. यापैकी पुरुषात कधी परिवर्तन होत नाही आणि प्रकृती कधी परिवर्तनरहित राहत नाही. जेव्हा हा पुरुष प्रकृतीशी संबंध जोडतो, तेव्हा प्रकृतीची क्रिया पुरुषाचे "कर्म" बनते. कारण प्रकृतीशी संबंध मानल्याने तादात्म्य होते. तादात्म्य झाल्याने ज्या प्राकृत वस्तू प्राप्त आहेत, त्यांच्याविषयी ममता होते आणि त्या ममतेमुळे अप्राप्त वस्तूंची कामना होते. अशा प्रकारे जोपर्यंत कामना, ममता आणि तादात्म्य राहते, तोपर्यंत जी काही परिवर्तनरूपी क्रिया होते, तिचे नाव "कर्म" आहे

तादात्म्य संपल्यावर तेच कर्म पुरुषासाठी "अकर्म" होते अर्थात् ते कर्म केवळ क्रिया राहते. त्यात फलजनकता राहत नाही—हे "कर्मात अकर्म" आहे. अकर्म अवस्थेत अर्थात् स्वरूपाचा अनुभव झाल्यास त्या महापुरुषाच्या शरीराकडून जी क्रिया होत राहते ते "अकर्मात कर्म" आहे (४।१८). तात्पर्य हे झाले की, आपल्या निर्लिप्त स्वरूपाचा अनुभव झाला नसेल तेव्हाही वास्तविक सर्व क्रिया प्रकृती आणि तिचे कार्य शरीर यात होतात परंतु प्रकृती अथवा शरीराशी आपल्या अलिप्ततेचा अनुभव न झाल्यामुळे त्या क्रिया "कर्म" बनतात (३।२७; १३।२९)

कर्म तीन प्रकारची असतात. क्रियमाण, संचित आणि प्रारब्ध! आत्ता वर्तमानात जी कर्म केली जातात ती "**क्रियमाण**" कर्म म्हटली जातात.* वर्तमानापूर्वी या जन्मात केलेली अथवा पूर्वीच्या अनेक मनुष्यजन्मात केलेली जी कर्म संगृहीत आहेत ती "**संचित**" कर्म म्हटली जातात. संचित कर्मातून जी कर्म फल देण्यासाठी प्रस्तुत (उन्मुख) झाली आहेत अर्थात् जन्म, आयुष्य आणि अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीच्या रूपात परिणत होण्यासाठी समोर आलेली आहेत ती "**प्रारब्ध**" कर्म म्हटली जातात.




क्रियमाण कर्म दोन प्रकारचे असतात. शुभ आणि अशुभ. जी कर्म शास्त्रानुसार विधि-विधानाने केली जातात ती शुभकर्म म्हटली जातात आणि काम, क्रोध, लोभ, आसक्ती इत्यादीने जी शास्त्रनिषिद्ध कर्म केली जातात ती अशुभकर्म म्हटली जातात.

शुभ अथवा अशुभ प्रत्येक क्रियमाण कर्माचा एक तर फल अंश बनतो आणि एक संस्कार अंश ! ही दोन्ही वेगवेगळी आहेत.

क्रियमाण कर्माच्या फल-अंशाचे दोन प्रकार आहेत—दृष्ट आणि अदृष्ट. यापैकी दृष्टाचेही दोन प्रकार आहेत—तात्कालिक आणि कालांतरिक. जसे भोजन करताना जो रस येतो, सुख होते, प्रसन्नता वाटते आणि तृप्ती होते—हे दृष्टाचे "तात्कालिक" फल आहे आणि भोजनाच्या परिणामी आयुष्य, बल, आरोग्य इत्यादीचे वाढणे—हे दृष्टाचे "कालांतरिक" फल आहे. तसेच तिखट जास्त खाण्याचा ज्याचा स्वभाव असतो,

* जे काही नवीन कर्म आणि त्यांचे संस्कार बनतात ते सर्व केवळ मनुष्यजन्मातच बनतात (४।१२; १५।२) पशु-पक्षी इत्यादी योनीत नाही. कारण त्या योनी केवळ कर्मफल भोगासाठीच मिळतात.

तो जेव्हा अधिक तिखट पदार्थ खातो, तेव्हा त्याला प्रसन्नता वाटते, सुख होते आणि तिखटाच्या तीक्ष्णतेमुळे तोंडात, जिभेत जळजळ होते, नाका डोळ्यातून पाणी येते, कपाळाला घाम येतो—हे दृष्टाचे ''तात्कालिक'' फल आहे आणि कुपथ्यकेल्या-मुळे परिणामी पोट दुखणे आणि रोग, दुःख इत्यादी होणे—हे दृष्टाचे कालांतरिक फल आहे.

त्याचप्रमाणे अदृष्टाचे सुद्धा दोन प्रकार आहेत— लौकिक आणि पारलौकिक! जिवंतपणीच फल मिळावे या भावनेने यज्ञ, दान, तप, तीर्थ, व्रत, मंत्र-जप, इत्यादी शुभकर्म विधि-विधानपूर्वक केली आणि त्याला कोणता प्रबल प्रतिबंध नसेल तर येथेच पुत्र, धन, यश, प्रतिष्ठा, इत्यादी अनुकूलतेची प्राप्ती होणे आणि रोग, निर्धनता इत्यादी प्रतिकूलतेची निवृत्ती होणे—हे अदृष्टाचे ''लौकिक'' फल आहे *आणि मृत्यूनंतर स्वर्गादीची प्राप्ती व्हावी—या भावनेने यथार्थ विधि-विधान आणि श्रद्धा-विश्वासपूर्वक जे यज्ञ, दान, तप इत्यादी शुभकर्म केली तर मृत्यूनंतर स्वर्गादी लोकांची प्राप्ती होणे—हे अदृष्टाचे ''पारलौकिक'' फल आहे. तसेच डाका घालणे, चोरी करणे, माणसाला ठार मारणे इत्यादी अशुभकर्माचे फल येथेच कैद, फाशी, दंड इत्यादी होणे—हे अदृष्टाचे ''लौकिक'' फल आहे आणि पापामुळे मृत्यूनंतर नरकात जाणे आणि पशु-पक्षी, कीट-पतंग इत्यादी बनणे-हे अदृष्टाचे ''पारलौकिक'' फल आहे.

पाप पुण्याच्या या लौकिक आणि पारलौकिक फलाच्या विषयात एक गोष्ट आणखी समजून घेण्याची आहे की, ज्या पापकर्मांचे फल येथेच कैद, दंड, अपमान, निंदा इत्यादींच्या रूपात भोगले आहे त्या पापांचे फल मृत्यूनंतर भोगावे लागणार नाही. परंतु व्यक्तीचे पाप किती मात्रेत होते आणि त्यांचा भोग किती मात्रेत झाला अर्थात् त्या पापकर्मांचे फल त्याने पूर्ण भोगले आहे किंवा अर्धवट भोगले आहे याचे पूर्ण ज्ञान मनुष्याला नसते कारण माणसाजवळ याचे काही मोजमाप नाही. परंतु भगवंताना हे पूर्ण माहीत असते. म्हणून त्यांच्या कायद्यानुसार त्या पापांचे फल येथे जितक्या अंशाने कमी भोगले असेल तितके या जन्मी अथवा मृत्यूनंतर भोगावेच लागेल. म्हणून माणसाने अशी शंका येऊ देऊ नये की, माझे पाप तर कमी होते परंतु शिक्षा अधिक भोगावी लागली अथवा मी पाप तर केले नाही पण शिक्षा मिळाली. कारण हे सर्वज्ञ, सर्वसुहृद, सर्वसमर्थ, भगवंताचे विधान आहे की, पापापेक्षा अधिक दंड कोणीही भोगत नाही आणि जो दंड मिळतो, ते कोण्या ना कोण्या पापाचेच फल असते.†

---

* येथे दृष्टाचे ''कालान्तरित'' फल आणि अदृष्टाचे लौकिक फल—दोन्ही फल एकसारखेच दिसतात. तरीपण त्या दोन्हीत फरक आहे. जे ''कालान्तरिक'' फल आहे ते सरळ मिळते, प्रारब्ध बनून नाही परंतु जे ''लौकिक'' फल आहे ते प्रारब्ध बनूनच मिळते.

† एक ऐकीव घटना आहे. एका गावात एक सज्जन राहत होते. त्यांच्या घरासमोर एका सोनाराचे घर होते. सोनाराजवळ सोने दागिने घडविण्यासाठी येत असत. एके दिवशी त्याच्याजवळ पुष्कळ सोने जमा झाले. रात्री पहारा करणाऱ्या शिपायाला ही गोष्ट कळली. त्या पहारेकरी शिपायाने त्या सोनाराला रात्री ठार केले आणि तो सोन्याचा डबा घेऊन पळू लागला. इतक्यात समोर राहणारे सज्जन लघुशंका करण्यासाठी उठून बाहेर आले. त्यांनी त्या शिपायाला पकडून हटकले की ''तू हा डबा कसा घेऊन चाललास?'' तेव्हा पहारेदार शिपाई म्हणाला ''तुम्ही चुप बसा मी यातील काही सोने तुम्हालाही देतो.'' सज्जन गृहस्थ म्हणाले ''मी चोर थोडाच आहे? मी कसे घेईन?'' पहारेकऱ्याने त्यांना म्हटले ''हे बघा! गुपचुप सोने घ्या नाही तर फार अनर्थ होईल, तुम्हाला फार महागात पडेल.'' परंतु त्या सज्जनाने ऐकले नाही. तेव्हा पहारेदाराने डबा खाली ठेवला आणि त्या सज्जनाला जोराने पकडून शिट्टी वाजविली. शिट्टी ऐकताच दुसरे पहारेदार तेथे पळत आले. त्या पहारेकऱ्याने इतर पहारेकऱ्यांना सांगितले की, ''हा या घरातून डबा घेऊन जात होता. मी याला पकडले आहे.'' तेव्हा अन्य शिपायांनी सोनाराच्या घरात जाऊन पाहिले तर सोनार मरून पडला आहे. त्यांनी त्या सज्जनाला पकडले आणि त्याला सरकारी शिपायांच्या हवाली केले. खटला चालला आणि न्यायाधीशासमोर जेव्हा जवाब घेतला गेला तेव्हा त्या सज्जनाने सांगितले की, ''मी मारले नाही त्या पहारेदार शिपायाने मारले आहे'' सर्व शिपायी एकमत होते. त्यांनी सांगितले ''नाही, यानीच मारले आम्ही प्रत्यक्ष याला रात्री पकडले आहे.'' इत्यादी

खटला चालला. शेवटी सज्जनाला फाशीची शिक्षा झाली. ज्यावेळी फाशीचा हुकूम दिला गेला त्यावेळी सज्जनाच्या मुखातून उद्गार निघाले- ''पहा हा मोठाच अन्याय होत आहे. मी मारले नाही तर मला शिक्षा आणि ज्याने मारले तो निर्दोष सुटून जातो, त्याला दंडही नाही, ईश्वराच्या दरबारात न्यायच नाही.'' न्यायाधीशावर त्याच्या बोलण्याचा परिणाम झाला आणि त्यांनी पुन्हा फेर तपासणी करण्यासाठी एक षड्यंत्र रचले.

सकाळ होताच एक माणूस धावतच रडत, ओरडत न्यायाधीशाकडे आला आणि म्हणाला माझ्या भावाचा खून झाला आहे, सरकार! त्याचा तपास व्हावा. तेव्हा न्यायाधीशाने त्या शिपायाला आणि कैदी सज्जनाला मेलेल्या माणसाचे प्रेत आणण्यास सांगितले. दोघेही प्रेताजवळ गेले. खाटेवर प्रेताला कपडा झाकला होता, रक्त इकडे तिकडे सांडलेले होते. दोघांनी ते प्रेत उचलले आणि घेऊन चालले. बरोबरचा माणूस पुढे सांगण्यासाठी निघून गेला. तेव्हा शिपायाने कैद्याला म्हटले ''पहा तू त्या दिवशी माझे ऐकून सोने घेतले असते तर आज तुझ्यावर फाशीचा प्रसंग आला नसता आता पाहिलेस काय खरेपणाचे फळ!''. कैद्याने म्हटले ''मी तर आपले काम प्रामाणिकपणाने केले होते, फाशी झाली तर झाली. खून तू केलास आणि दंड मला भोगावा लागत आहे. भगवंताजवळ न्याय नाही.''

खाटेवर मरणाचे सोंग घेतलेल्या माणसाने हे सर्व ऐकले आणि न्यायाधीशास सांगितले की, खरा खूनी पहोदारच आहे. हा मनुष्य निरपराध आहे. मी यांचे संभाषण स्वतः ऐकले आहे. त्यावर न्यायाधीशाने विचार केला की, मी कधी लाच घेतली नाही. सत्यतेने वागलो असे असताना माझ्या हातून ह्या सज्जनाला फाशीचा आदेश का निघाला? त्यांनी त्या सज्जनाला एकांतात नेऊन विचारले. ह्या खुनाच्या केसमध्ये तर तू निर्दोष आहेस मी

त्याचप्रमाणे धन-संपत्ती, मान, आदर, प्रशंसा, आरोग्य इत्यादी अनुकूल परिस्थितीच्या रूपात पुण्यकर्मांचे जितके फल येथे भोगले आहे, तितका अंश तर नष्ट झालाच आणि जितका बाकी राहिला आहे तो परलोकात नंतर भोगला जाऊ शकतो. जर पुण्यकर्माचे पूर्ण फल येथेच भोगले गेले तर पुण्य येथेच समाप्त होइल.

क्रियमाण कर्माच्या संस्कार अंशाचेही दोन प्रकार आहेत—शुद्ध (पवित्र संस्कार) आणि अशुद्ध (अपवित्र संस्कार). शास्त्रविहित कर्म केल्याने जे संस्कार होतात ते शुद्ध आणि पवित्र असतात आणि शास्त्र, नीती, लोकमर्यादा यांच्या विरुद्ध कर्म केल्याने जे संस्कार होतात ते अशुद्ध आणि अपवित्र असतात.

या दोन्ही अशुद्ध आणि शुद्ध संस्कारानुरूप स्वभाव (प्रकृती, सवय) बनतो. त्या संस्कारापैकी अशुद्ध अंशाचा सर्वथा नाश केल्यास स्वभाव शुद्ध, निर्मळ, पवित्र होतो. परंतु ज्या पूर्वकृत कर्मांनी स्वभाव बनला आहे त्या कर्मांच्या भिन्नतेमुळे जीवन्मुक्त पुरुषांच्या स्वभावामध्येही वेगळेपणा राहतो. या वेगवेगळया स्वभावामुळेच त्यांच्याकडून वेगवेगळी कर्म होतात, परंतु ती कर्म दोषी नसतात, उलट पूर्णपणे शुद्ध असतात आणि त्या कर्मांपासून संसाराचे कल्याण होते.

संस्कार अंशाने जो स्वभाव बनतो तो एका दृष्टीने महान् प्रबल असतो—"**स्वभावो मूर्धि वर्तते**" म्हणून त्याला नष्ट केले जाऊ शकत नाही. *त्याचप्रमाणे ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादी वर्णांचा जो स्वभाव आहे त्यात कर्म करण्याची मुख्यता राहते. म्हणून भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे की, जे कर्म तू मोहवश करू इच्छित नाहीस, त्यालाही तू आपल्या स्वाभाविक कर्मानि बांधलेला परवश होऊन करशील (१८।६०).

आता यात एक विचार करण्याची गोष्ट आहे की, एकीकडे तर स्वभावाची महान् प्रबलता आहे की, त्याला कोणी सोडूच शकत नाही आणि दुसरीकडे मनुष्यजन्माच्या प्रयत्नाची प्रबलता आहे की, मनुष्य सर्व काही करण्यात स्वतंत्र आहे. म्हणून या दोन्हीत कोणाचा विजय होईल आणि कोणाचा पराजय होईल? यात विजय पराजयाची गोष्ट नाही. दोन्हीही आपापल्या ठिकाणी प्रबल आहेत. परंतु येथे स्वभाव न सोडण्याची जी गोष्ट आहे ती जाती-विषयक स्वभावाची गोष्ट आहे. तात्पर्य हे आहे की, जीव ज्या वर्णात जन्मला आहे जसे रजवीर्य होते, त्यानुसार बनलेला जो स्वभाव आहे, त्याला कोणी बदलू शकत नाही. म्हणून तो स्वभाव दोषी नाही, निर्दोष आहे. जसे ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादी वर्णांचा जो स्वभाव आहे तो स्वभाव बदलू शकत नाही आणि तो बदलण्याची आवश्यकताही नाही तसेच तो बदलावा असे शास्त्रही म्हणत नाही. परंतु त्या स्वभावात जो अशुद्ध अंश (राग-द्वेष) आहे, त्याला समाप्त करण्याचे सामर्थ्य भगवंतांनी मनुष्याला दिले आहे. म्हणून ज्या दोषांनी मनुष्याचा स्वभाव अशुद्ध बनला आहे त्या दोषांना नष्ट करून मनुष्य स्वतंत्रतेने आपल्या स्वभावाला शुद्ध बनवू शकतो. मनुष्याने वाटेल तर कर्मयोगाच्या दृष्टीने आपल्या प्रयत्नाने राग-द्वेष नष्ट करून

---

मानतो पण या पूर्वी तुझ्या हातून कोणाचा खून झाला आहे काय? तो सज्जन प्रामाणिक होता. त्यांने सांगितले, होय महाराज! माझ्या पत्नीकडे एक व्यभिचारी माणूस येत असे. मला त्याचा पत्ता लागला. मी माझ्या पत्नीला व त्याला अनेक वेळा वेगवेगळे समजावले पण त्याने मानले नाही एक दिवस पाळत ठेवून माझ्या घरी पकडले व माझा राग अनावर होऊन मी त्याचा खून केला. त्याचे प्रेत मी घरामागील नदीत टाकून दिले. या घटनेचा कोणालाही पत्ता लागला नाही. तेव्हा न्यायाधीश म्हणाले—"ह्या खुनाच्या अपराधातून तर तू मुक्त झालास पण पूर्वीच्या केलेल्या खुनाची शिक्षा म्हणून तुला फाशी जावेच लागेल. मी विचार केला की, मी कधी लाच घेतली नाही, बेईमानी केली नाही आणि तू निरपराध असून माझ्या हातून तुला फाशीची शिक्षा कशी लिहिली गेली? आता माझे समाधान झाले. त्या पहारेकऱ्यालाही फाशी होईल आणि तुलाही होईल."

[वास्तविक त्या सज्जनाने त्या पहारेदार चोराला पकडून आपले कर्तव्यच केले होते. मग त्याला ही जी शिक्षा मिळाली ती कर्तव्य पालनाचे फल म्हणून नाही तर त्याने पूर्वी जो खून केला होता त्याचे फल आहे. कारण मनुष्याला आपले रक्षण करण्याचा अधिकार आहे, मारण्याचा अधिकार नाही. मारण्याचा अधिकार रक्षक क्षत्रियाचा, राजाचा आहे. म्हणून कर्तव्याचे पालन केल्यामुळे त्या पापा (हत्या) चे फल त्याला येथेच मिळाले आणि परलोकीच्या भयंकर दंडापासून त्याची मुक्ती झाली कारण या लोकी जो दंड भोगला जातो तो थोडाच असतो नाही तर परलोकात व्याजासह दंड भोगावा लागतो]

या कहाणीहून असे दिसून येते की, मनुष्याच्या केव्हा केलेल्या पापाचे फल केव्हा मिळेल हे सांगता येत नाही. भगवंताचे विधान विचित्र आहे. जोपर्यंत जुने पुण्य प्रबल असते. तोपर्यंत उग्र पापाचे फलसुद्धा तात्काळ मिळत नाही. जेव्हा मागील पुण्य समाप्त होते तेव्हा त्या पापाची बारी येते. पापाचे फल (दंड) तर भोगावेच लागते मग ते या जन्मात भोगावे लागो की जन्मांतरामध्ये!

अवश्यमेव भोक्तव्यं कृतं कर्म शुभाशुभम्। नाभुक्तं क्षीयते कर्म जन्मकोटिशतैरपि॥

* व्याघ्रस्तुष्यति कानने सुगहनं सिंहो गुहां सेवते हंसो वाञ्छति पद्मिनीं कुसुमितां गृध्रः श्मशाने स्थले।
साधुः सत्कृतिसाधुमेव भजते नीचोऽपि नीचं जनं या यस्य प्रकृतिः स्वभावजनिता केनापि न त्यज्यते॥

वाघ दाट जंगलात संतुष्ट राहतो, सिंह गहन गुहेत राहतो, हंस प्रफुल्लित कमळिणीची इच्छा करतो, गिधाड स्मशान भूमीत राहणे पसंत करते, सज्जन सदाचरणी सज्जन पुरुषांमध्ये राहू इच्छितो आणि नीच, नीच लोकातच राहू इच्छितो. हेच खरे आहे की, स्वभावापासून उत्पन्न झालेली ज्याची जशी प्रकृती असते, ती प्रकृती कोणी सोडीत नाही.

आपला स्वभाव शुद्ध बनवावा (३।३४) किंवा भक्तियोगाच्या दृष्टीने संपूर्णपणे भगवंतांना शरण होऊन आपला स्वभाव शुद्ध बनवावा. (१८।६२) अशा प्रकारे प्रकृतीची (स्वभाव) प्रबलताही सिद्ध झाली आणि मनुष्याची स्वतंत्रताही सिद्ध झाली. तात्पर्य, शुद्ध स्वभाव ठेवण्यात प्रकृतीची प्रबलता आहे आणि अशुद्ध स्वभाव मिटविण्यात मनुष्याची स्वतंत्रता आहे.

जसे लोखंडाच्या तलवारीला परिसाचा स्पर्श झाला तर तलवार सोन्याची बनते परंतु तिची मार, धार आणि आकार बदलत नाहीत. अशा प्रकारे सोने बनविण्यात परिसाची प्रधानता राहिली आणि मार, धार आणि आकार यात तलवारीची प्रधानता राहिली. त्याचप्रमाणे ज्या लोकांनी आपल्या स्वभावाला शुद्ध बनविले आहे त्यांची कर्मसुद्धा शुद्ध होतात. परंतु स्वभाव शुद्ध झाला तरी देखील वर्ण, आश्रम, सांप्रदाय, साधनपद्धती, मान्यता इत्यादीनुसार आपसात त्यांच्या कर्मांत भिन्नता राहते. जसे एखाद्या ब्राह्मणाला तत्त्वबोध झाला तरीही तो खाणे-पिणे इत्यादीत पवित्रता ठेवील आणि स्वत:च्या हाताने बनविलेलेच भोजन करील; कारण त्याच्या स्वभावात पवित्रता असते. परंतु एखाद्या हरिजन इत्यादी साधारण वर्णाच्या व्यक्तीला तत्त्वबोध झाला तर तो खाणे-पिणे इत्यादीत पवित्रता ठेवणार नाही आणि दुसऱ्याचे उष्टेही खाईल, कारण त्याचा स्वभावच तसा पडलेला असतो. परंतु असा स्वभाव त्याच्यासाठी दोषी नाही.

जीवाचा असत्‌शी संबंध जोडण्याचा स्वभाव अनादीकालापासून बनलेला आहे त्यामुळे तो जन्म-मरणाच्या चक्रात पडलेला आहे आणि पुन्हा पुन्हा उच्च नीच योनीत जात राहतो. त्या स्वभावाला मनुष्य शुद्ध करू शकतो अर्थात् त्यात जी कामना, ममता आणि आसक्ती आहे ती मिटवू शकतो. कामना, ममता आणि तादात्म्य मिटल्यानंतर जो स्वभाव राहतो तो दोषी राहत नाही. म्हणून त्या स्वभावाला मिटवावयाचे नाही आणि मिटविण्याची आवश्यकताही नाही.

जेव्हा मनुष्य अहंकाराचा आश्रय सोडून संपूर्णपणे भगवंताला शरण होतो, तेव्हा त्याचा भाव शुद्ध होतो, जसे लोखंडाचे परीसाच्या स्पर्शाने शुद्ध सोने होते. स्वभाव शुद्ध झाल्यास तो स्वभावज कर्म करूनही दोषी आणि पापी बनत नाही (१८।४७). सर्वथा भगवंताना शरण झाल्यास भक्ताचा प्रकृतीशी कोणताही संबंध राहत नाही. नंतर भक्ताच्या जीवनात भगवंताचा स्वभाव काम करतो. भगवान् समस्त प्राण्यांचे सुहृद आहेत—''**सुहृदं सर्वभूतानां**'' (५।२९) तर भक्तसुद्धा समस्त प्राण्यांचा सुहृद होतो— ''**सुहृद: सर्वदेहिनाम्**'' (श्रीमद्भा० ३।२५।२१)

त्याचप्रमाणे कर्मयोगाच्या दृष्टीने जेव्हा मनुष्य राग-द्वेषाला समाप्त करतो, तेव्हा त्याच्या स्वभावाची शुद्धी होते, त्यामुळे आपल्या स्वार्थाचा भाव मिटून केवळ जगत् हिताचा भाव आपोआप होतो. जसे भगवंताचा स्वभाव प्राणीमात्राचे हित करण्याचा आहे, तसेच त्याचा स्वभाव देखील प्राणीमात्राचे हित करण्याचा होतो. जेव्हा त्याच्या सर्व क्रिया प्राणीमात्राच्या हितासाठी होतात तेव्हा त्याची भगवंताच्या सर्वभूतसुहृत्ता-शक्तीशी एकता होते. त्याच्या त्या स्वभावात भगवंताची सुहृत्ता-शक्ती कार्य करू लागते.

वास्तविक भगवंताची ती सर्वभूतसुहृता-शक्ती मनुष्यमात्रासाठी समान रीतीने खुली झालेली आहे परंतु आपल्या अहंकार आणि रागद्वेषामुळे त्या शक्तीत बाधा निर्माण होते अर्थात् ती शक्ती काम करीत नाही. महापुरुषात अहंकार (व्यक्तित्व) आणि राग-द्वेष नसतात म्हणून त्यांच्यात ही शक्ती काम करू लागते.

**सञ्चित कर्म**

फल-अंश — प्रारब्ध

संस्कार-अंश — स्फुरणा

अनेक मनुष्यजन्मात केलेली जी कर्म (फल-अंश आणि संस्कार-अंश) अंत:करणात संगृहीत राहतात, ती संचित कर्म म्हटली जातात. त्यापैकी फलांशाने तर ''प्रारब्ध'' बनते आणि संस्कार अंशाने ''स्फुरणा'' होत राहते. त्या स्फुरणेतही वर्तमानात केली गेलेली जी नवीन क्रियमाण कर्म संचितात भरती झाली आहेत, बहुतेक त्यांचीच स्फुरणा होत असते. कधी कधी संचितात भरती झालेल्या जुन्या कर्मांची स्फुरणाही होते.* जसे एखाद्या भांड्यात प्रथम कांदे

* स्फुरणा संचितानुसारही होते आणि प्रारब्धानुसारही. संचितानुसार जी स्फुरणा होते ती मनुष्याला कर्म करण्यास बाध्य करीत नाही. परंतु संचिताच्या स्फुरणातही जर राग-द्वेष झाले तर त्या स्फुरणा ''संकल्प'' बनून मनुष्याला कर्म करण्यासाठी बाध्य करू शकतात. प्रारब्धानुसार जी स्फुरणा होते ती (फलभोग करविण्यासाठी) मनुष्याला कर्म करण्यासाठी बाध्य करते परंतु ती विहित कर्म करण्यासाठीच बाध्य करते, निषिद्ध कर्म करण्यासाठी नाही. कारण विवेकप्रधान मनुष्यशरीर निषिद्ध कर्म करण्यासाठी नाही. म्हणून आपल्या विवेकशक्तीला प्रबल करून निषिद्धाचा त्याग करण्याची जबाबदारी मनुष्यावर आहे आणि असे करण्यात तो स्वतंत्र आहे.

टाकले आणि त्यावर क्रमाने गहू, हरबरे, ज्वारी, बाजरी टाकली, तर काढताना जे सर्वात शेवटी टाकले होते, तीच (बाजरी) सर्वात प्रथम निघेल, परंतु मधून मधून कांद्याचाही वास येईल. परंतु हा दृष्टांत पूर्णतेने लागू होत नाही कारण कांदे, गहू इत्यादी सावयव पदार्थ आहेत आणि संचित कर्म निरवयव आहेत. हा दृष्टांत केवळ एवढ्याच अंशात दाखविण्यासाठी दिला आहे की, नवीन क्रियमाण कर्मांची स्फुरणा जास्त होते आणि कधी कधी जुन्या कर्मांचीही स्फुरणा होत असते.

त्याचप्रमाणे जेव्हा झोप येते तर त्यातही स्फुरणा होते. झोपेत जागृत अवस्था दबली गेल्यामुळे संचिताची ती स्फुरणा स्वप्नरूपाने दिसू लागते, त्यालाच स्वप्नावस्था म्हणतात.* स्वप्नावस्थेत बुद्धी सावध नसते त्यामुळे क्रम, व्यतिक्रम आणि अनुक्रम राहत नाहीत. जसे शहर तर दिल्ली दिसते आणि बाजार मुंबईचा दिसतो. त्या बाजारात दुकाने कलकत्त्याची दिसतात. एखादा जिवंत माणूस दिसतो किंवा एखाद्या मेलेल्या माणसाची भेट होते, बोलणे-चालणे होते इत्यादी.

जागृत अवस्थेत प्रत्येक मनुष्याच्या मनात अनेक प्रकारच्या स्फुरणा होत राहतात. जेव्हा जागृत अवस्थेत शरीर, इंद्रिये आणि मनावरचा बुद्धीचा अधिकार हटला जातो, तेव्हा मनुष्य मनाला वाटेल तसे बोलू लागतो. अशा प्रकारे योग्य-अयोग्य याविषयी विचार करण्याची शक्ती काम करीत नसल्यामुळे तो "साधा-सरळ-वेडा" म्हटला जातो. परंतु ज्याचा शरीर, इंद्रिये आणि मनावर बुद्धीचा अधिकार राहतो, तो जे उचित समजतो तेच बोलतो आणि जे अनुचित समजतो ते बोलत नाही. बुद्धी सावध असल्याने तो सावध चित्त राहतो. म्हणून तो "चतुर वेडा" आहे.

अशा प्रकारे मनुष्य जोपर्यंत परमात्मप्राप्ती करून घेत नाही तोपर्यंत तो आपल्याला स्फुरणेतून वाचवू शकत नाही. परमात्मप्राप्ती झाल्यास वाईट स्फुरणा सर्वथा मिटतात. म्हणून जीवन्मुक्त महापुरुषांच्या मनात वाईट, अपवित्र विचार कधी येतच नाहीत. जर त्याच्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीरात प्रारब्धवश (एखाद्या कारणाने व्याधी इत्यादी) कधी बेहोशी, उन्माद इत्यादी उत्पन्न झाले तरी त्यावेळीही तो शास्त्रनिषिद्ध काही बोलतही नाही आणि शास्त्रनिषिद्ध काही करीतही नाही. कारण अंत:करण शुद्ध झाल्याने शास्त्रनिषिद्ध बोलणे अथवा करणे त्याच्या स्वभावात राहत नाही.

**प्रारब्ध कर्म**

अनुकूल परिस्थिती — मिश्रित (अनुकूल-प्रतिकूल) परिस्थिती — प्रतिकूल परिस्थिती

स्वेच्छापूर्वक क्रिया (प्रवृत्ती) — अनिच्छापूर्वक क्रिया — परेच्छापूर्वक क्रिया

स्वेच्छापूर्वक क्रिया — अनिच्छापूर्वक क्रिया — परेच्छापूर्वक क्रिया

स्वेच्छापूर्वक क्रिया — अनिच्छापूर्वक क्रिया — परेच्छापूर्वक क्रिया

संचितातून फल देण्यास फलोन्मुख झालेल्या कर्मांना प्रारब्धकर्म† म्हणतात. प्रारब्ध कर्माचे फल तर अनुकूल अथवा प्रतिकूल परिस्थितीच्या रूपात समोर येते. परंतु त्या प्रारब्ध कर्मांना भोगण्यासाठी प्राण्यात तीन प्रकारची प्रवृत्ती असते (१) स्वेच्छापूर्वक (२) अनिच्छा (दैवेच्छा) पूर्वक आणि (३) परेच्छापूर्वक. उदाहरणार्थ—

* जागृत अवस्थेतही जागृत, स्वप्न आणि सुषुप्ती—तिन्ही अवस्था होतात. जसे मनुष्य जागृत अवस्थेत मोठ्या सावधानतेने काम करतो तर ही जागृतीत जागृतावस्था आहे. जागृत अवस्थेत मनुष्य जे काम करतो, त्या कामाव्यतिरिक्त अचानक जी दुसरी फुरणा होऊ लागते ती जागृतीत स्वप्नावस्था आहे. जागृत अवस्थेत कधी-कधी काम करत असतानाही त्या कामाची तसेच पूर्व कर्माची कोणतीही स्फुरणा होत नाही, अगदी वृत्तिरहित अवस्था होते, ती जागृतीत सुषुप्ती अवस्था आहे.

कर्म करण्याचा वेग अधिक राहिल्यास जागृत अवस्थेत, जागृत आणि स्वप्न-अवस्था तर अधिक होते परंतु सुषुप्ती अवस्था फार कमी होते. जर एखाद्या साधकाने जागृतीच्या स्वाभाविक सुषुप्तीला स्थायी बनविले तर त्याचे साधन फार तीव्र होईल कारण जागृत-सुषुप्तीत साधकाचा परमात्म्याशी निरावरणरूपाने सहज संबंध होतो. तसे तर सुषुप्ती अवस्थेतही संसाराचा संबंध तुटतो परंतु बुद्धी-वृत्ती अज्ञानात लीन झाल्यामुळे स्वरूपाचा स्पष्ट अनुभव होत नाही. जागृत सुषुप्तीत बुद्धी जागृत असल्याने स्वरूपाचा स्पष्ट अनुभव येतो.

ही जागृत-सुषुप्ती समाधीपेक्षाही विलक्षण आहे कारण ही सहज होते आणि समाधीत अभ्यासाने वृत्तींना एकाग्र तसेच निरुद्ध करावे लागते. म्हणून समाधीत पुरुषार्थाचा उद्देश असल्यामुळे शरीरात स्थिती राहते परंतु जागृत-सुषुप्तीत अभ्यास आणि अहंकार याशिवाय वृत्ती आपोआप निरुद्ध होत असल्यामुळे स्वरूपात स्थिती होते अर्थात् स्वरूपाचा अनुभव होतो.

† "प्रकर्षेण आरब्ध: प्रारब्ध:" अर्थात् उत्तम रीतीने फल देण्यास ज्याचा आरंभ झाला आहे ते "प्रारब्ध" होय.

(१) समजा एखाद्या व्यापाऱ्याने माल खरेदी केला तर त्यात नफा झाला. त्याचप्रमाणे दुसऱ्या एखाद्या व्यापाऱ्याने माल खरेदी केला तर त्याला तोटा झाला. या दोन्हीत नफा होणे आणि तोटा होणे तर त्यांच्या शुभाशुभ कर्मांनी बनलेल्या प्रारब्धाची फले आहेत. परंतु माल खरेदी करण्यात त्यांची प्रवृत्ती स्वेच्छापूर्वक झाली आहे.

(२) एक सज्जन गृहस्थ कोठे जात होते तर पुढे त्यांना नदी लागली. नदीला पूर आला होता. पुरात वाहत वाहत एक धनाची पेटी आली. ती त्यांनी पुरातून काढली. तिच्यात सोने पैसे होते, ते त्यांना मिळाले. दुसरा एक सज्जन गृहस्थ कोठे जात होता तर त्याच्यावर एका झाडाची फांदी अचानक तुटून पडली आणि तो जखमी झाला. या दोन्हीत धनाचे मिळणे आणि जखमी होणे तर त्यांच्या शुभाशुभकर्मांनी बनलेल्या प्रारब्धाचे फल आहे. परंतु धनाची पेटी मिळणे आणि वृक्षाची फांदी तुटून पडणे—ही प्रवृत्ती अनिच्छापूर्वक (दैवेच्छा) झाली आहे.

(३) एखाद्या श्रीमंत गृहस्थाने एखाद्या मुलाला दत्तक घेतले अर्थात् त्याचा पुत्ररूपाने स्वीकार केला, त्यामुळे त्याचे सर्व धन त्या मुलाला मिळाले. त्याचप्रमाणे एखाद्याचे चोरांनी सर्व धन लुटले. या दोन्हीत मुलाला धन मिळणे आणि चोरामुळे धन लुटले जाणे, हे तर त्यांच्या शुभाशुभकर्मांनी बनलेल्या प्रारब्धाचे फल आहे. परंतु दत्तक जाणे आणि चोरी होणे—ही प्रवृत्ती परेच्छापूर्वक झाली आहे.

या ठिकाणी आणखी एक गोष्ट समजून घ्यावयाची आहे की, कर्मांचे फल "कर्म" होत नाही तर "परिस्थिती" होते अर्थात् प्रारब्ध कर्माचे फल परिस्थितीरूपाने समोर येते. जर नवीन (क्रियमाण) कर्मास प्रारब्धाचे फल मानले तर मग "असे करा आणि असे करू नका"—असे शास्त्रांचे, गुरुजनांचे विधी-निषेध निरर्थक होतील. दुसरी गोष्ट, पूर्वी जसे कर्म केले होते त्यानुसार जन्म होईल आणि त्यानुसारच कर्म होतील तर ते कर्म पुढे नवीन कर्म उत्पन्न करतील. त्यामुळे ही कर्म परंपरा चालतच राहील अर्थात् त्याचा कधी अंतच होणार नाही.

प्रारब्ध कर्मांनी मिळणारी फले दोन प्रकारची आहेत—प्राप्त फल आणि अप्राप्त फल. आता प्राण्यांसमोर जी अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती येत आहे ते "प्राप्त" फल आहे आणि याच जन्मात जी अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थिती पुढे येणार आहे ते "अप्राप्त" फल आहे.

क्रियमाण कर्मांचा जो फलांश संचितात जमा राहतो, तोच प्रारब्ध बनून अनुकूल-प्रतिकूल आणि मिश्रित परिस्थितीच्या रूपात मनुष्यासमोर येतो. म्हणून जोपर्यंत संचित कर्म राहतात तोपर्यंत प्रारब्ध बनतच राहते आणि प्रारब्ध परिस्थितीच्या रूपात परिणत होतच राहते. ही परिस्थिती मनुष्याला सुखी-दुःखी होण्याला बाध्य करीत नाही. सुखी-दुःखी होण्याचे मुख्य कारण तर परिवर्तनशील परिस्थितीशी संबंध जोडणे हेच आहे. परिस्थितीशी संबंध जोडणे अथवा न जोडणे यात हा मनुष्य संपूर्णपणे स्वाधीन आहे, पराधीन नाही. जो परिवर्तनशील परिस्थितीशी आपला संबंध मानतो तो अविवेकी पुरुष तर सुखी-दुःखी होतच राहतो. परंतु जो परिस्थितीशी संबंध मानीत नाही, तो विवेकी पुरुष कधी सुखी-दुःखी होत नाही. म्हणून त्याची स्थिती सहज साम्यावस्थेत असते, जे त्याचे स्वरूप आहे.

कर्मांत मनुष्याच्या प्रारब्धाची प्रधानता आहे की पुरुषार्थाची? अथवा प्रारब्ध बलवान आहे किंवा पुरुषार्थ बलवान आहे? या विषयात पुष्कळ शंका येऊ शकतात. त्यांच्या समाधानासाठी प्रथम प्रारब्ध आणि पुरुषार्थ म्हणजे काय हे समजून घेणे जरूरी आहे?

मनुष्यात चार प्रकारची इच्छा असते. (१) धनाची (२) धर्माची (३) भोगाची (४) मुक्तीची. प्रचलित भाषेत यांनाच अर्थ, धर्म, काम आणि मोक्ष असे म्हटले जाते.

(१) **अर्थ**—धनाला "अर्थ" म्हणतात. ते धन दोन प्रकारचे असते—स्थावर आणि जंगम. सोने, चांदी, रुपये, जमीन, इस्टेट, घर इत्यादी स्थावर आहेत आणि गाय, म्हैस, घोडा, उंट, मेंढा, शेळी इत्यादी जंगम आहेत.

(२) **धर्म**—सकाम अथवा निष्कामभावनेने जे यज्ञ, तप, दान, व्रत, तीर्थ इत्यादी केले जातात त्याला "धर्म" म्हणतात.

(३) **काम**—सांसारिक सुख भोगाला "काम" म्हणतात. तो सुखभोग आठ प्रकारचा असतो—

शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, मान, सन्मान आणि आराम.

(क) शब्द—शब्द दोन प्रकारचा असतो. वर्णात्मक आणि ध्वन्यात्मक. व्याकरण, कोश, साहित्य, उपन्यास, गोष्टी, कहाणी इत्यादी "वर्णात्मक" शब्द आहेत.* खाल,

* वर्णात्मक शब्दातही दहा रस असतात. श्रृङ्गार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, वीभत्स, अद्भुत, शांत आणि वात्सल्य. हे दहाही रस चित्त द्रवित झाल्याने होतात. या दाही रसांचा उपयोग भगवंतासाठी केला गेला तर हे सर्व रस कल्याण करणारे होतात आणि यांच्याकडून सुख भोगले तर हे सर्व रस पतन करणारे होतात-

तार आणि फुंकून वाजविण्याचे बाजे आणि तालाचा अर्धा बाजा हे साडे तीन प्रकारचे बाजे ''ध्वन्यात्मक'' शब्द प्रगट करणारे आहेत.* या वर्णात्मक आणि ध्वन्यात्मक शब्दांना ऐकल्याने जे सुख मिळते, ते शब्दाचे सुख आहे.

(ख) स्पर्श—स्त्री, पुत्र, मित्र इत्यादींच्या मिलनाने तसेच शीत, उष्ण, कोमल इत्यादीशी अर्थात् त्यांचा त्वचेशी संयोग झाल्यास जे सुख होते ते स्पर्शाचे सुख आहे.

(ग) रूप—डोळ्यांनी खेळ, तमाशा, सिनेमा, नाटक, वन, पर्वत, सरोवर, घर इत्यादींच्या सुंदरतेला पाहून जे सुख होते, ते रूपाचे सुख आहे.

(घ) रस—मधुर (गोड), आम्ल (आंबट), लवण (क्षार), कटु (कडू) तिक्त (तिखट) आणि कषाय (तुरट). या सहा रसांना चाखल्याने जे सुख होते ते रसाचे सुख आहे.

(ङ) गन्ध—नाकाने अत्तर, तेल, फुले, लवेंडर, इत्यादी सुगंध असणारे आणि लसूण, कांदा इत्यादी दुर्गंधीत पदार्थांचा वास घेतल्याने जे सुख होते ते गंधाचे सुख आहे

(च) मान—शरीराचा आदर-सत्कार झाल्याने जे सुख होते ते मानाचे सुख आहे.

(छ) सन्मान—नावाची प्रशंसा, वाहवा झाल्याने जे सुख होते ते सन्मानाचे सुख आहे.

(ज) आराम—शरीराने परिश्रम न करण्याने अर्थात् काही न करता पडून राहण्याने जे सुख होते ते आरामाचे सुख आहे.

(४) **मोक्ष**—आत्मसाक्षात्कार, तत्त्वज्ञान, कल्याण, उद्धार, मुक्ती, भगवद्दर्शन, भगवत्प्रेम इत्यादींचे नाव ''मोक्ष'' आहे.

ह्या चारीमध्ये (अर्थ, धर्म, काम आणि मोक्ष) पाहिले तर धर्म आणि अर्थ दोन्हीही परस्पर एकमेकांची वृद्धी करणारे आहेत. अर्थात् धर्माने अर्थाची आणि अर्थाने धर्माची वृद्धी होते. परंतु धर्माचे पालन कामनापूर्तीसाठी केले तर तो धर्म कामनापूर्ती करून नष्ट होतो आणि अर्थाला कामनापूर्तीत लावले तर तो अर्थही कामनापूर्ती करून नष्ट होतो. तात्पर्य हे आहे की, कामना धर्म आणि अर्थ या दोघांना खाऊन टाकते. म्हणूनच भगवंतांनी गीतेमध्ये कामनेला ''महाशन'' (फार खाणारी) सांगून तिच्या त्यागाविषयी विशेषतेने सांगितले आहे (३। ३७-४३)

जर धर्माचे अनुष्ठान कामनेचा त्याग करून केले तर ते अंत:करण शुद्ध करून मुक्त करते. तसेच कामनेचा त्याग करून धन दुसऱ्यांच्या उपकारात, हितात, सुखासाठी खर्च केले तर तेही अंत:करण शुद्ध करून मुक्त करते.

अर्थ, धर्म, काम आणि मोक्ष या चारीपैकी ''अर्थ'' (धन) आणि ''काम'' (भोग) यांच्या प्राप्तीत प्रारब्धाची मुख्यता आणि पुरुषार्थाची गौणता आहे तसेच ''धर्म'' आणि ''मोक्ष'' यांच्या प्राप्तीत पुरुषार्थाची मुख्यता आणि प्रारब्धाची गौणता आहे. प्रारब्ध आणि पुरुषार्थ या दोन्हींचे क्षेत्र वेगवेगळे आहे आणि दोन्हीही आपापल्या क्षेत्रात प्रधान आहेत. म्हणून म्हटले आहे—

**संतोषस्त्रिषु कर्तव्यः स्वदारे भोजने धने।**
**त्रिषु चैव न कर्तव्यः स्वाध्याये जपदानयोः॥**

अर्थात् स्वत:ची पत्नी, पुत्र, परिवार, भोजन आणि धन यात संतोष मानावा आणि स्वाध्याय, पाठ-पूजा, नाम-जप, कीर्तन आणि दान करण्यात कधी संतोष करू नये. तात्पर्य हे झाले की, प्रारब्धाचे फल—धन आणि भोग यात तर संतोष करावा, कारण प्रारब्धानुसार जितके मिळावयाचे आहे तितकेच मिळणार, त्यापेक्षा अधिक नाही. परंतु धर्मानुष्ठान आणि आपले कल्याण करण्यात कधी संतोष करू नये. कारण हा नवीन पुरुषार्थ आहे आणि याच पुरुषार्थासाठी हे मनुष्यशरीर मिळाले आहे.

कर्माचे दोन प्रकार आहेत. शुभ (पुण्य) आणि अशुभ (पाप). शुभकर्माचे फल अनुकूल परिस्थिती प्राप्त होणे हे आहे आणि अशुभकर्माचे फल प्रतिकूल परिस्थिती प्राप्त होणे हे आहे. कर्म बाहेरुन होतात म्हणून त्यांचे फल बाह्य परिस्थितीच्या रूपातच प्राप्त होते. परंतु त्या परिस्थितींपासून जे सुख-दु:ख होते ते अंत:करणात होते. म्हणून त्या परिस्थितीत सुखी अथवा दु:खी होणे शुभाशुभकर्मांचे अर्थात् प्रारब्धाचे फल नाही, तर आपल्या मूर्खतेचे फल आहे. जर ती मूर्खता नष्ट झाली, भगवंतावर† अथवा प्रारब्धावर‡ विश्वास ठेवला तर प्रतिकूलातीत प्रतिकूल परिस्थिती आली तरी चित्तात प्रसन्नता

* ढोल, ढोलकी, तबला, पखवाज, मृदङ्ग इत्यादी ''चामड्याचे'' सतार, वीणा, सारंगी, मोरचंग इत्यादी हे ''ताराचे,'' मशक, पेटी (हार्मोनियम), बासुरी, पुंगी इत्यादी ''फुंकण्याचे'' आणि झांज, मंजिरी, करताल इत्यादी ''ताला'' चे बाजे आहेत.

† लालने ताडने मातुर्नाकारुण्यं यथार्भके। तद्वदेव महेशस्य नियन्तुर्गुणदोषयोः॥
''ज्याप्रमाणे मुलाचे पालन करणे व ताडण करणे यात मातेची कुठेही अवकृपा नसते, त्याचप्रमाणे जीवांचे गुणदोष नियंत्रण करणाऱ्या परमेश्वराची कुठेही कोणावर अवकृपा नसते''

‡ यद्भावि तद्भवत्येव यदभाव्यं न तद्भवेत्। इति निश्चितबुद्धीनां न चिन्ता बाधते क्वचित्॥ (नारदपुराण पूर्व ३७। ४७)
'जे होणार आहे ते झाल्याशिवाय राहत नाही आणि जे होणार नसते ते कधीच होत नाही—असा निश्चय ज्याच्या बुद्धीत असतो त्यांना चिंता कधी सतावीत नाही.'

राहील, हर्ष होईल. कारण प्रतिकूल परिस्थितीत पापे नष्ट होतात. पुढे पाप न करण्याबद्दल सावध केले जाते आणि पाप नष्ट झाल्यामुळे अंत:करणाची शुद्धी होते.

साधकाने अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीचा सदुपयोग केला पाहिजे, दुरुपयोग नव्हे. अनुकूल परिस्थिती प्राप्त झाली तर अनुकूल सामुग्रीला दुसऱ्यांच्या हितासाठी सेवाबुद्धीने खर्च करणे अनुकूल परिस्थितीचा सदुपयोग आहे आणि त्याचा सुखबुद्धीने भोग करणे हा दुरुपयोग आहे. तसेच प्रतिकूल परिस्थिती प्राप्त झाल्यास सुखाच्या इच्छेचा त्याग करणे आणि ''माझ्या पूर्वकृत पापांचा नाश करण्यासाठी, भविष्यात पाप न करण्याबद्दल सावध करण्यासाठी, माझी उन्नती करण्यासाठीच प्रभुकृपेने अशी परिस्थिती आली आहे'' असे समजून परम प्रसन्न राहणे प्रतिकूल परिस्थितीचा सदुपयोग आहे आणि त्यापासून दु:खी होणे दुरुपयोग आहे.

मनुष्यशरीर सुख-दु:ख भोगण्यासाठी नाही. सुख भोगण्याचे स्थान स्वर्ग आहे आणि दु:ख भोगण्याचे स्थान नरक तसेच चौऱ्यांशी लाख योनीं आहेत. म्हणून त्या भोग-योनीं आहेत आणि मनुष्य कर्मयोनी आहे. परंतु ही कर्मयोनी त्यांच्यासाठी आहे जे मनुष्यशरीरात सावधान राहत नाहीत, केवळ जन्म-मरणाच्या सामान्य प्रवाहातच सापडले आहेत. वास्तविक मनुष्यशरीर सुख-दु:खातीत होण्यासाठी अर्थात् मुक्ती प्राप्त करण्यासाठी मिळाले आहे. म्हणून याला कर्मयोनी न म्हणता ''साधनयोनी'' च म्हटले पाहिजे.

प्रारब्ध कर्मांचे फलस्वरूप जी अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थिती येत असते त्या दोन्हीपैकी अनुकूल परिस्थितीचा स्वरूपाने त्याग करण्यात तर मनुष्य स्वतंत्र आहे; परंतु प्रतिकूल परिस्थितीचा स्वरूपाने त्याग करण्यात मनुष्य परतंत्र आहे अर्थात् त्याचा स्वरूपाने त्याग केला जाऊ शकत नाही. कारण हे आहे की, अनुकूल परिस्थिती दुसऱ्याचे हित आणि त्यांना सुख दिल्याच्या फलरूपाने आलेली असते आणि प्रतिकूल परिस्थिती दुसऱ्यांना दु:ख देण्याच्या फलरूपाने आलेली असते. याला पुढील दृष्टान्ताने ही गोष्ट समजून घेता येईल.

शामलालने रामलालला शंभर रुपये उधार दिले. रामलालने करार केला की, मी अमुक महिन्यात व्याजासह पैसे परत करीन. ठरलेला महिना निघून गेला तरी रामलालने पैसे परत केले नाहीत. त्यामुळे शामलाल रामलालच्या घरी गेला आणि म्हणाला ''तू करारानुसार पैसे दिले नाहीस, आता देऊन टाक'' रामलाल म्हणाला ''आता माझ्याजवळ पैसे नाहीत, परवा देईन'' शामलाल तीसऱ्या दिवशी त्याच्याकडे गेला आणि म्हणाला ''माझे पैसे मला देऊन टाक''. समलाल म्हणाला ''मी आपल्या पैशाची अजून व्यवस्था करू शकलो नाही परवा जरूर पैसे परत करीन.'' तीसऱ्या दिवशी पुन्हा शामलाल गेला आणि पैसे मागितले तर तो ''उद्या जरूर देतो'' म्हणाला. दुसऱ्या दिवशी पुन्हा शामलाल गेला आणि पैसे मागितले तेव्हा रामलालने म्हटले ''अद्याप पैशाची सोय झाली नाही, माझ्याजवळ पैसे नाहीत तर देऊ कोठून ? परवा या''. रामलालचे असे बोलणे ऐकून शामलालला क्रोध आला आणि परवा, परवा म्हणतो पैसे देत नाही असे म्हणून त्याने रामलालला पाच जोडे मारले. रामलालने कोर्टात फौजदारी केली. शामलालला बोलावले गेले आणि विचारले. ''तुम्ही याच्या घरी जाऊन याला जोडा मारला काय ?'' तेव्हा शामलाल ने म्हटले ''होय साहेब, मी जोडा मारला आहे'' न्यायाधीशाने विचारले ''का मारले''? शामलाल म्हणाला ''याला मी रुपये दिले होते आणि याने करार केला होता की, या महिन्यात रुपये परत करीन. महिना संपल्यावर मी याच्या घरी जाऊन रुपये मागितले तर याने उद्या-परवा, उद्या-परवा म्हणून मला ह्याने तंग केले. त्यामुळे मला क्रोध आला आणि मी त्याला पाच जोडे मारले, तर सरकार! पाच जोड्याचे पाच रुपये कापून बाकीचे रुपये मला मिळवून द्यावे.''

न्यायाधीश हसून म्हणाले—हे फौजदारी कोर्ट आहे. येथे रुपये मिळवून देण्याचा कायदा नाही. तर येथे शिक्षा करण्याचा कायदा आहे. म्हणून जोडे मारल्याबद्दल आपल्याला दंड भरावा लागेल किंवा कैद होईल. आपल्याला रुपये वसूल करावयाचे असतील तर दिवाणी कोर्टात जावे लागेल. तेथे रुपये वसूल करण्याचा कायदा आहे कारण तो विभाग वेगळा आहे''

अशा प्रकारे अशुभकर्माचे फल जी प्रतिकूल परिस्थिती येते ती ''फौजदारी'' आहे म्हणून त्याचा स्वरूपाने त्याग करू शकत नाही आणि शुभकर्माचे फल तर अनुकूल परिस्थिती आहे ती ''दिवाणी'' आहे म्हणून तिचा स्वरूपाने त्याग केला जाऊ शकतो. यावरुन हे सिद्ध झाले की, मनुष्याच्या शुभ अशुभ कर्मांचा विभाग वेगवेगळा आहे. म्हणून शुभ कर्म (पुण्य) आणि अशुभ कर्म (पाप) यांचा वेगवेगळा संग्रह होतो. स्वाभाविकरूपाने हे दोन्ही एकमेकातून वजा होत नाहीत. अर्थात् पापातून पुण्य आणि पुण्यातून पाप वजा होत नाही. मात्र मनुष्याने जर पाप नष्ट करण्याच्या उद्देशाने (प्रायश्चित्त-रूपाने) शुभकर्म केले तर त्याची पापे नष्ट होतील.

संसारात एखादा मनुष्य पुण्यात्मा, सदाचारी असतो आणि दु:ख भोगत असतो तसेच एखादा मनुष्य पापात्मा, दुराचारी असतो आणि सुख भोगत असतो. असे पाहून चांगल्या-चांगल्या माणसांना अशी शंका येते की, यात ईश्वराचा न्याय कुठे आहे? *याचे समाधान असे आहे की, आता पुण्यात्मा जो दु:ख भोगत आहे, हे पूर्वजन्मकृत पापाचे फल आहे. आता केलेल्या पुण्याचे फल नव्हे. त्याचप्रमाणे आता पापात्मा जो सुख भोगत आहे हे देखील पूर्वजन्मकृत पुण्याचे फल आहे आता करीत असलेल्या पापाचे नव्हे!

यात आणखी एक तात्त्विक गोष्ट आहे. कर्माच्या फल-रूपात जी अनुकूल परिस्थिती येते त्याने सुखच होते आणि प्रतिकूल परिस्थिती येते त्याने दु:खच होते, असा काही नियम नाही. जसे अनुकूल परिस्थिती आल्याने मनात अभिमान येतो, खालच्या वर्गाविषयी घृणा होते, आपल्या-पेक्षा श्रीमंत असणाऱ्याविषयी ईर्ष्या होते, असहिष्णुता होते, अंत:करणात जळजळ होते आणि मनात असे दुर्भाव येतात की, त्यांची संपत्ती कशी नष्ट होईल आणि प्रसंग आला तर त्याला अपमानीत करण्याचाही प्रयत्न केला जातो. अशा प्रकारे सुखसामुग्री आणि धन-संपत्ती जवळ असूनही तो सुखी होऊ शकत नाही. परंतु बाह्य सामुग्रीला पाहून इतर लोकांना हा भ्रम होतो की, हा फार सुखी आहे. तसेच एखाद्या विरक्त आणि त्यागी मनुष्याला पाहून भोगसामुग्री असणाऱ्या माणसाला त्याच्याविषयी दया येते की, हा किती दु:खात आहे कारण याच्याजवळ धन-संपत्ती, इत्यादी सामुग्री काहीच नाही. परंतु वास्तविक तो विरक्तच खरा शांत आणि प्रसन्न असतो. अशी प्रसन्नता आणि शांती श्रीमंताच्या ठिकाणी राहू शकत नाही. म्हणून धन असणे म्हणजे सुख नव्हे आणि धनाचा अभाव म्हणजे दु:ख नव्हे. अंत:करणाची प्रसन्नता आणि शांती हेच खरे सुख आणि अंत:करणातील संताप आणि जळजळ हेच खरे दु:ख आहे.

पुण्य आणि पापाचे फल भोगण्यात एक नियम नाही. पुण्य तर निष्कामभावनेने भगवंताला अर्पण केल्याने समाप्त होऊ शकते परंतु पाप भगवंताला अर्पण केल्याने समाप्त होत नाही. पापाचे फल तर भोगावेच लागते कारण भगवंताच्या आज्ञेविरुद्ध केली गेलेली कर्म भगवंताला कशी अर्पण होऊ शकतील? आणि अर्पण करणाराही भगवंताच्या विरुद्ध कर्मांना भगवंताना अर्पण कसे करू शकतो? उलट भगवंताच्या आज्ञेनुसार केले गेलेले कर्मच भगवंताला अर्पण होतात. या विषयात एक कहाणी ऐकण्यात आली आहे.

एक राजा होता. तो एकदा प्रजेसह हरिद्वारला गेला. त्याच्याबरोबर सर्व प्रकारचे लोक होते. त्यात एक चांभार होता. त्या चांभाराने असा विचार केला की, हे व्यापारीलोक व्यवहारात फार चतुर असतात. हे आपल्या चातुर्याने धनी बनले आहेत. जर आपणही त्यांच्यासारख्या चातुर्याने व्यवहार केला तर आपणही धनी होऊ. असा विचार करून त्याने एका चतुर व्यापाऱ्याच्या क्रियेवर लक्ष ठेवले. जेव्हा हरिद्वारच्या ब्रह्मकुंडावर पंडा दान-पुण्याचा संकल्प करू लागला त्यावेळी त्या व्यापाऱ्याने म्हटले "मी अमुक ब्राह्मणाला शंभर रुपये उसने दिले होते आज मी ते दानरूपाने श्रीकृष्णार्पण करतो" पंड्याने संकल्प करून टाकला. चांभाराने पाहिले की, याने कौडीही दिली नाही आणि लोकात प्रसिद्ध झाला की, याने शंभर रुपयाचे दान केले. किती बुद्धिमान् आहे. मीही आता याच्यापेक्षा कमी राहणार नाही. जेव्हा पंड्याने संकल्पास सुरवात केली तेव्हा चांभाराने म्हटले "अमुक व्यापाऱ्याने मला शंभर रुपये उसने दिले होते तर त्या शंभर रुपयाला मी श्रीकृष्णार्पण करतो". पंड्याला त्याची ग्रामीण बोली नीट न समजल्यामुळे त्याने संकल्प करून टाकला. चांभार खूश झाला की, मीही व्यापाऱ्याप्रमाणे शंभर रुपयाचा दान धर्म केला.

सर्व घरी परतले. वेळेवर पेरणी झाली. ब्राह्मणाच्या आणि चांभाराच्या शेतात खूप धान्य पिकले. ब्राह्मणाने व्यापाऱ्याला म्हटले, "सेठ आपण वाटल्यास शंभर रुपयाचे धान्य घ्या" त्यामुळे आपल्याला नफाही मिळू शकतो. मला तर आपल्या कर्जातून मुक्त व्हावयाचे आहे" व्यापाऱ्याने म्हटले "ब्राह्मण महाराज! मी जेव्हा हरिद्वारला गेलो होतो तेव्हा मी आपल्याला उसने दिलेले रुपये दान करून टाकले" ब्राह्मण म्हणाला—"सेठ मी आपल्यापासून शभंर रुपये उसने

* महाभारत वन पर्वात एक कथा येते. एके दिवशी द्रौपदीने धर्मराजांना म्हटले की, आपण धर्माला सोडून एक पाऊलही टाकत नाही परंतु आपण वनवासाचे दु:ख भोगत आहात आणि दुर्योधन धर्माची किंचितही परवा न करता केवळ स्वार्थपरायण होऊन राज्य करीत आहे, आराम भोगत आहे, सुख भोगतो आहे. हे कसे? धर्मराजांनी उत्तर दिले की, जे सुख मिळण्याच्या इच्छेने धर्माचे पालन करतात ते धर्माच्या तत्त्वाला जाणत नाहीत. ते तर पशूप्रमाणे सुखभोगासाठी लोलुप आणि दु:खापासून भयभीत राहतात मग ते बिचारे धर्माचे तत्त्व कसे जाणतील? म्हणून मनुष्याची मनुष्यता यातच आहे की, त्याने अनुकूल वा प्रतिकूल परिस्थितीची परवा न करता शास्त्राज्ञेनुसार केवळ आपल्या धर्माचे (कर्तव्याचे) पालन करीत रहावे.

घेतले होते, दान घेतले नव्हते. म्हणून मी रुपये ठेवू इच्छित नाही, व्याजासह देऊ इच्छितो'' व्यापारी म्हणाला—''आपण जर देऊच इच्छित असाल तर आपल्या बहिणीला अथवा कन्येला देऊ शकता. मी शंभर रुपये भगवंताला अर्पण केले आहेत म्हणून मी तर घेणार नाही'' आता ब्राह्मण काय करणार तो आपल्या घरी निघून गेला.

आता ज्या व्यापाऱ्याने चांभाराला शंभर रुपये दिले होते, तो व्यापारी चांभाराच्या शेतात गेला आणि म्हणाला ''माझे रुपये परत करा, तुम्हाला धान्य पिकले आहे तर शंभर रुपयाचे धान्य देऊन टाका'' चांभाराने ऐकले होते की, ब्राह्मण देऊ लागला तरी व्यापाऱ्याने त्याच्यापासून रुपये घेतले नाहीत. म्हणून त्यानेही विचार केला की, मी जर संकल्प केला आहे तर मला रुपये का द्यावे लागावे? अशा विचाराने त्याने म्हटले ''मी तर अमुक सेठजीप्रमाणे गंगेत उभे राहून सर्व रुपये कृष्णार्पण केले तर मला रुपये का द्यावे लागावे?'' व्यापारी म्हणाला ''तुझ्या अर्पण करण्याने कर्ज फिटत नाही कारण तू माझ्या जवळून कर्ज घेतले आहेस तर तुझ्या सोडण्याने कसे फिटेल? मी तर व्याजासह पूर्ण रुपये घेईन. देऊन टाक माझे रुपये!'' असे म्हणून त्याने चांभारापासून आपल्या रुपयाचे धान्य घेतले.

या कहाणीतून हे सिद्ध होते की, आपल्यावर जे दुसऱ्याचे कर्ज आहे ते आपण सोडल्याने फिटू शकत नाही. त्याचप्रमाणे आपण भगवदाज्ञेनुसार शुभ कर्मांना तर भगवंताना अर्पण करून त्यांच्या बंधनातून सुटू शकतो परंतु अशुभ कर्माचे फल तर आपल्याला भोगावेच लागेल. म्हणून शुभ आणि अशुभ कर्माचा एक कायदा-नियम नाही. जर असा नियम झाला की, भगवंतांना अर्पण केल्याने ऋण व पाप-कर्म सुटून जातील तर सर्वच प्राणी मुक्त होतील, पण हे शक्य नाही. मात्र यात एक मार्मिक गोष्ट अशी आहे की, आपल्या स्वत:ला संपूर्णपणे भगवदर्पण केले, पूर्णपणे शरण केले तर पाप पुण्य पूर्णत: नष्ट होतात (१८।६६).

दुसरी शंका ही होते की, धन आणि भोगाची प्राप्ती प्रारब्ध कर्मानुसार होते असे दिसून येत नाही. कारण आपण पाहतो की, आयकर, विक्रीकर इत्यादींची चोरी केली तर धन वाढते आणि हे कर पूर्ण भरले तर धन निघून जाते. तर मग धनाचे येणे-जाणे प्रारब्धाधीन कोठे झाले? ते तर चोरीच्या- च अधीन झाले.

याचे समाधान असे आहे की, वास्तविक धन प्राप्त करणे आणि भोग भोगणे—या दोन्हीतही प्रारब्धाची प्रधानता आहे. परंतु या दोन्हीपैकी एखाद्याचे धनप्राप्तीचे प्रारब्ध असते भोगाचे नसते आणि एखाद्याचे भोगाचे प्रारब्ध असते, धन प्राप्तीचे नसते. तसेच एखाद्याचे धन आणि भोग दोन्हींचेही प्रारब्ध असते. ज्याचे धन प्राप्तीचे तर प्रारब्ध आहे परंतु भोगाचे प्रारब्ध नाही, त्याचेजवळ लाखो रुपये असूनही आजारामुळे वैद्याने, डॉक्टराने मनाई केल्यामुळे, तो भोग भोगू शकत नाही. त्याला जाडे-भरडे कोरडे खावे लागते. ज्याचे प्रारब्ध भोगाचे तर आहे परंतु धनाचे प्रारब्ध नाही त्याच्या जवळ धनाचा अभाव असूनही त्याच्या सुख आरामात कोणतीही उणीव राहत नाही.* त्याला एखाद्याच्या दयेने, मित्रत्वाने काम धंदा मिळून प्रारब्धानुसार जीवननिर्वाहाची सामुग्री मिळत राहते.

जर धनाचे प्रारब्ध नसेल तर चोरी करूनही धन मिळणार नाही, उलट कोणत्याही प्रकारे चोरी पकडली जाऊन जवळ असलेले धनही निघून जाईल, वरुन शिक्षा होईल. येथे शिक्षा मिळो अथवा न मिळो परंतु परलोकात तर दंड अवश्य मिळेळ. त्यापासून तो वाचू शकणार नाही. जरी प्रारब्धवशात् चोरीने धन मिळाले तरीही त्या धनाचा उपभोग होऊ शकणार नाही. ते धन आजारपण, चोरी, डाके, कोर्ट-कचेरी, फसवणूक इत्यादीत निघून जाईल. तात्पर्य हे आहे की, ते धन जितके दिवस टिकणार असेल, तितके दिवसच टिकेल त्यानंतर नष्ट होईल. एवढेच नव्हे तर आयकर आदींच्या चोरीचे संस्कार जन्मजन्मांतरापर्यंत त्याला चोरी करण्यास प्रवृत्त करीत राहतील आणि त्यामुळे तो शिक्षा भोगत राहील.

जर धनाचे प्रारब्ध असेल तर कोणी दत्तक घेईल अथवा एखादा मरणारा धनी मनुष्य त्याच्या नावे इस्टेट करून देईल अथवा घराचा पाया खोदताना गाडलेले धन मिळेल इत्यादी. अशा प्रकारे प्रारब्धानुसार जे धन मिळावयाचे असेल ते कोणत्याही निमित्ताने अवश्य मिळेलच.† परंतु मनुष्य

* संपूर्णपणे त्याग करणाऱ्यालाही अनुकूल वस्तू पुष्कळ प्रमाणात मिळत असलेल्या दिसतात (ही गोष्ट वेगळी आहे की तो त्यांचा स्वीकार करीत नाही). त्यागात तर आणखी एक विलक्षणता ही आहे की, जो मनुष्य धनाचा त्याग करतो, ज्याच्या मनात धनाचे महत्त्व नसते आणि स्वत:ला धनाधीन मानीत नाही, त्याच्यासाठी एक नवे प्रारब्ध बनते कारण त्याग हेसुद्धा एक फार मोठे पुण्य आहे ज्यामुळे तात्काळ एक नवीन प्रारब्ध बनते.

धान नहीं धीणों नहीं, नहीं रुपैयो रोक। जीमण बैठे रामदास, आन मिलै सब थोक॥

† प्राप्तव्यमर्थं लभते मनुष्यो दैवोऽपि तं लङ्घयितुं न शक्तः।

प्रारब्धावर तर विश्वास करीत नाही. कमीत कमी आपल्या पुरुषार्थावरही विश्वास करीत नाही की, मी मेहनतीची कमाई करून खाईन. याच कारणामुळे त्याची चोरी इत्यादी दुष्कर्मात प्रवृत्ती होते, ज्यामुळे अंत:करणात जळजळ राहते, लोकापासून लपून, छपून रहावे लागते, पकडल्यावर शिक्षा भोगावी लागते इत्यादी. जर मनुष्याने विश्वास आणि संतोष ठेवला तर अंत:-करणात महान् शांती, आनंद, प्रसन्नता राहते तसेच येणारे धनही येते आणि जितके जगण्याचे प्रारब्ध असेल तितकी जीवननिवार्हाची सामुग्रीही कोणत्या ना कोणत्या प्रकारे मिळत राहते.

जसे व्यापारात तोटा येणे, घरामध्ये एखाद्याचा मृत्यू होणे, विनाकारण अपयश आणि अपमान होणे इत्यादी प्रतिकूल परिस्थिती कोणीही इच्छित नाही. असे असले तरी ती येतच असते. तसेच अनुकूल परिस्थितीही येतच असते तिला कोणी रोखू शकत नाही. भागवतात आले आहे—

**सुखमैन्द्रियकं राजन् स्वर्गे नरक एव च।**
**देहिनां यद् यथा दुःखं तस्मान्नेच्छेत तत् बुधः॥**
(श्रीमद्भा० ११।८।१)

''राजन्! जसे प्राण्यांना इच्छेशिवाय प्रारब्धानुसार दु:ख प्राप्त होतात, तसेच इंद्रियजन्य सुख स्वर्गात आणि नरकातही प्राप्त होतात. म्हणून बुद्धिमान् मनुष्याने त्या सुखाची इच्छा करू नये.''

जसे धन आणि भोगाचे प्रारब्ध वेगवेगळे असते अर्थात् कोणाचे धनाचे प्रारब्ध असते तर कोणाचे भोगाचे प्रारब्ध असते, तसेच धर्म आणि मोक्षाचा पुरुषार्थही वेगवेगळा असतो अर्थात् कोणी धर्मासाठी पुरुषार्थ करतो आणि कोणी मोक्षासाठी पुरुषार्थ करतो धर्माच्या अनुष्ठानात शरीर, धन इत्यादी वस्तूंची मुख्यता राहते आणि मोक्षाच्या प्राप्तीत भाव तसेच विचाराची मुख्यता राहते.

एक ''करणे'' असते आणि एक ''होणे'' असते. दोन्ही विभाग वेगवेगळे आहेत. करण्याची वस्तू कर्तव्य आणि होण्याची वस्तू फल आहे. मनुष्याचा कर्म करण्यात अधिकार आहे फलात नाही—''**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन**'' (२।४७) तात्पर्य हे आहे की, होण्याची पूर्ती प्रारब्धानुसार अवश्य होते. त्यासाठी ''असे व्हावे आणि असे होऊ नये'' अशी इच्छा करावयास नको आणि करण्यात शास्त्र आणि लोकमर्यादेनुसार कर्तव्यकर्म करावे. ''करणे'' पुरुषार्थाधीन आहे आणि ''होणे'' प्रारब्धाधीन आहे. म्हणून मनुष्य करण्यात स्वाधीन आहे आणि होण्यात पराधीन आहे. मनुष्याच्या उन्नतीत ''करण्यात सावधान रहावे आणि होण्यात प्रसन्न रहावे'' ही गोष्ट मुख्य आहे.

क्रियमाण, संचित आणि प्रारब्ध—तिन्ही कर्मातून मुक्त होण्याचा काय उपाय आहे?

प्रकृती आणि पुरुष—हे दोन आहेत. प्रकृती सदा क्रियाशील असते परंतु पुरुषात कधी परिवर्तनरूप क्रिया होत नाही. प्रकृतीशी आपला संबंध मानणारा ''प्रकृतिस्थ'' पुरुषच कर्ता भोक्ता बनतो. जेव्हा तो प्रकृतीशी संबंध-विच्छेद करून घेतो अर्थात् आपल्या स्वरूपात स्थित होतो, तेव्हा त्याच्यावर कोणतेही कर्म लागू होत नाही.

प्रारब्धसंबंधी इतर गोष्टी खालील प्रमाणे आहेत.

(१) बोध झाल्यावरही ज्ञानी माणसाचे प्रारब्ध राहते—हे म्हणणे केवळ अज्ञानी लोकांना समजाविण्यासाठीच आहे कारण अनुकूल अथवा प्रतिकूल घटना घडणे हेच प्रारब्ध आहे. प्राण्याला सुखी अथवा दु:खी करण्याचे काम प्रारब्धाचे नाही, तर अज्ञानाचे काम आहे. अज्ञान समाप्त झाल्यास मनुष्य सुखी-दु:खी होत नाही. त्याला केवळ अनुकूलता-प्रतिकूलता याचे ज्ञान होते. ज्ञान होणे दोष नाही तर सुख-दु:खरूप विकार होणे दोष आहे. म्हणून वास्तविक ज्ञानी व्यक्तीस प्रारब्ध नसते.

(२) जसे प्रारब्ध असते तशी बुद्धी बनते. जसे एकाच बाजारात एक व्यापारी मालाची विक्री करतो आणि एक व्यापारी माल खरेदी करतो. पुढे जेव्हा बाजारभावात तेजी येते तेव्हा विक्री करणाऱ्या व्यापाऱ्याचे नुकसान होते आणि खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्याला नफा होतो आणि जेव्हा बाजार भावाला मंदी येते तेव्हा विक्री करणाऱ्या व्यापाऱ्याला नफा होतो आणि खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्याला नुकसान येते. म्हणून खरेदी करण्याची आणि विक्री करण्याची बुद्धी प्रारब्धाने बनते अर्थात् नफा अथवा नुकसानीचे जसे प्रारब्ध असेल, ज्या प्रारब्धानुसार फल भोगविले जाऊ शकेल त्यानुसारच प्रथम बुद्धी बनते. परंतु खरेदी आणि विक्रीची क्रिया न्याययुक्त केली जावी अथवा अन्याययुक्त केली जावी—यात मनुष्य स्वतंत्र आहे कारण हे क्रियमाण (नवीन कर्म) आहे, प्रारब्ध नव्हे.

(३) एका माणसाच्या हातून ग्लास पडून फुटला तर ती त्याची असावधानी आहे की प्रारब्ध?

---

तस्मान्न शोचामि न विस्मयो मे यदस्मदीयं न हि तत्परेषाम्॥ (पञ्चतन्त्र मित्रसम्प्राप्ति ११२)

''प्राप्त होणारे धन मनुष्याला मिळतच असते, दैवही त्याचे उल्लंघन करू शकत नाही म्हणून मी तर शोकही करीत नाही आणि मला आश्चर्यही वाटत नाही कारण जे आमचे आहे ते दुसऱ्याचे होऊ शकत नाही.''

कर्म करीत असताना तर सावध राहिले पाहिजे परंतु (चांगले अथवा वाईट) जे झाले त्याला पूर्णरूपाने प्रारब्ध—होणारी गोष्ट मानली पाहिजे. त्यावेळी जे हे म्हणतात की, जर तू सावध असतास तर ग्लास फुटला नसता. यावरुन हे समजावे की, आता मला पुढे सावध राहिले पाहिजे की, पुन्हा अशी चूक होऊ नये. वास्तविक जे झाले त्याला असावधानी न म्हणता होणारे मानले पाहिजे. म्हणून करण्यात सावध आणि होण्यात प्रसन्न रहावे.

(४) प्रारब्धाने होणाऱ्या आणि कुपथ्याने होणाऱ्या रोगात काय फरक आहे?

कुपथ्यजन्य रोग औषधाने मिटू शकतो परंतु प्रारब्ध-जन्य रोग औषधाने मिटत नाही. महामृत्युञ्जय इत्यादींचा जप आणि यज्ञ यागादी अनुष्ठान केल्याने, जर अनुष्ठान,प्रबल असेल तर, प्रारब्धजन्य रोग सुद्धा नष्ट होऊ शकतात.

रोगाचे दोन प्रकार आहेत—आधी (मानसिक रोग) आणि व्याधी (शारीरीक रोग). आधीचेही दोन प्रकार आहेत—एक तर शोक-चिंता इत्यादी आणि दुसरे वेडेपणा. चिंता-शोक इत्यादी तर अज्ञानाने होतात आणि वेडेपणा प्रारब्धाने होतो. म्हणून ज्ञान झाल्याने चिंता-शोकादी तर मिटतात परंतु प्रारब्धानुसार वेडेपणा होऊ शकतो. मात्र वेडेपणा झाला तरी ज्ञानी व्यक्तीद्वारा कोणती अनुचित् शास्त्रनिषिद्ध क्रिया होत नाही.

(५) आकस्मिक मृत्यू आणि अकाल मृत्यूत काय फरक आहे? एखादी व्यक्ती साप चावल्यामुळे मेली, अचानक उंचावरून पडून मेली, पाण्यात बुडून मेली, हृदय विकाराने मेली, आकस्मिक दुर्घटनेने मेली, तर हा त्यांचा "आकस्मिक मृत्यू" आहे. स्वाभाविक मृत्यूप्रमाणे आकस्मिक मृत्यूही प्रारब्धानुसार (आयुष्य पूर्ण झाल्याने) होतो.

एखाद्या व्यक्तीने जाणून बुजून आत्महत्या केली, अर्थात् फाशी लावून, विहीरीत पडून, गाडी खाली येऊन, छतावरून उडी मारून, विष भक्षण करून, जाळून घेऊन मेली तर हा तिचा अकाल मृत्यू आहे. हा मृत्यू आयुष्य शिल्लक असतानाही होतो. आत्महत्या करणाऱ्याला मनुष्याच्या हत्येचे पाप लागते. म्हणून हे नवीन पाप कर्म आहे, प्रारब्ध नव्हे. मनुष्यशरीर परमात्मप्राप्तीसाठीच मिळालेले आहे म्हणून त्याला आत्महत्या करून नष्ट करणे फार मोठे पाप आहे.

कित्येक वेळा आत्महत्या करण्याचा प्रयत्न करूनही मनुष्य वाचतो, मरत नाही. याचे कारण त्याचा दुसऱ्या मनुष्याच्या प्रारब्धाशी संबंध जडलेला राहतो. म्हणून त्याच्या प्रारब्धामुळे हा वाचतो. जसे भविष्यात एखाद्याला पुत्र होणार असेल आणि त्याने आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला, तर त्या (पुढे होणाऱ्या) मुलाचे प्रारब्ध त्याला मरू देणार नाही. जर त्या व्यक्तीकडून भविष्यात एखादे विशेष उत्तम काम होणारे असेल, लोकावर उपकार होणार असेल, अथवा याच जन्मात्, याच शरीरात प्रारब्धाचा काही उत्कट भोग (सुख दु:ख) येणारे असेल, तर आत्महत्त्येचा प्रयत्न केला तरी तो मरणार नाही.

(६) एका व्यक्तीने दुसऱ्या माणसाला मारले, तर त्याने मागील जन्मातल्या वैराचा हा बदला घेतला आणि मरणाऱ्याने जुन्या कर्माचे फळ मिळविले. मग मारणाऱ्याचा काय दोष?

मारणाऱ्याचा दोष आहे. शिक्षा करणे शासनाचे काम आहे सामान्य माणसाचे काम नाही. एका माणसाला दहा वाजता फाशीला द्यावयाचे आहे. एका दुसऱ्या व्यक्तीने त्या (फाशीची शिक्षा झालेल्या) व्यक्तीला मारेकऱ्याकडून सोडवून त्याला बरोबर दहा वाजता ठार केले. अशा परिस्थितीत त्या ठार करणाऱ्या व्यक्तीलाही फाशी होईल कारण ही आज्ञा तर मारेकऱ्यांना शासनाने दिली होती परंतु या व्यक्तीला कोणी आज्ञा केली होती?

मारणाऱ्याला ही गोष्ट माहीत नाही की, मी पूर्वजन्मीचा बदला घेत आहे, तरीही मारतो, तर हा त्याचा दोष आहे. दुसऱ्याला मारण्याचा अधिकार कोणालाही नाही. मरणे कोणीही इच्छित नाही. दुसऱ्याला मारणे आपल्या विवेकाचा अनादर आहे. प्रत्येक मनुष्याला विवेक-शक्ती प्राप्त आहे आणि या विवेकानुसार चांगले अथवा वाईट कार्य करण्यात तो स्वतंत्र आहे. म्हणून विवेकाचा अनादर करून दुसऱ्याला मारणे अथवा मारण्याची नीयत ठेवणे दोष आहे.

जर पूर्वजन्मीचा एकमेकाचा असाच बदला घेत फेडीत राहिले तर ही साखळी कधी संपणार नाही आणि मनुष्य कधी मुक्त होऊ शकणार नाही.

मागील जन्माचा बदला अन्य (साप इत्यादी) योनीत घेतला जाऊ शकतो. मनुष्ययोनी बदला घेण्यासाठी नाही. मात्र हे होऊ शकते की, मागील जन्माची हत्यारी व्यक्ती आपल्याला स्वाभाविकच आवडणार नाही, चांगली वाटणार नाही. परंतु वाईट वाटणाऱ्या व्यक्तीशी द्वेष करणे अथवा त्याला कष्ट देणे दोष आहे कारण हे नवीन कर्म आहे.

जसे प्रारब्ध असेल त्यानुसार त्याची बुद्धी बनली तर मग दोष कशाचा?

बुद्धीत जो द्वेष आहे त्याला वश झाला—हा दोष आहे.

त्याने त्याला वश न होता विवेकाचा आदर केला पाहिजे. गीताही म्हणते की, बुद्धीत जे राग-द्वेष राहतात (३।४०) त्यांच्या वश होऊ नये—"**तयोर्न वशमागच्छेत्**" (३।३४)

(७) प्रारब्ध आणि भगवत्कृपा ह्यात काय फरक आहे?

या जीवाला जे काही मिळत असते, ते प्रारब्धानुसार मिळत असते, परंतु प्रारब्ध-विधानाचे विधाता स्वत: भगवान् आहेत. कारण कर्म जड असल्याने स्वतंत्र फल देऊ शकत नाहीत. ते तर भगवंताच्या विधानानुसारच फल देतात. जसे एखादा माणूस एखाद्याच्या शेतात दिवसभर काम करतो तर त्याला सायंकाळी कामानुसार पैसे मिळतात परंतु शेताच्या मालकाकडूनच पैसे मिळतात.

पैसे तर काम करण्यानेच मिळतात, काम केल्याविना पैसे मिळतात काय? काम केल्याविना पैसा कोण देईल? जर एखाद्याने जंगलामध्ये जाऊन दिवसभर मेहनत केली तर त्याला पैसे मिळतील काय? मिळू शकत नाहीत. त्यात हे पाहिले जाते की, कोणाच्या सांगण्याने काम केले आणि कोणाची जबाबदारी होती?

जर एखादा नोकर काम मोठ्या तत्परतेने, चतुरपणे, उत्साहाने करत असेल तर तो मालकाला प्रसन्न करण्यासाठी करत असतो. मालकही प्रसन्न होऊन त्याला मजूरीपेक्षा अधिक पैसे देतो आणि तत्परता आणि गुणांना पाहून त्याला आपल्या शेतात हिस्सेदार देखील करतो. त्याचप्रमाणे भगवान् मनुष्याला त्याच्या कर्मानुसार फल देतात. जर कोणी मनुष्य भगवंताच्या आज्ञेनुसार, त्यांच्या प्रसन्नतेसाठी सर्व कार्य करत असेल तर त्याला भगवान् दुसऱ्यापेक्षा अधिकच देतात. परंतु जो भगवंताना संपूर्णपणे समर्पित होऊन सर्व कार्य करतो त्या भक्ताचे भगवानसुद्धा भक्त बनतात.* संसारात कोणीही नोकराला आपला मालक बनवीत नाही. परंतु भगवान् शरणागत भक्ताला आपला मालक बनवितात. अशी उदारता केवळ प्रभूमध्येच आहे. अशा प्रभूच्या चरणाला शरण न होता जी माणसे प्राकृत—उत्पत्ति-विनाशशील पदार्थांच्या पराधीन होतात, त्यांची बुद्धी पूर्णत: भ्रष्ट झालेली असते. ते ही गोष्ट समजूच शकत नाहीत की, आपल्यासमोर प्रत्यक्ष उत्पन्न आणि नष्ट होणारे पदार्थ आपल्याला कुठपर्यंत आश्रय देऊ शकतात?

***संबंध***—*ज्याप्रमाणे कर्मयोगात कर्मांचा आपल्याशी संबंध राहत नाही, त्याचप्रमाणे सांख्यसिद्धांतातसुद्धा कर्मांचा आपल्याशी किंचिन्मात्रही संबंध राहत नाही. याचे विवेचन पुढे करीत आहेत.*

**पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे।**
**साङ्ख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम्॥ १३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महाबाहो** | = हे महाबाहो! | **सर्वकर्मणाम्** | = संपूर्ण कर्मांच्या | **प्रोक्तानि** | = सांगितली गेली आहेत. |
| **कृतान्ते** | = कर्मांचा अंत करणाऱ्या | **सिद्धये** | = सिद्धीसाठी | | |
| | | **एतानि** | = ही | **मे** | = (त्यांना तू) माझ्याकडून |
| **साङ्ख्ये** | = सांख्य सिद्धांतात | **पञ्च** | = पाच | | |
| | | **कारणानि** | = कारणे | **निबोध** | = समजून घे. |

***व्याख्या***—**पञ्चैतानि महाबाहो कारणानि**—हे महाबाहो! ज्यामध्ये संपूर्ण कर्मांचा अंत होतो अशा सांख्य सिद्धांतात संपूर्ण विहित आणि निषिद्ध कर्म होण्यात पाच कारणे सांगितली गेली आहेत. "स्व" (स्वरूप) त्या कर्मात हेतू नाही.

**निबोध मे**—या अध्यायात भगवंतांनी जेथे सांख्य सिद्धांताचे वर्णन आरंभ केले आहे. तेथे "**निबोध**" क्रियेचा प्रयोग केला आहे (१८।१३,५०) तर अन्य ठिकाणी "शृणु" क्रियेचा प्रयोग केला आहे. (१८।४,१९,२९,३६,४५,६४) तात्पर्य हे आहे की, सांख्य सिद्धांतात तर "**निबोध**" पदाने चांगल्या प्रकारे समजून घेण्याविषयी म्हटले आहे आणि अन्य ठिकाणी "**शृणु**" पदाने ऐकण्याविषयी म्हटले. म्हणून सांख्य सिद्धांत सखोल समजून घेतला पाहिजे. जर तो आपल्या स्वत:कडून (स्व) सखोलतेने समजला तर तात्काळ तत्त्वानुभव होतो.

**साङ्ख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम्**—कर्म मग ते शास्त्र-विहित असो, शास्त्र-निषिद्ध असो, शारीरिक असो, मानसिक असो, वाचिक असो, स्थूल असो, सूक्ष्म असो—या संपूर्ण कर्मांच्या सिद्धीसाठी पाच हेतू सांगितले गेले आहेत. जेव्हा या कर्मांमध्ये पुरुषाचे कर्तृत्व राहते, तेव्हा कर्मसिद्धी आणि कर्मसंग्रह दोन्ही होतात आणि

* एवं स्वभक्तयो राजन् भगवान् भक्तभक्तिमान्। (श्रीमद्भा० १०।८६।५९)

जेव्हा पुरुषाचे या कर्मांच्या होण्यात कर्तृत्व राहत नाही, तेव्हा कर्मसिद्धी तर होते, परंतु कर्मसंग्रह होत नाही, तर केवळ क्रिया होते. जसे संपूर्ण संसारात परिवर्तन होत असते अर्थात् नद्या वाहतात, हवा वाहते, वृक्ष वाढतात इत्यादी-इत्यादी क्रिया होत राहतात. परंतु या क्रियामुळे कर्मसंग्रह होत नाही अर्थात् या क्रिया पाप-पुण्यजनक अथवा बंधनकारक होत नाहीत. तात्पर्य हे झाले की, कर्तृत्वाभिमानानेच कर्मसिद्धी आणि कर्मसंग्रह होतो. कर्तृत्वाभिमान समाप्त झाला तर केवळ क्रियेत अधिष्ठान, करण, प्रयत्न आणि दैव—हे चार हेतूच राहतात. (१८।१४)

येथे सांख्यसिद्धांताचे वर्णन होत आहे. सांख्य-सिद्धांतामध्ये विवेक विचाराची प्रधानता असते. मग भगवंतांनी "**सर्वकर्मणां सिद्धये**" असा कर्माचा मुद्दा का उपस्थित केला? कारण अर्जुनासमोर युद्धाचा प्रसंग आहे. क्षत्रिय असल्यामुळे युद्ध हे त्याचे कर्तव्यकर्म आहे. म्हणून कर्मयोगा-द्वारा अथवा सांख्ययोगाद्वारा अशी कर्मे केली पाहिजेत की, ज्यामुळे ती करून सुद्धा त्यापासून सर्वथा अलिप्त राहता येईल—हे भगवंतांना सांगावयाचे आहे. अर्जुनाने सांख्याचे तत्त्व विचारले आहे म्हणून भगवान् सांख्यसिद्धांतानुसार कर्म करण्याविषयी सांगण्यास आरंभ करीत आहेत.

अर्जुन स्वरूपाने कर्मांचा त्याग करू इच्छित होते. म्हणून त्यांना हे समजून सांगावयाचे होते की, कर्मांचा स्वीकार आणि त्याग दोन्हीही कल्याणाला कारण नाहीत. कल्याणात हेतू तर परिवर्तनशील नाशवान् प्रकृतीशी, अपरिवर्तनशील अविनाशी आपल्या स्वरूपाचा संबंध-विच्छेद हाच आहे. त्या संबंध-विच्छेदाच्या दोन प्रक्रिया आहेत. कर्मयोग आणि सांख्ययोग. कर्मयोगात तर फलाचा अर्थात् ममतेचा त्याग मुख्य आहे आणि सांख्ययोगात अहंतेचा त्याग मुख्य आहे. परंतु ममतेच्या त्यागाने अहंतेचा आणि अहंतेच्या त्यागाने ममतेचा त्याग आपोआप होतो. कारण अहंतेतही ममता राहते. जसे माझे मत स्वीकारले जावे, माझे मत काटले जाऊ नये. ह्या मीपणाबरोबर देखील माझेपण आले आहे. म्हणून ममतेचा (माझेपणा) त्याग झाल्यास अहंता (मी पणा) सुटून जाते.* त्याचप्रमाणे प्रथम अहंता होते नंतर ममता होते. अर्थात् प्रथम "मी" असतो, नंतर "माझेपण" होते. परंतु जर अहंतेचाच (मी पणा) त्याग केला गेला तर मग ममता (माझेपण) कशी राहील? तीही आपोआप सुटून जाईल.

**परिशिष्ट भाव**—आत्मा अकर्ता दाखविण्यासाठी पाच कारणांचे वर्णन करतात. या पाचांत कर्तृत्वाचा त्याग झाल्यास कर्मांचा संपूर्णपणे अंत (संबंध-विच्छेद) होतो.

***संबंध**—संपूर्ण कर्मांच्या सिद्धीत पांच हेतू कोणते आहेत? हे आता सांगत आहेत.*

## अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम्।
## विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम्॥ १४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अत्र** | = यात (कर्मांच्या सिद्धीत) | **च** | = आणि | **पृथक्** | = वेग-वेगळ्या |
| **अधिष्ठानम्** | = अधिष्ठान | **पृथग्विधम्** | = अनेक प्रकारचे करण | **चेष्टा** | = क्रिया |
| **तथा** | = तसेच | **च** | = आणि | **च, एव** | = आणि तसेच |
| **कर्ता** | = कर्ता | **विविधाः** | = विविध प्रकारच्या | **पञ्चमम्** | = पाचवे कारण |
| | | | | **दैवम्** | = दैव (संस्कार) आहे. |

* साक्षात् परमात्म्याचा अंश असल्याने या जीवाची परमात्म्याशी स्वतः सिद्ध आत्मीयता आहे. त्या परमात्म्यापासून विमुख होऊन जीवाने अहंतेशी ममता केली ज्यामुळे स्वतःला "मी संसारी आहे, मी त्यागी आहे, मी विवेकी आहे, मी सुशिक्षित विद्वान् आहे"—असे व्यक्तित्व (मी पणा) प्रिय वाटते आणि हे सुटू नये—अशी भिती वाटते. ही अहंतेशी ममता आहे. याचा त्याग करण्यासाठी कर्मयोगात "माझे काही नाही, मला काहीही नको आणि मला काहीही करावयाचे नाही" याच भावनेने संसाराच्या हितासाठी सर्व क्रिया कराव्यात (कारण कर्मांचा संबंध "पर" शी आहे "स्व" शी नाही). असे केल्याने ममता समाप्त होईल. ममता समाप्त होताच अहंताही सर्वथा समाप्त होईल.

कर्मयोगात स्थूलशरीराच्या क्रिया, सूक्ष्मशरीराचे परहित चिंतन आणि कारणशरीराची स्थिरता (एकाग्रता)—हे तिन्हीही संसाराच्या हितासाठीच होतात. म्हणून दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करता करता सर्वांच्या हिताचे चिंतन होते, हिताचे चिंतन होता होता आपोआपच स्थिरता येते. त्या स्थिरतेत अहंता आणि ममता या दोन्हींचा त्याग होतो आणि त्याग झाल्याने शांती मिळते.

संसाराच्या त्यागाने जी शांती मिळते, ती स्वरूप अथवा साध्य नाही ती तर एक साधन आहे—"योगारुढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते" (६।३) परंतु परमात्म्याच्या प्राप्तीने जी शांती मिळते ती साध्य आहे अर्थात् परमात्म्याचे स्वरूप आहे—"शान्तिं निर्वाणपरमाम्" (६।१५)

आता साधकाने ही सावधगिरी बाळगावी की, त्याने त्या साधनजन्य शांतीचा भोग घेऊ नये. भोग न घेतल्यास आपोआप वास्तविकतेचा अनुभव येईल आणि जर त्याचा भोग घेइल तर तो तेथेच गुंतून राहील.

*व्याख्या*— **अधिष्ठानम्**—शरीर आणि ज्या देशात हे शरीर स्थित आहे तो देश हे दोन्ही "अधिष्ठान" आहेत.

**कर्ता**—संपूर्ण क्रिया प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य यांच्या कडूनच होतात. मग त्या क्रिया व्यष्टीच्या असोत की समष्टीच्या असोत परंतु त्या क्रियांचा कर्ता "स्व" नसतो. केवळ अहंकाराने मोहित अंत:करणाचा अर्थात् ज्याला चेतन आणि जडाचे ज्ञान नाही असा अविवेकी पुरुषच जेव्हा तो प्रकृतीकडून होणाऱ्या क्रियांना आपल्या मानतो तेव्हा तो "कर्ता" बनतो.* असा "कर्ता" च कर्मांच्या सिद्धीत हेतू बनतो.

**करणं च पृथग्विधम्**—एकूण तेरा करणे आहेत. हात, पाय, वाणी, उपस्थ व पायू ही पाच कर्मेंद्रिये कान, डोळे, त्वचा, जीभ व नाक ही पांच ज्ञानेंद्रिये. ही दहा "बहि:करण" आहेत व मन, बुद्धी, अहंकार ही तीन "अंत:करण" आहेत.

**विविधाश्च पृथक्चेष्टाः**—उपर्युक्त तेरा करणांच्या वेग वेगळ्या क्रिया होतात. जसे (१) **पाणी** (हात)—देवाण-घेवाण करणे (२) **पाद** (पाय)—येणे-जाणे, चालणे-फिरणे (३) **वाक** (वाणी)—बोलणे (४) **उपस्थ**—मूत्र त्याग करणे (५) **पायू**—(गुद) मलत्याग करणे (६) **श्रोत्र** (कान)—ऐकणे (७) **चक्षु** (डोळे)—पाहणे, (८) **त्वक** (त्वचा)—स्पर्श करणे (९) **रसना** (जीभ)—चाखणे (१०) **घ्राण** (नाक)—वास घेणे, (११) **मन**—मनन करणे (१२) **बुद्धी**—निश्चय करणे (१३) **अहंकार** "मी असा आहे" इत्यादी अभिमान करणे.

**दैवं चैवात्र पञ्चमम्**—कर्मांच्या सिद्धीच्या पाचव्या हेतूचे नाव "दैव" आहे. येथे दैव संस्कारांना म्हटले आहे. मनुष्य जसे कर्म करतो तसाच संस्कार त्याच्या अंत:करणावर होतो. शुभ कर्माचा शुभ संस्कार आणि अशुभ कर्माचा अशुभ संस्कार होतो. तेच संस्कार पुढे कर्म करण्याची स्फुरणा उत्पन्न करतात. ज्याचा ज्या कर्माचा संस्कार जितका अधिक असतो, तो त्या कर्मात तितकाच सुगमतेने लागू शकतो आणि ज्या कर्माचा विशेष संस्कार नसेल, ते करण्यास त्याला काही परिश्रम होऊ शकतो. त्याचप्रमाणे मनुष्य ऐकतो, पुस्तके वाचतो आणि विचारही करतो तर तेही आपापल्या संस्कारानुसारच करतो. तात्पर्य हे आहे की, मनुष्याच्या अंत:करणात शुभ आणि अशुभ जसे संस्कार असतात त्यानुसार कर्म करण्याची स्फुरणा होते.

या श्लोकात कर्मांच्या सिद्धीत पाच हेतू सांगितले गेले आहेत—अधिष्ठान, कर्ता, करण, क्रिया आणि दैव. याचे कारण असे आहे की, आधाराशिवाय कोणतेही काम कसे केले जाईल? म्हणून "**अधिष्ठान**" पद आले आहे. कर्त्याशिवाय क्रिया कोण करील? म्हणून "**कर्ता**" पद आले आहे. क्रिया करण्याचे साधन (करण) असेल तरच कर्ता क्रिया करील. म्हणून "**करण**" पद आले आहे. करण्याचे साधन असूनही क्रिया केली जाणार नाही तर कर्मसिद्धी कशी होईल? म्हणून "**चेष्टा**" पद आले आहे. कर्ता आपापल्या संस्कारानुसारच क्रिया करील, संस्काराविरुद्ध अथवा संस्काराशिवाय क्रिया करू शकणार नाही. म्हणून "**दैव**" पद आले आहे. अशा प्रकारे हे पाच असल्यानेच कर्मसिद्धी होते.

**परिशिष्ट भाव**—'**कर्ता**'—अहंकार अपरा-प्रकृती आहे आणि जीव परा-प्रकृती आहे. जीवाचा संबंध (सजातीयता) परमात्म्याशी आहे, परंतु तो अहंकाराशी संबंध जोडून स्वत:ला कर्ता मानतो.

'**दैवम्**'—चांगले वाईट संस्कार सर्वांच्या अंत:करणात राहतात—'**सुमति कुमति सब के उर रहहीं**' (मानस, सुंदर० ४०।३). संग, शास्त्र आणि विचार—या तिन्हीपासून चांगल्या अथवा वाईट संस्कारांना बळ मिळते, ज्यामुळे नवीन कर्म होतात.

# शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः।
# न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः॥१५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **नरः** | = मनुष्य | **वा** | = अथवा | | करतो, |
| **शरीरवाङ्मनोभिः** | = शरीर, वाणी आणि मनाद्वारा | **विपरीतम्** | = शास्त्रविरुद्ध | **तस्य** | = त्याचे |
| | | **यत्, वा** | = जे काहीही | **एते** | = हे (पूर्वोक्त) |
| | | **कर्म** | = कर्म | **पञ्च** | = पाच |
| **न्याय्यम्** | = शास्त्रविहित | **प्रारभते** | = आरंभ | **हेतवः** | = हेतू आहेत. |

* संपूर्ण क्रिया प्रकृतीद्वाराच होतात—याचे वर्णन गीतेत अनेक पद्धतीने आले आहे. जसे—(१) सर्व कर्म प्रकृतीद्वाराच केली जातात—"प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः"। (१३।२९), संपूर्ण कर्म प्रकृतीच्या गुणांद्वारा केली जातात—"प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः" (३।२७) (२) गुणच गुणांत वर्तत आहेत—"गुणा गुणेषु वर्तन्ते" (३।२८) द्रष्टा गुणांशिवाय अन्य कोणालाही कर्ता पाहत नाही—"नान्यं गुणेभ्यः कर्तारं

*व्याख्या*— **शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म.............पञ्चैते तस्य हेतवः**—मागील (चौदाव्या) श्लोकात कर्मसिद्धीत जे अधिष्ठान इत्यादी पाच हेतू सांगितले गेले आहेत, ते पाचही हेतू या पदांत येतात. जसे ''**शरीर**'' पदात अधिष्ठान आले. ''**वाक्**'' पदात बहि:करण आणि ''**मन**'' पदात अंत:करण आले, ''**नर:**'' पदात कर्ता आला आणि ''**प्रारभते**'' पदात संपूर्ण इंद्रियांच्या क्रिया आल्या. आता राहिले ''**दैव**'' म्हणजे संस्कार ! हा दैव अर्थात् संस्कार अंत:करणातच राहतो परंतु स्पष्टपणे जाणवत नाही. त्याचा पत्ता तर त्यापासून उत्पन्न झालेल्या वृत्तींनी आणि त्यानुसार केलेल्या कर्मांनीच लागतो.

मनुष्य शरीर, वाणी आणि मन यांनी जे कर्म आरंभ करतो अर्थात् कोठे शरीराच्या प्रधानतेने, कोठे वाणीच्या प्रधानतेने आणि कोठे मनाच्या प्रधानतेने जे कर्म करतो ते मग न्याय्य—शास्त्रविहित असो अथवा विपरीत—शास्त्र-विरुद्ध असो. त्यात हे (पूर्व श्लोकात आलेले) पाच हेतू असतात.

शरीर, वाणी आणि मन—ह्या तिन्हीकडूनच संपूर्ण कर्म होतात. यांच्याकडून केल्या गेलेल्या कर्मांनाच कायिक, वाचिक आणि मानसिक कर्माची संज्ञा दिली जाते. या तिन्हीत अशुद्धी आल्यानेच बंधन होत असते. म्हणूनच या तिन्हींच्या (शरीर, वाणी आणि मन) शुद्धीसाठी सतराव्या अध्यायाच्या चौदाव्या, पंधराव्या आणि सोळाव्या श्लोकात क्रमाने कायिक, वाचिक आणि मानसिक तपाचे वर्णन केले गेले आहे. तात्पर्य हे आहे की, शरीर, वाणी आणि मन यांनी कोणतेही शास्त्रनिषिद्ध कर्म केले जाऊ नये, केवळ शास्त्रविहित कर्मच केली जावीत, तर ते ''तप'' होते. सतराव्या अध्यायाच्याच सतराव्या श्लोकात ''**अफलाकाङ्क्षिभि:**'' पद देऊन हे सांगितले आहे की, निष्कामभावनेने केलेले तप सात्त्विक होते. सात्त्विक तप बंधनकारक नसते, उलट मुक्ती देणारे होते. परंतु राजस तप व तामस तप बंधनकारक असते.

या शरीर, वाणी इत्यादींना आपले समजून आपल्या-साठी कर्म करण्यानेच यांच्यात अशुद्धी येते. म्हणून यांना शुद्ध केल्याशिवाय केवळ विचाराने बुद्धीद्वारा सांख्य सिद्धांताचा विषय तर समजू शकतो परंतु ''कर्माशी किंचिन्मात्रही माझा संबंध नाही'' असा स्पष्ट बोध होऊ शकत नाही. अशा परिस्थितीत साधकाने शरीर इत्यादींना आपले समजू नये आणि आपल्यासाठी कोणतेही कर्म करू नये. असे झाल्यास ते शरीरादी खूप लवकर शुद्ध होतील. म्हणून मग कर्मयोगाच्या दृष्टीने यांना शुद्ध करून यांचा संबंध तोडा किंवा सांख्य-योगाच्या दृष्टीने प्रबल विवेकाद्वारे यांचा संबंध तोडा. दोन्हीही साधनांनी प्रकृतीशी आणि प्रकृतीच्या कार्याशी आपण मानलेल्या संबंधाचा विच्छेद होतो आणि वास्तविक तत्त्वाचा अनुभव होतो.

ज्या समष्टी शक्तीने संपूर्ण संसाराच्या क्रिया होतात त्याच समष्टी शक्तीने व्यष्टी शरीराच्या स्वाभाविक क्रियाही होतात. विवेकाला महत्त्व न दिल्यामुळे ''स्व'' त्या क्रियांपैकी खाणे-पिणे, उठणे-बसणे, झोपणे-जागणे इत्यादी ज्या क्रियांचा कर्ता स्वत:ला मानतो तेथे कर्मसंग्रह होतो अर्थात् त्या क्रिया बंधनकारक होतात. परंतु जर ''स्व'' ने स्वत:ला कर्ता मानले नाही तर कर्म संग्रह होत नाही. त्यावेळी तर केवळ क्रिया होते. म्हणून त्या क्रिया फलोत्पादक अर्थात् बंधनकारक नसतात. जसे बालपणातून तरुण होणे, श्वासांचे येणे-जाणे, भोजनाचे पचन होणे तसेच रस इत्यादी बनणे, इत्यादी क्रिया कर्तृत्वाभिमानाशिवाय प्रकृतीकडून स्वत: स्वाभाविक होतात आणि त्यांचा कोणता कर्मसंग्रह अर्थात् पाप-पुण्य होत नाही. त्याचप्रमाणे कर्तृत्वाभिमान न राहिल्यास ''सर्व क्रिया प्रकृतीकडूनच होतात'' असा स्पष्ट अनुभव होतो.

**परिशिष्ट भाव**—मनात राग-द्वेष, हर्ष-शोक इत्यादी होणे मानसिक कर्म आहेत.

'**न्याय्यम्**' पदाचा अर्थ आहे—सात्त्विक कर्म, शास्त्रविहित कर्म अथवा शुभकर्म. '**विपरीतम्**' पदाचा अर्थ आहे—राजस, तामस कर्म, शास्त्रनिषिद्ध कर्म अथवा अशुभ कर्म. '**न्याय्यं वा विपरीतं वा**' पदांचे तात्पर्य आहे—मात्र कर्म.

---

यदा द्रष्टानुपश्यति'' (१४। १९)। (३) सर्व इंद्रिये आपापल्या अर्थांत (विषयांत) वर्तत आहेत—''इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्ते'' (५। ९) (४) येथे (१८। १४ मध्ये) कर्माच्या सिद्धीत अधिष्ठान इत्यादी पाच हेतू सांगितले गेले आहेत. या सर्वांचे तात्पर्य प्रकृती आणि पुरुष या दोन्हीपैकी केवळ प्रकृतीतच क्रिया होतात, पुरुषात नाही. प्रकृतीशी तादात्म्य केल्यानेच पुरुष त्या क्रियांना आपल्या मानतो. जसे एखादा मनुष्य विमानात बसून असे मानतो की, मी विमानद्वारा जात आहे परंतु वास्तविक विमानच जात असते, मनुष्य नाही. त्याचप्रमाणे पुरुष आपल्याला प्रकृतीच्या क्रियांचा कर्ता मानतो—''अहंकार विमूढात्मा कर्ताहमिति मन्यते।'' (३। २७)

तत्त्व जाणणारा विवेकी पुरुष असा अनुभव करतो की, सर्व क्रिया प्रकृती आणि प्रकृतीच्या कार्यातच होत आहेत, यात मी काहीही करीत नाही—''नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्।'' (५। ८)

*संबंध—भगवंतांनी सांख्यसिद्धांत सांगण्यासाठी जो उपक्रम केला आहे त्यात कर्म होण्यात पाच हेतू दाखविण्याचा काय आशय आहे याचे वर्णन पुढील श्लोकात करीत आहेत.*

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः॥ १६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **केवलम्** | = केवळ (शुद्ध) | **न, पश्यति** | = योग्य पाहत नाही, |
| **एवम्** | = असे पाच हेतू | **अत्मानम्** | = आत्म्याला | **अकृतबुद्धित्वात्** | = कारण त्याची बुद्धी शुद्ध नाही अर्थात् त्याने विवेकाला महत्त्व दिले नाही. |
| **सति** | = असूनही | **कर्तारम्** | = कर्ता | | |
| **यः** | = जो | **पश्यति** | = पाहतो, | | |
| **तत्र** | = या (कर्मांच्या) विषयात | **सः** | = तो | | |
| | | **दुर्मतिः** | = दुष्टबुद्धी असणारा | | |

*व्याख्या*— **तत्रैवं सति....पश्यति दुर्मतिः**—जितकी काही कर्म होतात ती सर्व अधिष्ठान, कर्ता, करण, क्रिया व दैव या पाच हेतूनेच होतात, आपल्या स्वरूपाने नव्हे. परंतु असे असूनही जो पुरुष आपल्या स्वरूपाला कर्ता मानतो त्याची बुद्धी शुद्ध नाही—''**अकृतबुद्धीत्वात्**'' अर्थात् त्याने विवेक विचाराला महत्त्व दिले नाही. जड आणि चेतनाचा, प्रकृती-पुरुषाचा, जो वास्तविक विवेक आहे, वेगळेपणा आहे, त्याकडे त्याने लक्ष दिले नाही. म्हणून त्याच्या बुद्धीत दोष आला आहे. त्या दोषामुळेच तो स्वतःला कर्ता मानतो.

येथे आलेले ''**अकृतबुद्धित्वात्**'' आणि ''**दुर्मतिः**'' पदांचा एकसारखा अर्थ दिसत असला तरी त्यात थोडा फरक आहे. ''**अकृतबुद्धित्वात्**'' पद हेतूच्या रूपात आले आहे आणि ''**दुर्मतिः**'' पद कर्त्याच्या विशेषणाच्या रूपात आले आहे. अर्थात् कर्ता दुर्मति होण्यात अकृतबुद्धीच हेतू आहे. तात्पर्य हे आहे की, बुद्धीला शुद्ध न करण्याने अर्थात् बुद्धीत विवेक जागृत न करण्यानेच तो दुर्मति आहे. जर त्याने विवेकाला जागृत केले असते तर तो दुर्मती राहिला नसता.

केवळ (शुद्ध) आत्मा काही करत नाही. ''**न करोति न लिप्यते**'' (१३।३१) परंतु तादात्म्यामुळे ''मी करत नाही'' असा बोध होत नाही. बोध न होण्यात ''अकृतबुद्धी'' च कारण आहे अर्थात् ज्याने बुद्धी शुद्ध केली नाही तो दुर्मतीच स्वतःला कर्ता मानतो परंतु शुद्ध आत्म्यात कर्तृत्व नाही.

''**केवलम्**'' पद कर्मयोग आणि सांख्ययोग—दोन्हीतही आले आहे. प्रकृती आणि पुरुष यांच्या विवेकाधारे कर्मयोग आणि सांख्ययोग चालतात. कर्मयोगात सर्व क्रिया शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धीद्वाराच होतात परंतु त्यांच्याशी संबंध जडत नाही अर्थात् त्यात ममता होत नाही. ममता न होण्याने शरीर, मन इत्यादींची संसाराशी जी एकता असते, ती एकता अनुभवात येते. एकतेचा अनुभव येताच स्वरूपात स्वतःसिद्ध स्थितीचा अनुभव होतो. म्हणून कर्मयोगात ''**केवलैः**'' पद शरीर, मन, बुद्धी आणि इंद्रियाबरोबर दिले गेले आहे—''**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि**'' (५।११).

सांख्ययोगात विवेक विचाराची प्रधानता असते. जितकी काही कर्म होतात ती सर्व पाच हेतूनेच होतात, आपल्या स्वरूपाने नव्हे. परंतु अहंकाराने मोहित अंतःकरणाचा मनुष्य आपणाला कर्ता मानतो. विवेकाने मोह समाप्त होतो. मोह समाप्त झाल्यास तो आपणाला कर्ता कसा मानू शकतो? अर्थात् त्याला स्वतःच्या शुद्ध स्वरूपाचा अनुभव येतो. म्हणून सांख्ययोगात ''**केवलम्**'' पद स्वरूपाबरोबर दिले गेले आहे—''**केवलम् आत्मानम्**''

आता यात विशेष लक्ष देण्याची एक गोष्ट अशी आहे की, कर्मयोगात ''केवल'' शब्द शरीर, मन, इत्यादीबरोबर राहिल्याने शरीर, मन, बुद्धी इत्यादीबरोबर ''अहम्'' सुद्धा संसाराच्या सेवेत लागेल तसेच स्वरूप जसेच्या तसे राहील. आणि सांख्ययोगात स्वरूपाबरोबर ''**केवल**'' राहिल्याने ''मी निर्लेप आहे'', ''मी शुद्ध बुद्ध मुक्त आहे'' अशा प्रकारे सूक्ष्म रीतीने ''अहम्'' चा गंध शिल्लक राहील. ''मी निर्लेप आहे'', ''माझ्यात कर्तृत्व नाही'' अशी स्थिती फार काळ पर्यंत राहिल्याने हा ''अहम्'' ही आपोआप गळून जाईल अर्थात् आपल्या कारण प्रकृतीत लीन होऊन जाईल.

**परिशिष्ट भाव**—सर्व कारकात कर्ता मुख्य आहे. कर्त्यात चेतनाची झलक येते, इतर कारकात नव्हे. वास्तविक 'कर्ता' नाव चेतनाचे नाही. हा मानलेला कर्ता आहे—'**अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**' (गीता ३।२७). म्हणून भगवंताने येथे आपल्या वास्तविक स्वरूपाला कर्ता मानणाऱ्याची निंदा केली आहे की, त्याची बुद्धी शुद्ध नाही, तो दुर्मती आहे. कारण स्वरूपात

कर्तृत्व आणि भोक्तृत्व दोन्हीही नाहीत—**'शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते'** (गीता १३। ३१). मूळात हे नाहीत, म्हणूनच यांचा त्याग होतो. हे कर्तृत्व भोक्तृत्व भगवंतानीही बनविलेले नाहीत किंवा प्रकृतीनेही, तर जीवाने बनविलेले आहेत.

वास्तविक कर्ता कोणीच नाही, चेतनही कर्ता नाही आणि जडही कर्ता नाही. जर कर्ता मानावाच लागेल तर तो जडातच मानला जाईल. ही गोष्ट भगवंताने गीतेत अनेक प्रकाराने सांगितली आहे. जसे—संपूर्ण क्रिया प्रकृतीद्वाराच होतात अर्थात् प्रकृती कर्ता आहे (तेराव्या अध्यायाचा एकोणतीसावा श्लोक). संपूर्ण क्रिया गुणांद्वारा होतात, गुणच गुणांत वर्तत आहेत अर्थात् गुण कर्ता आहेत. (तीसऱ्या अध्यायाचा सत्तावीसावा—अट्ठावीसावा आणि चौदाव्या अध्यायाचा तेवीसावा श्लोक). इंद्रियेच इंद्रियांच्या विषयात वर्तत आहेत अर्थात् इंद्रिये कर्ता आहेत. (पाचव्या अध्यायाचा नववा श्लोक). तात्पर्य असे आहे की, कर्तृत्व प्रकृतीतच आहे, स्वरूपात नाही. म्हणूनच आपल्या चेतन स्वरूपात स्थित असलेला तत्त्वज्ञ महापुरुष 'मी काहीही करीत नाही' असा अनुभव करतो—**'नैव किञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्'** (गीता ५। ८). भगवान् ही म्हणतात की, जेव्हा मनुष्य गुणांशिवाय इतर कोणाला कर्ता पाहत नाही अर्थात् तो क्रियामात्रात असा अनुभव करतो की, गुणांशिवाय दुसरा कोणी कर्ता नाही आणि स्वत:ला गुणांपासून बिलकुल असंबंध अनुभव करतो, जे वास्तविक आहे,* तेव्हा तो माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो (चौदाव्या अध्यायाचा एकोणीसावा श्लोक).

साधक खाणे-पिणे, झोपणे-जागणे इत्यादी लौकिक क्रियांना तर विचारद्वारा प्रकृतीत होणाऱ्या सुगमतेने मानू शकतो, परंतु तो जप, ध्यान, समाधी इत्यादी पारमार्थिक क्रियांना आपल्या द्वारा होणाऱ्या आणि आपल्यासाठी मानतो, तर हे वास्तविक साधकासाठी बाधक आहे. कारण ज्ञानयोगाच्या दृष्टीने क्रिया मग त्या उच्च असोत अथवा निकृष्ट असोत त्या एका जातीच्याच (प्रकृतीच्याच) असतात. काठी फिरविणे आणि माळेने जप करणे—दोन्ही क्रिया वेग वेगळ्या असूनही प्रकृतीतच आहेत. तात्पर्य हे आहे की, खाणे-पिणे, झोपणे-जागणे इत्यादीपासून जप, ध्यान, समाधीपर्यंतच्या संपूर्ण लौकिक-पारमार्थिक क्रिया प्रकृतीतच होत आहेत. प्रकृतीचा संबंध केल्याविना क्रिया संभवतच नाही. म्हणून साधकाने पारमार्थिक क्रियांचा तर त्याग करू नये, परंतु त्यात आपले कर्तृत्व मानू नये अर्थात् त्यांना आपल्याद्वारा होणाऱ्या आणि आपल्यासाठी मानू नये. क्रिया मग ती लौकिक असो अथवा पारमार्थिक असो, तिचे महत्त्व वास्तविक जडतेचेच महत्त्व आहे. शास्त्रविहित असल्यामुळे पारमार्थिक क्रियांचे अंत:करणात जे विशेष महत्त्व राहते, तेही जडतेचेच महत्त्व असल्यामुळे, साधकासाठी बाधक आहे.† पारमार्थिक क्रियांचा उद्देश परमात्मा असल्यामुळे त्या कल्याणकारक होतात. जस-जशी क्रियांची गौणता आणि भगवत्संबंधाची प्रधानता होते, तस-तसा अधिक लाभ होतो. क्रियेची प्रधानता राहिल्यास वर्षोगणती साधन करूनही लाभ होत नाही. म्हणून क्रियांना महत्त्व नसून भगवंतात प्रियता व्हावी. प्रियताच भजन आहे, क्रिया नव्हे.

ज्याची बुद्धी विवेकरहित आहे अर्थात् ज्याने विवेकाला महत्त्व दिले नाही. तो दुर्मती आहे. बोधात विवेक कारण आहे, बुद्धी नव्हे. विवेकाने बुद्धी शुद्ध होते. बुद्धीच्या शुद्धीत शुभकर्मही काही अंशाने सहायक होतात. परंतु विवेक-विचाराने बुद्धीची जशी शुद्धी होते, तशी शुभकर्माने होत नाही. विवेकाला महत्त्व न देणे जितके दोषी आहे तितके मल, विक्षेप, आवरण दोषी नाहीत. विवेक अनादी आणि नित्य आहे. म्हणून मल-विक्षेप-आवरण राहत असूनही विवेक जागृत होऊ शकतो. पापाने विवेक नष्ट होत नाही, तर विवेक जागृत होत नाही. विवेकाला महत्त्व न देण्यात कारण आहे—क्रिया आणि पदार्थांचे महत्त्व. क्रिया आणि पदार्थांना महत्त्व देणाराच 'दुर्मति' आहे.

***संबंध**—पूर्व श्लोकात हे सांगितले की, शुद्ध स्वरूपाला कर्ता समजणारा दुर्मती योग्य समजत नाही तर मग योग्य समजणारा कोण आहे. याचे वर्णन पुढील श्लोकात करतात.*

**यस्य नाहङ्कृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते।**
**हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते॥ १७॥**

---

* स्वरूप (आत्मा) गुणांपासून सर्वथा रहित आहे—'निर्गुणत्वात्' (गीता १३। ३१). गुण प्रकाश्य आहेत, स्वरूप प्रकाशक आहे. गुण परिवर्तनशील आहेत, स्वरूप अपरिवर्तनशील आहे, गुण अनित्य आहेत, स्वरूप नित्य आहे. स्वरूप निर्गुण असूनही जेव्हा हा गुणांचा संग करतो, तेव्हा जन्म-मरणात सापडतो—'कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु' (गीता १३। २१).

† भगवंतासाठी केल्या गेलेल्या उपासनेत भगवंताची कृपा प्रधान असते. म्हणून त्याच्यात साधकाचे कर्तृत्व नाही. क्रिया, कर्म, उपासना आणि विवेक—चारही वेगवेगळे आहेत. 'क्रिया' कोणाशीही संबंध जोडत नाही. 'कर्म' अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीशी (फलाशी) संबंध जोडते. 'उपासना' भगवंताशी संबंध जोडते. 'विवेक' जड-चेतनाचा संबंध-विच्छेद करतो.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **यस्य** | = ज्याचा | **यस्य** | = ज्याची | **लोकान्** | = संपूर्ण प्राण्यांना |
| **अहङ्कृतः, भावः** | = अहंकृतभाव (मी कर्ता आहे —असा भाव) | **बुद्धिः** | = बुद्धी | **हत्वा, अपि** | = मारूनही |
| | | **न लिप्यते** | = लिप्त होत नाही, | **हन्ति** | = मारीतही |
| | | **सः** | = तो (युद्धात) | **न** | = नाही (आणि) |
| **न** | = नाही (आणि) | **इमान्** | = या | **निबध्यते न** | = बांधलाही जात नाही. |

*व्याख्या*— **यस्य नाहङ्कृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते**—ज्याचे ठिकाणी ''मी कर्ता आहे'' असा अहंकृत भाव नाही आणि ज्याच्या बुद्धीत ''मला फल मिळेल'' अशा स्वार्थभावाचा लेप नाही. याला असे समजून घेऊ. जसे शास्त्र-विहित आणि शास्त्रनिषिद्ध या सर्व क्रिया एका प्रकाशात होतात आणि प्रकाशाच्याच आश्रित होतात परंतु प्रकाश कोणत्याही क्रियेचा ''कर्ता'' होत नाही. अर्थात् प्रकाश त्या क्रियांना करणाराही नाही आणि करविणाराही नाही. त्याच-प्रमाणे स्वरूपाच्या सत्तेशिवाय विहित आणि निषिद्ध कोणती-ही क्रिया होत नाही परंतु ती सत्ता त्या क्रियांना करणारीही नाही आणि करविणारीही नाही, असा ज्याला प्रत्यक्ष अनुभव येतो. त्याच्या ठिकाणी ''मी क्रिया करणारा आहे'' असा अहंकृतभाव राहत नाही आणि ''अमुक वस्तू हवी आणि तमुक वस्तू नको'', ''अमुक घटना घडावी आणि तमुक घटना घडू नये''—असा बुद्धीमध्ये लेप (द्वन्द्व मोह) राहत नाही. अहंकृतभाव आणि बुद्धीत लेप न राहिल्यामुळे त्याचे कर्तृत्व आणि भोक्तृत्व—दोन्ही नष्ट होतात अर्थात् स्वतःत कर्तृत्व आणि भोक्तृत्व—हे दोन्हीही नाहीत, याचा वास्तविक अनुभव येतो.

प्रकृतीचे कार्य स्वतः स्वाभाविकच चालत आहे, परिवर्तन होत आहे आणि आपले स्वरूप केवळ त्याचे प्रकाशक आहे—असे समजून जो आपल्या स्वरूपात स्थित राहतो त्याचे ठिकाणी ''मी करीत आहे'' असा अहंकृतभाव नसतो. कारण अहंकृतभाव प्रकृतीचे कार्य शरीराला स्वीकारल्यानेच होतो. अहंकृतभाव सर्वथा समाप्त झाल्यास त्याच्या बुद्धीत ''फल मला मिळावे'' असा लेपही नसतो अर्थात् फलाची कामना राहत नाही.

अहंकृतभाव एक मनोवृत्ती आहे. मनोवृत्ती असली तरीही हा भाव ''स्व'' (कर्ता) मध्ये राहतो कारण कर्तृत्व आणि अकर्तृत्व भाव स्वच स्वीकार करतो.

**हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते**—त्याने ह्या संपूर्ण प्राण्यांना एकाच वेळी मारून टाकले, तरीही तो मारीत नाही, कारण त्यात कर्तृत्व नाही आणि तो बांधलाही जात नाही. कारण त्यात भोक्तृत्व नाही. तात्पर्य हे आहे की, त्याचा क्रियेशीही संबंध नाही आणि फलाशीही संबंध नाही.

वास्तविक प्रकृतीच क्रिया आणि फलात परिणत होते. परंतु या वास्तविकतेचा अनुभव न झाल्यानेच पुरुष (चेतन) कर्ता आणि भोक्ता बनतो. कारण जेव्हा अहंकारपूर्वक क्रिया होते तेव्हा कर्ता, करण आणि कर्म तिन्ही मिळतात आणि तेव्हाच कर्मसंग्रह होतो. परंतु ज्यात अहंकृतभाव राहिला नाही, केवळ सर्वांचा प्रकाशक, आश्रय, सामान्य चेतनच राहिले, तर मग ते कसे कोणाला मारील? आणि कसे बांधले जाइल? त्याचे ''मारणे'' आणि ''बांधले जाणे'' संभवतच नाही. (२।१९)

संपूर्ण प्राण्यांना मारणे काय आहे? ज्यात अहंकृतभाव नाही आणि ज्याच्या बुद्धीत लेप नाही—अशा मनुष्याचे शरीर, ज्या वर्णाश्रमाचे असेल, त्यानुसार त्याच्यासमोर जी परिस्थिती प्राप्त होईल. त्यात प्रवृत्त झाल्यास त्याला पाप लागत नाही. जसे एखाद्या जीवन्मुक्त क्षत्रियासाठी आपोआप युद्ध परिस्थिती प्राप्त झाली तर तो त्यानुसार सर्वांना मारूनही, मारीतही नाही आणि बांधलाही जात नाही. कारण त्यात स्वार्थभाव आणि अभिमान नाही.

येथे अर्जुनासमोरही युद्धाचा प्रसंग आहे. म्हणून भगवंतांनी ''**हत्वापि**'' पदाने अर्जुनाला युद्धासाठी प्रेरणा केली आहे. ''**अपि**'' पदाचा भाव—''**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति सः**'' हा आहे (४।२०) ''कर्मात उत्तम प्रकारे प्रवृत्त झाला तरीही तो काही करत नाही.'' ''**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते**'' (६।३१) ''सर्वथा वर्तन करत असूनही तो योगी माझ्यात राहतो''. ''**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते**'' (१३।३१) ''शरीरात स्थित असूनही करीतही नाही आणि लिप्तही होत नाही.'' तात्पर्य हे आहे की, कर्मामध्ये सांगोपांग प्रवृत्त होण्याचे वेळी आणि जेव्हा कर्मांत प्रवृत्ती नसते त्या वेळीही स्वरूपाची निर्विकल्पता जशीच्या तशी राहते अर्थात् क्रिया करण्याने आणि न करण्याने स्वरूपात काहीही फरक पडत नाही. कारण क्रिया विभाग प्रकृतीत आहे स्वरूपात नाही.

वास्तविक हा अहंभावच (व्यक्तित्व) मनुष्यात भिन्नता करणारा आहे. अहंभाव न राहिल्यास परमात्म्याशी

भिन्नतेचे काही कारणच राहत नाही. मग तर केवळ सर्वांचा आश्रय, प्रकाशक, सामान्य चेतन राहतो. तो क्रियांचा कर्ताही होत नाही आणि फलाचा भोक्ताही बनत नाही. क्रियांचा कर्ता आणि फलाचा भोक्ता तर तो पूर्वीही नव्हता. केवळ नाशवान् शरीराशी संबंध मानून ज्या अहंभावाचा स्वीकार केला आहे, त्याच अहंभावाने त्यात कर्तेपणा आणि भोक्तेपणा आला आहे.

''अहम्'' दोन प्रकारचा असतो. अहंस्फूर्ती व अहंकृती. गाढ झोपेतून उठताच सर्वात प्रथम मनुष्याला आपल्या असलेपणाचे (सत्तामात्र) भान होते याला ''अहं-स्फूर्ती'' म्हणतात. यानंतर तो आपल्यात ''मी अमुक नाव, वर्ण, आश्रम इत्यादींचा आहे'' असा आरोप करतो. हाच असत्‌चा संबंध आहे. असत्‌च्या संबंधाने अर्थात् शरीराशी तादात्म्य मानल्याने शरीराच्या क्रियांविषयी ''मी करत आहे'' असा भाव उत्पन्न होतो. याला ''अहंकृती'' म्हणतात.

''अहम्'' मुळेच आपल्यात परिच्छिन्नता येते. म्हणून अहं स्फूर्तीतही किंचित् परिच्छिन्नता (व्यक्तित्व) राहू शकते. परंतु ही परिच्छिन्नता बंधनकारक नसते अर्थात् परिच्छिन्नता असली तरीही अहंस्फूर्ती दोषी राहत नाही. कारण अहंकृती अर्थात् कर्तृत्वाशिवाय स्वत:त गुण-दोषाचा आरोप होत नाही. अहंकृती आल्यानेच आपल्यात गुण-दोषाचा आरोप होतो, ज्यामुळे शुभाशुभ कर्म होतात. बोध झाल्यास अहंस्फूर्तीत जी परिच्छिन्नता असते, ती जळून जाते आणि केवळ स्फूर्ती राहते. अशा स्थितीत मनुष्य मारीतही नाही आणि बांधलाही जात नाही.

**न हन्ति न निबध्यते**—(मारीतही नाही आणि बांधलाही जात नाही) याचा काय भाव आहे? एक निर्विकल्प अवस्था असते आणि एक निर्विकल्प बोध असतो. निर्विकल्प अवस्था साधन-साध्य आहे आणि त्याचे व्युत्थानही होते अर्थात् ती एकरस राहत नाही. या निर्विकल्प अवस्थेशीही असंगता झाल्यास स्वत:सिद्ध निर्विकल्प बोधाचा अनुभव होतो. निर्विकल्प बोध साधन-साध्य नाही आणि त्यात निर्विकल्पता कोणत्याही अवस्थेत किंचित्मात्रही भंग होत नाही. निर्विकल्प बोधामध्ये कधी परिवर्तन झाले नाही, होणार नाही आणि होणे संभवतही नाही. तात्पर्य हे आहे की, त्या निर्विकल्प बोधामध्ये कधी चलबिचल इत्यादी होत नाही. हाच ''**न हन्ति न निबध्यते**'' याचा भाव आहे.

अहंकृतभाव आणि बुद्धीत लेप न राहण्याचा उपाय काय आहे? क्रियारूपाने परिवर्तन केवळ प्रकृतीतच होत असते आणि त्या क्रियांचाही आरंभ आणि अंत होत असतो तसेच त्या कर्मांच्या फलरूपात जे पदार्थ मिळतात, त्यांचाही संयोग-वियोग होत राहतो. अशा प्रकारे क्रिया आणि पदार्थ—दोन्हीशी संयोग-वियोग होत राहतो. संयोग-वियोग होत असला तरी स्व तर प्रकाशरूपाने जसाच्या तसाच राहतो. विवेक विचाराने असा अनुभव झाल्यास अहंकृतभाव आणि बुद्धीत लेप राहत नाही.

**परिशिष्ट भाव**—अहंकृतभाव न होण्याचे तात्पर्य आहे—अहंतारहित होणे आणि बुद्धी लिप्त न होण्याचे तात्पर्य आहे—कामना-ममता आणि स्वार्थभावरहित होणे.

अर्जुनाने म्हटले होते की, या आततायींना मारण्याने आम्हाला पाप लागेल—'**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिन:**' (गीता १।३६) आणि गुरुजनांना मारण्याने पाप लागेल—'**गुरुनहत्वा हि महानुभावान्.......**' (गीता २।५). म्हणून येथे भगवान् म्हणतात की, यांना मारण्याने पाप लागायाची गोष्टच काय आहे, संपूर्ण प्राण्यांना मारल्यावरही पाप लागणार नाही. कारण पाप लागण्यात हेतू अहंता आणि बुद्धीची लिप्तता आहे. बुद्धी कामना, ममता आणि स्वार्थभाव यांनी लिप्त होते. गंगाजीत कोणी बुडून मृत्यू पावला तर गंगाजीला पाप लागत नाही आणि जो कोणी तिचे जलपान करतो, स्नान करतो, शेती करतो, तर त्याच्यापासून गंगाजीला पुण्य लागत नाही. पावसाने कित्येक जीव मरतात आणि कित्येकांना जीवन मिळते परंतु पावसाला पाप-पुण्य लागत नाही. कारण गंगाजीत आणि पावसात अहंकृतभाव आणि बुद्धीचा लेप नाही. जर डॉक्टरात कामना, ममता आणि स्वार्थभाव नसेल तर ऑपरेशनात अंग कापल्यावरही त्याला पाप लागत नाही. जर त्यात अहंकृतभावही नसेल तर मग पाप लागण्याची गोष्टच काय आहे!

ज्ञानयोगाने 'अहंकृतभाव' याचा नाश होतो आणि कर्मयोगाने 'बुद्धीची लिप्तता' नष्ट होते. दोन्हीपैकी कोणत्याही एकाचा नाश झाल्यास दुसराही नष्ट होतो. अहंकृतभावामुळेच जीवात भोग आणि मोक्ष याची इच्छा उत्पन्न होते. अहंकृतभाव समाप्त झाल्यास भोगेच्छाही समाप्त होते—'**बुद्धिर्यस्य न लिप्यते**'. भोगेच्छा समाप्त झाल्यास मोक्षाची इच्छा आपोआप पूर्ण होते, कारण मोक्ष स्वत:सिद्ध आहे.

*संबंध— ज्ञान आणि प्रवृत्ती (क्रिया) दोषी नसतात, तर कर्तृत्वाभिमानच दोषी असतो. कारण कर्तृत्वाभिमानानेच कर्म-संग्रह होतो ही गोष्ट पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसङ्ग्रहः॥ १८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ज्ञानम्** | = ज्ञान, | **कर्मचोदना** | = कर्मप्रेरणा होते (तसेच) | **कर्ता** | = कर्ता— |
| **ज्ञेयम्** | = ज्ञेय (आणि) | | | **इति** | = या |
| **परिज्ञाता** | = परिज्ञाता | **कारणम्** | = करण, | **त्रिविधः** | = तिन्हींनी |
| **त्रिविधा** | = या तिन्हींनी | **कर्म** | = कर्म (आणि) | **कर्मसङ्ग्रहः** | = कर्मसंग्रह होतो. |

***व्याख्या—*** [याच अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात भगवंतांनी कर्म होण्यात पाच हेतू सांगितले—अधिष्ठान, कर्ता, करण, प्रयत्न आणि दैव (संस्कार). या पाचातही मूळ हेतू कर्ता आहे. या मूळ हेतूला मिटविण्यासाठी भगवंतांनी सोळाव्या श्लोकात कर्तृत्वभाव ठेवणाऱ्याची खूप मोठी निंदा केली आणि सतराव्या श्लोकात कर्तृत्वभाव न ठेवणाऱ्याची खूप प्रशंसा केली. कर्तृत्वभाव मुळीच राहू नये हे स्पष्टपणे समजावून सांगण्यासाठीच अठरावा श्लोक सांगितला गेला आहे]

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना**—ज्ञान, ज्ञेय आणि परिज्ञाता—ह्या तिन्हींनी कर्मप्रेरणा होते. "ज्ञाना" ला सर्वात प्रथम सांगण्यात हा भाव आहे की, प्रत्येक मनुष्याला कोणतीही प्रवृत्ती होवो, त्या प्रवृत्तीपूर्वी ज्ञान असते. जसे पाणी पिण्याच्या प्रवृत्तीपूर्वी तहानेचे ज्ञान असते. मग तो पाण्याने आपली तहान भागवितो. पाणी इत्यादी ज्या विषयाचे ज्ञान होते ते "ज्ञेय" म्हटले जाते आणि ज्याला ज्ञान होते तो "परिज्ञाता" म्हटला जातो. ज्ञान, ज्ञेय आणि परिज्ञाता तिन्ही असल्यानेच कर्म करण्याची प्रेरणा होते. जर या तिन्हीपैकी एकाचीही उणीव असेल तर कर्म करण्याची प्रेरणा होणार नाही.

**परिज्ञाता**—जो "**परितः**" ज्ञाता असतो, त्याला परिज्ञाता म्हणतात अर्थात् जो सर्व प्रकारच्या क्रियांच्या स्फुरणांचा ज्ञाता आहे. तो केवळ "ज्ञाता" च आहे अर्थात् त्याला प्रत्येक क्रियेच्या स्फुरणाचे ज्ञान होते. त्याच्यात आपल्यासाठी काही इच्छिण्याचा वा ती क्रिया करण्याचा अभिमान मुळीच नसतो.

कोणतीही क्रिया करण्याची स्फुरणा एका व्यक्ती-विशेषमध्येच होत असते. म्हणून शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध—या विषयानुसार ऐकणारा, स्पर्श करणारा, पाहणारा, चाखणारा आणि वास घेणारा अशा तऱ्हेने अनेक कर्ते होऊ शकतात. परंतु त्या सर्वांना जाणणारा एकच राहतो, त्यालाच येथे "**परिज्ञाता**" म्हटले आहे.

**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसङ्ग्रहः**—कर्म-संग्रहाचे तीन हेतू आहेत—करण, कर्म तसेच कर्ता. या तिन्हीच्या सहयोगाने कर्म पूर्ण होते. ज्या साधनांनी कर्ता कर्म करतो त्या क्रिया करण्याच्या साधनांना (इंद्रिये इत्यादी) "करण" म्हणतात. खाणे-पिणे, उठणे-बसणे, चालणे-फिरणे, येणे-जाणे इत्यादी ज्या क्रिया केल्या जातात त्यांना "कर्म" म्हणतात. करण आणि क्रियेशी आपला संबंध जोडून कर्म करणाऱ्याला "कर्ता" म्हणतात. अशा प्रकारे या तिन्हीच्या मिळण्याने कर्म बनते.

भगवंताना येथे मुख्य गोष्ट ही सांगावयाची आहे की, कर्मसंग्रह कसा होतो? अर्थात् कर्म बंधनकारक कसे होते? कर्म होण्याचे तीन हेतू सांगून भगवंताचे लक्ष्य मूळ हेतू "कर्ता" याला दाखविण्याचे आहे. कारण कर्मसंग्रहाचा मुख्य संबंध कर्त्याशी आहे. जर कर्तेपणा नसेल तर कर्मसंग्रह होणार नाही केवळ क्रियाच होते.

कर्मसंग्रहात "करण" हेतू नाही कारण करण कर्त्याचे अधीन असते. कर्ता जसे कर्म करू इच्छिल तसेच कर्म होते. म्हणून "कर्म" सुद्धा कर्मसंग्रहात मुख्य हेतू नाही. सांख्य-सिद्धांतानुसार मुख्य बंधनकारक अहंकृतभाव आहे आणि यानेच कर्मसंग्रह होतो. अहंकृतभाव न राहिल्यास कर्मसंग्रह होत नाही अर्थात् कर्म फलजनक होत नाही. हे मूळ अर्थात् अहंकृतभावाचे ज्ञान करवून देण्यासाठीच भगवंतांनी करण आणि कर्माला प्रथम सांगून कर्त्याला कर्मसंग्रहाजवळ ठेवले आहे, त्यामुळे लक्षात यावे की, बांधणारा "कर्ता" च आहे.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाने ज्ञानयोग आणि कर्मयोग यांचे तत्त्व जाणण्याची इच्छा प्रगट केली होती (अठराव्या अध्यायाचा

पहिला श्लोक), म्हणून भगवंताने बाराव्या श्लोकापर्यंत कर्मयोगाचे वर्णन केले. मग भगवंताने ज्ञानयोगाच्या दृष्टीतून कर्मांचे विवेचन करीत प्रथम कर्मांच्या सिद्धीसाठी पाच हेतू सांगितले (अठराव्या अध्यायाचा तेरावा, चवदावा आणि पंधराव्या श्लोक). तीच गोष्ट आता प्रकारान्तराने कर्मप्रेरणा आणि कर्मसंग्रह यांच्या रूपात वर्णन करीत आहेत.

जेव्हा मनुष्याच्या अंत:करणात अहंकार आणि लिप्तता राहते, तेव्हा ज्ञाता-ज्ञान-ज्ञेयरूपी त्रिपुटीने 'कर्मप्रेरणा' अर्थात् पाप आणि पुण्याचा संग्रह होतो. ते पाप आणि पुण्य कर्म कसे होतात—ही गोष्ट पुढे विसाव्या श्लोकापासून विस्तारपूर्वक सांगतील.

***संबंध—*** *गुणातीत होण्याच्या उद्देशाने आता पुढील श्लोकापासून त्रिगुणात्मक पदार्थांचे प्रकरण आरंभ करतात.*

## ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः।
## प्रोच्यते गुणसङ्ख्याने यथावच्छृणु तान्यपि॥ १९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **गुणसङ्ख्याने** | = गुणांचे विवेचन करणाऱ्या शास्त्रात | **च** | = आणि | | प्रकाराचेच |
| **गुणभेदतः** | = गुणांच्या भेदाने | **कर्म** | = कर्म | **प्रोच्यते** | = म्हटले जातात, |
| **ज्ञानम्** | = ज्ञान, | **च** | = तसेच | **तानि, अपि** | = त्यांनाही (तू) |
| | | **कर्ता** | = कर्ता | **यथावत्** | = यथार्थरूपाने |
| | | **त्रिधा, एवं** | = तीन-तीन | **शृणु** | = ऐक. |

*व्याख्या*— **प्रोच्यते गुणसङ्ख्याने**—ज्या शास्त्रात गुणांच्या संबंधाने प्रत्येक पदार्थाच्या भिन्न भिन्न भेदांची गणना केली गेली आहे, त्याच शास्त्रानुसार मी तुला ज्ञान, कर्म तसेच कर्ता यांचे भेद सांगत आहे.

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः**—मागील श्लोकात भगवंतांनी कर्माची प्रेरणा होण्यात तीन हेतू सांगितले तसेच तीनच हेतू कर्म होण्यात सांगितले. अशा प्रकारे कर्म-संग्रह होण्यापर्यंत एकूण सहा गोष्टी सांगितल्या.* आता या श्लोकात भगवान् ज्ञान, कर्म, तसेच कर्ता—या तिन्हींचेच विवेचन करणार आहेत. कर्मप्रेरक विभागापैकी विवेचन करण्यासाठी केवळ "ज्ञान" घेतले गेले आहे कारण कोणत्याही कर्माच्या प्रेरणेत प्रथम ज्ञानच होते. ज्ञानानंतरच कार्याचा आरंभ होतो. कर्मसंग्रह विभागापैकी केवळ "कर्म" आणि "कर्ता" घेतले गेले आहे. जरी कर्म होण्यात कर्ता मुख्य आहे, तरीपण त्याबरोबर कर्मालाही घेण्याचे कारण हे आहे की, कर्ता जेव्हा कर्म करतो, तेव्हाच कर्मसंग्रह होतो. जर कर्त्याने कर्म केले नाही तर कर्मसंग्रह होणारच नाही. तात्पर्य हे झाले की, कर्मप्रेरणेत "ज्ञान" तसेच कर्मसंग्रहात "कर्म" आणि "कर्ता" मुख्य आहे. हे तिन्ही—(ज्ञान, कर्म आणि कर्ता) सात्त्विक असले तरच मनुष्य निर्लिप्त होऊ शकतो, राजस आणि तामस असल्यास होऊ शकत नाही. म्हणून येथे कर्मप्रेरक विभागातून "ज्ञाता" आणि "ज्ञेय" यांना आणि कर्मसंग्रह विभागातून "करण" याला घेतले गेले नाही.

कर्मप्रेरक विभागाचे "ज्ञाता" आणि "ज्ञेय" यांचे विवेचन का केले नाही ? कारण ज्ञाता जेव्हा क्रियेशी संबंध जोडतो, तेव्हा तो "कर्ता" म्हटला जातो आणि त्या कर्त्याच्या तीन (सात्त्विक, राजस आणि तामस) भेदांच्या अंतर्गतच ज्ञात्याचेही तीन भेद होतात. परंतु ज्ञाता जेव्हा ज्ञप्तीमात्र राहतो, तेव्हा त्याचे तीन भेद होत नाहीत. कारण त्यात गुणांचा संग नसतो. गुणांचा संग झाल्यानेच त्याचे तीन भेद होतात. म्हणून वृत्ति-ज्ञानच सात्त्विक, राजस आणि तामस होते.

ज्याला जाणले जाते त्या विषयाला "ज्ञेय" म्हणतात. जाणण्याचे विषय अनेक आहेत म्हणून त्याचे वेगळे विभाग केले गेले नाहीत. परंतु जाणण्यायोग्य सर्व विषयांचे एकमात्र लक्ष्य "सुख" प्राप्त करणे हेच असते. जसे एखादा विद्या शिकतो, कोणी पैसा मिळवतो, कोणी अधिकार मिळविण्याचा प्रयत्न करतो. तर या सर्व विषयांना जाणणे, मिळविणे याच्या प्रयत्नाचे लक्ष्य एक मात्र "सुख" च असते. विद्या शिकण्यात हाच भाव राहतो की, अधिक शिकून अधिक पैसा मिळवीन, मान मिळवीन आणि त्यापासून मी सुखी होईन. त्याचप्रमाणे प्रत्येक कर्माचे लक्ष्य

* कर्मप्रेरणा तर सूक्ष्म आहे आणि कर्मसंग्रह स्थूल आहे अर्थात् ज्ञान, ज्ञेय आणि ज्ञाता—ही तिन्ही सूक्ष्म सामुग्री आहे तसेच कर्म, करण आणि कर्ता—ही तिन्ही स्थूल सामुग्री आहे.

परंपरेने सुखच राहते. म्हणून भगवंतांनी ज्ञेयाचे तीन भेद सात्त्विक, राजस आणि तामस ''सुखा'' च्या नावाने पुढे (१८।३६ ते ३९ मध्ये) केले आहेत.

त्याचप्रमाणे भगवंतांनी करणाचेही तीन भेद केले नाहीत कारण इंद्रिये इत्यादी जितके काही करण आहेत ते सर्व केवळ साधनच आहेत. म्हणून त्यांचे तीन भेद होत नाहीत. परंतु या सर्व करणांत ''बुद्धी'' चीच प्रधानता आहे कारण मनुष्य करणांनी जे काही काम करतो त्याला तो बुद्धीपूर्वकच (विचारपूर्वक) करतो. म्हणून भगवंतांनी करणाचे तीन भेद ''बुद्धी'' च्या नावाने पुढे (१८।३० ते ३२ मध्ये) केले आहेत.

बुद्धीला दृढतापूर्वक ठेवण्यात ''धृती'' बुद्धीची सहायक बनते. ज्ञानयोगाच्या साधनेत भगवंतांनी दोन ठिकाणी (६।२५ मध्ये तसेच १८।५१ मध्ये) बुद्धीबरोबर ''धृती'' पदही दिले आहे यावरुन असे दिसते की, ज्ञानमार्गात बुद्धी बरोबर धृतीची विशेष आवश्यकता आहे. म्हणून भगवंतांनी धृतीचेही तीन भेद (१८।३३ ते ३५ मध्ये) सांगितले आहेत.

**त्रिधैव**—या पदाचा हा भाव आहे की, हे भेद तीनच (सात्त्विक, राजस आणि तामस) होतात कमी किंवा जास्त होत नाहीत अर्थात् दोन होत नाहीत किंवा चार होत नाहीत. कारण सत्त्व, रज आणि तम—हे तीन गुणच प्रकृतीपासून उत्पन्न होतात—''**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः**'' (१४।५) म्हणून या तीन गुणांनुसार तीनच भेद होतात.

**यथावत्**—गुणसंख्यान शास्त्रात या विषयाचे जसे वर्णन झाले आहे तसेच्या तसे तुला सांगत आहे. माझ्याकडून काहीच कमी किंवा अधिक करून सांगत नाही.

**शृणु**—या विषयाला लक्ष लावून ऐक. कारण सात्त्विक, राजस आणि तामस—या तिन्हीपैकी ''सात्त्विक'' वस्तू तर कर्मांशी संबंध विच्छेद करून परमात्मतत्त्वाचा बोध करविणाऱ्या आहेत, ''राजस'' वस्तू जन्म-मरण देणाऱ्या आहेत आणि ''तामस'' वस्तू पतन करणाऱ्या अर्थात् नरक आणि नीच योनींना नेणाऱ्या आहेत. म्हणून यांचे वर्णन ऐकून सात्त्विक वस्तूंचा स्वीकार आणि राजस, तामस वस्तूंचा त्याग केला पाहिजे.

**तानि**—या ज्ञान इत्यादींचा तुझ्या स्वरूपाशी काहीही संबंध नाही. तुझे स्वरूप तर सदा निर्लेप आहे.

**अपि**—यांच्या भेदांना जाणण्याचीसुद्धा फार मोठी आवश्यकता आहे. कारण यांना योग्य रीतीने जाणल्यास ''**यस्य नाहंकृतो भावो.....न हन्ति न निबध्यते**'' (१८।१७) या श्लोकाचा योग्य अनुभव येईल अर्थात् आपल्या स्वरूपाचा बोध होईल.

***संबंध***—*आता भगवान् सात्त्विक ज्ञानाचे वर्णन करीत आहेत.*

## सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते।
## अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम्॥ २०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **येन** | = ज्या ज्ञानाद्वारा (साधक) | **अविभक्तम्** | = विभागरहित | **ईक्षते** | = पाहतो, |
| | | **एकम्** | = एक | **तत्** | = ते |
| | | **अव्ययम्** | = अविनाशी | **ज्ञानम्** | = ज्ञान (तू) |
| **विभक्तेषु, सर्वभूतेषु** | = संपूर्ण विभक्त प्राण्यांत | **भावम्** | = भाव (सत्ता) | **सात्त्विकम्** | = सात्त्विक |
| | | | | **विद्धि** | = समज. |

***व्याख्या***— **सर्वभूतेषु येनैकं..............अविभक्तं विभक्तेषु**—व्यक्ती, वस्तू इत्यादीमध्ये जो ''आहे'' पणा दिसतो तो त्या व्यक्ती, वस्तू इत्यादीचा नाही, तर सर्वात परिपूर्ण असलेल्या परमात्म्याचाच आहे. त्या व्यक्ती, वस्तू इत्यादीची स्वतंत्र सत्ताच नाही, कारण त्यात प्रत्येक क्षणाला परिवर्तन होत आहे. कोणतीही व्यक्ती, वस्तू अशी नाही, ज्यात परिवर्तन होत नाही, परंतु आपल्या अज्ञानाने त्यांची सत्ता दिसते. जेव्हा अज्ञान समाप्त होते, ज्ञान होते, तेव्हा साधकाची दृष्टी त्या अविनाशी तत्त्वाकडेच जाते, ज्याच्या सत्तेने हे सर्व सत्तावान् दिसत आहे.

ज्ञान झाल्यास साधकाची दृष्टी परिवर्तनशील वस्तूंचा भेद करून परिवर्तनरहित तत्त्वाकडेच जाते (१३।२७) मग तो विभक्त अर्थात् वेगवेगळ्या वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, घटना, इत्यादीमध्ये विभागरहित एकाच तत्त्वाला पाहतो (१३।१६). तात्पर्य हे आहे की, वेगवेगळ्या वस्तू, व्यक्ती इत्यादीचे वेगवेगळे ज्ञान आणि यथायोग्य वेगवेगळा

व्यवहार असूनही तो या विकारी वस्तूंमध्ये त्या स्वत:सिद्ध निर्विकार एका तत्त्वाला पाहतो. त्याच्या पाहण्याचे हेच लक्षण आहे की, त्याच्या अंत:करणात राग-द्वेष नसतात.

**तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम्**—त्या ज्ञानाला तू सात्त्विक समज. परिवर्तनशील वस्तूं, वृत्तींच्या संबंधानेच ह्याला ''सात्त्विक ज्ञान'' म्हणतात. संबंधरहित झाल्यास हेच ज्ञान ''वास्तविक बोध'' म्हटला जातो, ज्याला भगवंतांनी सर्व साधनांनी जाणण्यायोग्य ज्ञेय-तत्त्व म्हटले आहे—''**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते**।'' (१३।१२)

## मार्मिक गोष्ट

संसाराचे ज्ञान इंद्रियांनी होते, इंद्रियांचे ज्ञान बुद्धीने होते आणि बुद्धीचे ज्ञान ''मी'' पासून होते. तो ''मी'' बुद्धी, इंद्रिये आणि विषय—या तिन्हींना जाणतो. परंतु त्या ''मी'' चाही एक प्रकाशक आहे, ज्यात ''मी'' चेही भान होते. तो प्रकाश सर्वदेशीय आणि असीम आहे परंतु ''मी'' एकदेशीय आणि सीमित आहे. त्या प्रकाशात जसे ''मी'' चे भान होते तसेच ''तू'', ''हा'' आणि ''तो'' याचेही भान होते. तो प्रकाश कोणाचाही विषय नाही. वास्तविक तो प्रकाश निर्गुणच आहे, परंतु व्यक्ती-विशेषमध्ये राहणारा असल्यामुळे (वृत्तींच्या संबंधाने) त्याला ''सात्त्विक ज्ञान'' म्हणतात.

या सात्त्विक ज्ञानाला दुसऱ्या रीतीने अशा प्रकारे समजून घ्यावे. ''मी'', ''तू'', ''हा'' आणि ''तो''—हे चौघे एका प्रकाशात काम करतात. या चौघाच्या अंतर्गत संपूर्ण प्राणी येतात, जे विभक्त आहेत, परंतु यांचा जो प्रकाशक आहे, तो अविभक्त (विभागरहित) आहे.

बोलणारा ''मी'' त्याच्या समोर ऐकणारा ''तू'' आणि जवळ असणारा ''हा'' तसेच दूर असणारा ''तो'' म्हटला जातो अर्थात् बोलणारा स्वत:ला ''मी'' म्हणतो. समोरच्याला ''तू'' म्हणतो, जवळच्याला ''हा'' म्हणतो आणि दूरच्याला ''तो'' म्हणतो. जो ''तू'' बनला होता तो ''मी'' झाला तर ''मी'' बनलेला ''तू'' होईल आणि ''हा'' आणि ''तो'' तसेच राहतील. त्याचप्रमाणे ''हा'' म्हणविणारा जर ''मी'' बनला तर ''तू'' म्हणविणारा ''हा'' होईल आणि ''मी'' म्हणविणारा ''तू'' होईल. ''तो'' परोक्ष असल्याने आपल्या जागीच राहील. आता ''तो'' म्हणविणारा ''मी'' बनेल तर त्याच्या दृष्टीत ''मी'' ''तू'' ''हा'' म्हणविणारे सर्व ''तो'' (ते) होतील.* अशा प्रकारे ''मी'', ''तू'', ''हा'' आणि ''तो'' हे चारही एक दुसऱ्याच्या दृष्टीने चारीही बनू शकतात.

यावरुन हे सिद्ध झाले की ''मी'', ''तू'', ''हा'' आणि ''तो''—हे सर्व परिवर्तनशील आहेत अर्थात् टिकणारे नाहीत, वास्तविक नाहीत. जर वास्तविक असते तर एक-च राहिले असते वास्तविक ज्याच्या प्रकाशात ''मी'', ''तू'', ''हा'' आणि ''तो'' याचे भान होत आहे, तो या सर्वांचा प्रकाशक आणि आश्रय आहे. त्या प्रकाशात ''मी'', ''तू'', ''हा'' आणि ''तो'' हे चौघेही नाहीत, तर त्यापासूनच या चौघांना सत्ता मिळते. आपल्या मान्यतेमुळे ''मी'', ''तू'', ''हा'' आणि ''तो'' याचे तर भान होते परंतु प्रकाशकाचे भान होत नाही. तो प्रकाशक सर्वांना प्रकाशित करतो, स्वत: प्रकाशस्वरूप आहे आणि सदा जसाच्या तसा राहतो. ''मी'' ''तू'' ''हा'' आणि ''तो''—हे सर्व विभक्त प्राण्यांचे स्वरूष आहे आणि जो वास्तविक प्रकाशक आहे तो विभागरहित आहे. हेच वास्तविक ''सात्त्विक ज्ञान'' आहे.

विभक्त, परिवर्तनशील आणि नष्ट होणाऱ्या जितक्या वस्तू आहेत, हे ज्ञान त्या सर्वांचे प्रकाशक आहे आणि ''स्व'' देखील निर्मळ तसेच विकाररहित आहे—''**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम्**'' (१४।६) म्हणून या ज्ञानाला ''सात्त्विक'' म्हटले जाते.

वास्तविक हे सात्त्विक ज्ञान प्रकाश्याच्या दृष्टीने (संबंधाने) ''प्रकाशक'' आणि विभक्ताच्या दृष्टीने ''अविभक्त'' म्हटले जाते. प्रकाश्य आणि विभक्तरहित झाल्यास तर हे निर्गुण, निरपेक्ष ''वास्तविक ज्ञान'' च आहे.

**परिशिष्ट भाव**—जसे सामान्य मनुष्य शरीरात आपल्याला व्यापक मानतो, तसेच साधक संसारात परमात्म्याला व्यापक मानतो. जसे शरीर आणि संसार एक आहेत, तसेच स्वयं आणि परमात्मा एक आहेत.

---

* उदाहरणाच्या रूपात राम, शाम, गोविंद आणि गोपाल ह्या चार व्यक्ती आहेत. राम आणि शाम एक दुसऱ्यासमोर आहेत, गोविंद त्यांच्या जवळ आहे आणि गोपाल त्यांच्यापासून दूर आहे. राम स्वत: ला ''मी'' म्हणतो, आपल्या समोरच्या शामला ''तू'' म्हणतो, जवळच्या गोविंदला ''हा'' म्हणतो आणि दूर असलेल्या गोपालला ''तो'' म्हणतो. आता जर शामने स्वत:ला ''मी'' म्हणले तर रामला ''तू'' म्हणेल, गोविंदाला ''हा'' म्हणेल आणि गोपाळ याला ''तो'' म्हणेल. त्याच प्रमाणे गोविंदने आपल्याला ''मी'' म्हणले तर तो शामला ''हा'' म्हणेल आणि रामाला ''तू'' म्हणेल अथवा शामला ''तू'' आणि रामाला ''हा'' म्हणेल तसेच दूर असणाऱ्या त्या गोपाळला तर ''तो'' म्हणेल. आता जर गोपालने आपल्याला ''मी'' म्हणले तर तो राम, शाम आणि गोविंद—तिघांना ''तो'' म्हणेल. अशा प्रकारे राम, शाम, गोविंद आणि गोपाळ हे चारही एक दुसऱ्याच्या दृष्टीत मी, तू, हा आणि तो बनू शकतात.

साधकाच्या दृष्टीत प्राण्यांचीही सत्ता राहिल्यामुळे हे 'सात्त्विक ज्ञान' (विवेक) म्हटले गेले आहे. जर त्याच्या दृष्टीत प्राण्यांची सत्ता राहिली नाही, केवळ अविनाशी सत्ताच राहिली तर हे गुणातीत 'तत्त्वज्ञान' च (ब्रह्मप्राप्तीच) आहे. ती अविनाशी सत्ता सर्व ठिकाणी समानरूपाने विद्यमान आहे. त्या सत्तेशी आपले स्वाभाविक ऐक्य आहे.

***संबंध***—*आता राजस ज्ञानाचे वर्णन करीत आहेत.*

## पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान्।
## वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम्॥ २१॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **भूतेषु** | = प्राण्यांत | **वेत्ति** | = जाणतो, |
| **यत्** | = जे | **पृथक्त्वेन** | = वेगवेगळे | **तत्** | = ते |
| **ज्ञानम्** | = ज्ञान अर्थात् ज्या ज्ञानाद्वारा मनुष्य | **नानाभावान्** | = अनेक भाव | **ज्ञानम्** | = ज्ञान (तू) |
| **सर्वेषु** | = संपूर्ण | **पृथग्विधान्** | = वेगवेगळ्या रूपाने | **राजसम्** | = राजस |
| | | | | **विद्धि** | = जाण. |

*व्याख्या*— **पृथक्त्वेन तु* यज्ज्ञानं नानाभावान् पृथग्विधान्**—राजस ज्ञानात ''आसक्ती'' ची मुख्यता असते— ''**रजो रागात्मकं विद्धि**'' (१४।७). आसक्तीचा हा नियम आहे की, ती ज्याच्यात येते त्याच्यात कोणाविषयी तरी आसक्ती, प्रियता उत्पन्न करविते आणि कोणाविषयी तरी द्वेष उत्पन्न करविते. या आसक्तीमुळेच मनुष्य, देवता, यक्ष-राक्षस, पशु-पक्षी, कीट-पतंग, वृक्ष-लता इत्यादी जितके काही चराचर प्राणी आहेत, त्या प्राण्यांची वेगवेगळी आकृती, स्वभाव, नाम, रूप, गुण इत्यादींना अनुसरून राजस ज्ञानाचा मनुष्य त्यांच्यात राहणाऱ्या एकाच अविनाशी आत्म्याला तत्त्वाने वेगवेगळे समजतो.

**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम्**— त्याचप्रमाणे ज्या ज्ञानाने मनुष्य वेगवेगळ्या शरीरांत, अंतः-करण, स्वभाव, इंद्रिये, प्राण इत्यादींच्या संबंधाने प्राण्यांनाही वेगवेगळे मानतो. हे ज्ञान राजस म्हटले जाते. राजस ज्ञानात जड-चेतनाचा विवेक नसतो.

**परिशिष्ट भाव**—क्रिया आणि पदार्थ—दोन्हींना सत्ता देऊन आसक्तिपूर्वक संबंध जोडण्यामुळे सर्व वेग-वेगळे दिसतात.

***संबंध***— आता तामस ज्ञानाचे वर्णन करतात-

## यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम्।
## अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम्॥ २२॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | | शरीरातच | | ज्ञानरहित (आणि) |
| **यत्** | = जे (ज्ञान) अर्थात् ज्या ज्ञानाद्वारा मनुष्य | **कृत्स्नवत्** | = संपूर्णाप्रमाणे | **अल्पम्** | = तुच्छ आहे, |
| | | **सक्तम्** | = आसक्त राहतो | **तत्** | = ते |
| | | **च** | = तसेच (जे) | **तामसम्** | = तामस |
| **एकस्मिन्** | = एका | **अहैतुकम्** | = युक्तिरहित, | **उदाहृतम्** | = म्हटले गेले आहे. |
| **कार्ये** | = कार्यरूपी | **अतत्त्वार्थवत्** | = वास्तविक | | |

*व्याख्या*— **यत्तु† कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तम्**—तामस मनुष्य एकाच शरीरात संपूर्णाप्रमाणे आसक्त राहतो अर्थात् उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या या पञ्चभौतिक शरीरालाच आपले स्वरूप मानतो. तो असे मानतो की, मीच लहान मुलगा होतो, मीच तरुण आहे आणि मीच म्हातारा होईल, मी भोगी, बलवान आणि सुखी आहे, मी धनी आणि माझा परिवार मोठा आहे, माझ्या बरोबरीचा दुसरा कोण आहे? इत्यादी अशी मान्यता मूढतेमुळेच होते—''**इत्यज्ञानविमोहिताः**'' (१६।१५)

**अहैतुकम्**—तामस मनुष्याची मान्यता युक्ती आणि शास्त्रप्रमाणाच्या विरुद्ध असते. हे शरीर प्रत्येक क्षणाला बदलत

* येथे ''तु'' पद राजस ज्ञानाला सात्त्विक ज्ञानापेक्षा भिन्न दाखविण्यासाठी आले आहे.
† या श्लोकात राजस ज्ञानापेक्षाही तामस ज्ञानाला भिन्न दाखविण्यासाठी ''तु'' पद आले आहे.

आहे. शरीरादी सर्व वस्तू अभावात परिवर्तित होत आहेत, सर्व दृश्य, अदृश्यात जात आहे आणि यात तू सदा जसाच्या तसा राहतोस, म्हणून हे शरीर आणि तू एक कसा होऊ शकतोस? अशा प्रकारच्या युक्तींना तो स्वीकार करीत नाही.

**अतत्त्वार्थवदल्पं च**—हे शरीर आणि "मी" दोन्ही वेगवेगळे आहेत—या वास्तविक ज्ञानाने (विवेक) तो रहित आहे. त्याची समज अत्यंत तुच्छ असते अर्थात् तुच्छतेची प्राप्ती करविणारी असते. म्हणून तिला "ज्ञान" म्हणण्यात भगवंतांना संकोच झाला आहे. कारण तामस पुरुषात मूढतेची प्रधानता असते. मूढता आणि ज्ञानाचा परस्पर विरोध आहे. म्हणून भगवंतांनी "ज्ञान" पद न देता "**यत्**" आणि "**तत्**" पदानेच काम भागविले आहे.

**तत्तामसमुदाहृतम्**—युक्तिरहित, अल्प आणि अत्यंत तुच्छ समज हिलाच महत्त्व देणे "तामस" म्हटले गेले आहे.

जर तामस समज "ज्ञान" नाहीच आणि भगवंतांना-सुद्धा याला "ज्ञान" म्हणण्यात संकोच झाला आहे, तर मग हिचे वर्णनच कशाला केले गेले? कारण भगवंतांनी एकोणीसाव्या श्लोकात ज्ञानाचे तीन भेद आहेत असे सांगितले आहे, म्हणून सात्त्विक आणि राजस ज्ञानाचे वर्णन केल्यानंतर तामस समजसुद्धा सांगण्याची आवश्यकता होती.

**परिशिष्ट भाव**—तामस ज्ञानात आसुरी-संपत्ती विशेष असते. या श्लोकात 'ज्ञान' शब्द न देण्याचे तात्पर्य हे आहे की, वास्तविक हे ज्ञान नव्हे तर अज्ञानच आहे. ही तामस मनुष्यांची बुद्धी आहे, ज्याला 'पशुबुद्धी' म्हटले गेले आहे—

**त्वं तु राजन् मरिष्येति पशुबुद्धिमिमां जहि।**
**न जातः प्रागभूतोऽद्य देहवत्त्वं न नङ्क्ष्यसि॥** (श्रीमद्भा० १२।५।२)

(श्रीशुकदेवजी म्हणाले—) 'हे राजन्! आता तू ही पशुबुद्धी सोडून दे की, मी मरेल. जसे शरीर पूर्वी नव्हते, नंतर उत्पन्न झाले आणि मग मरेल, तसे तू पूर्वी नव्हतास, नंतर उत्पन्न झालास आणि मग मरशील—अशी गोष्ट नाही.'

***संबंध**—आता भगवान् सात्त्विक कर्माचे वर्णन करीत आहेत.*

## नियतं सङ्गरहितमरागद्वेषतः कृतम्।
## अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते॥ २३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **सङ्गरहितम्** | = कर्तृत्वाभिमानरहित असलेले (तसेच) | **अरागद्वेषतः** | = राग-द्वेषाविना |
| **कर्म** | = कर्म | | | **कृतम्** | = केलेले असेल, |
| **नियतम्** | = शास्त्रविधीने नियत केलेले (आणि) | **अफलप्रेप्सुना** | = फलेच्छारहित मनुष्याद्वारा | **तत्** | = ते |
| | | | | **सात्त्विकम्** | = सात्त्विक |
| | | | | **उच्यते** | = म्हटले जाते. |

***व्याख्या*— नियतं सङ्गरहितम्....सात्त्विकमुच्यते**—ज्या व्यक्तीसाठी वर्ण आश्रमानुसार ज्या परिस्थितीत आणि ज्या वेळी शास्त्रांनी जसे करण्यास सांगितले आहे, त्याच्या-साठी ते कर्म "नियत" आहे.

येथे "**नियतम्**" पदाने एकतर कर्माचे स्वरूप सांगितले आहे आणि दुसरें शास्त्रनिषिद्ध कर्माचा निषेध केला आहे.

**सङ्गरहितम्**—या पदाचे तात्पर्य हे आहे की, ते नियत कर्म कर्तृत्वाभिमानरहित होऊन केले जावे. कर्तृत्वाभिमान-रहित होऊन म्हणण्याचा भाव असा आहे की, जसे वृक्षात मूढतेमुळे त्यांना कर्तृत्वाचे भान नसते. परंतु त्यांच्याही सर्व क्रिया ऋतुकाळी पाने झडणे, नवीन पाने येणे, शाखा तुटल्यावर घाव मिटणे, शाखांचे वाढणे, फुले-फळे लागणे इत्यादी समष्टी शक्तीद्वारा आपोआपच होत असतात. त्याचप्रमाणे या सर्व शरीरांचे वाढणे-घटणे, खाणे-पिणे, चालणे-फिरणे इत्यादी सर्व क्रिया देखील समष्टी शक्तीद्वारा आपोआप होत आहेत. या क्रियांशी आत्ताही कोणता संबंध नाही, अगोदरही संबंध नव्हता आणि पुढेही कोणता संबंध राहणार नाही. अशा प्रकारचा अनुभव जेव्हा साधकाला प्रत्यक्ष येतो, तेव्हा मग त्यात कर्तृत्व राहत नाही. कर्तृत्व न राहिल्यास त्याच्याकडून जे कर्म होते ते संगरहित अर्थात् कर्तृत्वाभिमानरहितच होते.

येथे सांख्य प्रकरणात कर्तृत्वाचा त्याग मुख्य असल्याने आणि पुढे "**अरागद्वेषतः कृतम्**" पदांतही आसक्तीच्या त्यागासंबंधी सांगितले गेल्याने येथे "**सङ्गरहितम्**" पदाचा अर्थ कर्तृत्वाभिमानरहित असा घेतला गेला आहे.*

* येथे संन्यासात (सांख्ययोग) "सङ्गरहितम्" पदाने कर्तृत्वअभिमानरहित होण्याचा उल्लेख आला आहे आणि त्यागात (कर्मयोगात)

**अरागद्वेषतः कृतम्**—या पदांचे तात्पर्य हे आहे की, राग-द्वेषरहित होऊन कर्म केले जावे अर्थात् कर्माचा स्वीकार रागपूर्वक नसावा आणि कर्माचा त्याग द्वेषपूर्वक नसावा तसेच कर्म करण्याची जितकी साधने (शरीर, इंद्रिये, अंत:करण इत्यादी) आहेत त्यातही राग-द्वेष नसावा.

''**अरागद्वेषतः**'' पदाने वर्तमानात आसक्तीचा अभाव सांगितला आहे आणि ''**अफलप्रेप्सुना**'' पदाने भविष्यात आसक्तीचा अभाव सांगितला आहे. तात्पर्य हे आहे की, भविष्यात मिळणाऱ्या फलेच्छूरहित मनुष्याकडून कर्म केले जावे अर्थात् क्रिया आणि पदार्थांपासून निर्लिप्त राहून असंगता-पूर्वक कर्म केले जावे, तर ते सात्त्विक म्हटले जाते.

या सात्त्विक कर्मात जोपर्यंत अत्यंत सूक्ष्मरूपाने देखील प्रकृतीशी संबंध आहे तोपर्यंतच सात्त्विकता आहे. जर प्रकृतीशी संबंध-विच्छेद झाला तर हे कर्म ''अकर्म'' होते.

***संबंध***—*आता राजस कर्माचे वर्णन करतात.*

**यत्तु कामेप्सुना कर्म साहङ्कारेण वा पुनः।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम्॥ २४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **वा** | = अथवा | **क्रियते** | = केले जाते |
| **यत्** | = जे | **साहङ्कारेण** | = अहंकाराने | **तत्** | = ते |
| **कर्म** | = कर्म | **पुनः** | = आणि | **राजसम्** | = राजस |
| **कामेप्सुना** | = भोगेच्छेने | **बहुलायासम्** | = परिश्रमपूर्वक | **उदाहृतम्** | = म्हटले गेले आहे. |

*व्याख्या*— **यत्तु* कामेप्सुना कर्म**—आम्ही कर्म करू तर आम्हाला पदार्थ मिळतील, सुख-आराम मिळेल, भोग मिळतील, आदर-सन्मान, मोठेपणा मिळेल इत्यादी फलेच्छेने कर्म केले जावे.

**साहङ्कारेण**—लोकांसमोर कर्म करण्याने लोक पाहतात आणि प्रशंसा करतात त्यामुळे अभिमान येतो आणि जेथे समाज नसतो तेथे (एकान्तात) कर्म करण्याने दुसऱ्यापेक्षा आपल्यात विलक्षणता, विशेषता पाहून अभिमान येतो. जसे—दुसरी माणसे आमच्याप्रमाणे व्यवस्थित, सांगोपांग कार्य करू शकत नाहीत, आमच्यात काम करण्याची जी योग्यता, विद्या, चतुरता, इत्यादी आहे ती प्रत्येक माणसात मिळू शकणार नाही, आम्ही जे काही काम करतो, ते फारच इमाने इतबारे करतो आणि लवकर करतो इत्यादी इत्यादी. अशा प्रकारे अहंकारपूर्वक केले गेलेले कर्म राजस म्हटले जाते.

**वा पुनः**—भविष्यात मिळणाऱ्या फलाच्या इच्छेने (फलेच्छापूर्वक) कर्म केले जाइल अथवा वर्तमानात आपली विशेषता दाखविण्यासाठी (अहंकारपूर्वक) कर्म केले जाइल—या दोन भावांपैकी एक भाव झाला तरीही ते कर्म ''राजस'' होते हे सांगण्यासाठी येथे ''**वा पुनः**'' पद आले आहे. तात्पर्य हे आहे की, फलेच्छा आणि अहंकार—या दोन्हीपैकी जर एक भाव झाला तरीही कर्म ''राजस'' होते, तर मग दोन्ही भाव झाल्यास ते कर्म राजस होणारच.

**क्रियते बहुलायासम्**—कर्म करतेवेळी प्रत्येक व्यक्तीच्या शरीराला परिश्रम तर होतोच. परंतु ज्या व्यक्तीत शरीराच्या सुख आरामाची इच्छा मुख्य असते त्याला कर्म करतेवेळी शरीरास अधिक प्रमाणात क्लेश वाटतात.

ज्या व्यक्तीत कर्मफलाची इच्छा तर मुख्य आहे, परंतु शारीरीक सुख-आरामाची इच्छा मुख्य नाही अर्थात् सुख-आराम घेण्याची स्वाभाविकच प्रकृती नाही, त्याला कर्म करून सुद्धा शरीरास परिश्रम वाटत नाही. कारण अंत:करणात भोग आणि संग्रहाची जोरदार कामना असल्याने त्याची वृत्ती कामनापूर्तीकडेच लागलेली राहते, शरीराकडे नाही. तात्पर्य हे आहे की, शरीराच्या सुख-आरामाची मुख्यता असल्याने फलेच्छेची अवहेलना होते आणि फलेच्छेची मुख्यता असल्याने शरीराच्या सुख-आरामाची अवहेलना होते.

लोकांसमोर कर्म करतेवेळी अहंकारजन्य सुखाचा

---

''सङ्गं त्यक्त्वा फलं चैव'' (१८।९) पदांनी आसक्ती तसेच फलेच्छारहित होण्याचा उल्लेख आला आहे. याचे तात्पर्य हे आहे की, सांख्ययोग्याच्या शरीरात थोडाही अभिमान राहिला तर त्याचा शरीराशी संबंध कायम राहील जो तत्त्वप्राप्तीत बाधक राहील, परंतु कर्मयोग्याचा शरीरात थोडा अभिमान जरी राहिला तरी तो सांख्ययोग्याइतका बाधक नसतो. कारण (कोणतेही कर्म आपल्यासाठी न करण्याने) कर्मयोग्याचा कर्तृत्वाभिमान केवळ कर्तव्यपालनासाठीच असतो, अर्थात् तो ज्यावेळी जे कार्य करतो, फक्त त्याच वेळी त्याच्यात तात्कालिक कर्तृत्वाभिमान असतो. कार्य संपताच तो कर्तृत्वाभिमान त्या कार्यात लीन होऊन जातो.

* राजस कर्माला सात्त्विक कर्मापासून वेगळे दाखविण्यासाठी येथे ''तु'' पदाचा प्रयोग झाला आहे.

खुराक मिळाल्याने आणि शरीराच्या सुख-आरामाची मुख्यता नसल्याने राजस मनुष्याला कर्म करण्यात परिश्रम वाटत नाही. परंतु एकांतात कर्म करतेवेळी अहंकारजन्य सुखाचा खुराक न मिळाल्याने आणि शरीराच्या सुख-आरामाची मुख्यता असल्याने राजस मनुष्याला कर्म करण्यात अधिक परिश्रम वाटतो.

**तद्राजसमुदाहृतम्**—अशा फलेच्छू माणसाकडून अहंकार आणि परिश्रमपूर्वक केले गेलेले कर्म, ''राजस'' म्हटले गेले आहे.

**परिशिष्ट भाव**—राजस मनुष्य आपल्या आवश्यकतेला अधिक वाढवितो, ज्यामुळे प्रत्येक कामात त्याला अधिक वस्तूंची आवश्यकता भासते. अधिक वस्तूंना जमविण्यात परिश्रमसुद्धा अधिक होतात. राजस मनुष्य कर्मांचा विस्तार अधिक करतो, म्हणूनही त्याला परिश्रम अधिक होतात. शरीरात आसक्ती असल्यामुळे राजस मनुष्य शरीरास आराम इच्छितो, ज्यामुळे त्याला थोड्याकामातही अधिक परिश्रम वाटतात.

*संबंध—आता तामस कर्माचे वर्णन करीत आहेत.*

**अनुबन्धं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम्।**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते॥ २५ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **च** | = आणि | | केले जाते, |
| **कर्म** | = कर्म | **पौरुषम्** | = सामर्थ्य | **तत्** | = ते |
| **अनुबन्धम्** | = परिणाम, | **अनवेक्ष्य** | = न पाहता | **तामसम्** | = तामस |
| **क्षयम्** | = हानी, | **मोहात्** | = मोहपूर्वक | **उच्यते** | = म्हटले |
| **हिंसाम्** | = हिंसा | **आरभ्यते** | = आरंभ | | जाते. |

*व्याख्या*— **अनुबन्धम्**—फलेच्छू मनुष्य फलप्राप्तीसाठी विचारपूर्वक कर्म करतो, परंतु तामस मनुष्यात मूढतेची प्रधानता असल्यामुळे तो कर्म करताना विचारच करीत नाही. हे कार्य करण्याने माझे तसेच दुसऱ्या प्राण्यांचे आत्ता आणि परिणामी किती नुकसान होईल, किती अहित होईल—या अनुबंधाला अर्थात् परिणामाला न पाहता तो कार्य आरंभ करतो.

**क्षयम्**—हे कार्य करण्याने आपल्या आणि दुसऱ्यांच्या शरीराची किती हानी होईल, पैसा आणि समय किती खर्च होईल, यामुळे जगात माझा अपमान, तिरस्कार, निंदा इत्यादी किती होईल, माझा लोक-परलोक इत्यादी दोन्हीही बिघडून जातील इत्यादी नुकसानीला न पाहताच तो कार्य आरंभ करतो.

**हिंसाम्**—या कर्मापासून किती जीवांची हत्या होईल, श्रेष्ठ व्यक्तींच्या सिद्धांताची आणि मान्यतेची किती हत्या होईल, दुसऱ्या माणसांच्या मनुष्यत्वाची केवढी मोठी हिंसा होईल. आत्ताचे आणि भावी जीवांचे शुद्ध भाव, आचरण, वेशभूषा खाणे-पिणे इत्यादींची किती मोठी हिंसा होईल, याने माझे आणि जगाचे किती अध:पतन होईल इत्यादी हिंसेचा विचार न करताच तो कार्य आरंभ करतो.

**अनवेक्ष्य च पौरुषम्**—हे काम करण्यात माझी किती योग्यता आहे, किती बल, किती सामर्थ्य आहे, माझ्या-जवळ किती काळ आहे, केवढी बुद्धी आहे, केवढी कला आहे, केवढे ज्ञान आहे, इत्यादी आपल्या पुरूषार्थाला (सामर्थ्या) न पाहताच ते कार्य आरंभ करतो.

**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते**—तामस मनुष्य कर्म करतेवेळी त्याचा परिणाम, त्यापासून होणारे नुकसान, हिंसा आणि आपल्या सामर्थ्याचा काहीही विचार न करता जेव्हा जसा मनात भाव आला त्याचवेळी विवेक विचार न करता तसेच करून बसतो. अशा प्रकारे केले गेलेले कर्म ''तामस'' म्हटले जाते.

**परिशिष्ट भाव**—तामस मनुष्य आपली शक्ती, परिणाम इत्यादीचा विचार न करून मूढतेने काम करतो.* तो स्वाभाविकच असे काम करतो, ज्याद्वारा दुसऱ्याला बाधा पोहचेल. जसे वाटेत उभे राहून बोलू लागणे, वाटेत सायकल उभी करणे इत्यादी—दुसऱ्यांना आपल्याकडून बाधा होत आहे याकडे त्याचे लक्षच जात नाही.

---

* बिना बिचारे जो करै, सो पाछे पछिताय। काम बिगारै आपनौ, जग में होत हँसाय॥
जग मे होत हँसाय, चित्त में चैन नपावे। खान पान सनमान, राग-रँग मन नहिं भावै॥
कह गिरधर कविराय करमगति टरत नटारे। खटकत हैं जिय माहिं कियौ जो बिना बिचारे॥

सात्त्विक स्वभाव आपोआप उत्थानाकडे जातो, राजस स्वभावात उन्नती रोखली जाते आणि तामस स्वभाव सहज पतनाकडे जातो.

***संबंध**—आतां भगवान् सात्त्विक कर्त्याची लक्षणे सांगत आहेत.*

**मुक्तसङ्गोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः।**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते॥ २६ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कर्ता** | = (जो) कर्ता | **समन्वितः** | उत्साहयुक्त (तसेच) | **निर्विकारः** | = निर्विकार आहे, (तो) |
| **मुक्तसङ्गः** | = आसक्तिरहित | **सिद्ध्यसिद्ध्योः** | = सिद्धी आणि असिद्धीत | **सात्त्विकः** | = सात्त्विक |
| **अनहंवादी** | = कर्तृत्वाभिमानरहित | | | **उच्यते** | = म्हटला जातो. |
| **धृत्युत्साह-** | = धैर्य आणि | | | | |

***व्याख्या**—* **मुक्तसङ्गः**—जसे सांख्ययोग्याचा कर्माशी राग (आसक्ती) राहत नाही तसे सात्त्विक कर्ताही रागरहित असतो.

कामना, वासना, आसक्ती, स्पृहा, ममता इत्यादीशी आपला संबंध जोडल्यामुळेच वस्तू, व्यक्ती, पदार्थ, परिस्थिती, घटना इत्यादीविषयी आसक्ती, लिप्तता होते. सात्त्विक कर्ता या लिप्ततेपासून सर्वथा रहित असतो.

**अनहंवादी**—पदार्थ, वस्तू, परिस्थिती इत्यादीला अनुसरून आपल्याठिकाणी एका विशेषतेचा अनुभव करणे म्हणजे अहंवदनशीलता आहे. ही अहंवदनशीलता आसुरी संपत्ती असल्याने अत्यंत निकृष्ट आहे. सात्त्विक कर्त्यामध्ये ही अहंवदनशीलता, अभिमान तर राहतच नाही, उलट ''मी या वस्तूंचा त्यागी आहे, माझ्यात हा अभिमान नाही, मी निर्विकार आहे, मी सम आहे, मी सर्वथा निष्काम आहे, मी संसाराशी संबंधरहित आहे'' अशा प्रकारच्या अहंभावाचा-सुद्धा त्यात अभाव राहतो.

**धृत्युत्साह समन्वितः**—कर्तव्यकर्म करताना विघ्न-बाधा आल्या, त्या कर्माचा परिणाम योग्य झाला नाही, लोकात निंदा झाली, तरीही विघ्न-बाधा आली नसताना जसे धैर्य असते तसेच धैर्य विघ्न-बाधा आल्यावरही नित्य-निरंतर कायम राहणे याचे नाव ''धृती'' आहे आणि यशच मिळत राहिले, उन्नती होत राहिली, लोकांत मान, सन्मान, आदर वाढतच गेला, अशा स्थितीत जशी उमेद, यशाविषयी उत्साह राहतो, तशीच उमेद या विपरीत स्थितीतही अर्थात् अपयश, अवनती, निंदा इत्यादी झाली असताही कायम राहणे याचे नाव ''उत्साह'' आहे. सात्त्विक कर्ता अशा प्रकारच्या धृती आणि उत्साहाने युक्त राहतो.

**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः**—सिद्धी-असिद्धीत आपल्यात कोणताही विकार येऊ नये, आपल्यावर त्याचा काहीही परिणाम होऊ नये अर्थात् कार्य योग्य रीतीने सांगोपांग पूर्ण होवो अथवा पूर्ण प्रयत्न करूनही (आपली शक्ती, समज, सामर्थ्य, समय इत्यादींना पूर्ण लावूनही) कार्य पूर्ण झाले नाही, फल प्राप्त झाले अथवा झाले नाही, तरीसुद्धा आपल्या अंत:करणात प्रसन्नता आणि खिन्नता, हर्ष आणि शोक न होणे हेच सिद्धी-असिद्धीत निर्विकार राहणे आहे.

**कर्ता सात्त्विक उच्यते**—असा आसक्ती आणि अहंकार रहित, धैर्य तसेच उत्साहयुक्त आणि सिद्धी-असिद्धीमध्ये निर्विकार असलेला कर्ता ''सात्त्विक'' म्हटला जातो.

या श्लोकात सहा गोष्टी सांगितल्या आहेत. संग, अहंवदनशीलता, धृती, उत्साह, सिद्धी आणि असिद्धी. या पैकी प्रथम दोन गोष्टींनी रहित, मधल्या दोन गोष्टींनी युक्त व शेवटच्या दोन गोष्टीत निर्विकार राहण्यास सांगितले आहे.

**परिशिष्ट भाव**—सिद्धी-असिद्धीत निर्विकार, सम राहण्याची गोष्ट गीतेत तीन वेळ आली आहे—'**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा**' (२।४८), '**समः सिद्धावसिद्धौ च**' (४।२२) आणि येथे '**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः**'. तात्पर्य हे आहे की, सिद्धि-असिद्धी आपल्या हातातली गोष्ट नाही, परंतु त्यात निर्विकार राहणे हे आपल्या स्वाधीन आहे. जे आपल्या स्वाधीन आहे, ते योग्य करायचे आहे.

'**अनहंवादी**' सात्त्विक मनुष्य 'जसे मी करू शकतो तसे दुसरा करू शकत नाही'—अशाप्रकारे बाहेरुनही बोलत नाही किंवा आतूनही बोलत नाही. स्वत:त विशेषतेचा अनुभव करणे म्हणणेच आतून बोलणे आहे.

***संबंध**—आता राजस कर्त्याची लक्षणे सांगतात.*

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः॥ २७॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **कर्ता** | = (जो) कर्ता | **हिंसात्मकः** | = हिंसक स्वभावाचा | **हर्षशोकान्वितः** | = हर्ष-शोकयुक्त आहे (तो) |
| **रागी** | = रागी (आसक्तियुक्त) | **अशुचिः** | = अशुद्ध (आणि) | **राजसः** | = राजस |
| **कर्मफलप्रेप्सुः** | = कर्मफलेच्छू, | | | **परिकीर्तितः** | = म्हटला गेला आहे. |
| **लुब्धः** | = लोभी, | | | | |

*व्याख्या*— **रागी**—रागाचे (आसक्तीचे) स्वरूप रजोगुण असल्यामुळे भगवंतांनी राजस कर्त्याच्या लक्षणात सर्वात प्रथम "रागी" पद दिले आहे. रागाचा अर्थ, कर्मांत, कर्मफलांत तसेच वस्तू, पदार्थ इत्यादीत मनाची ओढ असणे, मनाची प्रियता असणे, असा आहे. या वस्तूंचा ज्याचेवर रंग चढतो तो "रागी" असतो.

**कर्मफलप्रेप्सुः**—राजस मनुष्य कोणतेही काम करेल तर ते कोणत्या तरी फलाच्या इच्छेनेच करेल. जसे मी असे असे अनुष्ठान करीत आहे, दान देत आहे, त्यापासून येथे धन, मान, सन्मान इत्यादी मिळतील आणि परलोकात स्वर्गादीचे भोग, सुख इत्यादी मिळतील, मी अशा अशा औषधीचे सेवन करीत आहे त्यामुळे माझे शरीर निरोगी राहील इत्यादी.

**लुब्धः**—राजस मनुष्याला जितके, जे काही मिळते, त्यात तो संतोष मानीत नाही, उलट "**जिमि प्रतिलाभ लोभ अधिकाई**" प्रमाणे "आणखी मिळत रहावे, आणखी मिळत रहावे" अर्थात् आदर, सत्कार, माहात्म्य इत्यादी अधिकाती अधिक होत रहावे, धन, पुत्र, परिवार इत्यादी अधिकाती-अधिक वाढत रहावे. अशा प्रकारची हाव वाढतच राहते, लोभ चिकटलेला राहतो.

**हिंसात्मकः**—तो हिंसक स्वभावाचा असतो. स्वतःच्या स्वार्थासाठी तो दुसऱ्याच्या हानीची, दुःखाची परवा करीत नाही. तो जसजशी अधिक भोगसामुग्री जमवून भोग भोगतो, तसतशी दुसऱ्या अभावग्रस्त लोकांच्या अंतःकरणात जळजळ उत्पन्न होते. म्हणून दुसऱ्यांच्या दुःखाची परवा न करणे तसेच भोग भोगणे हिंसाच आहे.

तामस कर्म (१८। २५) आणि राजस कर्ता दोन्हीत हिंसा दाखविण्याचे तात्पर्य हे आहे की, मूढता असल्यामुळे तामस मनुष्याच्या क्रिया विवेकपूर्वक नसतात. म्हणून चालणे-फिरणे, उठणे-बसणे, इत्यादीत त्याच्याकडून हिंसा होते. राजस मनुष्य आपल्या सुखासाठी उच्च श्रेणीचे भोग भोगतो तर त्याला पाहून ज्यांना ते भोग मिळत नाहीत, त्यांच्या अंतःकरणात जळजळ होते. ही हिंसा त्या भोग भोगणाऱ्यालाच लागते. कारण कोणताही भोग हिंसेशिवाय नसतोच. तात्पर्य हे आहे की, तामस मनुष्याद्वारा तर कर्मात हिंसा होते आणि राजस मनुष्य स्वतः हिंसात्मक असतो.

**अशुचिः**—रागी (आसक्त) पुरुष भोगबुद्धीने ज्या वस्तूं, पदार्थ इत्यादींचा संग्रह करतो, त्या सर्व वस्तूं अपवित्र होतात. तो जेथे राहतो तेथील वायुमंडळ अपवित्र होते. तो ज्या वस्त्रांचा वापर करतो, ती वस्त्रही अपवित्र होतात. याच कारणामुळे आसक्ती-ममतायुक्त मनुष्याच्या मृत्यूनंतर त्याच्या वस्त्र इत्यादिकांना कोणी वापरू इच्छित नाही. ज्या स्थानावर त्याचे शव जाळले जाते त्या ठिकाणी कोणी भजन-ध्यान करू इच्छिल तर त्याचे मन लागणार नाही. तेथे चुकून जर कोणी झोपला तर त्याला बहुतेक वाईट स्वप्न पडतील. तात्पर्य हे आहे की, उत्पत्ति-विनाशशील पदार्थांकडे आकृष्ट होताच आसक्ती-ममतारूपी मलीनता येऊ लागते, ज्यामुळे मनुष्याचे शरीर आणि त्यातील हाडे देखील अधिक अपवित्र होतात.

**हर्षशोकान्वितः**—त्याच्यासमोर दिवसातून कितीतरी वेळा यश-अपयश, अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती, घटना इत्यादी येत राहतात. त्यांच्या अनुषंगाने तो हर्ष-शोक, राग-द्वेष, सुख-दुःख इत्यादीतच गुंतून राहतो.

**कर्ता राजसः परिकीर्तितः**—उपर्युक्त लक्षणांचा कर्ता "राजस" म्हटला गेला आहे.

**परिशिष्ट भाव—'हिंसात्मकः'** पूर्वी तामस कर्मातही हिंसा सांगितली गेली आहे, (याच अध्यायाचा पंचवीसावा श्लोक), कारण रजोगुण आणि तमोगुण—दोन्ही एक दुसऱ्याला जवळ पडतात, परंतु सत्त्वगुण दोन्हीपासून दूर पडतो. रजोगुण रागात्मक असतो आणि तमोगुण मोहात्मक. रजोगुणात तर होश आणि सावधानी राहते, परंतु तमोगुणात बेहोशी आणि असावधानी राहते. राग, स्वार्थबुद्धी असल्यामुळे राजस मनुष्य 'हिंसात्मक' होतो. त्याची हिंसेत तल्लीनता होते.

*संबंध—आता तामस कर्त्याची लक्षणे सांगत आहेत.*

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठोऽनैष्कृतिकोऽलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कर्ता** | = (जो) कर्ता | **अनैष्कृतिक** | = उपकाऱ्यावर अपकार करणारा, | **च** | = आणि |
| **अयुक्तः** | = असावधान, | | | **दीर्घसूत्री** | = दीर्घसूत्री आहे, (तो) |
| **प्राकृतः** | = अशिक्षित, | | | | |
| **स्तब्धः** | = अक्कडबाज, | **अलसः** | = आळशी, | **तामसः** | = तामस |
| **शठः** | = जिद्दी, | **विषादी** | = विषादी | **उच्यते** | = म्हटला जातो. |

***व्याख्या*— अयुक्तः—**तमोगुण मनुष्याला मूढ बनवून टाकतो (१४।८) यामुळे कोण्यावेळी कोणते काम करावे. कोणत्या पद्धतीने केले तर लाभ होईल आणि कोण्या पद्धतीने केले तर हानी होईल याविषयी तामस माणूस सावधान राहत नाही अर्थात् तो कर्तव्य-अकर्तव्य या विषयात विचारच करीत नाही. म्हणून तो अयुक्त अर्थात् ''असावधान'' म्हटला जातो.

**प्राकृतः—**ज्याने शास्त्र, सत्संग, उत्तम शिक्षण, उपदेश इत्यादींनी आपले जीवन सुसंस्कृतही केले नाही आणि आपल्या जीवनावर काही विचारही केला नाही, जसा माता-पित्यापासून जन्माला आला तसाच्या तसाच कोरा अर्थात् कर्तव्याकर्तव्य ज्ञानरहित राहिला, असा असंस्कृत माणूस ''प्राकृत'' अर्थात् आशिक्षित म्हटला जातो.

**स्तब्धः—**तमोगुणाच्या प्रधानतेमुळे त्याच्या मन, वाणी आणि शरीर यात अक्कड राहते. म्हणून तो आपल्या वर्णाश्रमात वडीलधारी माता, पिता, गुरू, आचार्य इत्यादी पूज्य व्यक्तींसमोर कधी झुकत नाही. तो मन, वाणी, शरीर याने कधी सरळ, नम्र असा वागत नाही, उलट अत्यंत कठोर व्यवहार करतो. असा मनुष्य ''स्तब्ध'' अर्थात् ''अक्कडबाज'' म्हटला जातो.

**शठः—**तामस मनुष्य जिद्दी असल्यामुळे, दुसऱ्या कोणाचाही चांगला उपदेश, सुविचार मानीत नाही. त्याला मूढतेमुळे आपलेच विचार चांगले वाटतात. म्हणून तो ''शठ'' अर्थात् जिद्दी म्हटला जातो.*

**अनैष्कृतिकः—**दुसऱ्याने केलेल्या उपकाराची परत फेड करणारास नैष्कृतिक (कृतज्ञ) म्हणतात. परंतु तामस मनुष्य उपकार कर्त्यावरच उलटून त्याच्यावर अपकार करतो म्हणून तो ''अनैष्कृतिक'' (कृतघ्न) म्हटला जातो.

**अलसः—**आपल्या वर्णाश्रमानुसार आवश्यक कर्तव्य-कर्म प्राप्त झाले तरीही तामस माणसास मूढत्वामुळे ते करणे आवडत नाही; उलट सांसारिक व्यर्थ गोष्टीत, पडल्या पडल्या निरर्थक गोष्टींवर विचार करित राहणे अथवा झोप घेणे त्याला आवडते. म्हणून त्याला ''आळशी'' म्हटले गेले आहे.

**विषादी—**जरी तामस माणसात कर्तव्य-अकर्तव्याचा तसेच निद्रा, आळस, प्रमाद इत्यादीमध्ये आपल्या शक्तीचा व जीवनाच्या अमूल्य वेळेचा किती दुरुपयोग होत आहे मुळीच विचार नसतो तरीपण कुमार्ग व कर्तव्यच्युत झाल्यामुळे त्याच्या अंतरंगात स्वाभाविकच एक विषाद (दुःख, अशांती) होत राहतो म्हणून त्याला ''विषादी'' म्हटले गेले आहे.

**दीर्घसूत्री—**अमुक काम कशा प्रकारे केले म्हणजे चांगले व लवकर होऊ शकेल—याचा तो विचारच करीत नाही. म्हणून तो एखाद्या कामात अविवेकपूर्वक जरी लागला तरी थोड्या वेळात होणाऱ्या कामाला खूप वेळ लावतो आणि त्याचेकडून ते कामही व्यवस्थितपणे होत नाही. असा मनुष्य ''दीर्घसूत्री'' म्हटला जातो.

**कर्ता तामस उच्यते—**उपर्युक्त आठ लक्षणाने युक्त असलेला कर्ता ''तामस'' म्हटला जातो.

**विशेष गोष्ट**

सव्वीसाव्या, सत्तावीसाव्या आणि अठ्ठावीसाव्या श्लोकात जितक्या गोष्टी आल्या आहेत त्या सर्व कर्त्याला अनुसरूनच म्हटल्या गेल्या आहेत. कर्त्याची जशी लक्षणे असतात त्यानुसार कर्म होतात. कर्ता ज्या गुणांचा स्वीकार करतो, त्या गुणांनुसारच कर्माचे रूप असते. कर्ता जे साधन करतो ते साधन कर्त्याचे रूप होते. कर्त्यापुढे जे करण असतात तेही कर्त्यानुरूप असतात. तात्पर्य हे आहे की, जसा कर्ता असतो तसेच कर्म, करण इत्यादी

* मूर्खस्य पञ्च चिन्हानि गर्वी दुर्वचनी तथा। हठी चाप्रियवादी च परोक्तं नैव मन्यते॥

असतात. कर्ता सात्त्विक, राजस अथवा तामस असेल तर कर्म इत्यादीही सात्त्विक, राजस अथवा तामस होतील.

सात्त्विक कर्ता आपल्या कर्म, बुद्धी इत्यादींना सात्त्विक बनवून सात्त्विक सुखाचा अनुभव करीत असंगतापूर्वक परमात्मतत्त्वाशी अभिन्न होतो—"**दुःखान्तं च निगच्छति**" (१८।३६) कारण सात्त्विक कर्त्याचे ध्येय परमात्मा असते. म्हणून तो कर्तृत्व भोक्तृत्वरहित होऊन चिन्मय तत्त्वाशी अभिन्न होतो कारण तो तात्त्विक स्वरूपाने अभिन्नच होता. परंतु राजस-तामस कर्ता, राजस-तामस कर्म, बुद्धी इत्यादीशी तन्मय होऊन राजस-तामस सुखात लिप्त होतो. म्हणून तो परमात्मतत्त्वाशी अभिन्न होऊ शकत नाही. कारण राजस तामस कर्त्याचा उद्देश परमात्मा नसतो आणि त्यात जडतेचे बंधनही अधिक असते.

आता येथे एक शंका होऊ शकते की, कर्त्याचे सात्त्विक होणे तर ठीक आहे पण कर्म सात्त्विक कसे होते? याचे समाधान असे आहे की, ज्या कर्माशी कर्त्याची आसक्ती नाही, कर्तृत्वाभिमान नाही, लेप (फलेच्छा) नाही, ते कर्म सात्त्विक होते. अशा सात्त्विक कर्माने आपले आणि जगाचे फार कल्याण होते. त्या सात्त्विक कर्माचा ज्या ज्या वस्तू, व्यक्ती, पदार्थ, वायुमंडळ इत्यादीशी संबंध येतो, त्या सर्वात निर्मळता येते, कारण निर्मळता सत्त्वगुणाचा स्वभाव आहे—"**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्**" (१४।६)

दुसरी गोष्ट पातञ्जली महाराज यांनी रजोगुणाला, क्रियात्मकच मानले आहे—"**प्रकाशक्रियास्थितिशीलं भूतेन्द्रियात्मकं भोगापवर्गार्थं दृश्यम्।**" (योगदर्शन २।१८) परंतु गीता रजोगुणाला क्रियात्मक मानत असूनही मुख्यरूपाने रागात्मकच मानते.—"**रजो रागात्मकं विद्धि**" (१४।७) वास्तविक पाहिले तर "राग" च बंधनकारक आहे. "क्रिया" नाही.

गीतेत कर्म तीन प्रकारची सांगितली गेली आहेत—सात्त्विक, राजस आणि तामस! (१८।२३-२५) कर्म करणाऱ्याचा भाव सात्त्विक असेल तर ते कर्म "सात्त्विक" होईल, भाव राजस असेल तर कर्म "राजस" होईल आणि भाव तामस असेल तर ते कर्म "तामस" होईल. म्हणून भगवंतांनी केवळ क्रियेला रजोगुणी मानले नाही.

**परिशिष्ट भाव**—'विषादी' पद रजोगुणात यायला पाहिजे पण येथे तमोगुणात आले आहे. तामस वृत्तीचा विवेकाशी विरोध आहे, म्हणून तामस मनुष्यात विषाद अधिक असतो.

*संबंध—सर्व कर्म विचारपूर्वक केली जातात. त्या कर्मांच्या विचारात बुद्धी आणि धृती या कर्मसंग्राहक करणांची प्रधानता असल्याने आता पुढे त्यांचे प्रकार सांगतात.*

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनञ्जय॥२९॥**

**धनञ्जय** = हे धनंजय! (आता तू)
**गुणतः** = गुणांनुसार
**बुद्धेः** = बुद्धी
**च** = आणि
**धृतेः एव** = धृती यांचेही
**त्रिविधम्** = तीन प्रकारचे
**भेदम्** = भेद
**पृथक्त्वेन** = वेग-वेगळ्या रूपाने
**शृणु** = ऐक,
**अशेषेण** = (जे माझ्याद्वारा) पूर्णरूपाने
**प्रोच्यमानम्** = सांगितले जात आहेत.

*व्याख्या*—[याच अध्यायाच्या अठराव्या श्लोकात कर्म संग्रहाचे तीन हेतू सांगितले गेले आहेत—करण, कर्म आणि कर्ता. यापैकी कर्म करण्याची जी इंद्रिये इत्यादी करण आहेत. त्यांचे सात्त्विक, राजस आणि तामस—असे तीन भेद होत नाहीत. त्या इंद्रियांत बुद्धीचीच प्रधानता असते आणि सर्व इंद्रिये बुद्धीनुसारच काम करतात. म्हणून या ठिकाणी बुद्धीच्या भेदाने करणांचे भेद सांगत आहेत.

बुद्धीच्या निश्चयाला, विचाराला, दृढतेने ठीक तऱ्हेने स्थिर राखून ठेवणारी आणि आपल्या ध्येयापासून विचलित होऊ न देणारी जी धारणशक्ती असते तिला "धृती" म्हणतात. धारणशक्ती अर्थात् धृतीशिवाय बुद्धी आपल्या निश्चयावर दृढ राहू शकत नाही. म्हणून बुद्धीबरोबर धृती-चेही तीन भेद सांगणे आवश्यक झाले.*

मनुष्य जे काही करतो, ते बुद्धिपूर्वकच करतो

* सांख्ययोगात तर बुद्धी आणि धृतीची खास आवश्यकता आहेच, परमात्मप्राप्तीची अन्य जितकी काही साधने आहेत, त्या सर्वातही बुद्धी आणि धृतीची फार मोठी आवश्यकता आहे. म्हणून गीतेत बुद्धी आणि धृती—या दोन्हींना बरोबर सांगितले आहे. जसे—"शनैः शनैरुपरमेद बुद्ध्या धृतिगृहीतया" (६।२५) आणि "बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च" (१८।५१)

अर्थात् योग्य विचार करूनच एखाद्या कार्यात प्रवृत्त होतो. त्या कार्यात प्रवृत्त झाल्यावरसुद्धा त्याला धैर्याची फार मोठी आवश्यकता आहे. जर त्याच्या बुद्धीत विचारशक्ती तेज असेल आणि तिला धारण करणारी शक्ती धृती श्रेष्ठ असेल तर त्याची बुद्धी आपल्या निश्चित ध्येयापासून विचलित होत नाही. जेव्हा बुद्धी आपल्या ध्येयावर दृढ राहते तेव्हा मनुष्याचे कार्य सिद्ध होते.

आता साधकांसाठी कर्मप्रेरक आणि कर्मसंग्रहाचे जे प्रकरण चालू आहे त्यात ज्ञान, कर्म आणि कर्ता यांचीच मुख्य आवश्यकता आहे. म्हणून जर साधक आपल्या साधनेत दृढतेने लागून राहील, तर त्यासाठी बुद्धी आणि धृतीचे भेद जाणण्याची विशेष आवश्यकता आहे. कारण त्या भेदाला ठीक जाणूनच तो संसारातीत होऊ शकतो. कोणत्या पद्धतीने बुद्धी आणि धृतीला धारण करून साधक संसारातीत होऊ शकतो आणि कोणत्या प्रकारची बुद्धी आणि धृती राहिल्याने त्याला उन्नत होण्यात बाधा येऊ शकते—हे जाणणे साधकासाठी फार जरूरी आहे. म्हणून भगवंतांनी त्या दोन्हींचे भेद सांगितले आहेत. भेद सांगण्यात भगवंताचा भाव असा आहे की, सात्त्विकी बुद्धी आणि धृतीनेच साधक उन्नत होऊ शकतो, राजसी-तामसी बुद्धी आणि धृतीने नव्हे.]

**धनञ्जय**—जेव्हा पांडवांनी राजसूय यज्ञ केला होता, तेव्हा अर्जुनाने अनेक राजांना जिंकून पुष्कळसे धन आणले होते. म्हणूनच त्यांचे नाव धनञ्जय पडले होते. आता भगवान् अर्जुनाला म्हणत आहेत की, आपल्या साधनेत सात्त्विकी बुद्धी आणि धृती स्वीकार करून गुणातीत तत्त्वाची प्राप्ती करणे हेच वास्तविक धन आहे. म्हणून तू या वास्तविक धनाला धारण कर. यातच तुझ्या धनञ्जय नावाची सार्थकता आहे.

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु**—भगवान् म्हणतात की, बुद्धीही एक आहे आणि धृतीही एक आहे परंतु गुणांच्या प्रधानतेने त्या बुद्धीचे आणि धृतीचेही सात्त्विक, राजस आणि तामस—असे तीन तीन भेद होतात. त्याचे योग्य प्रकारे विवेचन मी करीन आणि थोड्या शब्दात महत्त्वाची गोष्ट सांगेन, ते तू मन लावून, लक्ष ठेवून योग्य प्रकारे ऐक.

धृती श्रोत्रादी करणांत आली नाही म्हणून भगवान् **''चैव''** पदाचा प्रयोग करून म्हणत आहेत की, जसे बुद्धीचे तीन भेद सांगणार आहे त्याचप्रमाणे धृतीचेही तीन भेद सांगेन. साधारण दृष्टीने पाहिले तर धृतीही बुद्धीचाच एक गुण दिसते. बुद्धीचा एक गुण असूनही धृती बुद्धीपेक्षा वेगळी आणि विलक्षण आहे. कारण धृती ''स्व'' अर्थात् कर्त्यात राहते. त्या धृतीमुळेच मनुष्य बुद्धीचा योग्य उपयोग करू शकतो. धृती जितकी श्रेष्ठ अर्थात् सात्त्विकी असेल, साधकाची (साधनेत) बुद्धी तितकीच स्थिर राहील. साधनेत बुद्धीच्या स्थिरतेची जितकी आवश्यकता आहे तितकी आवश्यकता मनाच्या स्थिरतेची नाही. हां, एका अंशात अणिमा इत्यादी सिद्धींच्या प्राप्तीत मनाच्या स्थिरतेची आवश्यकता आहे, परंतु पारमार्थिक उन्नतीत तर बुद्धी आपल्या उद्देशावर स्थिर राहण्याचीच अधिक आवश्यकता आहे.* साधकाची बुद्धी ही सात्त्विकी असेल आणि धृतीही सात्त्विकी असेल, तेव्हाच साधक आपल्या साधनेत दृढतेने लागून राहील. म्हणून या दोहोंचेही भेद जाणण्याची आवश्यकता आहे.

**पृथक्त्वेन**—त्यांचे भेद वेगवेगळे योग्य रीतीने सांगेन. अर्थात् बुद्धी आणि धृतीच्या विषयातही कोण कोणते भेद आहेत तेही सांगेन.

**प्रोच्यमानमशेषेण**—भगवान् म्हणतात की, बुद्धी आणि धृतीच्या विषयात जाणण्याच्या ज्या ज्या आवश्यक गोष्टी आहेत त्या सर्व पूर्ण रीतीने सांगेन, त्यानंतर काही जाणणे बाकी राहणार नाही.

*संबंध—आता भगवान् सात्त्विकी बुद्धीची लक्षणे सांगत आहेत.*

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये।**
**बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिःसा पार्थ सात्त्विकी॥ ३०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **प्रवृत्तिम्** | = प्रवृत्ती | **निवृत्तिम्** | = निवृत्ती, |
| **या** | = जी (बुद्धी) | **च** | = आणि | **कार्याकार्ये** | = कर्तव्य |

* बुद्धीद्वारा तर आपले ध्येय (लक्ष्य) योग्य प्रकारे समजते आणि धृतीद्वारा कर्ता स्वयं त्या लक्ष्यावर दृढ राहतो. साधक पूर्वजीवनात कोणत्याही भावांच्या आचरणांचा असो अर्थात् अत्यंत पापी व अती दुराचारी असला तरी तोसुद्धा ''मला तर परमात्मप्राप्तीच करावयाची आहे'' ह्या ध्येयावर दृढ राहिला तर त्याची सर्व पापे नष्ट होतात. (९। ३०)

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | आणि | **च** | = तसेच | **वेत्ति** | = जाणते, |
| | अकर्तव्य, | **बन्धम्** | = बंधन | **सा** | = ती |
| **भयाभये** | = भय आणि | **च** | = आणि | **बुद्धि** | = बुद्धी |
| | अभय यांना | **मोक्षम्** | = मोक्ष यांना | **सात्त्विकी** | = सात्त्विकी आहे. |

*व्याख्या*— **प्रवृत्तिं च निवृत्तिं च**—प्रत्येक साधकाच्या प्रवृत्ती आणि निवृत्ती—ह्या दोन अवस्था असतात. कधी तो संसाराचा काम धंदा करतो, त्यावेळी ती प्रवृत्ती अवस्था आहे आणि कधी संसाराचा काम धंदा सोडून एकांतात भजन ध्यान करतो तर ती निवृत्ती अवस्था आहे. परंतु या दोन्हीत सांसारिक कामनासहित प्रवृत्ती आणि वासनासहित निवृत्ती.—* ह्या दोन्हीही अवस्था ''प्रवृत्ती'' आहेत अर्थात् संसारात लावणाऱ्या आहेत. तसेच सांसारिक कामनारहित प्रवृत्ती आणि वासनारहित निवृत्ती—या दोन्हीही अवस्था ''निवृत्ति'' आहेत अर्थात् परमात्म्याकडे घेऊन जाणाऱ्या आहेत. म्हणून साधकाने यांना योग्य प्रकारे जाणून कामना-वासनारहित प्रवृत्ती आणि निवृत्ती यांचाच स्वीकार करावा.

वास्तविक सखोल दृष्टीने पाहिले तर कामना-वासनारहित प्रवृत्ती आणि निवृत्तीसुद्धा जर आपल्या सुख-आराम इत्यादीसाठी केली गेली तर त्या दोन्हीही ''प्रवृत्ती'' होतील कारण त्या दोन्हीही बंधनकारक आहेत अर्थात् त्यात आपले व्यक्तित्व मिटत नाही. परंतु जर कामना-वासनारहित प्रवृत्ती आणि निवृत्ती—दोन्ही केवळ दुसऱ्यांच्या सुख, आराम आणि हितासाठी केल्या गेल्या तर त्या दोन्हीही ''निवृत्ती'' होतात. कारण त्या दोन्हींनीही आपले व्यक्तीत्व राहत नाही. ते व्यक्तित्व केव्हा राहत नाही? जेव्हा प्रवृत्ती आणि निवृत्ती ज्याच्या प्रकाशात प्रकाशित होतात तसेच जे प्रवृत्ती आणि निवृत्ती यांनी रहित आहे त्या प्रकाशक अर्थात् तत्त्वप्राप्तीच्या उद्देशानेच प्रवृत्ती आणि निवृत्ती केली जावी. प्रवृत्ती तर प्राणीमात्राच्या सेवेसाठी केली जावी आणि निवृत्ती परम विश्राम अर्थात् स्वरूप सिद्धीसाठी केली जावी.

**कार्याकार्ये**—शास्त्र, वर्णाश्रमाच्या मर्यादेनुसार जे काम केले जाते ते ''**कार्य**'' आहे आणि शास्त्र इत्यादींच्या मर्यादेविरुद्ध जे काम केले जाते ते ''**अकार्य**'' आहे.

जे आम्ही करू शकतो, जे जरूर केले पाहिजे आणि जे केल्याने जीवाचे अवश्य कल्याण होते ते ''**कार्य**'' अर्थात् कर्तव्य म्हटले जाते आणि जे आम्ही करू नये तसेच जे केल्याने जीवाचे बंधन होते ते ''**अकार्य**'' अर्थात् अकर्तव्य म्हटले जाते. जे आम्ही करू शकत नाही ते अकर्तव्य म्हटले जात नाही. ती तर आपली असमर्थता आहे.

**भयाभये**—भय आणि अभयाचे कारण पाहिले पाहिजे. ज्या कर्माने आत्ता आणि परिणामी आपले आणि जगाचे अनिष्ट होण्याची संभावना आहे ते कर्म ''भय'' अर्थात् भयदायक आहे आणि ज्या कर्माने आत्ता आणि परिणामी आपले आणि जगाचे हित होण्याची संभावना आहे, ते कर्म ''**अभय**'' अर्थात् सर्वांना अभय करणारे आहे.

मनुष्य जेव्हा करण्यायोग्य कार्यापासून च्युत होऊन अकार्यात प्रवृत्त होतो तेव्हा त्याच्या मनात आपल्या मान-सन्मानाची हानी आणि निंदा-अपमान होण्याच्या आंशकेने भय उत्पन्न होते. परंतु जो आपल्या मर्यादेपासून कधी विचलित होत नाही, आपल्या मनाने कोणाचेही अनिष्ट चिंतीत नाही आणि केवळ परमात्म्यातच लागून राहतो, त्याच्या मनात सदा अभय कायम राहते. हे अभयच मनुष्याला संपूर्ण अभयपद—परमात्म्याला प्राप्त करविते.

**बन्धं मोक्षं च या वेत्ति**—जो बाहेरुन तर यज्ञ, दान, तीर्थ, व्रत इत्यादी उत्तमाती उत्तम कार्य करतो, परंतु अंत:-करणात असत्, जड, नाशवान् पदार्थांची आणि स्वर्गादी लोकांची इच्छा करतो, त्याच्यासाठी ती सर्व कर्म ''**बन्ध**'' अर्थात् बन्धनकारकच आहेत. केवळ परमात्म्याशीच संबंध ठेवणे, परमात्म्याशिवाय कधी कोण्या अवस्थेत असत्, संसाराशी लेशमात्रही संबंध न ठेवणे ''**मोक्ष**'' अर्थात् मोक्षदायक आहे.

आपल्याला ज्या वस्तू अप्राप्त आहेत त्यांची कामना झाल्याने मनुष्य त्यांच्या अभावाचा अनुभव करतो. तो स्वत: ला त्या वस्तूंच्या परतंत्र मानतो आणि वस्तू प्राप्त झाल्यास स्वत:-ला स्वतंत्र मानतो. तो तर असे समजतो की, माझ्याजवळ वस्तू असल्याने मी स्वतंत्र झालो आहे परंतु तो त्या वस्तूंच्या

* प्रवृत्तीचा त्याग करून एखादा एकांतात भजन-ध्यान करतो त्यावेळी त्याच्यासमोर द्रव्य, पदार्थ तर नसतात परंतु ''लोकांनी मला ज्ञानी, ध्यानी, साधक समजावे म्हणजे ते माझा आदर-सत्कार करतील'' अशा प्रकारची एक सूक्ष्म इच्छा अंत:करणात राहते, तिला ''वासना'' म्हणतात.

परतंत्र होतो. वस्तूंच्या अभावात आणि वस्तूंच्या भावात—या दोन्हींच्या परतंत्रतेत इतकाच फरक पडतो की, वस्तूंच्या अभावात परतंत्रता दिसते, खटकते आणि वस्तूंच्या अस्तित्वात वस्तूंची परतंत्रता, परतंत्रतेच्या रूपात दिसतच नाही. कारण त्यावेळी मनुष्य आंधळा होतो. परंतु या दोन्हीही परतंत्रताच आहेत आणि परतंत्रताच बंधन आहे. अभावाची परतंत्रता प्रकट विष आहे आणि भावाची परतंत्रता अप्रकट, लपलेले गोड विष आहे. परंतु दोन्हीही विषच आहेत. विष तर मारणारेच असते.

निष्कर्ष हा निघाला की, सांसारिक वस्तूंच्या कामनेनेच बंधन होते आणि परमात्म्याशिवाय अन्य कोणत्याही वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, देश, काळ इत्यादींची कामना न झाल्यास मुक्ती होते.* जर मनात कामना असेल तर वस्तू जवळ असली तरी बंधन अथवा जवळ नसली तरी बंधन. जर मनात कामना नसेल तर वस्तू जवळ असली तरी मुक्ती आणि जवळ नसली तरी मुक्ती.

**बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी**—अशा प्रकारे जी बुद्धी प्रवृत्ती-निवृत्ती, कार्य-अकार्य, भय-अभय आणि बन्ध-मोक्ष यांच्या वास्तविक तत्त्वाला जाणते, ती बुद्धी सात्त्विकी आहे.

यांच्या वास्तविक तत्त्वांना जाणणे म्हणजे काय? प्रवृत्ती-निवृत्ती, कार्य-अकार्य, भय-अभय आणि बंध-मोक्ष—यांना सखोलतेने समजून ज्याच्याशी वास्तविक आमचा संबंध नाही त्या संसाराशी संबंध न मानणे आणि ज्याच्याशी आमचा स्वत:सिद्ध संबंध आहे, अशा (प्रवृत्ती-निवृत्ती इत्यादींचा आश्रय तसेच प्रकाशक) परमात्म्याला तत्त्वाने योग्य रीतीने जाणणे—हेच सात्त्विकी बुद्धीद्वारा वास्तविक योग्य प्रकारे जाणणे आहे.

**परिशिष्ट भाव**—प्रवृत्ती आणि निवृत्ती, कर्तव्य आणि अकर्तव्य, भय आणि अभय यांना तसेच बंधन आणि मोक्ष यांना—दोन्हींना जाणण्याचे तात्पर्य संसाराच्या संबंध-विच्छेदातच आहे. जर संसाराशी संबंध-विच्छेद झाला नसेल तर ते जाणणे वास्तविक जाणणे नव्हे तर शिकणे आहे.

गीतेचा 'सात्त्विक' भाव गुणातीत करणारा, संसाराशी संबंध-विच्छेद करणारा आहे. म्हणून यात बंधन आणि मोक्षापर्यंतचा विचार असतो—'**बन्धं मोक्षं च या वेत्ति**'. सात्त्विकी बुद्धीत जो विवेक असतो, तो तत्त्वज्ञानात परिणत होतो. विवेकवती बुद्धी 'ब्रह्मलोकाच्या प्राप्तीपर्यंत सर्व बंधन आहे'—असे जाणते.

***संबंध**—आता राजसी बुद्धीची लक्षणे सांगत आहेत.*

## यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च।
## अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी॥ ३१॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पार्थ! | **च** | = तसेच | **अयथावत्** | = योग्य प्रकारे |
| **यया** | = (मनुष्य) जिच्याद्वारा | **कार्यम्** | = कर्तव्य | **प्रजानाति** | जाणत नाही |
| **धर्मम्** | = धर्म | **च** | = आणि | **सा** | = ती |
| **च** | = आणि | **अकार्यम्,** | = अकर्तव्य | **बुद्धिः** | = बुद्धी |
| **अधर्मम्** | = अधर्म | **एव,** | यांनाही | **राजसी** | = राजसी आहे. |

***व्याख्या***— **यया धर्ममधर्मं च**—शास्त्रांनी जे काही विधान केले आहे तो "धर्म" आहे अर्थात् शास्त्रांनी जी आज्ञा केली आहे आणि ज्यामुळे परलोकात सद्गती होते तो धर्म आहे. शास्त्रांनी ज्याचा निषेध केला आहे तो "अधर्म" आहे अर्थात् शास्त्रांनी ज्याची आज्ञा केली नाही आणि ज्यामुळे परलोकात दुर्गती होते तो अधर्म आहे. जसे आपल्या माता-पित्याची, वडीलधारी माणसांची सेवा करणे, दुसऱ्यांना सुख देणे, दुसऱ्यांच्या हिताविषयी प्रयत्न करण्यात आपले तन, मन, धन, योग्यता, पद, अधिकार, सामर्थ्य इत्यादींना लावणे "धर्म" आहे. त्याचप्रमाणे आड-विहीर खोदविणे, धर्मशाळा-औषधालय

* एक "कामना" असते आणि एक "आवश्यकता" असते. संसाराची कामना असते आणि परमात्म्याची आवश्यकता असते. कामनेची कधी पूर्ती होतच नाही तिची तर निवृत्ती होते परंतु आवश्यकतेची पूर्तीच होते.

परमात्म्याची आवश्यकता सुद्धा संसाराची कामना झाल्यानेच उत्पन्न होते. कामनेचा अत्यंत अभाव झाल्यास आवश्यकता राहतच नाही अर्थात् परमात्म्याची प्राप्ती होते.

बनविणे; पाणपोयी-अन्नछत्र चालवणे, देश, गाव, गल्लीतील अनाथ तसेच गरीब बालकांच्या आणि समाजाच्या उन्नतीसाठी आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या वस्तूंचा आवश्यकतेनुसार त्यांच्याच समजून निष्कामभावनेने उदारतापूर्वक खर्च करणे ''धर्म'' आहे. या उलट आपल्या स्वार्थ, सुख, आरामासाठी दुसऱ्यांची धन-संपत्ती, हक्क, पद, अधिकार लुबाडणे, दुसऱ्यावर अपकार, दुसऱ्यांचे अहित, दुसऱ्याची हत्या इत्यादी करणे, आपल्या तन, मन, धन, योग्यता, पद, अधिकार इत्यादीद्वारा दुसऱ्यांना दुःख देणे ''अधर्म'' आहे.

वास्तविक धर्म तो आहे, जो जीवाचे कल्याण करतो आणि अधर्म तो आहे, जो जीवाला बंधनात टाकतो.

**कार्यं चाकार्यमेव च**—वर्ण, आश्रम, देश, काळ, लोकमर्यादा, परिस्थिती इत्यादीनुसार शास्त्रांनी आम्हाला जे कर्म करण्याची आज्ञा दिली आहे ते कर्म आमच्यासाठी ''कर्तव्य'' आहे. अवसर प्राप्त झाला असताना कर्तव्याचे पालन न करणे तसेच न करण्यायोग्य कर्म करणे ''अकर्तव्य'' आहे. जसे भिक्षा मागणे, यज्ञ, विवाह इत्यादी करविणे आणि त्यात दान-दक्षिणा घेणे इत्यादी कर्म ब्राह्मणासाठी तर कर्तव्य आहेत परंतु क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्यासाठी अकर्तव्य आहेत. त्याचप्रमाणे शास्त्रांनी ज्याच्या वर्णासाठी आणि आश्रमासाठी जी जी कर्म सांगितली आहेत ती सर्व त्यांच्यासाठी कर्तव्य आहेत आणि ज्यांच्यासाठी निषेध केला आहे त्यांच्यासाठी ती सर्व अकर्तव्य आहेत.

जेथे नोकरी करायची तेथे प्रामाणिकपणे आपला पूर्ण वेळ देणे, कार्य उत्तम रीतीने करणे, ज्या रीतीने मालकाचे हित होईल असे काम करणे—ही सर्व कर्मचाऱ्यांसाठी ''कर्तव्य'' आहेत. आपल्या स्वार्थ, सुख आणि आरामात फसून कार्यात पूर्ण वेळ न लावणे, कार्य तत्परतेने न करणे, थोड्याशा लाचेसाठी मालकाचे फार मोठे नुकसान करणे, दहा पांच रुपयासाठी मालकाचे अहित करणे—ही सर्व कर्मचाऱ्यांसाठी ''अकर्तव्य'' आहेत.

शासकीय जितके उच्च अधिकारी आहेत, त्यांना राज्याची व्यवस्था करण्यासाठी, सर्वांचे हित करण्यासाठीच, उच्च अधिकारावर नेमले जाते. म्हणून आपल्या स्वार्थाचा आणि अभिमानाचा त्याग करून ज्या रीतीने सर्व लोकांचे हित होऊ शकते, सर्वांना सुख, आराम, शांती मिळू शकते, अशा कामांना करणे त्यांच्यासाठी ''कर्तव्य'' आहे. आपल्या तुच्छ स्वार्थासाठी राज्याचे नुकसान करणे, लोकांना दुःख देणे इत्यादी त्यांच्यासाठी ''अकर्तव्य'' आहे.

सात्त्विकी बुद्धीत सांगितलेली प्रवृत्ती-निवृत्ती, भय-अभय आणि बंध-मोक्ष यांनाही येथे ''**एव च**'' पदाने घेतले पाहिजे.

**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी**—राग (आसक्ती) असल्याने राजसी बुद्धीत स्वार्थ, पक्षपात, विषमता, इत्यादी दोष येतात. हे दोष असतील तर बुद्धी धर्म-अधर्म कार्य-अकार्य, भय-अभय, बंध-मोक्ष इत्यादींचे वास्तविक तत्त्व योग्य रीतीने जाणू शकत नाही. म्हणून कोणत्या वर्णाश्रमासाठी कोणत्या परिस्थितीत कोणता धर्म म्हटला जातो आणि कोणता अधर्म म्हटला जातो? तो धर्म कोणत्या वर्णाश्रमासाठी कर्तव्य होतो आणि कोणासाठी अकर्तव्य होतो, कोणापासून भय होते आणि कोणापासून मनुष्य अभय होतो? या गोष्टींना जी बुद्धी योग्य रीतीने जाणू शकत नाही, ती बुद्धी राजसी आहे.

जेव्हा सांसारिक वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, क्रिया, पदार्थ, इत्यादींत राग (आसक्ती) होतो तेव्हा तो राग दुसऱ्याविषयी द्वेष उत्पन्न करणारा होतो. मग ज्याच्याविषयी राग होतो, त्याच्या दोषांकडे आणि ज्याच्याविषयी द्वेष होतो त्याच्या गुणांकडे मनुष्य पाहू शकत नाही. राग आणि द्वेषाने संसाराशी संबंध जडतो. संसाराशी संबंध जडल्यास मनुष्य संसाराला जाणू शकत नाही. त्याचप्रमाणे परमात्म्यापासून वेगळे राहून मनुष्य परमात्म्याला जाणू शकत नाही. संसारापासून वेगळे होऊनच संसाराला जाणू शकतो आणि परमात्म्याशी अभिन्न होऊनच परमात्म्याला जाणू शकतो. ती अभिन्नता मग प्रेमाने होवो अथवा ज्ञानाने होवो!

परमात्म्याशी अभिन्न होण्यात सात्त्विकी बुद्धीच काम करते कारण सात्त्विकी बुद्धीत विवेकशक्ती जागृत राहते. परंतु राजसी बुद्धीत ती विवेकशक्ती आसक्तीमुळे अंधुक होते. जसे पाण्यात माती मिसळल्याने, पाणी निर्मळ, स्वच्छ राहत नाही तसेच बुद्धीत रजोगुण आल्याने बुद्धीत तितकी स्वच्छता, निर्मळता राहत नाही. म्हणून धर्माधर्म समजणे कठीण जाते. राजसी माणसाची बुद्धी राजसी असल्यामुळे कोणताही विषय योग्य समजणे त्याला कठीण जाते. त्या विषयाचे गुण दोष योग्य रीतीने समजल्याशिवाय तो स्वीकार आणि त्याग आपल्या आचरणात आणू शकत नाही अर्थात् तो ग्राह्य वस्तूंचा स्वीकार करू शकत नाही आणि त्याज्य वस्तूंचा त्याग करू शकत नाही.

**परिशिष्ट भाव**—जो धर्म-अधर्म तसेच कर्तव्य आणि अकर्तव्य यांनाही योग्य प्रकारे जाणत नाही, तो बंधन आणि मोक्षाला कसे जाणेल? जाणू शकत नाही. बुद्धी रागात्मिका (आसक्तियुक्त) असल्यामुळे तो यांना योग्य प्रकारे जाणत नाही, कारण आसक्तीचे प्राधान्य असल्यामुळे तो विवेकाला महत्त्व देऊ शकत नही. उत्पत्ति-विनाशशील वस्तूंचा रंग चढल्याने त्याचा विवेक लुप्त होतो.

*संबंध—आता तामसी बुद्धीची लक्षणे सांगत आहेत.*

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता।**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी॥ ३२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **अधर्मम्** | = अधर्माला | **सर्वार्थान्** | = संपूर्ण वस्तूंना |
| **तमसा** | = तमोगुण- | **धर्मम्** | = धर्म— | **विपरीतान्** | = उलटे (मानते,) |
| **आवृत्ता** | वेष्टित | **इति** | = अशी | **सा** | = ती |
| **या** | = जी | **मन्यते** | = मानते | **तामसी** | = तामसी |
| **बुद्धि** | = बुद्धी | **च** | = आणि | | आहे. |

*व्याख्या*— **अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता**— ईश्वराची निंदा करणे, शास्त्र, वर्ण, आश्रम आणि लोकमर्यादेच्या विरुद्ध काम करणे, माता-पित्यांचा अनादर करणे, संत-महात्मा, गुरू-आचार्य इत्यादींचा अपमान करणे, असत्य, कपट, बेईमानी, धोकेबाजी, अभक्ष्य-भक्षण, परस्त्रीगमन, इत्यादी शास्त्रनिषिद्ध पाप कर्मांना धर्म मानणे—हे सर्व अधर्मांना ''धर्म'' मानणे आहे.

आपल्या शास्त्र, वर्ण, आश्रम यांच्या मर्यादेत चालणे, माता-पित्याची आज्ञा पालन करणे तसेच त्यांची तन, मन, धनाने सेवा करणे, संत महात्म्यांच्या उपदेशानुसार आपले जीवन बनविणे, धार्मिक ग्रंथांचे पठन-पाठन करणे, दुसऱ्यांची सेवा-उपकार करणे, शुद्ध-पवित्र भोजन करणे इत्यादी शास्त्रविहित कर्मांना उचित न मानणे—हे धर्माला ''अधर्म'' मानणे आहे.

तामसी बुद्धीच्या माणसांचे असे विचार असतात की, शास्त्रकारांनी, ब्राह्मणांनी स्वतःचे मोठेपण वाढविले आणि अनेक प्रकारचे नियम बनवून लोकांना बांधून टाकले, ज्यामुळे भारत परतंत्र झाला. जोपर्यंत हे शास्त्र राहतील, ही धार्मिक पुस्तके राहतील तोपर्यंत भारताची उन्नती होणार नाही, पारतंत्र्याच्या बेडीतच भारत जखडलेला राहील इत्यादी. म्हणून ते मर्यादा तोडण्यातच धर्म मानतात.

**सर्वार्थान्विपरीतांश्च**—आत्म्याला स्वरूप न मानता शरीरालाच स्वरूप मानणे, ईश्वराला न मानता दृश्य जगतालाच खरे मानणे, दुसऱ्यांना तुच्छ समजून स्वतःलाच सर्वांत श्रेष्ठ समजणे, दुसऱ्यांना मूर्ख समजून स्वतःलाच सुशिक्षित विद्वान समजणे, जितके संत-महात्मा होऊन गेले आहेत, त्यांच्या मान्यतेहून आपली मान्यता श्रेष्ठ समजणे, खऱ्या सुखाकडे लक्ष न देता वर्तमानात मिळणाऱ्या संयोगजन्य सुखालाच खरे समजणे, न करण्यालायक कार्यालाच आपले कर्तव्य समजणे, अपवित्र वस्तूंनाच पवित्र मानणे—हे सर्व गोष्टींना उलटे मानणे आहे.

**बुद्धिः सा पार्थ तामसी**—तमोगुणाने आवृत्त झालेली बुद्धी अधर्माला धर्म, धर्माला अधर्म आणि चांगल्याला वाईट, सुलट्याला उलटे मानते, ती बुद्धी तामसी आहे. ही तामसी बुद्धीच मनुष्याला अधोगतीस नेणारी आहे—''**अधो गच्छन्ति तामसाः**'' (१४।१८) म्हणून स्वकल्याणेच्छूने तिचा संपूर्णपणे त्याग करावा.

**परिशिष्ट भाव**—ज्यांची बुद्धी तामसी असते, त्यांना व्यवहारात आणि परमार्थात सर्व ठिकाणी उलटच दिसते. याचे उदाहरण वर्तमानकाळात स्पष्ट पाहण्यात येते. जसे— पशूंच्या विनाशाला 'मासांचे उत्पादन' म्हटले जाते! गर्भपातरूपी महापापाला आणि मनुष्याच्या उत्पादक शक्तीच्या विनाशाला 'परिवार कल्याण' म्हटले जाते. स्त्रियांच्या उच्छृंखलतेला, मर्यादेच्या नाशाला 'नारी-मुक्ती' म्हटले जाते. पूर्वी स्त्री घरची स्वामिनी (गृहलक्ष्मी) होती, आता घराच्या बाहेर अनेक पुरुषांचे दास्यत्व (नोकरी) करणे हिला 'नारीची स्वाधीनता' म्हटले जात आहे! अशाप्रकारे पराधीनेतला स्वाधीनतेचे लक्षण मानले जात आहे. नैतिक पतनाला उन्नतीची संज्ञा दिली जात आहे. पशुतेला सभ्यतेचे चिन्ह मानले जात आहे. धार्मिकतेला सांप्रदायिकता आणि धर्मविरुद्धाला धर्म-निरपेक्ष म्हटले जात आहे. जेव्हा विनाशकाळ जवळ येतो, तेव्हा अशी विपरीत, तामसी बुद्धी

उत्पन्न होते—'**विनाशकाले विपरीत बुद्धिः**', '**बुद्धिनाशात्प्रणश्यति**' (गीता २। ६३).

***संबंध***—*आता भगवान् सात्त्विकी धृतीची लक्षणे सांगतात.*

**धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः।**
**योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी॥ ३३॥**

**पार्थ** = हे पार्थ!
**योगेन** = समतायुक्त
**यया** = ज्या
**अव्यभिचारिण्या** = अव्यभिचारिणी
**धृत्या** = धृतिद्वारा मनुष्य
**मनःप्राणेन्द्रिय-क्रियाः** = मन, प्राण आणि इंद्रियांच्या क्रियांना
**धारयते** = धारण करतो अर्थात् संयम ठेवतो,
**सा** = ती
**धृतिः** = धृती
**सात्त्विकी** = सात्त्विकी आहे.

***व्याख्या***—**धृत्या यया धारयते...योगेनाव्यभिचारिण्या**—सांसारिक लाभ-हानी, जय-पराजय, सुख-दुःख, आदर-निरादर, सिद्धी-असिद्धी यात सम राहण्याचे नाव ''योग'' (समता) आहे.

परमात्म्याच्या इच्छेबरोबर इहलोकाच्या सिद्धी-असिद्धी, वस्तू, पदार्थ, सत्कार, पूजा इत्यादीची आणि परलोकात सुखभोगाची इच्छा करणे ''व्यभिचार'' आहे आणि इहलोक तसेच परलोकाचे सुख, भोग, वस्तू, पदार्थ इत्यादीची लेशमात्रही इच्छा न ठेवता केवळ परमात्म्याला इच्छिणे ''अव्यभिचार'' आहे. हा अव्यभिचार ज्यात असतो ती धृती ''अव्यभिचारिणी'' म्हटली जाते.

आपली मान्यता, सिद्धांत, लक्ष्य, भाव, क्रिया, वृत्ती, विचार इत्यादींना दृढ, अटळ ठेवण्याच्या शक्तीचे नाव ''धृती'' आहे. योग अर्थात् समतायुक्त या अव्यभिचारिणी धृतीद्वारा मनुष्य मन, प्राण आणि इंद्रियांच्या क्रियांना धारण करतो.

मनात राग-द्वेषरहित चिंतन होणे, इच्छेनुसार मनाला लावले जाणे आणि इच्छेनुसार तेथून मनाला हटविणे इत्यादी मनाच्या क्रियांना धृतीद्वारा धारण करणे आहे.

प्राणायाम करीत असताना रेचकात पूरक न होणे, पूरकात रेचक न होणे आणि बाह्य कुम्भकमध्ये पूरक न होणे तसेच अभ्यंतर कुंभकमध्ये रेचक न होणे अर्थात् प्राणायामाच्या नियमाविरुद्ध श्वास-प्रश्वास न होणे हेच धृतीद्वारा प्राणांच्या क्रियांना धारण करणे आहे.

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध—या विषयांमध्ये इंद्रियांचे उच्छृंखल न होणे, ज्या विषयात जसे प्रवृत्त व्हावयास हवे तसे प्रवृत्त होणे आणि ज्या विषयापासून निवृत्त व्हावयास हवे त्या विषयापासून निवृत्त होणे हेच धृतीद्वारा इंद्रियांच्या क्रियांना धारण करणे आहे.

**धृतिः सा पार्थ सात्त्विकी**—ज्या धृतीने मन, प्राण आणि इंद्रियांच्या क्रियांवर अधिपत्य होते, हे पार्थ! ती धृती सात्त्विकी आहे.

**परिशिष्ट भाव**—जीव परमात्म्याचा अंश आहे, म्हणून परमात्म्याशिवाय कोठेही त्याचे जाणे 'व्यभिचार' आहे आणि केवळ परमात्म्याकडे अग्रेसर होणे 'अव्यभिचार' आहे. केवळ परमात्म्याकडे अग्रेसर होणारी धृती 'अव्यभिचारिणी धृती' आहे.

***संबंध***—*आता राजसी धृतीची लक्षणे सांगत आहेत.*

**यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन।**
**प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी धृतिः सा पार्थ राजसी॥ ३४॥**

**तु** = परंतु
**पार्थ** = हे पृथानंदन
**अर्जुन** = अर्जुन!
**फलाकाङ्क्षी** = फलेच्छू मनुष्य
**यया** = ज्या
**धृत्या** = धृतिद्वारा
**धर्मकामार्थान्** = धर्म, काम (भोग) आणि धन यांना
**प्रसङ्गेन** = अत्यंत आसक्तिपूर्वक
**धारयते** = धारण करतो
**सा** = ती
**धृतिः** = धृती
**राजसी** = राजसी आहे.

***व्याख्या***—**यया तु धर्मकामार्थान्धृत्या....सा पार्थ राजसी**—राजसी धारण-शक्तीने मनुष्य आपल्या कामनापूर्तीसाठी धर्माचे अनुष्ठान करतो, काम अर्थात् भोगपदार्थांना भोगतो आणि अर्थ अर्थात् धनाचा संग्रह करतो.

अमावस्या, पौर्णिमा, व्यतिपात इत्यादी पर्वकाळी दान करणे, तीर्थात अन्नदान करणे, पर्वकाळी उत्सव साजरा करणे, तीर्थयात्रा करणे, धार्मिक संस्थेला देणगी देणे, कधी कथा-कीर्तन, भागवत-सप्ताह इत्यादी करवून घेणे—हे सर्व केवळ कामनापूर्तीसाठी करणे हेच ''धर्माला'' धारण करणे आहे.*

सांसारिक भोगपदार्थ तर प्राप्त झालेच पाहिजेत कारण भोगपदार्थांपासूनच सुख मिळते. संसारात असा कोणीही प्राणी नाही की, जो भोगपदार्थांची कामना करीत नाही. जर मनुष्याने भोगांची कामना केली नाही तर त्याचे जीवनच व्यर्थ आहे. अशा धारणेने भोगपदार्थांच्या कामनापूर्तीतच लागून राहणे ''कामा'' ला धारण करणे आहे.

पैशाशिवाय जगामध्ये कोणाचेही काम चालत नाही, पैशानेच धर्म होतो. जर जवळ पैसे नसतील तर मनुष्य धर्म करूच शकत नाही. जेवढी आयोजने केली जातात, ती सर्व पैशानेच तर होतात, आज जेवढी माणसे मोठी म्हणविली जातात ती सर्व पैशामुळेच तर मोठी झाली आहेत. पैसा असला तरच लोक आदर-सन्मान करतात. ज्याच्याजवळ पैसा नसतो त्याला संसारात कोणी विचारीतच नाही. म्हणून पैशाचा खूप संग्रह केला पाहिजे—अशा प्रकारे धनाच्या कामनेतच आकंठ बुडून जाणे हे ''अर्था'' ला धारण करणे आहे. संसारात अत्यंत राग (आसक्ती) असल्यामुळे राजस पुरुष शास्त्रमर्यादेनुसार जे काही शुभ काम करतो, त्यात त्याची हीच कामना असते की, या कर्माचे फल मला या लोकी सुख, आराम, मान, सत्कार, इत्यादी मिळावे आणि परलोकी सुखभोग मिळावे. अशा फलेच्छू तसेच संसारात अत्यंत आसक्त असलेल्या मनुष्याची धारणशक्ती राजसी असते.

***संबंध**—आता तामसी धृतीची लक्षणे सांगत आहेत.*

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च।**
**न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी॥ ३५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पार्थ! | **शोकम्** | = चिंता, | **न** | = नाही अर्थात् धारण करून राहतो, |
| **दुर्मेधा** | = दुष्टबुद्धीचा मनुष्य | **विषादम्** | = दुःख | | |
| **यया** | = ज्या धृतिद्वारा | **च** | = आणि | **सा** | = ती |
| **स्वप्नम्** | = निद्रा, | **मदम् एव** | = घमेंड यांनाही | **धृतिः** | = धृती |
| **भयम्** | = भय, | **विमुञ्चति** | = सोडत | **तामसी** | = तामसी आहे. |

***व्याख्या*— यथा स्वप्नं भयं....सा पार्थ तामसी**— तामस धारणशक्तीद्वारा मनुष्य अतिनिद्रा, बाह्य आणि आंतरिक भय, चिंता, दुःख, आणि घमेंड—यांचा त्याग करीत नाही. उलट या सर्वात बुडून जातो. तो कधी अधिक निद्रा घेत राहतो, कधी मृत्यू, आजार, अपयश, अपमान, स्वास्थ्य, धन इत्यादींच्या भयाने भयभीत राहतो, कधी शोक-चिंतेत मग्न राहतो, कधी दुःख करीत राहतो आणि कधी अनुकूल पदार्थ मिळाले तर घमेंडीत चूर होतो.

निद्रा, भय, शोक इत्यादीशिवाय, प्रमाद, अभिमान, दंभ, द्वेष, ईर्ष्या इत्यादी दुर्गुणांना तसेच हिंसा, दुसऱ्यावर अपकार करणे, त्यांना दुःख देणे, त्यांच्या धनाचे कोणत्या तरी पद्धतीने अपहरण करणे, इत्यादी दुराचारांचाही ''एव च'' पदांत अंतर्भाव करावा.

अशा प्रकारे निद्रा, भय इत्यादींना आणि दुर्गुण-दुराचारांना घट्ट पकडून ठेवणारी अर्थात् त्यांना न सोडणारी धृती तामसी असते.

भगवंतांनी तेहतीसाव्या चौतीसाव्या श्लोकांत ''**धारयते**'' पदाने सात्त्विक आणि राजस मनुष्याद्वारा क्रमाने सात्त्विकी आणि राजसी धृती धारण केली जात असल्याबद्दल सांगितले आहे. परंतु येथे तामस मनुष्यद्वारा तामसी धृती धारण केली जाते असे म्हटले नाही. कारण जो दुष्टबुद्धी आहे, ज्याच्या बुद्धीत अज्ञता, मूढता भरलेली आहे, असा मलीन अंतःकरणाचा तामस मनुष्य निद्रा, भय, शोक इत्यादी भावांना सोडतच नाही. तो स्वाभाविकच त्यांच्यात बुडून राहतो.

सात्त्विकी, राजसी आणि तामसी—ह्या तिन्ही धृतीच्या

* धर्मानुष्ठान धनासाठी आणि धनाचा खर्च धर्मासाठी केला तर धनाने धर्म आणि धर्माने धन—दोन्ही परस्पर वाढतात. परंतु धर्माचे अनुष्ठान आणि धनाचा खर्च केवळ कामनापूर्तीसाठीच केला तर धर्म (पुण्य) आणि धन—दोन्हीही कामनापूर्ती करून नष्ट होतात.

वर्णनात राजसी आणि तामसी धृतीत तर क्रमाने "**फलाकाङ्क्षी**" आणि "**दुर्मेधाः**" पदाने कर्त्याचा उल्लेख केला आहे परंतु सात्त्विकी धृतीमध्ये कर्त्याचा उल्लेख केलाच नाही. याचे कारण हे आहे की, सात्त्विकी धृतीत कर्ता निर्लिप्त राहतो अर्थात् त्याच्यात कर्तृत्वाचा लेप नसतो, परंतु राजसी आणि तामसी धृतीत कर्ता लिप्त राहतो.

## विशेष गोष्ट

मानवशरीर विवेक-प्रधान आहे. मनुष्य जे काही करतो ते विचारपूर्वकच करीत असतो. तो जसा विचारपूर्वक काम करतो तसा विवेक अधिक स्पष्ट होतो. सात्त्विक मनुष्याच्या धृतीत (धारण शक्ती) हा विवेक स्पष्ट प्रकट होतो की, मला तर केवळ परमात्म्याकडेच जावयाचे आहे. राजस माणसाच्या धृतीत सांसारिक पदार्थांची आणि भोगांत आसक्तीची प्रधानता असल्यामुळे विवेक तसा स्पष्ट प्रगट होत नाही, तरीपण या लोकातील सुख, आराम, मान-आदर मिळावा आणि परलोकात उत्तम गती मिळावी, भोग मिळावेत—या विषयात विवेक काम करतो आणि आचरणही मर्यादेनुसारच होते. परंतु तामस माणसाच्या धृतीत विवेक पूर्णच दबून जातो. तामस भावांत त्याची इतकी दृढता होते की, त्याला ते भाव धारण करण्याची गरजच राहत नाही. तो तर निद्रा भय इत्यादी तामस भावातच बुडालेला असतो.

पारमार्थिक मार्गात क्रिया इतके काम करीत नाही, जितका आपला उद्देश काम करतो. स्थूल क्रियेची प्रधानता स्थूलशरीरात, चिंतनाची प्रधानता सूक्ष्मशरीरात आणि स्थिरतेची प्रधानता कारणशरीरात असते. ही सर्व क्रियाच आहे. "क्रिया तर शरीरांत होते परंतु मला तर केवळ पारमार्थिक मार्गाचीच वाटचाल करावयाची आहे" असा उद्देश अथवा लक्ष्य "स्व" (चेतनस्वरूप) मध्येच राहते. स्व मध्ये जसे लक्ष्य असेल त्यानुसार आपोआप क्रिया होतात. जी गोष्ट स्व मध्ये असते ती कधी बदलत नाही. त्या लक्ष्याच्या दृढतेसाठी सात्त्विकी बुद्धीची आवश्यकता आहे आणि बुद्धीच्या निश्चयाला अटळ ठेवण्यासाठी सात्त्विकी धृतीची आवश्यकता आहे. म्हणून येथे तीसाव्यापासून पस्तीसाव्या श्लोकापर्यंत एकूण सहा श्लोकात सहा वेळ "**पार्थ**" संबोधनाचा प्रयोग करून भगवान् सर्व साधकांचा प्रतिनिधी असलेल्या अर्जुनाला सावध करतात की, "हे पृथानन्दन! लौकिक वस्तूं आणि व्यक्तींसाठी चिंता न करता तू आपले लक्ष्य दृढतेने धारण कर. आपल्यात कधीही राजस-तामस भाव येऊ नयेत—यासाठी निरंतर जागृत रहा."

**परिशिष्ट भाव**—निद्रा, भय, चिंता, दुःख, घमेंड इत्यादी दोष तर राहतीलच, नष्ट होऊच शकत नाहीत—असा निश्चय करणारे मनुष्य 'दुर्मेधा' आहेत. अशा मनुष्यांचे दोषत्यागाकडे लक्षच नसते, त्यागाची हिम्मतच नसते, उलट ते त्यांना स्वाभाविकच धरण करतात.

अधिक निद्रासुद्धा बाधक आहे. आवश्यक, यथायोग्य निद्रा बाधक नसते (गीता—सहाव्या अध्यायाचा सोळावा-सतरावा श्लोक).

***संबंध***—*मनुष्याची कर्मात प्रवृत्ती सुखाच्या लोभानेच होते अर्थात् सुख कर्मसंग्रहात हेतू आहे. म्हणून पुढील चार श्लोकात सुखाचे भेद सांगत आहेत.*

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति॥ ३६॥**
**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्।**
**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम्॥ ३७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भरतर्षभ** | = हे भरतवंशातील श्रेष्ठ अर्जुन! | **मे** | = माझ्याकडून | **च** | = आणि (ज्यामुळे) |
| | | **शृणु** | = ऐक. | | |
| **इदानीम्** | = आता | **यत्र** | = ज्याच्यात | **दुःखान्तम्** | = दुःखांचा अंत |
| **त्रिविधम्** | = तीन प्रकारचे | **अभ्यासात्** | = अभ्यासाने | **निगच्छति** | = होतो |
| **सुखम्, तु** | = सुखही (तू) | **रमते** | = रमण होते | **तत्** | = असे ते |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **आत्मबुद्धि-** | = परमात्मविषयक बुद्धीच्या | | आसक्तीमुळे) | **अमृतोपमम्** | = अमृतासारखे असते |
| **प्रसादजम्** | प्रसन्नतेने उत्पन्न होणारे | **अग्रे** | = आरंभी | **तत्** | = ते (सुख) |
| **यत्** | = जे | **विषम्, इव** | = विषासारखे (आणि) | **सात्त्विकम्** | = सात्त्विक |
| **सुखम्** | = सुख (सांसारिक | **परिणामे** | = परिणामी | **प्रोक्तम्** | = म्हटले गेले आहे. |

***व्याख्या*— भरतर्षभ—**हे संबोधन देण्यात भगवंताचा भाव असा आहे की, हे अर्जुन! तू राजस, तामस सुखात लोलुप, मोहीत होणारा नाहीस कारण राजस-तामस सुखावर विजय मिळविणे तुझ्यासाठी काही मोठी गोष्ट नाही. तू राजस सुखावर विजयही मिळविला आहेस कारण स्वर्गातील उर्वशीसारख्या सुंदर अप्सरेलाही तू ठोकर मारली आहेस. त्याचप्रमाणे तू तामस सुखावरही विजय मिळविला आहेस कारण प्राणीमात्रासाठी आवश्यक जे निद्रेचे तामस सुख आहे त्यावरही तू विजय मिळविला आहेस. म्हणूनच तुझे नाव ''गुडाकेश'' पडले आहे. ह्याकारणाने तू भरतवंशामध्ये श्रेष्ठ आहेस.

**सुखं तु इदानीम्—**ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी आणि धृतीचे तीन तीन भेद सांगितल्यानंतर येथे ''**तु**'' पदाचा प्रयोग करून भगवान् म्हणतात की, सुखही तीन प्रकारचे आहे. यात एक विशेष लक्षात घेण्याची गोष्ट अशी आहे की, आज पारमार्थिक मार्गावर चालणारे जितके काही साधक आहेत, त्या साधकांची उन्नती न होण्यात अथवा त्यांना परमात्मतत्त्वाचा अनुभव न होण्यात जर कोणती बाधा असेल तर ती 'सुखाची इच्छा' ही आहे.

सात्त्विक सुखसुद्धा आसक्तीमुळे बंधनकारक होते. तात्पर्य हे आहे की, जर साधनजन्य ध्यान आणि एकाग्रतेचे सुखही घेतले गेले तर तेही बंधनकारक होते. एवढेच नव्हे, जर समाधीचे सुखही घेतले गेले तरी तेही परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीत बाधक होते—''**सुखसङ्गेन बध्नाति**'' (१४।६) या विषयात एखाद्याने म्हटले की, परमात्मतत्त्वाचे सुख प्राप्त झाले तर काय त्या सुखाचाही स्वीकार करू नये? वास्तविक परमात्मतत्त्वाचे सुख घेतले जात नाही, तर त्या अक्षयसुखाचा आपोआप अनुभव होतो (५।२१; ६।२१, २८) साधनजन्य सुखाचा भोग न करण्याने ते अक्षयसुख आपोआप स्वाभाविक प्राप्त होते. त्या अक्षयसुखाकडे विशेष लक्ष करविण्यासाठी भगवान् येथे ''तु'' पदाचा प्रयोग करीत आहेत.

येथे ''**इदानीम्**'' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, अर्जुन संन्यास आणि त्यागाच्या तत्त्वाला जाणू इच्छित आहेत म्हणून त्यांच्या जिज्ञासेच्या उत्तरात भगवंतांनी त्याग, ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी आणि धृतीचे तीन तीन भेद सांगितले. परंतु या सर्वात ध्येय तर सुखाचेच राहते. म्हणून भगवान् म्हणतात की, तू त्या ध्येयाच्या सिद्धीसाठी सुखाचे भेद ऐक.

**त्रिविधं शृणु मे—**लोक रात्रंदिवस राजस आणि तामस सुखात लागलेले राहतात आणि त्यालाच वास्तविक सुख मानतात. या कारणामुळे ''सांसारिक भोगापेक्षाही पलीकडे आणखी कोणते श्रेष्ठ सुख मिळू शकते, प्राणांच्या मोहापेक्षा, राजस-तामस सुखापेक्षाही त्यांच्या पलीकडे कोणते सात्त्विक सुख आहे'' याची ते कल्पनाही करू शकत नाहीत, ते ह्या गोष्टींना समजूच शकत नाहीत. म्हणून भगवान् म्हणतात की, हे सखा! ते सुख तीन प्रकारचे असते ते तू ऐक आणि त्यापैकी सात्त्विक सुखाचा स्वीकार कर आणि राजस-तामस सुखाचा त्याग कर. कारण सात्त्विक सुख परमात्म्याकडे अग्रेसर होण्यात साहाय्यता करणारे आहे आणि राजस-तामस सुख संसारात फसवून पतन करणारे आहे.

**अभ्यासाद्रमते यत्र—**सात्त्विक सुखात अभ्यासाने रमण होते. साधारण मनुष्यांना अभ्यासाशिवाय या सुखाचा अनुभव होत नाही. राजस आणि तामस सुखात अभ्यास करावा लागत नाही. त्यात तर प्राणीमात्राचे स्वतः स्वाभाविक-च आकर्षण असते.

राजस-तामस सुखात इंद्रियांचे विषयांकडे, मन-बुद्धीचे भोग-संग्रहाकडे तसेच थकवा आल्यावर निद्रेकडे आरामाकडे स्वतः स्वाभाविक आकर्षण असते. विषयजन्य, अभिमानजन्य, प्रशंसाजन्य आणि निद्राजन्य सुख सर्व प्राण्यांना स्वाभाविकच प्रिय वाटतात. कुत्रे इत्यादी जे नीच प्राणी आहेत त्यांचाही आदर केला तर तेही खूश होतात आणि निरादर केला तर नाराज होतात, दुःखी होतात. तात्पर्य हे आहे की, राजस आणि तामस सुखात अभ्यासाची जरूरी नाही, कारण हे सुख सर्व प्राणी अन्य योनीतही घेत आले आहेत.

या सात्त्विक सुखात अभ्यास काय आहे? श्रवण-मननसुद्धा अभ्यास आहे, शास्त्रांना समजणेसुद्धा अभ्यास आहे आणि राजसी-तामसी वृत्तींना हटविणेसुद्धा अभ्यास आहे. ज्या राजस-तामस सुखात प्राणीमात्राची स्वतः स्वाभाविक प्रवृत्ती होत आहे त्याहून वेगळी नवीन प्रवृत्ती करण्याचे नाव

''अभ्यास'' आहे. सात्त्विक सुखात अभ्यास करणे तर आवश्यक आहे परंतु रमण करणे बाधक आहे.

येथे **''अभ्यासाद्रमते''** पदाचा हा भाव नाही की, सात्त्विक सुखाचा भोग केला जावा. तर सात्त्विक सुखात अभ्यासानेच आवड, प्रियता, प्रवृत्ती इत्यादी होण्यालाच येथे रमण करणे म्हटले गेले आहे.

**दुखान्तं च निगच्छति**—त्या सात्त्विक सुखात अभ्यासाने जस-जशी आवड, प्रियता वाढत जाते, तस-तसा परिणामी दु:खांचा नाश होत जातो आणि प्रसन्नता, सुख तसेच आनंद वाढत जातो. (२।६५)

**''च''** अव्यय देण्याचे तात्पर्य हे आहे की, जोपर्यंत सात्त्विक सुखात रमण होईल अर्थात् साधक सात्त्विक सुख घेत राहील, तोपर्यंत दु:खांचा अत्यंताभाव होणार नाही. कारण सात्त्विक सुखसुद्धा परमात्मविषयक बुद्धीच्या प्रसन्नतेने उत्पन्न झाले आहे—**''आत्मबुद्धिप्रसादजम्''**. जे उत्पन्न होणारे असते ते अवश्य नष्ट होते. अशा सुखाने दु:खांचा अंत कसा होईल? म्हणून सात्त्विक सुखातसुद्धा आसक्ती होऊ नये. सात्त्विक सुखाच्याही पलीकडे गेल्यास मनुष्य दु:खांच्या अंताला प्राप्त होतो, गुणातीत होतो.

**आत्मबुद्धिप्रसादजम्**—ज्या बुद्धीत सांसारिक मान, सन्मान, आदर, धनसंग्रह, विषयजन्य सुख इत्यादींचे महत्त्व नसते, केवळ परमात्मविषयक विचारच राहतो, त्या बुद्धीची प्रसन्नता (२।६४) अर्थात् स्वच्छतेने हे सात्त्विक सुख उत्पन्न होते. तात्पर्य हे आहे की, सांसारिक संयोगजन्य सुखापासून सर्वथा उपरत होऊन परमात्म्यात बुद्धी विलीन झाल्यावर जे सुख होते ते सुख सात्त्विक आहे.

**यत्तदग्रे विषमिव**—येथे **''यत्तत्''** म्हणण्याचा भाव हा आहे की, **''यत्''** जे सात्त्विक सुख आहे, **''तत्''** ते परोक्ष आहे अर्थात् त्याचा अजून अनुभव आला नाही. आत्ता तर त्या सुखाचा केवळ उद्देश बनविला आहे. पण अजून राजस आणि तामस सुखाचा अनुभव येत आहे. म्हणून अनुभवजन्य राजस आणि तामस सुखाचा त्याग करण्यात कठीणता वाटते. आणि लक्ष्यरूपाने जे सात्त्विक सुख आहे, त्याच्या प्राप्तीसाठी केलेले रसहीन परिश्रम (अभ्यास) आरंभी विषाप्रमाणे वाटतो—**''अग्रे विषमिव''** तात्पर्य हे आहे की, अनुभवजन्य राजस आणि तामस सुखाचा तर त्याग केला आणि लक्ष्यरूप सात्त्विक सुख मिळाले नाही—त्याचा रस अजून मिळाला नाही. म्हणून ते सात्त्विक सुख आरंभी विषाप्रमाणे वाटते.

राजस आणि तामस सुख अनेक योनीत भोगत आले आहे आणि ते याही जन्मात भोगले आहे. त्या भोगलेल्या सुखाची स्मृती आल्याने राजस आणि तामस सुखात स्वाभाविकच मन लागते. परंतु सात्त्विक सुख तितके भोगलेले नाही म्हणून त्याच्यात मन लवकर लागत नाही. या कारणामुळे सात्त्विक सुख सुरवातीला विषाप्रमाणे वाटते.

वास्तविक सात्त्विक सुख विषाप्रमाणे नाही तर राजस आणि तामस सुखाचा त्याग विषाप्रमाणे असतो. जसे लहान मुलाला खेळणे-कूदणे सोडून अभ्यास करायला लावले तर ते त्याला कैद्याप्रमाणे होऊन अभ्यास करावा लागतो. अभ्यासात मन लागत नाही तसेच इकडील उच्छृंखलता, खेळणे-कूदणे सुटून जाते तर त्यावेळी त्याला अभ्यास विषाप्रमाणे वाटतो. परंतु तोच मुलगा अभ्यास करीत राहिला आणि एक-दोन परीक्षेत पास झाला तर त्याचे अभ्यासात मन लागते अर्थात् त्याला अभ्यास करणे आवडू लागते. मग त्याला त्याच्या शिक्षणाच्या अभ्यासाची गोडी, प्रियता होऊ लागते.

वास्तविक पाहिले तर सात्त्विक सुख आरंभी विषाप्रमाणे त्याच लोकांसाठी असते ज्यांची राजस-तामस सुखात आसक्ती असते. परंतु ज्यांना सांसारिक भोगांविषयी स्वाभाविक वैराग्य आहे, ज्यांची पारमार्थिक शास्त्राध्ययन, सत्संग, कथा-कीर्तन, साधन, भजन इत्यादित स्वाभाविक रुची आहे आणि ज्यांचे ज्ञान, कर्म, बुद्धी आणि धृती सात्त्विक आहेत त्या साधकांना हे सात्त्विक सुख आरंभापासूनच अमृताप्रमाणे आनंद देणारे असते. त्यांना यात कष्ट, परिश्रम, कठीणता, इत्यादी जाणवत नाहीत.

**परिणामेऽमृतोपमम्**—साधन करण्याने साधकात सत्त्वगुण येतो. सत्त्वगुण आल्याने इंद्रिये आणि अंत:करणात स्वच्छता, निर्मळता, ज्ञानाची दीप्ती, शांती, निर्विकारता, इत्यादी सद्भाव, सद्गुण प्रगट होतात.* या सद्गुणांचे प्रगट होणे हेच सात्त्विक सुख परिणामी अमृतासारखे होणे आहे. याचा उपभोग न केल्यास अर्थात् यात रस न घेतल्यास वास्तविक अक्षयसुखाची प्राप्ती होते (५।२१)

सात्त्विक सुख परिणामी राजस आणि तामस सुखापेक्षा उच्च श्रेणीचे ठरून जडतेशी संबंध-विच्छेद करून देते आणि यात आसक्ती न राहिल्यास शेवटी परमात्म्याची प्राप्ती करून

* सात्त्विक, राजस आणि तामस—हे तिन्ही गुण अंत:करणात अमूर्तरूपाने असतात. यांची ओळख वृत्तींवरुनच होते, ज्याचे वर्णन चौदाव्या अध्यायात अकराव्यापासून तेराव्या श्लोकापर्यंत झाले आहे.

देते. म्हणून हे परिणामी अमृतासारखे आहे.

**तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तम्**—सत्संग, स्वाध्याय, संकीर्तन, जप, ध्यान, चिंतन इत्यादीने जे सुख होते ते मान, सन्मान, आराम, रुपये, भोग, इत्यादी विषयेंद्रिय-संबंधाचे नाही आणि प्रमाद, आळस, निद्रेचेही नाही. ते तर परमात्म्याच्या संबंधाचे आहे. म्हणून ते सुख सात्त्विक म्हटले गेले आहे.

**परिशिष्ट भाव**—चौदाव्या अध्यायात तर सात्त्विक सुखाला बंधनकारक म्हटले होते—'**सुखसङ्गेन बध्नाति**' (१४।६), परंतु येथे दुःखनाशक म्हणतात—'**दुःखान्तं च निगच्छति**'. याचे तात्पर्य असे आहे की, सात्त्विक सुखात रमण (भोग) करण्याने ते बंधनकारक होते अर्थात् गुणातीत होऊ देत नाही. जर रमण केले नाही, तर ते सात्त्विक सुख दुःखनाशक होते. सुख भोगल्याने दुःखनाश होत नाही. भोगाचा त्याग केल्यानेच योग होतो. म्हणून सात्त्विक सुखापासूनही असंगता झाली पाहिजे. संग झाल्यास बंधनकारक असलेला रजोगुण येतो. सत्त्वगुणात रजोगुण आल्यास पतन होते.

विवेकाला महत्त्व न दिल्यामुळे सात्त्विक सुख आरंभी विषासारखे दिसते. राजस मनुष्य विवेकाला आदर देत नाही. म्हणून सात्त्विक सुखाचे आरंभी विषासारखे दिसणे राजसपणा आहे. तात्पर्य हे आहे की, सात्त्विक सुख दुःखदायक नसते, परंतु मनुष्याच्या बुद्धीत राजसपणा झाल्याने सात्त्विक सुखसुद्धा त्याला विषासारखे दुःखदायक दिसते. त्याचा उद्देश तर सात्त्विक सुखाचा असतो परंतु अंतःकरणात राजस भाव असतो.

***संबंध**—आता राजस सुखाचे वर्णन करतात-*

**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**
**परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **यत्** | = जे | **अग्रे** | = आरंभी | **इव** | = सारखे प्रतीत होते, (म्हणून) |
| **सुखम्** | = सुख | **अमृतोपमम्** | = अमृतासारखे (आणि) | **तत्** | = ते (सुख) |
| **विषयेन्द्रिय-संयोगात्** | = इंद्रिये आणि विषय यांच्या संयोगाने (होते) | **परिणामे** | = परिणामी | **राजसम्** | = राजस |
| **तत्** | = ते | **विषम्** | = विषा- | **स्मृतम्** | = म्हटले गेले आहे. |

*व्याख्या*— **विषयेन्द्रियसंयोगात्**—विषय आणि इंद्रियांच्या संयोगाने होणारे जे सुख आहे, त्यात अभ्यास करावा लागत नाही. कारण हा प्राणी कोणत्याही योनीत जावो तेथे त्याला विषय आणि इंद्रियांच्या संयोगाने होणारे सुख मिळतच असते. शब्द, स्पर्श इत्यादी पाचही विषयांचे सुख पशु-पक्षी, कीट पतंग, इत्यादी सर्व प्राण्यांना मिळते. म्हणून त्या सुखात प्राणीमात्राचा स्वाभाविक अभ्यास राहतो. मनुष्यजीवनातही लहानपणापासून पाहिले तर अनुकूलतेत खूश होणे आणि प्रतिकूलतेत नाखूश होणे स्वाभाविकच होत आले आहे. म्हणून या राजस सुखात अभ्यासाची आवश्यकता नाही.

**यत्तदग्रेऽमृतोपमम्**—राजस सुख आरंभी अमृताप्रमाणे म्हणण्याचा भाव असा आहे की, सांसारिक सुख प्राप्तीच्या संभावनेचे वेळी मनात जितके सुख होते, तितके सुख, मस्ती, खूशी विषय मिळाल्यावर राहत नसते. मिळाल्यावरही आरंभी (संयोग होताच) जसे सुख होते, थोड्या वेळानंतर तसे सुख राहत नाही आणि शेवटी तो विषय भोगता भोगता जेव्हा भोगण्याची शक्ती क्षीण होते तेव्हा सुख होत नाही उलट विषयभोगापासून अरुची होते. भोग भोगण्याची शक्ती क्षीण झाल्यावरही जर विषयांना भोगले गेले तर दुःख, आग उत्पन्न होते. चित्तात सुख राहत नाही. म्हणून हे राजस सुख आरंभी अमृततुल्य वाटते.

अमृततुल्य म्हणण्याचा दुसरा भाव असा आहे की, जेव्हा मन विषयाकडे आकर्षित होते तेव्हा मनाला ते विषय फार प्रिय वाटतात. विषय आणि भोगांच्या गोष्टी ऐकण्यात जितका रस येतो तितका भोगात येत नाही. म्हणून गीतेत आले आहे—"**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः**" (२।४२) राजस पुरुष स्वर्गीय भोगांचे सुख ऐकतात तेव्हा ते त्यांना प्रिय वाटते आणि ते त्यासाठी लालायित होतात. तात्पर्य, स्वर्गसुख दुरुन ऐकूनच फार प्रिय वाटते पण स्वर्गात जाऊन सुख भोगण्यात तितका आनंद मिळत नाही व तितके ते प्रियही वाटत नाही.

**परिणामे विषमिव**—आरंभी विषय फार सुंदर वाटतात, त्यात फार सुख वाटते परंतु ते भोगता भोगता जेव्हा परिणामी

ते सुख नीरसतेत परिणत होते, त्या सुखाविषयी बिल्कुल अरुची उत्पन्न होते, तेव्हा तेच सुख विषासमान वाटू लागते.

संसारात जितके प्राणी कैदेत पडलेले आहेत, जितके चौऱ्यांशी लाख योनीत आणि नरकांत पडलेले आहेत; त्याचे कारण जर पाहिले तर त्यांनी विषयांचा भोग घेतला आहे, त्यांच्यापासून सुख घेतले आहे, म्हणूनच ते कैद, नरक इत्यादीत दु:ख भोगत आहेत. कारण राजस सुखाचा परिणाम दु:ख होतोच—"**रजसस्तु फलं दु:खम्**" (१४।१६).

आजही जे लोक घाबरत आहेत, दु:खी होत आहेत, ते सर्व पदार्थांच्या आसक्तीमुळेच दु:ख भोगत आहेत. जो धनी होऊन नंतर निर्धन झाला आहे तो जितका दु:खी व संतप्त होतो तितका संताप आणि दु:ख स्वाभाविक निर्धनाला नसतो. कारण त्याच्यावर सुखाचे संस्कार अधिक झाले नाहीत. परंतु श्रीमंताने राजस सुख अधिक भोगले आहे. त्याच्या अंत:करणावर सुखाचे संस्कार अधिक पडले आहेत म्हणून त्याला धनाच्या अभावाचे दु:ख अधिक आहे. जसे ज्या मनुष्याला भोजनात अनेक प्रकारचे पदार्थ खाण्याची सवय आहे, त्याच्या भोजनातील एखादा पदार्थ जरी कमी झाला तरी ती उणीव त्याला खटकते. आज काय तर चटणीच नाही, आंबट पदार्थ नाही, गोड पदार्थ नाही, अमुक अमुक वस्तू नाही. अशा प्रकारे त्याचा नाही-नाहीचा जप चालू असतो. परंतु सामान्य गरीब माणूस साधी बाजरीची ओली कोरडी भाकरी खाऊन मजेत राहतो. त्याला भोजनात कशाचीही उणीव खटकत नाही. तात्पर्य हे झाले की, पदार्थांच्या संयोगाचे जितके अधिक सुख घेतले आहे तितकाच त्याच्या अभावाचा अनुभव होतो. अभावाच्या अनुभवात दु:खच होते.

ज्या पदार्थाची कामना होते, त्याच्या प्राप्तीसाठी मनुष्य प्रयत्न करतो. प्रयत्न केल्यावरही वस्तू मिळेल अथवा मिळणार नाही याविषयी संदेह राहतो. वस्तू नाही मिळाली तर त्याच्या अभावाचे दु:ख होते आणि वस्तू मिळाली तर ती वस्तू आणखी अधिक प्रमाणात प्राप्त करण्याची इच्छा होते. अशा प्रकारे इच्छापूर्ती नवीन इच्छेचे कारण बनते आणि इच्छापूर्ती तसेच पुन्हा इच्छेची उत्पत्ती—असे चक्र चालूच राहते. याचा कधी अंतच होत नाही. तात्पर्य हे आहे की, इच्छा कधी मिटत नाही आणि इच्छेच्या अस्तित्वात अभाव खटकत राहतो. हा अभावच विषासमान आहे अर्थात् दु:खदायी आहे.

जर राजस सुख परिणामी विषासमान आहे तर मग राजस सुख घेणारे जितके लोक आहेत ते सुखभोगाअंती मरून जायला पाहिजे होते? परंतु राजस सुख विषाप्रमाणे मारीत नाही उलट विषाप्रमाणे अरुचीकारक होते. त्यात पूर्वी जशी रुची होती तशी रुची शेवटी राहत नाही अर्थात् ते सुख विषासमान होते, प्रत्यक्ष विष होत नाही.

राजस सुख विषासमान का होते? कारण विष तर एका जन्मातच मारते पण राजस सुख कित्येक जन्मापर्यंत मारत राहते. राजस सुख भोगणारा रागी पुरुष शुभ कर्म करून जर स्वर्गातही गेला तरी तेथेही त्याला सुख, शांती मिळत नाही. स्वर्गातही आपल्यापेक्षा उच्च श्रेणीवाल्यांना पाहून त्याला ईर्ष्या होते की, हे आमच्यापेक्षा श्रेष्ठ का झाले. समान श्रेणी-वाल्यांना पाहून त्याला वाटते की, हे माझ्या बरोबरीच्या पदावर का आले? आणि निम्न श्रेणींच्याना पाहून अभिमान होतो की, आम्ही त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ आहोत. अशा प्रकारे त्यांच्या मनात ईर्ष्या, दु:ख आणि अभिमान होतच राहतो. मग त्याच्या मनाला सुख शांती कुठली? एवढेच नव्हे पुण्य क्षीण झाल्यावर त्याला पुन्हा मृत्युलोकात यावे लागते—"**क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति**" (९।२१). येथे येऊन पुन्हा शुभ कर्म करतो आणि पुन्हा स्वर्गात जातो. अशा प्रकारे जन्म-मरणाच्या चक्रामध्ये फिरत राहतो—"**गतागतं कामकामा लभन्ते**" (९।२१) जर तो आसक्तीमुळे पाप-कर्मात लागला तर परिणामी चौऱ्यांशी लाख योनींत आणि नरकांत पडून, न जाणो किती जन्मांपर्यंत जन्मत-मरत राहतो, त्याचा काही अंतच होत नाही. म्हणून या सुखाला विषासमान म्हटले गेले आहे.

**तत्सुखं राजसं स्मृतम्**—सात्त्विक सुखासाठी तर (सदतीसाव्या श्लोकात) "**प्रोक्तम्**" पद आले आहे परंतु राजस सुखासाठी येथे "**स्मृतम्**" पद सांगण्याचे तात्पर्य हे आहे की, पूर्वीही मनुष्याने राजस सुखाचे फल दु:ख भोगले आहे परंतु आसक्तीमुळे तो संयोगासाठी पुन्हा लालायित होतो. कारण संयोगाचा प्रभाव त्याच्यावर पडलेला असतो आणि परिणामाचा प्रभाव स्वीकार करीत नाही. जर त्याने परिणामाच्या प्रभावाचा स्वीकार केला तर मग पुन्हा राजस सुखात फसणार नाही. स्मृती, शास्त्र, पुराण इत्यादीत अशा पुष्कळ ऐतिहासिक कथा आल्या आहेत की, ज्यात मनुष्याने राजस सुख भोगल्यामुळे परिणामी त्याला दु:खच भोगावे लागले. याच गोष्टीचे स्मरण करविण्यासाठी येथे "**स्मृतम्**" पद आले आहे.

ज्याची वृत्ती जितकी सात्त्विक असते तो तितकाच

प्रत्येक विषयाच्या परिणामाकडे पाहतो. आत्ताच्या तात्कालिक सुखाकडे तो लक्ष देत नाही. परंतु राजसीवृत्तीचा माणूस परिणामाकडे पाहतच नाही. त्याची वृत्ती तात्कालिक सुखा-कडेच जाते. म्हणून तो संसारात फसलेला राहतो. राजस पुरुषाला संसाराचा संबंध वर्तमानात तर चांगला वाटतो परंतु परिणामी हा हानीकारक असतो—**"ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते।** (५।२२)". म्हणून साधकाने संसारातून विरक्त व्हावयास हवे, राजस सुखात फसू नये.

**परिशिष्ट भाव**—सांसारिक भोगाचे सुख आरंभी अमृतासारखे आणि परिणामी विषासारखे असते. अविवेकी मनुष्य आरंभालाच महत्त्व देतो. आरंभ तर सदा राहत नाही, परंतु त्याची कामना सदा राहते, जी संपूर्ण दुःखांचे कारण आहे. परंतु विवेकी मनुष्य आरंभाला न पाहता परिणामाला पाहतो. म्हणून तो भोगात आसक्त होत नाही—**'न तेषु रमते बुधः'** (गीता ५। २२). परिणामाला पाहण्याची योग्यता मनुष्यातच आहे. परिणामाला न पाहणे पशुता आहे.

वास्तविक आरंभ (संयोग) मुख्य नाही, तर अंतच (वियोगच) मुख्य आहे. मनुष्य आरंभकाळ इच्छितो परंतु तो राहत नाही, कारण प्रत्येक संयोगाचा वियोग होतो—हा नियम आहे. आरंभ अनित्य असतो आणि अंत नित्य असतो. अनित्याच्या इच्छेनेच दुःखांची उत्पत्ती होते. संसारमात्राचा वियोगच नित्य आहे. परंतु राजसवृत्तीमुळे संयोग बरा वाटतो. जर मनुष्य आरंभ-काळाच्या सुखाला महत्त्व देणार नाही तर दुःख कधी भोगावेच लागणार नाही. आरंभाला पाहिल्याने भोग होतो आणि परिणामाला पाहिल्याने योग होतो.

संसाराच्या संयोगात जे सुख प्रतीत होते त्यात दुःखही मिसळलेले राहते. परंतु संसाराचा वियोग झाल्यास सुख-दुःखातीत अखंड आनंद प्राप्त होतो.

***संबंध**—आता तामस सुखाचे वर्णन करतात.*

**यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः।**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम्॥ ३९॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **निद्रालस्य-प्रमादोत्थम्** | = निद्रा, आळस आणि प्रमाद यापासून उत्पन्न होणारे | **अग्रे** | = आरंभी | | असते, |
| **यत्** | = जे | **च** | = आणि | **तत्** | = ते (सुख) |
| **सुखम्** | = सुख | **अनुबन्धे च** | = परिणामीही | **तामसम्** | = तामस |
| | | **आत्मनः** | = आपल्याला | **उदाहृतम्** | = म्हटले गेले आहे. |
| | | **मोहनम्** | = मोहित करणारे | | |

***व्याख्या***—**निद्रालस्यप्रमादोत्थम्**—जेव्हा आसक्ती अत्यधिक वाढते तेव्हा ती तमोगुणाचे रूप धारण करते. यालाच मोह म्हणतात. या मोहामुळेच (मूढता) मनुष्याला अधिक झोप चांगली वाटते. अधिक झोप घेणाऱ्याला गाढ झोप लागत नाही. गाढ झोप येत नसल्याने त्याला तन्द्री आणि स्वप्न जास्त पडतात. यात त्याचा खूप काळ व्यर्थ जातो. परंतु तामस मनुष्याला यातच सुख वाटते. म्हणून या सुखाला निद्रे-पासून होणारे असे म्हटले आहे.

जेव्हा तमोगुण अधिक वाढतो तेव्हा मनुष्याच्या वृत्ती जड होतात. मग तो आळसात वेळ व्यर्थ घालवितो. आवश्यक काम समोर उपस्थित झाले तर तो म्हणतो "मग करू, आत्ता तर आराम करीत आहे". अशा प्रकारे आळसातच त्याला सुख वाटते. परंतु रिकामटेकडा राहत असल्यामुळे त्याच्या इंद्रियात आणि अंतःकरणात शिथिलता येते, मनात संसारी विषयाचे निरर्थक चिंतन होत राहते आणि मनात अशांती, शोक, विषाद, चिंता, दुःख याचे साम्राज्य पसरते.

जेव्हा यापेक्षाही अधिक तमोगुण वाढतो तेव्हा मनुष्य प्रमाद करू लागतो. तो प्रमाद दोन प्रकारचा असतो. अक्रिय प्रमाद आणि सक्रिय प्रमाद. घर, परिवार, शरीर इत्यादींच्या आवश्यक कामांना न करणे आणि रिकामे बसून राहणे अक्रिय प्रमाद आहे.* व्यर्थ क्रिया (पाहणे, ऐकणे, विचार करणे इत्यादी) करणे, बीडी, सिगारेट, दारू, भांग, तंबाखू, खेळ-तमाशे, इत्यादी दुर्व्यसनात लागणे आणि चोरी, डाके,

* आळस आणि अक्रिय प्रमाद एकसारखे दिसत असले तरीही त्यात थोडा फरक आहे. आळसात वृत्ती भारी पडल्यामुळे सुख वाटते तर अक्रिय प्रमादात कर्तव्यकर्माचा त्याग करण्याने सुख होते.

असत्य, कपट, बेईमानी, व्यभिचार, अभक्ष्य-भक्षण, इत्यादी दुराचारात लागणे ''सक्रिय प्रमाद'' आहे.

प्रमादामुळे तामस माणसांना निरर्थक वेळ घालविण्यात तसेच असत्य, कपट, बेईमानी, इत्यादी करण्यात सुख मिळते. जेसे काम धंदा करणारे पैसे (मजूरी वा वेतन) तर पूर्ण घेतात पण काम पूर्ण आणि योग्य रीतीने पार पाडत नाहीत. चिकित्सक लोक रोग्यांचा योग्य रीतीने इलाज करीत नाहीत ज्यामुळे रोग्यांनी पुन्हा पुन्हा येत रहावे आणि पैसे देत रहावे. दूध विक्री करणारे पैशाच्या लोभाने दुधात पाणी घालून विक्री करतात. पैसे अधिक दिले तरी पाणी घालणे सोडत नाहीत. अशा पापरूपी प्रमादाने त्यांना घोर नरकांची प्राप्ती होते.

जेव्हा तमोगुणी प्रमाद वृत्ती येते तेव्हा ती सत्त्वगुणाच्या विवेक-ज्ञानाला झाकून टाकते आणि जेव्हा तमोगुणी निद्रा आळस वृत्ती येते तेव्हा ती सत्त्वगुणाच्या प्रकाशाला झाकून टाकते. विवेक-ज्ञान झाकले गेले तर प्रमाद होतो तसेच प्रकाश झाकला गेला तर आळस आणि निद्रा येते. तामस पुरुषाला निद्रा, आळस आणि प्रमाद—तिन्हीपासून सुख मिळते. म्हणून तामस सुख ह्या तिन्हीपासून उत्पन्न होते असे सांगितले आहे.

### विशेष गोष्ट

निद्रा दोन प्रकारची असते. युक्तनिद्रा आणि अतिनिद्रा.

**(१) युक्तनिद्रा**—निद्रेत एक विश्राम मिळतो, विश्रामामुळे शरीर, मन, बुद्धी, अंत:करणात निरोगता, स्फूर्ती, स्वच्छता, निर्मळता आणि ताजेतवानेपणा येतो. तजेला आल्याने साधन-भजन करण्यात आणि सांसारिक काम करण्यातही शक्ती मिळते आणि उत्साह राहतो. म्हणून युक्तनिद्रा दोषी नाही उलट सर्वांसाठी आवश्यक आहे. भगवंतांनीही युक्तनिद्रेला आवश्यक म्हटले आहे— **''युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा''** (६।१७)

ताजेतवाने होण्यासाठी साधकास निद्रा आवश्यक आहे. ज्या साधकाचे संकल्प आसक्तिपूर्वक नसतात त्याला झोप फार लवकर लागते आणि जादा संकल्पशीलास लवकर झोप येत नाही. यावरुन हे सिद्ध झाले की, संसाराचा जो संबंध आहे तो निद्रेचे सुखही घेऊ देत नाही. निद्रा आवश्यक का आहे ? कारण निद्रेमध्ये जे स्थिर तत्त्व आहे ते साधकाला साधनेत प्रवृत्त करण्यात आणि सांसारिक कार्य करण्यात बल देते. म्हणून निद्रा आवश्यक आहे.

जरी निद्रा तामसी आहे तरीपण निद्रेचा जो बेहोशीपणा आहे तो त्याज्य आहे आणि जो विश्रामपणा आहे तो ग्राह्य आहे. परंतु प्रत्येक मनुष्य बेहोशीशिवाय विश्रामपणा ग्रहण करू शकत नाही. म्हणून त्यांना निद्रेचा बेहोशीभागही ग्राह्य आहे. मात्र जे साधन करून श्रेष्ठतेला पोचले आहेत त्यांना निद्रेचा बेहोशीभाग वगळूनही जागृत-सुषुप्तीत विश्राम मिळतो. कारण जागृत अवस्थेत संसाराच्या चिंतनाचा सर्वथा त्याग होऊन परमात्मतत्त्वात स्थिती होते तेव्हा महान् विश्राम, सुख मिळते. या स्थितीतही असंग झाल्यास वास्तविक तत्त्वाची प्राप्ती होते.

जे साधक आहेत त्यांनी विश्रामासाठी झोपू नये. त्यांचा तर असाच भाव असला पाहिजे की, या अगोदर काम धंदा करताना भगवंताचे भजन करत होतो आता पडल्या पडल्या भजन करायचे आहे.

**(२) अतिनिद्रा**—वेळेवर झोपणे आणि वेळेवर जागणे युक्तनिद्रा आहे आणि अधिक झोपणे अतिनिद्रा आहे. अतिनिद्रेच्या आदी आणि अंती शरीरात आळस भरलेला असतो. शरीरात जडपणा येतो. अधिक झोप घेण्याचा स्वभाव झाल्यामुळे प्रत्येक कार्यात झोप येत राहते.

चौदाव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात भगवंतांनी पहिल्या नंबरमध्ये प्रमाद, दुसऱ्या नंबरमध्ये आळस, तीसऱ्या नंबरमध्ये निद्रा ठेवली आहे—**''प्रमादालस्यनिद्राभिस्तन्नि-बध्नाति भारत''** परंतु येथे प्रथम निद्रा दुसऱ्या नंबरमध्ये आळस आणि तीसऱ्या नंबरमध्ये प्रमाद ठेवला आहे— **''निद्रालस्यप्रमादोत्थम्''** या व्यतिक्रमाचे कारण असे आहे की, तेथे या तिन्हीद्वारा मनुष्याला बांधण्याचा प्रसंग आहे आणि येथे मनुष्याचे पतन करण्याचा प्रसंग आहे. बांधण्याच्या विषयात प्रमाद सर्वात अधिक बंधनकारक आहे. म्हणून याला सर्वात प्रथम ठेवले आहे. कारण प्रमाद निषिद्ध आचरणात प्रवृत्त करतो, ज्यामुळे अधोगती होते. आळस केवळ चांगल्या प्रवृत्तीला रोखणारा असल्याने याला दोन नंबरमध्ये ठेवले आहे. निद्रा आवश्यक असल्याने बंधनकारक नाही उलट अतिनिद्राच बंधनकारक आहे, म्हणून हिला तीसऱ्या नंबरमध्ये ठेवले आहे. येथे त्याहून उलटा क्रम ठेवण्याचा अभिप्राय असा आहे की, निद्रा सर्वांसाठी आवश्यक असल्याने इतके पतन करणारी नाही. निद्रेपेक्षा आळस अधिक पतन करतो आणि आळसापेक्षाही प्रमाद अधिक पतन करतो. कारण मनुष्याने अधिक झोप घेतली तर वृक्ष इत्यादी मूढयोनीची प्राप्ती होते. परंतु आळस आणि प्रमाद केला तर कर्तव्यच्युत होऊन दुराचार

करण्याने नरकात जावे लागेल.*

**यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः**—निद्रा, आळस आणि प्रमाद यापासून उत्पन्न झालेले सुख आरंभी आणि परिणामी आपणाला मोहित करणारे असते. या सुखात आरंभीही विवेक राहत नाही आणि परिणामीही विवेक राहत नाही अर्थात् हे सुख विवेकाला जागृत होऊ देत नाही. पशु-पक्षी, कीट-पतंग इत्यादीमध्ये-देखील विवेकशक्ती जागृत न राहिल्याने ते क्रियेच्या आरंभाचा आणि परिणामाचा विचार करू शकत नाहीत. त्याचप्रमाणे ज्या सुखामुळे मनुष्य हा विचारच करू शकत नाही की, या निद्रादिकापासून उत्पन्न होणाऱ्या सुखाचा परिणाम आपल्यावर काय होईल? त्यापासून आपल्याला कोणता लाभ मिळेल? कोणती हानी होईल? कोणते हित होईल? कोणते अहित होईल? त्या सुखाला तामस म्हटले गेले आहे—"**तत्तामसमुदाहृतम्**"

## विशेष विचार

(१) प्रकृती आणि पुरुष—दोन्ही अनादी आहेत आणि "हे दोन आहेत" अशा प्रकारे यांच्या पृथक्‌तेचा विवेकही अनादी आहे. हा विवेक पुरुषातच राहतो, प्रकृतीत नव्हे. जेव्हा हा पुरुष या विवेकाचा अनादर करून अविवेकामुळे प्रकृतीशी संबंध जोडून घेतो तेव्हा या संबंधामुळे पुरुषामध्ये राग (आसक्ती) उत्पन्न होतो.†

जेव्हा राग (आसक्ती) फार सूक्ष्म असतो तेव्हा विवेक प्रबल असतो. जेव्हा राग (आसक्ती) वाढतो तेव्हा विवेक दबून जातो, मिटत नाही. परंतु विवेक योग्य रीतीने जागृत झाला तर मग राग (आसक्ती) टिकत नाही अर्थात् रागाचा (आसक्ती) अभाव होतो आणि त्यावेळी पुरुष मुक्त म्हटला जातो.

त्या रागामुळे मनुष्याची प्रकृतीजन्य सुखात आसक्ती होते. ती आसक्ती असतेवेळी जर मनुष्य एखाद्या कारणाने सात्त्विक सुख प्राप्त करू इच्छित असेल तर राजस आणि तामस सुखाचा त्याग करण्यात त्याला कठीण जाते—"**यत्तदग्रे विषमिव**" परंतु जेव्हा राग समाप्त होतो तेव्हा ते सुख अमृततुल्य होते "**परिमाणेऽमृतोपमम्**".

रागामुळेच रजोगुणी सुख आरंभी अमृतासमान दिसते परंतु ते सुख परिणामी प्राण्यासाठी विषाप्रमाणे अनिष्टकारक अर्थात् महान् दुःखरूप होते. प्रकृतीजन्य सुखाची आसक्ती झाल्यास दुःखाच्या परंपरेचा काही अंत लागत नाही.

जर त्याच रागाने तमोगुणाचे रूप धारण केले तर मनुष्याच्या वृत्ती जड होतात. मग मनुष्य निद्रा आणि आळसात आपला काळ निरर्थक घालवितो. तसेच आवश्यक कर्माला विमुख होऊन अकर्तव्य करू लागतो. परंतु तामस पुरुषाला यातच सुख वाटते म्हणून हे तामस सुख आदी व अंती मोहित करणारे आहे.

(२) जे प्रत्येक क्षणाला अभावामध्ये जात आहे ते वास्तविक "नाही". परंतु जो "नाही" ला प्रकाशित करणारा तसेच त्याचा आधार असतो ते वास्तविक "आहे" तत्त्व आहे. त्याच तत्त्वाला "सच्चिदानन्द" म्हणतात. निरंतर सत्ता रूपाने राहत असल्यामुळे त्याला "सत्" म्हणतात, ज्ञान-स्वरूप असल्याकारणाने त्याला "चित्" म्हणतात आणि आनन्दरूप असल्यामुळे त्याला "आनन्द" म्हणतात. त्या सच्चिदानन्द परमात्म्याचा अंश असल्याने हा प्राणीही सच्चिदानन्दरूप आहे. परंतु जेव्हा प्राणी असत् वस्तूची इच्छा करतो की, अमुक वस्तू मला मिळावी, तेव्हा त्या इच्छेने ते स्वतः स्वाभाविक आनंद-सुख झाकले जाते. जेव्हा असत् वस्तूची इच्छा मिटते तेव्हा ती इच्छा मिटताच ते स्वतः स्वाभाविक सुख प्रगट होते.

नित्य-निरंतर राहणारे जे सुखरूप "तत्त्व" आहे त्यात जेव्हा सात्त्विकी बुद्धी तल्लीन होते, तेव्हा बुद्धीत स्वच्छता, निर्मळता येते. त्या स्वच्छ आणि निर्मळ बुद्धीने अनुभवात येणारे ते स्वाभाविक सुखच सात्त्विक म्हटले जाते. बुद्धीशी-सुद्धा जेव्हा संबंध सुटतो तेव्हा वास्तविक सुख राहते. सात्त्विकी बुद्धीच्या संबंधानेच त्या सुखाची "सात्त्विक" संज्ञा होते. बुद्धीशी संबंध सुटताच त्याची "सात्त्विक" संज्ञा राहत नाही.

मनात जेव्हा एखादी वस्तू प्राप्त करण्याची इच्छा होते तेव्हा ती वस्तू मनात बसते अर्थात् मन आणि बुद्धीचा

---

* तमोगुणाची वृत्ती जो प्रमाद आहे तो सत्प्रवृत्तीला रोखून धरून खेळ-तमाशे इत्यादी सामान्य फालतू क्रियांमध्ये लावून देतो. परंतु जेव्हा ह्या प्रमादाबरोबर आसक्ती येऊन मिळते (जी रजोगुणाचे रूप आहे), तेव्हा तिच्यापासून कामना उत्पन्न होते. कामनेपासून मग अनेक प्रकारची पापे, अनर्थ होतात, त्यांचा परिणाम फार भयंकर होतो.

† आसक्तीपासून अनेक विकार उत्पन्न होतात परंतु ते सर्व विकार प्रकृतीतच होतात, पुरुषात नव्हे. प्रकृतीशी तादात्म्य झाल्याने पुरुष प्रकृतीच्या त्या विकारांना आपल्यात मानतो तेव्हा हा पुरुष भोगी होतो परंतु जेव्हा ह्याला हा बोध होतो की, विकार येतात आणि जातात, उत्पन्न होतात आणि नष्ट होतात परंतु विकारांचा आदी आणि अंत पाहणारी आपली नित्य सत्ता जशीच्या तशीच राहते, तेव्हा त्या अवस्थेत पुरुष योगी होतो.

तिच्याशी संबंध होतो. जेव्हा ती मनोवांच्छित वस्तू मिळते तेव्हा ती वस्तू मनातून निघून जाते अर्थात् मनात जे वस्तूचे आकर्षण होते ते निघून जाते. ते निघून जाताच अर्थात् वस्तूशी संबंध-विच्छेद होताच वस्तूच्या अभावाचे जे दुःख होते, ते निवृत्त होते आणि नित्य राहणाऱ्या स्वतःसिद्ध सुखाचा तात्कालिक अनुभव येतो. वास्तविक हे सुख वस्तूच्या मिळाल्याने झाले नाही उलट रागाच्या तात्कालिक मिटण्याने झाले आहे. परंतु राजस पुरुष अज्ञानाने त्या सुखाला वस्तूच्या मिळण्याने झाल्याचे समजतो. वास्तविक पाहिले तर वस्तूचा संग बाहेरुन होतो आणि प्रसन्नता अंतः-करणातून होते. आतून जी प्रसन्नता होते ती बाहेरच्या संयोगाने उत्पन्न होत नाही उलट मनात बसलेल्या वस्तूशी जो संबंध होता, त्या वस्तूचा संबंध-विच्छेद झाल्याने उत्पन्न होते. तात्पर्य हे आहे की वस्तू मिळताच अर्थात् बाह्य वस्तूचा संग होताच आतून त्या वस्तूचा संबंध-विच्छेद होतो आणि संबंध-विच्छेद होताच नित्य राहणाऱ्या स्वाभाविक सुखाचा आभास होतो.

जेव्हा बुद्धी झोपेत तमोगुणात लीन होते तेव्हा बुद्धीच्या स्थिरतेमुळे ते सुख प्रकट होते. कारण तमोगुणाच्या प्रभावाने झोपेत जागृत आणि स्वप्न पदार्थांची विस्मृती होते. पदार्थांची स्मृती दुःखाला कारण असते. पदार्थांची विस्मृती झाल्याने निद्रावस्थेत पदार्थांचा वियोग होतो तर त्या वियोगामुळे स्वाभाविक सुखाचा आभास होतो. यालाच झोपेचे सुख म्हणतात. परंतु बुद्धीच्या मलीनतेने ते स्वाभाविक सुख जसे आहे तसे अनुभवात येत नाही. तात्पर्य हे आहे की, बुद्धी तमोगुणी झाल्याने बुद्धीत स्वच्छता राहत नाही आणि स्वच्छता न राहिल्याने ते सुख स्पष्ट अनुभवात येत नाही. म्हणून निद्रेच्या सुखाला तामस म्हटले गेले आहे.*

या सर्वांचे तात्पर्य हे आहे की, सात्त्विक मनुष्याला संसारापासून विमुख होऊन तत्त्वात बुद्धी तल्लीन झाल्याने सुख होते, राजस मनुष्याला राग असल्यामुळे अंतःकरणात वसत असलेले पदार्थ बाहेर निघाल्याने सुख होते आणि तामस मनुष्याला पदार्थांसाठी केल्या जाणाऱ्या कर्तव्यकर्माच्या विस्मृतीने आणि निरर्थक क्रियेत लागून राहिल्याने सुख होते. यावरुन हे सिद्ध झाले की, जे नित्य निरंतर राहणारे सुखरूप तत्त्व आहे ते असत्च्या संबंधामुळे आच्छादित राहते. विवेकपूर्वक असत्शी संबंध विच्छेद झाल्यास, राग (आसक्ति) असणारे पदार्थ मनातून निघून गेल्यास आणि बुद्धी तमोगुणात लीन झाल्यास जे सुख होते, ते त्या सुखाचा आभास आहे. तात्पर्य हे झाले की, संसाराशी विवेकपूर्वक विमुख झाल्याने सात्त्विक सुख, अंतःकरणातून पदार्थ निघाल्याने राजस सुख आणि मूढतेने निद्रा-आळसात संसाराची विस्मृती झाल्याने तामस सुख होते. परंतु वास्तविक सुख तर प्रकृतिजन्य पदार्थांशी सर्वथा संबंध-विच्छेद झाल्यानेच होते. या सुखात जी प्रियता, आकर्षण आणि (सुखाचा) भोग आहे, तोच पारमार्थिक उन्नतीत बाधा देणारा आणि पतन करणारा आहे. म्हणून पारमार्थिक उन्नती इच्छिणाऱ्या साधकासाठी या तिन्ही सुखांशी संबंध-विच्छेद करणे अत्यंत आवश्यक आहे.

**परिशिष्ट भाव**—तामस मनुष्यात मोह राहतो—'**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम्**' (गीता १४। ८). मोह विवेकाला बाधक होतो. तामसी वृत्ती विवेकाला जागृत होऊ देत नाही. म्हणून मनुष्याचा विवेक मोहामुळे लुप्त होतो, त्यामुळे तो आरंभाला आणि अंताला पाहतच नाही.

*संबंध—वीसाव्यापासून एकोणचाळीसाव्या श्लोकापर्यंत भगवंतांनी गुणांच्या मुख्यतेनुसार ज्ञान, कर्म इत्यादींचे तीन तीन भेद सांगितले. आता याशिवाय गुणानुसार सृष्टीच्या संपूर्ण वस्तूंचेही तीन तीन भेद होतात, याकडे लक्ष्य वेधून भगवान् पुढील श्लोकात प्रकरणाचा उपसंहार करीत आहेत.*

---

* निद्रेला तामस सुख म्हणण्याचा अभिप्राय असा आहे की, यात बुद्धी मोहित होते अर्थात् त्यात बेहोशी येते. त्या बेहोशीमुळे संसाराची संपूर्णपणे विस्मृती होते आणि जागृत अवस्था संपूर्णपणे दबली जाते म्हणून हिला तामस सुख म्हटले गेले आहे. जर इंद्रियासह बुद्धी मोहित झाली नसती तर हीच अवस्था ''समाधी'' होते. समाधीपासूनही विश्राम मिळतो. या विश्रामात निद्रेपासून मिळणारा जो ताजेतवानेपणा असतो तो मिळतो परंतु या ताजेतवानेपणाचे सुख घेतल्यास गुणातीत होत नाही. गुणातीत तर समाधी सुखाच्या असंगतेनेच होतो.

प्रकृती क्रियाशील, परिवर्तनशील आहे आणि परमात्मतत्त्व अपरिवर्तनशील, निर्विकार, शांत, निश्चल आहे. निद्रावस्थेत त्या निश्चल तत्त्वात स्थिती होते परंतु अंतःकरणांत भोगांचे महत्त्व राहिल्याने झोपेनंतर मनुष्याला पुन्हा भोग आणि संग्रहाचीच आवड उत्पन्न होते आणि तो त्यातच लागून जातो. अशा प्रकारे आसक्तीमुळे मनुष्य त्या निश्चळ तत्त्वाचा लाभ घेऊ शकत नाही आणि झोपेपासून केवळ थकवा दूर करून घेतो. जर त्याने भोग व ऐश्वर्यांच्या आसक्तीचा संपूर्णपणे त्याग केला तर त्याची झोपेत व झोपेनंतरही स्वतः स्वाभाविक अटळ स्थिती राहील.

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिःस्यात्त्रिभिर्गुणैः॥४०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पृथिव्याम्** | = पृथ्वी | | याशिवाय | **प्रकृतिजैः** | = प्रकृतिजन्य |
| **वा** | = अथवा | | इतर कोठेही | **एभिः** | = या |
| **दिवि** | = स्वर्ग | **तत्** | = ती (अशी कोणती) | **त्रिभिः** | = तीन |
| **वा** | = अथवा | **सत्त्वम्** | = वस्तू | **गुणैः** | = गुणांनी |
| **देवेषु** | = देवता यांच्यात | **न, अस्ति** | = नाही, | **मुक्तम्** | = रहित |
| **पुनः** | = तसेच | **यत्** | = जी | **स्यात्** | = आहे. |

***व्याख्या***—[या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाने संन्यास आणि त्यागाचे तत्त्व जाणण्याची इच्छा केली तर भगवंतांनी प्रथम त्याग—कर्मयोगाचे वर्णन केले. त्या प्रकरणाचा उपसंहार करताना भगवंतांनी म्हटले की, जो त्यागी नाही त्याला अनिष्ट, इष्ट आणि मिश्र—असे तीन प्रकारचे कर्माचे फल मिळते आणि जो संन्यासी आहे त्याला फल कधीच मिळत नाही. असे म्हणून तेराव्या श्लोकापासून संन्यास—सांख्ययोगाचे प्रकरण आरंभ करून प्रथम कर्म होण्यात अधिष्ठानादी पाच हेतू सांगितले. सोळाव्या-सतराव्या श्लोकात कर्तृत्व मानणारांची निंदा आणि कर्तृत्वाचा त्याग करणारांची प्रशंसा केली. अठराव्या श्लोकात कर्मप्रेरणा आणि कर्मसंग्रहाचे वर्णन केले. परंतु वास्तविक जे तत्त्व आहे ते कर्मप्रेरकही नाही आणि कर्मसंग्राहकही नाही. कर्मप्रेरणा आणि कर्मसंग्रह तर प्रकृतीच्या गुणांशी संबंध ठेवल्यानेच होतात. मग गुणांनुसार ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी, धृती आणि सुखाचे तीन तीन भेद वर्णन केले. सुखाचे वर्णन करताना हे सांगितले की, प्रकृतीशी लेशमात्र संबंध असताना जे सर्वोच्च सुख असते ते सात्त्विक असते. परंतु स्वरूपाचे जे वास्तविक सुख आहे ते गुणातीत आहे, विलक्षण आहे आणि अलौकिक आहे (६।२१)

सात्त्विक सुखाला "**आत्मबुद्धिप्रसादजम्**" सांगून भगवंतांनी त्याला जन्य (उत्पन्न होणारे) म्हटले. जन्य वस्तू नित्य नसते. म्हणून त्याला जन्य म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, त्या जन्य सुखाच्याही पलीकडे जावयाचे आहे अर्थात् प्रकृती आणि प्रकृतीचे तिन्ही गुण यांनी रहित होऊन त्या परमात्मतत्त्वाला प्राप्त करायचे आहे जे सर्वांचे स्वतःचे स्वाभाविक स्वरूप आहे. म्हणून म्हणतात—]

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः**—येथे "**पृथिव्याम्**" पदाने मृत्युलोक आणि पृथ्वीचे खालचे अतल, वितल इत्यादी सर्व लोकांचा, "**दिवि**" पदाने स्वर्ग इत्यादी लोकांचा, "**देवेषु**" पदाला प्राणिमात्राच्या उपलक्षणाच्या रूपात त्या त्या स्थानांत राहणारे मनुष्य, देवता, असुर, राक्षस, नाग, पशू, पक्षी, कीट, पतंग, वृक्ष इत्यादी सर्व चराचर प्राण्यांचे आणि "**वा पुनः**" पदांनी अनंत ब्रह्मांडांचा संकेत केला गेला आहे. तात्पर्य हे झाले की, त्रैलोक्य आणि अनंत ब्रह्मांड तसेच त्यात राहणारी कोणतीही वस्तू अशी नाही; जी प्रकृतिजन्य ह्या तीन गुणांपासून रहित आहे, अर्थात् सर्वचे सर्व त्रिगुणात्मक आहे—"**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः।**"

प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य हे सर्वचे सर्वच त्रिगुणात्मक आणि परिवर्तनशील आहे. यांच्याशी संबंध जोडण्यानेच बंधन होते आणि यांच्याशी संबंध-विच्छेद करण्यानेच मुक्ती होते, कारण स्वरूप असंग आहे. स्वरूप "स्व" आहे आणि प्रकृती "पर" आहे. प्रकृतीशी संबंध जडताच अहंकार उत्पन्न होतो, जो पराधीनता उत्पन्न करणारा आहे. ही एक विचित्र गोष्ट आहे की, अहंकारात स्वाधीनता वाटते, परंतु वास्तविक पराधीनताच आहे, कारण अहंकाराने प्रकृतिजन्य पदार्थांत आसक्ती, कामना, इत्यादी उत्पन्न होतात. त्यामुळे पराधीनतेतही स्वाधीनता दिसू लागते. म्हणून प्रकृतिजन्य गुणांपासून रहित होणे आवश्यक आहे.

प्रकृतिजन्य गुणांत रजोगुण आणि तमोगुणाचा त्याग करून सत्त्वगुण वाढविण्याची आवश्यकता आहे. सत्त्वगुणात सुद्धा प्रसन्नता आणि विवेक तर आवश्यक आहे परंतु सात्त्विक सुख आणि ज्ञानाची आसक्ती नसावी. कारण सुख आणि ज्ञानाची आसक्ती बंधनकारक आहे. म्हणून त्यांच्या आसक्तीचा त्याग करून सत्त्वगुणाच्या पलीकडे गेले पाहिजे. यापासून उन्नत होण्यासाठीच येथे गुणांचे प्रकरण आले आहे.

साधकाने तर सात्त्विक ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धी, धृती आणि सुख यांच्यावर लक्ष ठेवून त्यांच्या अनुरूप आपले जीवन घडविले पाहिजे आणि दक्षतेने राजस-तामसाचा त्याग

केला पाहिजे. यांचा त्याग करण्यात दक्षता हेच साधन आहे. दक्षतेने सर्व साधने आपोआप प्रकट होतात. प्रकृतीशी संबंध विच्छेद करण्यात सात्त्विकता फार आवश्यक आहे. कारण तीत प्रकाश अर्थात् विवेक जागृत राहतो, त्यामुळे प्रकृतीपासून मुक्त होण्यास पुष्कळशी साहाय्यता मिळते. वास्तविक पाहिले तर यापासूनही असंग व्हावयाचे आहे.

**परिशिष्ट भाव**—दहाव्या अध्यायात भगवंताने भक्तीच्या (विश्वासाच्या) दृष्टीने संपूर्ण वस्तू आपल्यापासून उत्पन्न होणाऱ्या सांगितल्या होत्या—**'न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम्'** (१०।३९). येथे भगवान् ज्ञानाच्या (विवेकाच्या) दृष्टीने संपूर्ण वस्तू प्रकृतिजन्य गुणांपासून उत्पन्न होणाऱ्या सांगत आहेत. कारण विवेकीच्या दृष्टीत सत् आणि असत् दोन्ही राहतात, परंतु भक्ताच्या दृष्टीत एक भगवान्च राहतात—**'सदसच्चाहमर्जुन'** (गीता ९।१९). विवेकमार्गात असत्चा, गुणांचा त्याग मुख्य आहे, परंतु भक्तिमार्गात भगवंताच्या संबंध मुख्य आहे.

'संसारातील कोणतीही वस्तू तिन्ही गुणांनी रहित नाही'—ही गोष्ट अज्ञान्याच्या दृष्टीत आहे, तत्त्वज्ञानी याच्या दृष्टीत नव्हे. तत्त्वज्ञान्याची दृष्टी सत्तामात्र असलेल्या स्वरूपाकडे असते, जी स्वत: स्वाभाविक निर्गुण आहे (गीता—तेराव्या अध्यायाचा एकतीसावा श्लोक).

***संबंध***—*त्यागाच्या प्रकरणात भगवंतांनी हे सांगितले की, नियतकर्मांचा त्याग करणे उचित नाही. त्यांचा मूढतापूर्वक त्याग करण्याने तो त्याग तामस होतो. शारीरिक क्लेशाच्या भयाने नियतकर्मांचा त्याग करण्याने तो त्याग राजस होतो आणि फल तसेच आसक्तीचा त्याग करून नियतकर्म करण्याने तो त्याग सात्त्विक होतो (१८।७-९). सांख्ययोगाच्या दृष्टीने संपूर्ण कर्मांच्या सिद्धीत पाच हेतू सांगताना जेथे सात्त्विक कर्माचे वर्णन झाले आहे तेथे नियतकर्म कर्तृत्वाभिमानरहित, राग-द्वेषरहित आणि फलेच्छारहित मनुष्याकडून केले जाण्याचा उल्लेख केला आहे (१८।२३) त्या कर्मांत कोणत्या वर्णासाठी कोणते कर्म नियतकर्म आहेत आणि त्या नियतकर्मांना कसे केले जावे—हे सांगण्यासाठी आणि त्याबरोबरच भक्तियोग सांगण्यासाठी भगवान् पुढचे प्रकरण आरंभ करतात.*

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परन्तप।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः॥४१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **परन्तप** | = हे परंतप! | **शूद्राणाम्** | = शूद्र यांची | **गुणैः** | = तिन्ही गुणांद्वारा |
| **ब्राह्मणक्षत्रिय-विशाम्** | = ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य | **कर्माणि** | = कर्मे | **प्रविभक्तानि** | = विभक्त केली गेली आहेत. |
| **च** | = आणि | **स्वभाव प्रभवैः** | = स्वभावापासून उत्पन्न झालेल्या | | |

*व्याख्या*— **ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परन्तप**— येथे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य—या तिघांसाठी एक पद आणि शूद्रांसाठी वेगळे एक पद देण्याचे तात्पर्य हे आहे की; ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य—हे द्विजाती आहेत आणि शूद्र द्विजाती नाही. म्हणून यांच्या कर्मांचा विभाग वेगवेगळा आहे आणि कर्मानुसार शास्त्रीय अधिकारही वेगवेगळा आहे.

**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः**—मनुष्य जे काही कर्म करतो, त्याच्या अंत:करणात त्या कर्माचे संस्कार पडतात आणि त्या संस्कारानुसार त्याचा स्वभाव बनतो. अशा प्रकारे पूर्वीच्या अनेक जन्मात केलेल्या कर्मांच्या संस्कारांनुसार मनुष्याचा जसा स्वभाव असतो त्यानुसारच त्यात सत्त्व, रज आणि तम—तिन्ही गुणांच्या वृत्ती निर्माण होतात. या गुणवृत्तींच्या तारतम्यानुसारच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्या कर्मांचा विभाग केला गेला आहे (४।१३) कारण मनुष्यात जशा गुणवृत्ती असतात तसेच तो कर्म करतो.

**विशेष गोष्ट**

(१)

कर्म दोन प्रकारची असतात. (१) जन्मारम्भक कर्म आणि (२) भोगदायक कर्म. ज्या कर्मांनी उच्च-नीच योनीत जन्म होतो ती "जन्मारम्भक कर्म" म्हटली जातात आणि ज्या कर्मांनी सुख-दु:खाचा भोग होतो, ती "भोगदायक" कर्म म्हटली जातात. भोगदायक कर्म अनुकूल प्रतिकूल परिस्थिती उत्पन्न करतात, ज्याला गीतेत अनिष्ट, इष्ट आणि मिश्र नावाने म्हटले गेले आहे (१८।१२).

सखोलदृष्टीने पाहिले तर, सर्व कर्म भोगदायक आहेत. अर्थात् जन्मारंभक कर्मांनीही भोग होतो आणि

भोगदायक कर्मांनीही भोग होतो. जसे ज्याचा उत्तम कुलात जन्म होतो त्याचा आदर होतो, सत्कार होतो आणि ज्याचा नीच कुलात जन्म होतो त्याचा निरादर होतो, तिरस्कार होतो. त्याचप्रमाणे अनुकूल परिस्थिती असणाऱ्यांचा आदर होतो आणि प्रतिकूल परिस्थिती असणाऱ्यांचा निरादर होतो. तात्पर्य हे आहे की, आदर आणि निरादररूपाने भोग तर जन्मारंभक आणि भोगदायक—दोन्ही कर्मांचा होतो. परंतु जन्मारंभक कर्माने जो जन्म होतो त्यात आदर-निरादररूप भोग गौण असतो. कारण आदर-निरादर कधी तरी होत असतात. नेहमी होत नाहीत आणि भोगदायक कर्मांनी जी अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती येते, त्यात परिस्थितीचा भोग मुख्य असतो कारण परिस्थिती नेहमी येत असते.

भोगदायक कर्मांचा सदुपयोग-दुरुपयोग करण्यात प्रत्येक मनुष्य स्वतंत्र आहे अर्थात् तो अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीने सुखी-दुःखीही होऊ शकतो आणि त्याला साधन सामुग्रीही बनवू शकतो. जे अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीने सुखी-दुःखी होतात, ते मूर्ख असतात आणि जे त्याला साधन सामुग्री बनवितात, ते बुद्धिमान् साधक असतात. कारण मनुष्यजन्म परमात्मप्राप्तीसाठीच मिळाला आहे. म्हणून यात जी काही अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती येते ती सर्व साधन सामुग्रीच आहे.

अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीला साधनसामुग्री बनविणे म्हणजे काय ? अनुकूल परिस्थिती आली तर तिला दुसऱ्यांच्या सेवेत, दुसऱ्यांच्या सुख आरामात लावावे आणि प्रतिकूल परिस्थिती आली तर सुखाच्या इच्छेचा त्याग करावा. दुसऱ्यांची सेवा करणे आणि सुखेच्छेचा त्याग करणे—ही दोन्हीही साधने आहेत.

(२)

शास्त्रात असे सांगितले आहे की, पुण्य अधिक झाले तर जीव स्वर्गात जातो आणि पाप अधिक झाले तर नरकाला जातो तसेच पुण्य-पाप समान झाल्यास मनुष्य बनतो. या दृष्टीने कोणत्याही वर्ण, आश्रम, देश, वेष इत्यादींचा कोणताही मनुष्य संपूर्णपणे पुण्यात्मा अथवा पापात्मा होऊ शकत नाही.

पुण्य-पाप समान झाल्याने जो मनुष्य बनतो त्यातही जर पाहिले तर पुण्य-पापाचे तारतम्य राहते अर्थात् कोणाचे पुण्य अधिक असते* आणि कोणाचे पाप अधिक असते. त्याचप्रमाणे गुणांचा विभागसुद्धा आहे. एकंदरीत सत्त्वगुण प्रधान व्यक्ती उर्ध्व लोकात जातात, रजोगुणप्रधान व्यक्ती मध्यलोकात अर्थात् मनुष्य लोकात येतात आणि तमोगुणप्रधान व्यक्ती अधोगतीला जातात. या तिन्हीतही गुणाच्या तारतम्याने अनेक प्रकारचे भेद होतात.

सत्त्वगुणाच्या प्रधानतेने ब्राह्मण, रजोगुणाच्या प्रधानतेने आणि सत्त्व गुणाच्या गौणतेने क्षत्रिय, रजोगुणाची प्रधानता आणि तमोगुणाची गौणता याने वैश्य आणि तमोगुणाच्या प्रधानतेने शूद्र होतात. ही तर सामान्य रीतीने गुणांची गोष्ट सांगितली. आता यांच्या अवांतर तारतम्याचा विचार करू. रजोगुणप्रधान मनुष्यांमध्ये सत्त्वगुणाची प्रधानता असणारे ब्राह्मण झाले. या ब्राह्मणातही जन्माच्या भेदाने उच्च-नीच ब्राह्मण मानले जातात आणि परिस्थितीरूपाने कर्माचे फल-सुद्धा अनेक प्रकारचे असते अर्थात् सर्व ब्राह्मणांची एक-सारखी अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती नसते. या दृष्टीने ब्राह्मण योनीतही तिन्ही गुण मानावे लागतात. त्याचप्रमाणे क्षत्रिय, वैश्य आणि शूद्रही जन्माने उच्च-नीच मानले जातात आणि अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीसुद्धा कित्येक प्रकारची असते. म्हणून गीतेत म्हटले गेले आहे की, त्रैलोक्यात अशी कोणतीही वस्तू नाही जी तिन्ही गुणांपासून रहित आहे. (१८।४०)

आता जे मनुष्येतर योनीचे पशु-पक्ष्यादी आहेत, त्यात-ही उच्च-नीच मानले जातात. जसे गाय इत्यादी श्रेष्ठ मानली जातात आणि कुत्रे, गाढव, डुक्कर इत्यादी नीच मानले जातात. कबूतर इत्यादी श्रेष्ठ मानले जातात आणि कावळा, घार इत्यादी नीच मानले जातात. या सर्वांना अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती सुद्धा एकसारखी मिळत नाही. तात्पर्य हे आहे की, उर्ध्वगती, मध्यगती आणि अधोगती मिळणाऱ्यातही कित्येक प्रकारचे जाती-भेद आणि परिस्थिती-भेद होतात.

**परिशिष्ट भाव**—चवथ्या अध्यायात भगवंताने म्हटले आहे की, चारही वर्णांची रचना मी गुण आणि कर्म यांच्या विभागानुसार केली आहे—'**गुणकर्मविभागशः**' (४।१३) आणि येथे म्हणतात की, चारही वर्णांचे कर्म स्वभावापासून उत्पन्न

* जसे परीक्षेत अनेक विषय असतात आणि त्या विषयांपैकी काही विषयात कमी तर काही विषयात जास्त गुण (मार्क) मिळतात. ते सर्व गुण मिळून एकूण जितके गुण होतात त्यावरुन परीक्षाफल तयार होते. त्याचप्रमाणे प्रत्येक मनुष्याच्या एखाद्या विषयात पुण्य अधिक असते आणि एखाद्या विषयात पाप अधिक असते आणि मग एकंदरीत जितकी पुण्य-पापे असतील त्यानुसार त्याला जन्म मिळतो. जर वेगवेगळ्या विषयात सर्वांची पुण्य-पापे समान असती तर सर्वांना अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती सारखीच मिळाली असती परंतु असे होत नाही. म्हणून सर्वांच्या पाप-पुण्यात अनेक प्रकारचे तारतम्य असते. हीच गोष्ट सत्त्वादी गुणांविषयीही समजली पाहिजे.

झालेल्या तिन्ही गुणांद्वारा विभक्त केले गेले आहेत—'**स्वभावप्रभवैर्गुणैः**'. चवथ्या अध्यायात तर चारही वर्णांच्या उत्पत्तीची गोष्ट आहे आणि येथे चारही वर्णांच्या कर्मांची गोष्ट आहे. तात्पर्य हे आहे की, चवथ्या अध्यायात भगवंताने सांगितले की, चारही वर्णांचा जन्म पूर्वजन्माच्या गुणकर्मांनुसार झाला आहे आणि येथे सांगतात की, जन्मानंतर चारही वर्णांचे अमुक-अमुक कर्म असावे, ज्यानुसार त्यांची पुढे गती होईल.

***संबंध**—आता ब्राह्मणांची स्वाभाविक कर्म सांगतात.*

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम्॥ ४२॥**

**शमः** = मनोनिग्रह करणे, **दमः** = इंद्रिये स्वाधीन करणे, **तपः** = धर्मपालनासाठी कष्ट सहन करणे, **शौचम्** = बाह्याभ्यंतर शुद्ध राहणे, **क्षान्ति** = दुसऱ्यांच्या अपराधाची क्षमा करणे, **आर्जवम्** = शरीर, मन इत्यादीत सरळता ठेवणे, **ज्ञानम्** = वेद, शास्त्र इत्यादीचे ज्ञान असणे, **विज्ञानम्** = यज्ञविधी अनुभवात आणणे **च** = आणि **आस्तिक्यम्** = परमात्मा, वेद इत्यादीत आस्तिक-भाव ठेवणे— **एव** = (ही सर्वची सर्व) च **ब्रह्मकर्मस्वभावजम्** = ब्राह्मणाची स्वाभाविक कर्म आहेत.

***व्याख्या*— शमः—**मनाला वाटेल तेथे लावता येणे आणि वाटेल तेथून काढता येणे अशा प्रकारच्या मनोनिग्रहास ''शम'' म्हणतात.

**दमः—**ज्यावेळी ज्या इंद्रियांकडून जे काम करावयाचे असेल, त्यावेळी त्यांच्याकडून ते काम करून घेणे आणि जेव्हा ज्या इंद्रियाला जेथून दूर करावयाचे असेल, तेथून त्याला दूर करणे, अशा प्रकारे इंद्रियांना ताब्यात ठेवणे, ह्याचे नाव ''दम'' आहे.

**तपः—**गीतेत शरीर, वाणी आणि मनाच्या तपाचे वर्णन आले आहे (१७।१४-१६) हे तप गृहीत धरूनच येथे वास्तविक ''तपा'' चा अर्थ असा आहे की, स्वधर्माचे पालन करीत असतांना येणारे कष्ट प्रसन्नतापूर्वक सहन करणे अर्थात् कष्ट झाल्यावरही चित्त प्रसन्न राहणे.

**शौचम्—**आपल्या मन, बुद्धी, शरीर, इंद्रिये इत्यादींना पवित्र ठेवणे. तसेच आपले खाणे-पिणे, व्यवहार इत्यादीची पवित्रता ठेवणे—अशा प्रकारे शौचाचार-सदाचाराचे योग्य रीतीने पालन करण्याचे नाव ''शौच'' आहे.

**क्षान्तिः—**कोणी कितीही अपमान करो, निंदा करो, दुःख देवो आणि आपल्यात त्याला शिक्षा करण्याची योग्यता, बल, अधिकारही असो, तरीही त्याला शिक्षा न देता त्याने क्षमा न मागताच त्याला प्रसन्नतेने क्षमा करण्याचे नाव ''क्षान्ति'' आहे.

**आर्जवम्—**शरीर, वाणी इत्यादींच्या व्यवहारात सरळता असणे आणि मनात छल, कपट, लपवालपवी इत्यादी दुर्भाव नसणे अर्थात् साधेपणा असणे याचे नाव ''आर्जव'' आहे.

**ज्ञानम्—**वेद, शास्त्र, इतिहास, पुराण, इत्यादींचे योग्य अध्ययन असणे आणि त्यांच्या भावांचा योग्य प्रकारे बोध होणे तसेच कर्तव्याकर्तव्याचा बोध होणे. ''ज्ञान'' आहे.

**विज्ञानम्—**यज्ञात स्रुक्, स्रुवा इत्यादी वस्तूंचा कोणत्या वेळी कोणत्या विधीने प्रयोग केला पाहिजे याचे अर्थात् यज्ञ विधीचे तसेच अनुष्ठान इत्यादीच्या विधीचा अनुभव करून घेणे (चांगल्या रीतीने करून पाहणे) याला ''विज्ञान'' म्हणतात.

**आस्तिक्यम्—**परमात्मा, वेदादी शास्त्र, परलोक इत्यादींचा अंतःकरणात आदर असणे, श्रद्धा असणे आणि त्यांच्या सत्यतेविषयी कधीही संशय न येणे. तसेच त्यानुसार आपले आचरण असणे याचे नाव ''आस्तिक्य'' आहे.

**ब्रह्मकर्म स्वभावजम्—**हे शम, दम इत्यादी ब्राह्मणाची स्वाभाविक कर्म (गुण) आहेत. अर्थात् या कर्मांना (गुणा) धारण करण्यात ब्राह्मणाला परिश्रम होत नाहीत.

ज्या ब्राह्मणांत सत्त्वगुणाची प्रधानता आहे, ज्यांची वंश-परंपरा परम शुद्ध आहे आणि ज्यांची पूर्व जन्मकृत कर्मही शुद्ध आहेत. अशा ब्राह्मणांचे शम, दम इत्यादी गुण स्वाभाविक असतात आणि त्यांच्यात एखादा गुण नसेल अथवा एखाद्या गुणात काही उणीव असेल तरीही त्याची पूर्ती करणे त्या ब्राह्मणांसाठी सहज असते.

चारी वर्णांची रचना गुणांच्या तारतम्याने केली गेली आहे. म्हणून गुणांनुसार त्या त्या वर्णात ते ते कर्म स्वाभाविक

प्रकट होतात आणि दुसरी कर्म गौण होतात. जसे ब्राह्मणात सत्त्वगुणाची प्रधानता असल्याने त्यात शम, दम इत्यादी कर्म (गुण) स्वाभाविक येतात तसेच जीविकेची कर्म गौण होतात आणि दुसऱ्या वर्णांत रजोगुणाची तसेच तमोगुणाची प्रधानता असल्याने त्या वर्णांच्या जीविकेची कर्मही स्वाभाविक कर्मांत सम्मिलित होतात. या दृष्टीने गीतेत ब्राह्मणाच्या स्वभावज कर्मांत जीविकेची कर्म न सांगता शम, दम इत्यादी कर्मच (गुण) सांगितली गेली आहेत.

**परिशिष्ट भाव**—वर्ण-परंपरा योग्य असेल तर हे गुण ब्राह्मणात स्वाभाविक असतात. परंतु वर्णसंकरता आल्यास हे गुण स्वाभाविक नसतात, यात उणीव येते.

पूर्व श्लोकात '**स्वभावप्रभवैर्गुणैः**' म्हटले, म्हणून येथे स्वभावज कर्म सांगतात. स्वभाव बनण्यात पूर्वीचा जन्म मुख्य आहे, मग जन्मानंतर संग मुख्य आहे. संग, स्वाध्याय, अभ्यास इत्यादीमुळे स्वभाव बदलतो.

***संबंध***—*आतां क्षत्रियांची स्वाभाविक कर्म सांगत आहेत.*

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम्।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्॥ ४३॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **शौर्यम्** | = शूरवीरता, | **च** | = तसेच | **ईश्वरभावः** | = शासन करण्याचा भाव (—ही सर्वचे सर्व) |
| **तेजः** | = तेज, | **युद्धे** | = युद्धात | | |
| **धृतिः** | = धैर्य, | **अपि** | = कधी | | |
| **दाक्ष्यम्** | = प्रजासंचलन इत्यादीची विशेष चतुरता | **अपलायनम्** | = पाठ न दाखविणे, | **क्षात्रम्** | = क्षत्रियाची |
| | | **दानम्** | = दान करणे | **स्वभावजम्** | = स्वाभाविक |
| | | **च** | = आणि | **कर्म** | = कर्म आहेत. |

***व्याख्या***—''**शौर्यम्**''—मनात आपल्या धर्माचे पालन करण्याची तत्परता असणे, धर्ममय युद्ध* प्राप्त झाल्यास युद्ध करताना घाव होणे, अंग कापले जाणे, मरण येणे इत्यादीचे किंचितही भय न वाटणे, घाव झालाच तर मनात प्रसन्नता आणि उत्साह राहणे तसेच शिर कापले गेल्यावरही पहिल्या प्रमाणेच शस्त्र चालवीत राहणे, याचे नाव ''शौर्य'' आहे.

**तेजः**—ज्या प्रभावापुढे, शक्तीपुढे पापी-दुराचारी मनुष्यदेखील पाप, दुराचार करण्यास घाबरतात. ज्याच्या-समोर लोकमर्यादेविरुद्ध कोणालाही चालण्याची हिमंत होत नाही अर्थात् लोक स्वाभाविकच मर्यादेत चालतात त्याचे नाव ''तेज'' आहे.

**धृतिः**—अत्यंत विपरीत परिस्थितीतही स्वधर्मापासून विचलित न होणे आणि शत्रूंनी धर्म, नीतीविरुद्ध अनुचित प्रकारे त्रास दिला तरी, धर्म, नीतीविरुद्ध कार्य न करता धैर्य-पूर्वक, त्याच मर्यादेत वागणे ह्यास ''धृति'' म्हणतात.

**दाक्ष्यम्**—प्रजेवर शासन करण्याचे, प्रजेला यथायोग्य व्यवस्थित ठेवण्याचे आणि तिचे संचालन करण्याचे चातुर्य, विशेष योग्यता असणे याला ''दाक्ष्य'' म्हणतात.

**युद्धे चाप्यपलायनम्**—युद्धात कधीच पाठ न दाखवणे, मनात कधी पराजय न स्वीकारणे, युद्ध सोडून न पळणे, हे युद्धात ''अपलायन'' आहे.

**दानम्**—क्षत्रियलोक दान करतात तर देण्यात कधी उणीव राहू देत नाहीत, फार उदारतेने देतात. वर्तमानात दान-पुण्य करण्याचा स्वभाव वैश्यात दिसतो. परंतु वैश्यलोक देण्यात घासाघीस करतात. अर्थात् इतक्याच धनात काम होईल तर बरे, अधिक कशाला द्यायचे?—असा त्यांच्यात द्रव्यलोभ असतो. द्रव्याचा लोभ राहिल्याने धर्मपालनात बाधा येते, उणीव येते, परिणामी सात्त्विक दान (१७।२०) देण्यात कठीणता येते. परंतु क्षत्रियात दानवीरता असते. म्हणून येथे ''दान'' शब्द क्षत्रियांच्या स्वभावामध्ये आला आहे.

**ईश्वरभावश्च**—क्षत्रियात स्वाभाविकच शासन करण्याची प्रवृत्ती असते. लोक जेव्हा नीती, धर्म, मर्यादा याविरुद्ध वागतात तेव्हा ते पाहून त्यांच्या मनात स्वाभाविक ही गोष्ट येते की हे असे का वागतात? असा विचार करून त्यांना, नीती, धर्मानुसार चालविण्याची इच्छा क्षत्रियांना होते. आपल्या शासनद्वारा सर्वांना आपापल्या मर्यादेनुसार चालविण्याचा भाव राहतो. या ईश्वरभावात अभिमान नसतो. कारण क्षत्रिय जातीत नम्रता, सरळता इत्यादी गुण दिसून येतात.

**क्षात्रं कर्म स्वभावजम्**—जो सर्व प्रजेचे दुःखापासून रक्षण करतो त्याचे नाव ''क्षत्रिय'' आहे—''**क्षतात् त्रायते इति क्षत्रियः**''. त्या क्षत्रियाची जी स्वाभाविक कर्म आहेत ती क्षात्रकर्म म्हटली जातात.

* आपला युद्ध करण्याचा विचारही नाही, कोणता स्वार्थही नाही, परंतु परिस्थितीवशात कर्तव्यरूपाने प्राप्त झाले आहे, ते ''धर्ममय युद्ध'' आहे.

**परिशिष्ट भाव**—क्षत्रिय (राजपूत) फार शूरवीर आणि तेजस्वी असतात. परंतु ईर्ष्या-दोष झाल्यमुळे ज्या राजाचे राज्य झाले, त्याने आपल्या अधीन राहणाऱ्या राजपूतांचा उत्साह कमी करण्याचा प्रयत्न केला, त्यांची उन्नती होऊ दिली नाही. त्याचे कारण असे की, त्यांनी प्रबल होऊन राज्य हिसकावून घेऊ नये. अशाप्रकारे ईर्ष्यामुळे आपसात फूट निर्माण झाल्याने तसेच उत्साहात उणीव येण्यानेच विधर्मीलोक भारतावर आपला अधिकार जमविण्यात समर्थ होऊ शकले.

***संबंध**—आता वैश्य आणि शूद्राची स्वाभाविक कर्म सांगतात.*

**कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम्॥ ४४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कृषिगौरक्ष्य-** | = शेती करणे, | | (—ही सर्वची सर्व) | | सेवा करणे |
| **वाणिज्यम्** | गार्यींचे रक्षण | **वैश्यकर्म,** | = वैश्याचे स्वाभाविक | **शूद्रस्य अपि** | = शूद्राचेही |
| | करणे आणि | **स्वभावजम्** | कर्म आहेत (तसेच) | **स्वभावजम्** | = स्वाभाविक |
| | व्यापार करणे | **परिचर्यात्मकम्** | = चारही वर्णांची | **कर्म** | = कर्म आहे. |

*व्याख्या*— **कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्**—शेती करणे, गार्यींचे रक्षण करणे, त्यांची वंश-वृद्धी करणे आणि शुद्ध व्यापार करणे—ही वैश्याची स्वाभाविक कर्म असतात.

शुद्ध व्यापार करण्याचे तात्पर्य—ज्या देशात, ज्या वेळी, ज्या वस्तूची आवश्यकता आहे, लोकांच्या हिताच्या भावनेने त्या वस्तूला (जेथे मिळत असेल तेथून घेऊन) त्याच देशात पोहोचविणे, प्रजेच्या आवश्यक वस्तूंच्या अभावाची पूर्ती कशी होईल, वस्तूंच्या अभावी कोणाला कष्ट होऊ नये—या भावनेने ईमानदारीने वस्तूंचे वितरण करणे, हे आहे.

भगवान् श्रीकृष्ण (नंदबाबाच्या नात्याने) आपल्याला वैश्यच मानतात.* म्हणून त्यांनी स्वत: गार्यीं वासरे वळली, मनु महाराज यांनी वैश्य-वृत्तीमध्ये "**पशूनां रक्षणम्**" (मनु स्मृती १।९०) (पशूंचे रक्षण करणे) म्हटले आहे. परंतु येथे भगवान् (उपर्युक्त पदांनी) आपल्या जाती बंधूना जणू असे म्हणतात की, तुम्ही सर्व पशूंचे पालन, त्यांचे रक्षण करू शकत नसाल तर कमीत कमी गार्यींचे पालन आणि त्यांचे रक्षण अवश्य करावे. गार्यींची वृद्धी करू शकत नसाल तर काही हरकत नाही परंतु त्यांचे रक्षण अवश्य करावे, ज्यामुळे आपले गोधन घटू नये. म्हणून वैश्य समाजाने गार्यींच्या रक्षणात आपले तन,मन,धन लावावे. त्यांचे रक्षण करण्यात आपली शक्ती वाचवू नये.

**गोरक्षासंबंधी विशेष संकेत**

मनुष्यासाठी गाय सर्व दृष्टीने पालनीय आहे. गायीपासून धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष—या चारी पुरुषार्थांची सिद्धी होते. आजच्या अर्थप्रधान युगात तर गाय अत्यंत उपयोगी आहे. गोपालनाने गायीचे दूध, तूप, शेण इत्यादीपासून धन वृद्धी होते. आमचा देश कृषिप्रधान आहे. म्हणून येथे शेतीमध्ये जितकी प्रधानता बैलांची आहे तितकी प्रधानता अन्य कशाचीही नाही. रेड्याद्वाराही शेती केली जाते परंतु शेतीमध्ये बैल जितका काम करू शकतो तितका रेडा करू शकत नाही. रेडा बलवान तर असतो परंतु तो ऊन सहन करू शकत नाही. उन्हात चालला तर जीभ बाहेर काढतो परंतु बैल उन्हातही चालतो. कारण रेड्यात सात्त्विक बल नसते. परंतु बैलात सात्त्विक बल असते. बैलापेक्षा रेडे कमीही असतात. त्याचप्रमाणे उंटाकडूनही शेती केली जाते परंतु उंट रेड्यापेक्षाही कमी असतात आणि फार कीमती असतात. शेती करणारा प्रत्येक मनुष्य उंट खरेदी करू शकत नाही. आजकाल चांगले चांगले बैल मारले जात असल्यामुळे बैल देखील महाग झाले आहेत तरी ते उंटाइतके महाग नाहीत. जर घरी गाय ठेवली तर बैल घरीच उत्पन्न होतात, खरेदी करावे लागत नाही. संकरीत गायीचे जे बैल असतात ते शेतीत कामी येऊ शकत नाहीत कारण त्यांना खांदा नसल्यामुळे त्यांच्यावर जू ठेवले जाऊ शकत नाही.

---

* कृषिवाणिज्यगोरक्षं कुसीदं तुर्यमुच्यते।
वार्ता चतुर्विधा तत्र वयं गोवृत्तयोऽनिशम्॥ (श्रीमद्भा० १०। २४। २१)

वैश्यांची वार्तावृत्ती चार प्रकारची आहे—कृषी, वाणिज्य, गोरक्षा आणि व्याज घेणे. आम्ही लोक त्या चारपैकी केवळ गोपालनच नेहमी करीत आलो आहे.

गाय पवित्र असते. तिच्या शरीराचा स्पर्श करणारा वायू-सुद्धा पवित्र असतो. गायीचे मूत्र आणि शेणसुद्धा पवित्र असते. गायीच्या शेणाने सारवलेल्या घरात प्लेग, कॉलरा इत्यादीसारखे भयंकर आजार येत नाहीत. याशिवाय युद्धाचे वेळी शेणाने सारवलेल्या घरावर बॉम्बचा तेवढा परिणाम होत नाही जेवढा सीमेंटच्या घरावर होतो. शेणात विष शोषून घेण्याची विशेष शक्ती असते. काशीत एक व्यक्ती साप चावून मेली. लोकांनी त्याला दहन करण्यासाठी गंगेच्या काठावर आणले. तेथे एक साधू राहत होते. त्यांनी विचारले की, "या व्यक्तीला काय झाले?" लोकांनी सांगितले की, 'हा साप चावून मेला' साधूने म्हटले की, "हा मेला नाही. तुम्ही गायीचे शेण आणा". शेण आणले गेले. साधूने त्या व्यक्तीचे नाक सोडून त्याच्या पूर्ण शरीराला (खाली वर) शेणाने लिपले. अर्ध्या तासानंतर पुन्हा शेणाचा लेप दिला. त्यामुळे त्या व्यक्तीचा श्वास चालू झाला आणि तो जीवंत झाला. हृदयाच्या आजारांना दूर करण्यासाठी गोमूत्र फार उपयोगाचे आहे. लहान वासराचे (कालवड) गोमूत्र तोळा दोन तोळे रोज घेतले तर पोटातले रोग दूर होतात. एका संताना दमा होता. त्यांना गोमूत्र सेवनाने फार लाभ झाला आहे. आजकाल शेण आणि गोमूत्र ह्यापासून अनेक औषधी बनविली जात आहेत. शेणापासून गॅसही निर्माण होऊ लागला आहे.

शेतात गोमूत्र आणि शेणापासून जे अन्न उत्पन्न होते तेही पवित्र असते. शेतीत गायी राहिल्याने त्यांच्या गोमूत्र आणि शेणाने शेतीची जेवढी पुष्टी होते तेवढी विदेशी रासायनीक खताने होत नाही. एकदा द्राक्षाचा मळा करणाऱ्याने सांगितले की, गायीच्या शेणाचे खत घातल्याने द्राक्षाचे घड जितके मोठे होतात तितके विदेशी खत घातल्याने होत नाहीत. विदेशी खत घातल्याने कांहीवर्षातच जमीनीची पीक उत्पादन शक्ती नष्ट होते. परंतु शेण आणि गोमूत्राने जमीनीची पीक उत्पादन शक्ती जशीची तशी कायम राहते. विदेशात रासायनीक खताने पुष्कळशी जमीन खराब झाली असल्याकारणाने तिला पिकाऊ करण्यासाठी लोक भारतातून शेण खत मागवीत आहेत आणि भारतातून जहाजे भरभरून शेण खत विदेशात जात आहे.

आमच्या देशाच्या गायी सौम्य आणि सात्त्विक असतात. म्हणून त्यांचे दूधही सात्त्विक असते, ते प्याल्याने बुद्धी तीक्ष्ण होते आणि स्वभाव सौम्य आणि शांत होतो. विदेशी गायींना दूध तर अधिक असते परंतु त्या गायींमध्ये क्रोध फार असतो. म्हणून त्यांचे दूध प्याल्याने मनुष्याचा स्वभाव क्रूर होतो. म्हशीचे दूधही अधीक असते परंतु ते दूध सात्त्विक नसते, त्यापासून सात्त्विक बल मिळत नाही. सैनिकांच्या घोड्यांना गायीचे दूध पाजले जाते, ज्यामुळे ते घोडे फार तेज होतात. एकदा सैनिकांनी परीक्षा घेण्यासाठी कांही घोड्यांना म्हशीचे दूध पाजले ज्यामुळे घोडे खूप लठ्ठ झाले परंतु जेव्हा नदी ओलांडण्याची वेळ आली तेव्हा ते नदीच्या पाण्यात म्हशीप्रमाणे बसले. म्हैस पाण्यात बसते म्हणून तोच स्वभाव घोड्यातही आला. उंटीणीचेही दूध निघते पण त्या दुधाचे दही, लोणी होतच नाही. ते दूध तामसी असल्याने दुर्गती देणारे असते. स्मृतीमध्ये उंट, कुत्रा, गाढव इत्यादींना अस्पृश्य म्हटले आहे.

संपूर्ण धार्मिक कार्यात गायीची मुख्यता आहे. जात-कर्म, चूडा कर्म, उपनयन, इत्यादी सोळा संस्कारात गायीचा तिचे दूध, तूप, शेण, इत्यादींचा विशेष संबंध राहतो. गायीच्या तुपानेच यज्ञ केला जातो. स्थान शुद्धीसाठी गायीच्या शेणा-नेच सारविले जाते. श्राद्ध कर्मात गायीच्या दुधाची खीर बनविली जाते. नरकातून वाचण्यासाठी गोदान केले जाते. धार्मिक कृत्यांत "पञ्चगव्य" उपयोगात आणले जाते जे गायीच्या दूध, दही, तूप, शेण आणि मूत्र या पाचापासून बनविलेले असते.

कामनापूर्तीसाठी केल्या जाणाऱ्या यज्ञांत गायीचे तूप उपयोगात आणले जाते. रघुवंश चालू राहण्यात गायीचीच प्रधानता होती. पौष्टिक, वीर्यवर्धक वस्तूतसुद्धा गायीच्या दुधाचे आणि तुपाचे स्थान मुख्य आहे.

निष्कामभावनेने गायीची सेवा करण्याने मुक्ती होते. गायीची सेवा करण्यानेच अंतःकरण निर्मळ होते. भगवान् श्रीकृष्णांनी अनवाणी राहून गायी चारण्याची लीला केली होती, त्यामुळे त्यांचे नाव "गोपाळ" पडले. प्राचीन काळात ऋषी वनात राहून आपल्याजवळ गाय सांभाळीत होते. गायीच्या दूध, तुपाने त्यांची बुद्धी प्रखर, विलक्षण राहत होती. त्यामुळे ते मोठमोठया ग्रंथांची रचना करीत होते. आजकाल तर त्या ग्रंथांना जाणणारेसुद्धा फार कमी झाले आहेत. गायीच्या दूध-तुपाने ते दीर्घायू होत होते. म्हणून गायीच्या तुपाचे एक नाव "आयु" ही आहे. मोठमोठे राजेलोकसुद्धा त्या ऋषींकडे जात होते आणि त्यांच्या सल्ल्याने राज्य चालवीत होते.

गायीचे रक्षण करण्यासाठी बलिदान करणारांच्या कथांनी इतिहास, पुराणे भरलेली आहेत. पण फार दुःखाची गोष्ट अशी आहे की, आज आमच्या देशात पैशाच्या लोभाने

दररोज हजारो गायींची हत्या केली जात आहे. जर अशीच गोहत्या होत राहिली तर एक वेळ अशी येईल की, गोवंश समाप्त होईल. जर गायीच राहिल्या नाहीत तर काय दशा होईल! किती संकटे येतील याचा अंदाज लावला जाऊ शकत नाही. जेव्हा गायी समाप्त होतील तेव्हा गायींच्या अभावी त्यांचे शेणखत मिळणार नाही त्यामुळे जमीन नापीक होईल. जमीन नापीक झाल्यास शेती कशी होईल? शेती न झाल्यास अन्न तसेच वस्त्र (कापूस) कसे मिळेल? शरीरनिर्वाहासाठी लोकांना अन्न-पाणी आणि वस्त्रही मिळणे कठीण होईल. गाय व तिचे दूध, तूप, शेण इत्यादी न मिळाल्यामुळे प्रजा फार दु:खी होईल. गोधनाच्या अभावात देश पराधीन आणि दुर्बल होईल. वर्तमानातही अकाल, अनावृष्टी, भूकंप, आपसातील कलह इत्यादींच्या होण्यात गायींची हत्या मुख्य कारण आहे. म्हणून आपली पूर्ण शक्ती लावून कोणत्याही परिस्थितीत गोरक्षण करणे; त्यांना कत्तलखान्यात जाऊ न देणे हे आमचे परम कर्तव्य आहे.

गायींची सुरक्षा करण्यासाठी सर्व बंधू-भगिनींनी घरी गायी पाळाव्यात त्यांचे पालन करावे. गायीचेच दूध-तूप वापरावे, म्हशीचे वापरू नये. घरी गोबरगॅसचा प्रयोग करावा. गायींच्या रक्षणाच्या उद्देशानेच गोशाळा बनविल्या जाव्या, दुधाच्या उद्देशाने नव्हे. जितके गायरान आहे त्याचे रक्षण करावे. सरकारकडून गायराने सोडवून घ्यावीत. शासनाच्या गोहत्या नीतीचा विरोध करून देशाच्या रक्षणासाठी संपूर्ण देशात गोहत्या तात्काळ बंद करण्याचा अनुरोध करावा.

**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम्**—चारीही वर्णांची सेवा करणे, सेवेची सामुग्री तयार करणे आणि सर्व वर्णांच्या कार्यात कोणतीही बाधा अडचण येऊ नये, सर्वांना सुख आराम मिळावा—या भावनेने आपली बुद्धी, योग्यता, बल यांच्याद्वारा सर्वांची सेवा करणे हे शूद्राचे स्वाभाविक कर्म आहे

येथे एक शंका येते की, भगवंतांनी चारीही वर्णांच्या उत्पत्तीत सत्त्व, रज आणि तम—या तीन गुणांना कारण सांगितले. त्यात तमोगुणाच्या प्रधानतेने शूद्राची उत्पत्ती सांगितली आणि गीतेत जेथे तमोगुणाचे वर्णन झाले आहे तेथे त्याचे अज्ञान, प्रमाद, आळस, निद्रा, अप्रकाश, अप्रवृत्ती आणि मोह—हे सात अवगुण सांगितले आहेत. (१४।८; १३।१७). म्हणून अशा तमोगुणाची प्रधानता असणाऱ्या शूद्राकडून सेवा कशी होईल? कारण तो आळस, प्रमाद इत्यादीत पडून राहील तर सेवा कशी करू शकेल? सेवा फार उच्च दर्जाची गोष्ट आहे. अशा उच्च कर्माचे विधान भगवंतांनी शूद्रासाठी कसे केले?

जर या शंकेवर गुणांच्या दृष्टीने विचार केला गेला तर गीतेत आले आहे की, सत्त्वगुणी उच्च लोकात जातात, रजोगुणी मृत्युलोकात येतात आणि तमोगुणी अधोगतीला जातात. (१४।१८) यातही वास्तविक पाहिले तर, रजोगुण वाढला असता ज्याचा मृत्यू होतो तो कर्मप्रधान मनुष्ययोनीत जन्म घेतो—"**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते**" (१४।१५) या सर्वांचे तात्पर्य हे झाले की, सर्व माणसे रज:प्रधान (रजोगुण प्रधानता असणारे) आहेत. रज:प्रधान असणाऱ्यांत जे सात्त्विक, राजस, तामस—तीन गुण असतात त्या तिन्ही गुणांनीच चारी वर्णांची रचना केली गेली आहे म्हणून कर्म करणे सर्वात मुख्य आहे आणि याच दृष्टीने मनुष्यांना कर्मयोनी म्हटले गेले आहे. तसेच गीतेतही चारीही वर्णांच्या कर्मासाठी "स्वभावज कर्म""स्वभाव नियत कर्म" इत्यादी पदे आली आहेत. म्हणून शूद्राचे परिचर्या अर्थात् सेवा करणे "स्वभावज कर्म" आहे, ज्यात त्याला परिश्रम होत नाहीत.

मनुष्यमात्र कर्मयोनी असूनही ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांच्यात विवेक विचाराचे विशेष तारतम्य राहते आणि शुद्धताही असते. परंतु शूद्रात मोहाची प्रधानता असल्याने त्याच्यात विवेक फार दबलेला असतो. या दृष्टीने शूद्राच्या सेवा कर्मात विवेकाची प्रधानता न राहता आज्ञा पालनाची प्रधानता राहते—"**अग्या सम न सुसाहिब सेवा**" (मानस २।३०१।२) म्हणून चारीही वर्णांची आज्ञेनुसार सेवा करणे, सुख-सुविधा जुळवून देणे शूद्रासाठी स्वाभाविक असते.

शूद्रांची कर्म परिचर्यात्मक अर्थात् सेवास्वरूप असतात. त्यांचे शारीरिक, सामाजिक, नागरिक, ग्रामीण इत्यादी सर्वच्या सर्व कर्म योग्य तऱ्हेने संपन्न होतात. ज्यामुळे चारीही वर्णांच्या जीवननिर्वाहासाठी सुख-सुविधा, अनूकूलता आणि आवश्यकतेची पूर्ती होते.

## स्वाभाविक कर्मांचे तात्पर्य

चेतन जीवात्मा आणि जड प्रकृती—दोन्हींचा स्वभाव भिन्न भिन्न आहे. चेतन स्वाभाविकच निर्विकार अर्थात् परिवर्तनरहित आहे आणि प्रकृती स्वाभाविकच विकारी अर्थात् परिवर्तनशील आहे. म्हणून या दोन्हींचा स्वभाव भिन्न-भिन्न असल्याने यांचा संबंध स्वाभाविक नाही परंतु चेतनाने प्रकृतीशी आपला संबंध मानून त्या संबंधाची सद्भावना करून घेतली आहे अर्थात् "संबंध आहे" असे मानले आहे. यालाच गुणांचा

संग म्हणतात. जो जीवात्म्याच्या चांगल्या वाईट योनीत जन्म घेण्याला कारण आहे—"**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**" (१३।२१). या संगामुळे गुणांच्या तारतम्याने जीवाचा ब्राह्मणादी योनीत जन्म होतो. गुणांच्या तारतम्याने ज्या वर्णात जन्म होतो त्या गुणांनुसारच त्या वर्णाचे कर्म स्वाभाविक, सहज असतात. जसे ब्राह्मणासाठी शम, दम इत्यादी; क्षत्रियासाठी शौर्य, तेज इत्यादी, वैश्यासाठी शेती, गोरक्षण इत्यादी आणि शूद्रासाठी सेवा—ही कर्म स्वत: स्वाभाविक असतात. तात्पर्य हे आहे की, चारीही वर्णांना ही कर्म करण्यात परिश्रम होत नाहीत. कारण गुणांनुसार स्वभाव आणि स्वभावानुसार त्यांच्यासाठी कर्मांचे विधान आहे. म्हणून या कर्मांत त्यांची स्वाभाविक आवड असते. मनुष्य जेव्हा या स्वाभाविक कर्मांना आपल्यासाठी अर्थात् आपला स्वार्थ, भोग आणि आराम ह्यासाठी करतो तेव्हा तो त्या कर्मांनी बांधला जातो. जेव्हा त्याच कर्मांना स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करून निष्कामभावपूर्वक संसाराच्या हितासाठी करतो, तेव्हा "कर्मयोग" होतो आणि त्याच कर्मांनी सर्व संसारात व्यापक असलेल्या परमात्म्याचे पूजन करतो अथवा भगवत्परायण होऊन केवळ भगवत्संबंधी कर्म (जप, ध्यान, सत्संग, स्वाध्याय इत्यादी) करतो तर तो "भक्तियोग" होतो. मग प्रकृतीच्या गुणांचा सर्वथा संबंध-विच्छेद झाल्यास केवळ एक परमात्मतत्त्वच राहते, ज्यात सिद्ध महापुरुषाच्या स्वरूपाची स्वत:सिद्ध स्वतंत्रता, अखंडता, निर्विकारतेची अनुभूती राहते. असे असतानाही त्याचे शरीर, मन, बुद्धी आणि इंद्रियांद्वारा आपापल्या वर्ण, आश्रमाच्या मर्यादेनुसार निर्लिप्ततापूर्वक शास्त्रविहित कर्म स्वाभाविक होतात, जे संपूर्ण संसारासाठी आदर्श होतात. प्रभूकडे आकृष्ट झाल्याने प्रतिक्षण प्रेम वाढत राहते, जे अनंत आनंदस्वरूप आहे.

## जाती जन्माने मानाव्यात की कर्माने?

उच्च नीच योनीत जितकी काही शरीरे मिळतात ती सर्व गुण आणि कर्मानुसारच मिळतात. गुण आणि कर्मानुसारच मनुष्याचा जन्म होतो. म्हणून मनुष्याची जाती जन्मानेच मानली जाते. म्हणून स्थूल शरीराच्या दृष्टीने विवाह, भोजन इत्यादी कर्म जन्माच्या प्रधानतेनेच केली पाहिजेत अर्थात् आपल्या जाती अथवा वर्णानुसारच भोजन, विवाह इत्यादी कर्म व्हावेत.

दुसरी गोष्ट, ज्या प्राण्याचा सांसारिक भोग, धन, मान, आराम, सुख, इत्यादीचा उद्देश असतो त्याच्यासाठी वर्णानुसार कर्तव्यकर्म करणे आणि वर्णाच्या मर्यादेत चालणे आवश्यक होते. जर तो वर्णाच्या मर्यादेत चालला नाही तर त्याचे पतन होते.* परंतु ज्याचा उद्देश केवळ परमात्माच आहे, सांसारिक भोग इत्यादी नाही त्याच्यासाठी सत्संग, स्वाध्याय, जप, ध्यान, कथा, कीर्तन, परस्पर विचार विनिमय इत्यादी भगवत्संबंधी कामे मुख्य असतात. तात्पर्य असे आहे की, परमात्म्याच्या प्राप्तीत प्राण्याचे पारमार्थिक भाव, आचरण इत्यादींची मुख्यता आहे; जाती अथवा वर्णाची नाही.

तीसरी गोष्ट, ज्याचा उद्देश परमात्मप्राप्तीचा आहे तो भगवत्संबंधी कार्यांना मुख्यतेने करीत असताही वर्ण, आश्रमानुसार आपली कर्तव्यकर्मे पूजन बुद्धीने केवळ भगवत्प्रीत्यर्थच करतो.

पुढे सेहेचाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी फारच महत्त्वाची गोष्ट सांगितली आहे की, ज्याच्यापासून संपूर्ण संसाराची उत्पत्ती झाली आहे आणि ज्याने संपूर्ण संसार व्याप्त आहे, त्या परमात्म्याचेच लक्ष्य ठेवून त्याच्या प्रीत्यर्थच पूजन-रूपाने आपापल्या वर्णानुसार कर्म केली जावीत. यात प्रत्येक मनुष्याचा अधिकार आहे. देवता, असुर, पशु-पक्षी इत्यादींचा सहज अधिकार नाही; परंतु त्यांच्यासाठी सुद्धा परमात्म्याकडून निषेध नाही. कारण सर्वच परमात्म्याचे अंश असल्याने परमात्म्याच्या प्राप्तीचे सर्व अधिकारी आहेत. सर्व प्राण्यांचा भगवंतावर पूर्ण अधिकार आहे. यावरुनही हे सिद्ध होते की, आपसातील व्यवहारात अर्थात् रोटी, बेटी व शरीराशी व्यवहार करण्यात "जन्माची" प्रधानता असते आणि परमात्मप्राप्तीत भाव, विवेक आणि "कर्म" यांची प्रधानता असते. याच आशयाने भागवतकारांनी म्हटले आहे की, मनुष्याचा वर्ण दर्शविणारी जी लक्षणे सांगितली गेली आहेत ती जर दुसऱ्या वर्णाच्या व्यक्तीत आढळली तर त्यालाही त्याच वर्णाचा समजला पाहिजे.† अभिप्राय असा आहे की, ब्राह्मणाची शम, दमादी जितकी लक्षणे आहेत ती लक्षणे अथवा गुण स्वाभाविकच कोणात असतील तर केवळ जन्माने नीच असूनही त्याला नीच मानू नये. त्याचप्रमाणे महाभारतात युधिष्ठिर आणि नहुष यांच्या संवादात आले आहे की, जो शूद्र आचरणाने श्रेष्ठ आहे त्या शूद्राला शूद्र मानू नये आणि जो ब्राह्मण ब्राह्मणोचित

* आचारहीनं न पुनन्ति वेदा यदप्यधीता: सह षड्भिरङ्गैः। छन्दांस्येनं मृत्युकाले त्यजन्ति नीडं शकुन्ता इव जातपक्षा:॥ (वसिष्ठ स्मृती)
"शिक्षा, कल्प, निरुक्त, छन्द, व्याकरण आणि ज्योतिष—या सहा अङ्गांसहित अध्ययन केलेले वेद देखील आचारहीन पुरुषाला पवित्र करीत नाहीत. पंख फुटल्यानंतर पक्षी ज्याप्रमाणे आपले घरटे सोडून जातो, त्याचप्रमाणे मृत्युसमयी आचारहीन पुरुषाला वेद सोडून देतात"

† यस्य यल्लक्षणं प्रोक्तं पुंसो वर्णाभिव्यञ्जकम्। यदन्यत्रापि दृश्येत तत् तेनैव विनिर्दिशेत् (श्रीमद्भा० ७।११।३५)

कर्मरहित असेल तर त्या ब्राह्मणाला ब्राह्मण मानू नये.* अर्थात् तेथे कर्माची प्रधानता घेतली गेली आहे, जन्माची नाही.

शास्त्रांत जी अशी वचने येतात त्या सर्वांचे तात्पर्य हे आहे की, कोणताही नीच वर्णाचा साधारणाती साधारण माणूस आपली पारमार्थिक उन्नती करून घेऊ शकतो. यात शंकोच नाही. एवढेच नव्हे, तो त्याच वर्णात राहून शम, दम इत्यादी जे सामान्य धर्म आहेत त्यांचे सांगोपांग पालन करून आपली श्रेष्ठता प्रकट करू शकतो. जन्म तर पूर्व कर्मांनुसार झाला आहे त्यात तो बिचारा काय करू शकतो? परंतु तेथेच (नीच वर्णात) राहूनही तो आपली नवीन उन्नती करू शकतो. त्या नवीन उन्नतीत प्रोत्साहन देण्यासाठीच शास्त्र-वचनांचा आशय असा वाटतो की, नीच वर्णीयानेही नवीन उन्नती करण्यात हिमंत खचू देऊ नये. जो उच्च वर्णीय असूनही वर्णोचित वर्तन करीत नाही त्यालाही आपल्या वर्णोचित काम करण्यास शास्त्रांत प्रोत्साहित केले आहे. जसे—"**ब्राह्मणस्य हि देहोऽयं क्षुद्रकामाय नेष्यते**" (श्रीमद्भा० ११।१७।४२)

ज्या ब्राह्मणांचे खाणे-पिणे, आचरण सर्वथा भ्रष्ट आहे त्या ब्राह्मणांचा केवळ वचनानेही आदर करावयास नको—असे स्मृतीत म्हटले आहे. †परंतु ज्यांचे आचरण श्रेष्ठ आहे, जे भगवद्भक्त आहेत त्या ब्राह्मणांचे भागवत इत्यादी पुराणांत आणि महाभारत, रामायण इत्यादी इतिहास ग्रंथांत फार मोठे माहात्म्य वर्णन केले गेले आहे.

भगवद्भक्त कितीही नीच जातीचा का असेना तो भक्तीहीन विद्वान ब्राह्मणापेक्षा श्रेष्ठ आहे.‡

ब्राह्मणाला विराटरूप भगवंताचे मुख, क्षत्रियाला बाहू, वैश्याला उर (मध्यभाग) आणि शूद्राला पाय असे सांगितले गेले आहे. ब्राह्मणाला मुख सांगण्याचे तात्पर्य असे आहे की, त्याच्याजवळ ज्ञानाचा संग्रह असतो म्हणून चारी वर्णांना शिकविणे, उत्तम शिक्षण देणे आणि उपदेश करणे—हे मुखाचेच काम आहे. या दृष्टीने ब्राह्मण उच्च मानले गेले आहेत.

क्षत्रियांना बाहू सांगण्याचे तात्पर्य असे आहे की, ते चारी वर्णांचे शत्रूपासून रक्षण करतात. रक्षण करणे मुख्यत: बाहूचे काम आहे. जसे शरीरात फोड वगैरे झाला तर हातानेच त्याचे रक्षण केले जाते. शरीरावर कोणी वार केल्यास रक्षणासाठी हातच पुढे होतात आणि स्वत:च्या रक्षणासाठी दुसऱ्यावरही हातानेच वार केला जातो. माणूस जर खाली पडला तर अगोदर हातच टेकवतो. म्हणून क्षत्रिय बाहू झाले. अराजकता माजल्यावर मात्र जन, धन इत्यादीचे रक्षण करणे चारीही वर्णांचा धर्म होतो.

वैश्याला उरू-मध्यभाग म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, ज्यावेळी पोटात अन्न, पाणी, औषध इत्यादी जातात त्यापासून शरीराच्या संपूर्ण अवयवांना खुराक मिळतो आणि सर्व अवयव पुष्ट होतात. त्याचप्रमाणे वस्तूंचा संग्रह करणे, त्यांची आयात-निर्यात करणे, ज्या ठिकाणी ज्या वस्तूची कमी असेल तेथे ती पोहोचविणे, प्रजेला कोणत्याही वस्तूचा अभाव होऊ न देणे हे वैश्याचे काम आहे. पोटात अन्न-पाण्याचा संग्रह सर्व शरीरासाठी होत असतो आणि त्याबरोबर पोटालाही पुष्टी मिळते. कारण मनुष्य केवळ पोटासाठी पोट भरत नाही. त्याचप्रमाणे वैश्यांनी केवळ दुसऱ्यासाठीच संग्रह करावा, केवळ आपल्यासाठी नव्हे. तो ब्राह्मणादिकांना दान देतो, क्षत्रियांना कर देतो, आपले स्वत:चे पालन करतो आणि शूद्रांना मजूरी देतो. अशा प्रकारे तो सर्वांचे पालन करतो. जर त्याने संग्रह केला नाही, शेती, गोरक्षण आणि वाणिज्य केले नाही तर तो काय देईल?

शूद्राला पाय सांगण्याचे तात्पर्य हे आहे की, ज्याप्रमाणे पाय सर्व शरीराचा भार संभाळून शरीराला फिरवितात आणि सर्व शरीराची सेवा पायानेच होते. त्याचप्रमाणे सेवेच्या आधारावरच चारीही वर्ण चालतात. शूद्र आपल्या सेवा कर्माद्वारा सर्वांच्या आवश्यक कार्यांची पूर्ती करतो.

उपर्युक्त विवेचनात एक लक्षात घेण्याची गोष्ट अशी आहे की, गीतेत चारीही वर्णांच्या अशा स्वाभाविक कर्मांचे वर्णन आहे, जे कर्म आपोआप होतात अर्थात्

---

* शूद्रे तु यद् भवेल्लक्ष्म द्विजे तच्च न विद्यते। न वै शूद्रो भवेच्छूद्रो ब्राह्मणो न च ब्राह्मणः॥
यत्रैतल्लक्ष्यते सर्प वृत्तं स ब्राह्मणः स्मृतः। यत्रैतन्न भवेत् सर्प तं शूद्रमिति निर्दिशेत्॥ (महाभारत वनपर्व १८०। २५-२६)

† पाषण्डिनो विकर्मस्थान्बैडालव्रतिकाञ्छठान्। हैतुकान्बकवृत्तींश्च वाङ्मात्रेणापि नार्चयेत्॥ (मनुस्मृति ४। ३०)
'पाखण्डी, विरुद्ध कर्म करणारे, बैडालव्रती, शठ, हेतुवादी, बकवृत्ती ब्राह्मणांचा केवळ वचनाने सुद्धा आदर करू नये.'
न वार्यपि प्रयच्छेतु बैडालव्रतिके द्विजे। न बकव्रतिके विप्रे नावेदविदि धर्मवित्॥ (मनुस्मृति ४। १९२)
'धर्मज्ञ गृहाश्रमी, बैडालव्रती, बकव्रती आणि वेद न जाणणाऱ्या ब्राह्मणाला पाणीसुद्धा देऊ नये.'

‡ (१) अहो बत श्वपचोऽतो गरीयान् यज्जिह्वाग्रे वर्तते नाम तुभ्यम्। तेपुस्तपस्ते जुहुवुः सस्नुरार्या ब्रह्मानूचुर्नाम गृणन्ति ये ते॥ (श्रीमद्भा० ३। ३३। ७)
"अहो! तो चाण्डालही सर्व श्रेष्ठ आहे ज्याच्या जिभेच्या अग्रभागावर आपले नाव विराजते. जे श्रेष्ठ पुरुष आपल्या नावाचे उच्चारण करतात, त्यांनी तप, हवन, तीर्थस्नान, सदाचारपालन आणि वेदाध्ययन सर्व काही केले"
(२) विप्राद् द्विषड्गुणयुतादरविन्दनाभपादारविन्दविमुखाच्छ्वपचं वरिष्ठम्।

ते करण्यात अधिक परिश्रम करावे लागत नाहीत. चारीही वर्णांसाठी आणखीही दुसऱ्या कर्मांचे विधान आहे. ते स्मृती ग्रंथात पहावे आणि त्यानुसार आपले आचरण ठेवावे. (१६।२४)

सध्याच्या काळी चारीही वर्णांत गडबड झाली असली तरी चारीही वर्णांचे समुदाय एकत्र करून वेगवेगळ्या समुदायात पाहिले तर ब्राह्मण समुदायात शम दमादी गुण जितके अधिक आढळतील तितके क्षत्रिय, वैश्य व शूद्र समुदायात दिसून येणार नाहीत. क्षत्रिय समुदायात शौर्य, तेजादी गुण जितके अधिक दिसतील तितके ब्राह्मण, वैश्य आणि शूद्र समुदायात दिसणार नाहीत. वैश्य समुदायात व्यापार, धनोपार्जन, धन पचविणे (धनाचा भपका वरून दिसू न देणे) इत्यादी गुण जितके अधिक दिसतील तितके ब्राह्मण, क्षत्रिय आणि शूद्र समुदायात दिसणार नाहीत आणि शूद्र समुदायात सेवेची प्रवृत्ती जितकी अधिक आढळेल तितकी ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य समुदायात आढळणार नाही. तात्पर्य हे आहे की, आज सर्व वर्ण मर्यादारहित आणि उच्छृंखल झाले असूनही त्यांची स्वभावज कर्म त्यांच्या समुदायात विशेषतेने दिसून येतात अर्थात् ही गोष्ट व्यक्तिगत न दिसता समुदायगत दिसून येते.

जे लोक सखोल शास्त्ररहस्य जाणत नाहीत; ते म्हणतात की, ब्राह्मणाच्या हातात टाक लेखणी होती म्हणून त्यांनी ''ब्राह्मण सर्वांत श्रेष्ठ आहे'' असे लिहून ब्राह्मणांना सर्वोच्च म्हटले आहे. ज्यांचेजवळ राज्य होते ते ब्राह्मणांना म्हणाले ''महाराज! आम्ही कोणीच नाही काय?'' तेव्हा ब्राह्मण म्हणाले ''तसे नाही, आपणही आहात, पण आपण दुसऱ्या क्रमांकाचे आहात''. वैश्य ब्राह्मणाला म्हणाले ''महाराज! आमच्या शिवाय आपली जीविका चालेल कशी?'' ब्राह्मण म्हणाले ''हो, हो, आपण तीसऱ्या क्रमांकाचे आहात''. ज्यांच्याजवळ राज्य नव्हते, धन नव्हते असे (शूद्र) परिस्थितीने वर येऊ लागले तेव्हा ब्राह्मण त्यांना म्हणाले ''आपल्या भाग्यात राज्य आणि धन लिहिलेले नाही. आपण ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांची सेवा करा. म्हणून आपण चौथ्या क्रमाकांचे लोक आहात.'' अशा प्रकारे सर्वांना भ्रमात ठेवून विद्या, राज्य व धन यांच्या जोरावर आपली एकी करून चौथ्या वर्णाला पददलित करून टाकले—असे लिहिणारांचा स्वत:चा स्वार्थ आणि अभिमानच आहे.

याचे समाधान असे आहे की, ब्राह्मणांनी कोठेही आपल्या ब्राह्मण धर्मासाठी असे लिहिले नाही की, ब्राह्मण सर्वात श्रेष्ठ आहे म्हणून त्यांनी खूप आरामात राहिले पाहिजे, धन संपत्तीनी युक्त होऊन मौज करीत राहिले पाहिजे इत्यादी, उलट ब्राह्मणासाठी असे लिहिले आहे की, त्यांनी त्याग केला पाहिजे, कष्ट सहन केले पाहिजेत, तपश्चर्या केली पाहिजे. गृहस्थी धर्मात राहूनही त्यांनी धन संग्रह करता कामा नये, अन्नाचा संग्रहही थोडाच केला पाहिजे. कुंभी धान्य अर्थात् एक घडाभर धान्य असावे, लौकिक भोगात आसक्ती नसली पाहिजे आणि जीवननिर्वाहासाठी कोणाकडून दान जरी घेतले तरी त्याचे काम करून अर्थात् यज्ञ, होम, जप, पाठ इत्यादी करूनच घ्यावे. गोदान जर घेतले तर त्याचे प्रायश्चित केले पाहिजे.

जर कोणी ब्राह्मणाला श्राद्धाचे निमंत्रण देऊ इच्छिल तर त्याने श्राद्धाचे अदले दिवशी द्यावे ज्यामुळे ब्राह्मण त्याच्या पितरांचे आपल्यात आवाहन करून रात्री ब्रह्मचर्य आणि संयमपूर्वक राहू शकेल. दुसऱ्या दिवशी त्याने यजमानाच्या पितरांचे पिंडदान, तर्पण योग्य विधी-विधानाने करवावे. त्यानंतर तेथे भोजन करावे. निमंत्रणसुद्धा एकाच यजमानाचे स्वीकारावे आणि भोजनसुद्धा एकाच घरी करावे. श्राद्धाचे भोजन केल्यावर गायत्री जप इत्यादी करून शुद्ध व्हावे. दान

मन्ये तदर्पितमनोवचनेहितार्थप्राणं पुनाति स कुलं न तु भूरिमान:॥ (श्रीमद्भा० ७।९।१०)

''माझ्या मते बारा गुणांनी युक्त ब्राह्मणसुद्धा जर भगवान् कमलनाभांच्या चरणकमलास विमुख असेल तर, ज्याने आपले मन, वचन, कर्म, धन आणि प्राण भगवंतांना अर्पण केले आहेत, असा चांडालही त्यापेक्षा श्रेष्ठ आहे कारण तो चांडाळ तर आपले सर्व कुल पवित्र करतो, परंतु आपल्या श्रेष्ठतेचा अभिमान असलेला भगवद्‌विमुख ब्राह्मण तर स्वत:लाही पवित्र करू शकत नाही.''

(३) चाण्डालोऽपि मुने: श्रेष्ठो विष्णुभक्तिपरायण:। विष्णुभक्तिविहीनस्तु द्विजोऽपि श्वपचोऽधम:॥ (पद्मपुराण)

''हरिभक्तीत लीन राहणारा चांडाळसुद्धा मुनीपेक्षा श्रेष्ठ आहे आणि हरिभक्तिरहित ब्राह्मण चांडाळापेक्षाही अधम आहे''

(४) अवैष्णवाद् द्विजाद् विप्र चाण्डालो वैष्णवो वर:। सगण: श्वपचो मुक्तो ब्राह्मणो नरकं व्रजेत्॥ (ब्रह्मवैवर्त, ब्रह्म० ११।३९)

अवैष्णव ब्राह्मणापेक्षा वैष्णव चांडाळ श्रेष्ठ आहे, कारण तो वैष्णव चांडाळ आपल्या बन्धुगणासह भव-बंधनातून मुक्त होतो परंतु तो अवैष्णव ब्राह्मण नरकात जातो.

(५) न शूद्रा भगवद्भक्ता विप्रा भागवता: स्मृता:। सर्ववर्णेषु ते शूद्रा ये ह्यभक्ता जनार्दने॥ (महाभारत)

''जर शूद्र भगवद्भक्त असेल तर तो शूद्र नाही तर परमश्रेष्ठ ब्राह्मण आहे. वास्तविक सर्व वर्णामध्ये शूद्र तो आहे, जो भगवद्भक्तिरहित आहे.''

घेणे, श्राद्धाचे भोजन करणे ब्राह्मणासाठी उच्च दर्जा नाही. ब्राह्मणाचा उच्च दर्जा त्यागात आहे. ते केवळ यजमानाच्या पितरांचे कल्याण करण्याच्या भावनेनेच श्राद्धाचे भोजन आणि दक्षिणा स्वीकार करतात, स्वार्थाच्या भावनेने नव्हे. म्हणून हाही त्यांचा त्यागच आहे.

ब्राह्मणांनी आपल्या जीविकेसाठी ऋत, अमृत, मृत, सत्यानृत आणि प्रमृत ह्या पाच वृत्ती सांगितल्या आहेत.*

(१) ऋतवृत्ती सर्वोच्च वृत्ती मानली गेली आहे. हिला शिलोञ्छ अथवा कपोतवृत्तीही म्हणतात. शेतकऱ्याने शेतातील धान्य कापून नेल्यानंतर जमीनीवर जे धान्य (ओंब्या, कणसे) पडलेले राहते ते भूदेवांचे (ब्राह्मणाचे) असते. म्हणून ते धान्य वेचून आणून आपला निर्वाह करणे "शिलोञ्छवृत्ती" आहे अथवा धान्य बाजारात जेथे धान्य मोजले जाते तेथे जमीनीवर पडलेले धान्य भूदेवांचे असते म्हणून ते वेचून आणून जीवननिर्वाह करणे "कपोतवृत्ती" आहे.

(२) याचना न करता व इशारा न करता कोणी यजमानाने आणून दिले तर निर्वाहापुरते घेणे ही "अमृत वृत्ती" आहे. हिलाच "अयाचितवृत्ती" ही म्हणतात.

(३) सकाळी भिक्षेसाठी गावात जाऊन लोकांना वार, तिथी, मुहूर्त वगैरे सांगून (अशा प्रकारे काम करून) भिक्षेत जे मिळेल त्यानेच आपला निर्वाह करणे "मृत-वृत्ती" आहे.

(४) व्यापार करून जीवननिर्वाह करणे "सत्यानृत-वृत्ती" आहे.

(५) उपर्युक्त चारीही वृत्तीने जीवननिर्वाह न झाल्यास शेती करावी पण ती कठोर विधि-विधानाने करावी. जसे एका बैलाने नांगर चालवू नये, उन्हात नांगर धरू नये वगैरे ही "प्रमृतवृत्ती" आहे.

उपर्युक्त वृत्तीपैकी कोणत्याही वृत्तीने निर्वाह केला जावो त्यात पंचमहायज्ञ, अतिथी सेवा करून यज्ञशेषाचे भोजन करावे.†

श्रीमद्भगवद्गीतेवर विचार केला तर ब्राह्मणासाठी पाळावयाचे जे नऊ धर्म सांगितले आहेत. त्यात जीविका उत्पन्न करणारा एकही धर्म नाही. क्षत्रियांना सांगितलेल्या स्वाभाविक सात धर्मांपैकी युद्ध व शासन हे काही प्रमाणात जीविका उत्पन्न करणारे आहेत. वैश्यांना सांगितलेले शेती, गोरक्षण व व्यापार हे तिन्ही धर्म जीविका उत्पन्न करणारे आहेत आणि शूद्राला केवळ सेवा धर्म सांगितला. त्यात तर उत्पन्नच उत्पन्न आहे. शूद्रांना खाणे-पिणे, जीवननिर्वाह यांच्या नियमात बरीच सवलत दिली आहे.

भगवंतांनी **"स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः"** (१८।४५) पदांनी किती विचित्र गोष्ट सांगितली आहे की, शम, दम इत्यादी नऊ धर्माचे पालनाने ब्राह्मणाचे जे कल्याण होते, तेच कल्याण शौर्य, तेज इत्यादी सात धर्मांच्या पालनाने क्षत्रियाचे होते, तेच कल्याण शेती, गोरक्षण आणि व्यापाराच्या पालनाने वैश्याचे होते आणि तेच कल्याण केवळ सेवा केल्याने शूद्राचे होते.

पुढे भगवंतांनी एक विलक्षण गोष्ट सांगितली आहे की, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र आपापल्या वर्णोचित कर्मा-द्वारा त्या परमात्म्याचे पूजन करून परमसिद्धीला प्राप्त होतात— **"स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः"**।(१८।४६) वास्तविक कल्याण वर्णोचित कर्मांनी होत नाही उलट निष्कामभावपूर्वक पूजनानेच होते. शूद्राचे तर स्वाभाविक कर्मच परिचर्यात्मक अर्थात् पूजनरूप आहे म्हणून त्याच्या पूजनाद्वारा पूजन होते अर्थात् त्याच्याद्वारा दुप्पट पूजा होते. म्हणून त्याचे कल्याण जितके लवकर होते तितके लवकर ब्राह्मणाचे होत नाही.

शास्त्रकारांनी उद्धार करण्यात लहानावर जास्त प्रेम दाखविले आहे. कारण लहान हा प्रेमाला पात्र असतो आणि मोठा अधिकाराला पात्र असतो. मोठ्यावर चिंता जबाबदारी अधिक असते परंतु लहानावर कसलाच भार नसतो. शूद्राला भाररहित करून त्याची जीविका सांगितली गेली आहे आणि प्रेमही दिले गेले आहे.

वास्तविक पाहिले तर जो ज्या वर्णाश्रमात जितका उच्च असतो त्याच्यासाठी शास्त्रांनुसार तितकेच नियम कठीण असतात. ते नियम तंतोतंत पाळणे फार कठीण असते. परंतु जो वर्णाश्रमात नीच असतो त्याचे कल्याण सुगमतेने होते.

* ऋतामृताभ्यां जीवेत्तु मृतेन प्रमृतेन वा। सत्यानृताभ्यामपि वा न श्ववृत्त्या कदाचन॥ (मनुस्मृती ४।४)

"ऋत, अमृत, मृत, प्रमृत आणि सत्यानृत—यापैकी कोणत्याही वृत्तीने जीवननिर्वाह करो, परंतु श्वानवृत्ती अर्थात् सेवावृत्तीने कधीही जीवननिर्वाह करू नये"

†ब्राह्मण आणि क्षत्रियासाठी हा निषेध आला आहे की, त्यांनी श्ववृत्ती अर्थात् सेवावृत्ती कधीही करू नये-"न श्ववृत्त्या कदाचन" (मनु० ४।४) "सेवा श्ववृत्तिराख्याता तस्मात्तां परिवर्जयेत्" (मनु० ४।६). वास्तविक सेवावृत्तीचाच निषेध केला गेला आहे, सेवेचा नाही. माता-पित्याप्रमाणे ते अत्यंत निम्न वर्णांची अगदी हलकी समजली जाणारी सेवा करू शकतात. नीच वर्णांची सेवा करण्यात त्यांची महत्ताच आहे. म्हणून वृत्तीचीच निंदा केली गेली आहे. मान, मोठेपणा, उपार्जन इत्यादी स्वार्थासाठी सेवा करण्याची निंदा आहे, स्वार्थाचा त्याग करून सेवा करण्याची निंदा नाही.

या विषयात विष्णुपुराणात एक कथा येते. एकदा पुष्कळ ऋषि-मुनी मिळून श्रेष्ठतेचा निर्णय करण्यासाठी भगवान् वेदव्यासांकडे गेले. व्यासांनी सर्वांचा आदर करून बसविले आणि आपण गंगास्नानाला निघून गेले. गंगेत स्नान करताना त्यांनी म्हटले. "कलियुगा तू धन्य आहेस, स्त्रीयांनो तुम्ही धन्य आहात, शूद्रांनो तुम्ही धन्य आहात !" जेव्हा व्यासजी स्नान आटोपून ऋषींजवळ आले तेव्हा ऋषींनी म्हटले— "महाराज! आपण कलियुग, स्त्रीया आणि शूद्र यांना धन्यवाद का दिलात ?" त्यावेळी ते म्हणाले की, कलियुगात आपल्या धर्माचे पालन केल्याने स्त्रीया आणि शूद्र यांचे कल्याण लवकर आणि सुगमतेने होते.

येथे आणखी एक गोष्ट विचार करण्याची आहे की, जो आपल्या स्वार्थाचे काम करतो तो समाजात आणि संसारात आदराला पात्र नसतो. समाजातच नव्हे तर कुटुंबातील जरी एखादी व्यक्ती स्वार्थी नुसती खाणारी पिणारी आणि काम चुकारू असेल तर त्या व्यक्तीची सर्व निंदा करतात. ब्राह्मणांनी स्वार्थदृष्टीने आपल्याच मुखाने आपली (ब्राह्मणांची) प्रशंसा, श्रेष्ठतेची गोष्ट केलेली नाही. त्यांनी ब्राह्मणासाठी त्यागच सांगितला आहे. सात्त्विक माणसे आपली प्रशंसा करीत नाहीत उलट दुसऱ्यांची प्रशंसा, दुसऱ्यांचा आदर करत असतात. तात्पर्य हे आहे की, ब्राह्मणांनी कधीही आपल्या स्वार्थ आणि अभिमानाची गोष्ट म्हटली नाही. जर ते स्वार्थ आणि अभिमानाची भाषा बोलले असते तर ते इतके आदरणीय झाले नसते. संसारात आणि शास्त्रांत आदराला पात्र झाले नसते. त्यांना जो आदर मिळतो तो त्यागामुळेच मिळतो.

अशा प्रकारे मनुष्याने शास्त्रांचे सखोल अध्ययन करून उपर्युक्त सर्व गोष्टींना समजून घ्यावे आणि ऋषि-मुनींवर, शास्त्रकारांवर खोटा आरोप करू नये.

उच्च-नीच वर्णात प्राण्यांचा जन्म प्रामुख्याने गुण आणि-कर्मानुसार होतो—**"चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः"** (४।१३) परंतु ऋणानुबंधन, शाप, वरदान, संग इत्यादी कोणत्या तरी कारणविशेषाने सुद्धा उच्च-नीच वर्णात जन्म होतो. त्या वर्णात जन्म झाला तरीही ते आपल्या पूर्व स्वभावानुसारच आचरण करतात. हेच कारण आहे की, उच्च वर्णात उत्पन्न होऊनही त्यांचे नीच आचरण दिसून येतात, जसे धुंधुकारी इत्यादी आणि नीच वर्णात उत्पन्न होऊनही ते महापुरुष होतात, जसे विदुर, कबीर, रैदास इत्यादी !

आज ज्या समुदायात जातीगत, कुलपरंपरागत, समाजगत, व व्यक्तिगत जे काही शास्त्र-विपरीत दोष आले आहेत त्यांना आपल्या विवेक, विचार, सत्संग, स्वाध्याय, इत्यादींनी दूर करून आपल्यात स्वच्छता, निर्मळता, पवित्रता, आणली पाहिजे. त्यानेच आपल्या मनुष्यजन्माचे ध्येय सिद्ध होऊ शकेल.

***संबंध**—स्वभावज कर्मांचे वर्णन करण्याचे काय प्रयोजन आहे हे पुढील दोन श्लोकांत सांगत आहेत.*

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु॥४५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **स्वे स्वे** | = आपापली | | (परमात्मा) | **सिद्धिम्** | = सिद्धीला |
| **कर्माणि** | = कर्म करण्यात | **लभते** | = प्राप्त करून घेतो. | **विन्दति** | = प्राप्त होतो, |
| **अभिरतः** | = प्रीतिपूर्वक लागलेला | **स्वकर्मनिरतः** | = आपल्या कर्मात लागलेला मनुष्य | **तत्** | = तो प्रकार (तू माझ्याकडून) |
| **नर** | = मनुष्य | | | | |
| **संसिद्धिम्** | = सम्यक् सिद्धी | **यथा** | = ज्याप्रकारे | **शृणु** | = ऐक. |

***व्याख्या**— **स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः**—*गीतेच्या अध्ययनाने असे आढळून येते की, मनुष्याची जशी स्वतःसिद्ध स्वाभाविक प्रकृती (स्वभाव) असेल, तीत जर त्याने काही नवीन गुंतागुंत निर्माण केली नाही, राग द्वेष केला नाही तर ती प्रकृती (स्वभाव) आपोआपच त्याचे कल्याण करते. तात्पर्य हे आहे की, प्रकृतीद्वारा प्रवाहरूपाने आपोआप होणारी जी स्वाभाविक कर्म आहेत ती स्वार्थ-त्यागपूर्वक प्रीती आणि तत्परतेने आचरण करावीत पण कर्माच्या प्रवाहाशी राग-द्वेष नसावा आणि फलेच्छाही नसावी. रागद्वेष आणि फलेच्छारहित होऊन क्रिया करण्याने "करण्याचा वेग" शांत होतो आणि कर्मात आसक्ती नसल्याने नवीन वेग उत्पन्न होत नाही. त्यामुळे प्रकृतीच्या पदार्थांशी आणि क्रियांशी निर्लिप्तता (असंगता) येते. निर्लिप्तता आल्याने प्रकृतीच्या क्रियांचा प्रवाह स्वाभाविकच चालू राहतो आणि त्यांच्याशी आपला कोणताही संबंध न राहिल्याने साधकाची आपल्या स्वरूपात स्थिती होते, जी प्राणीमात्राची

स्वत: स्वाभाविक असते. आपल्या स्वरूपात स्थिती झाल्यास त्याचे परमात्म्याकडे स्वाभाविक आकर्षण होते. परंतु हे सर्व कर्मात ''अभिरति'' असल्याने होते, आसक्ती असल्याने नव्हे.

कर्मात एक तर ''अभिरति'' असते आणि एक ''आसक्ती'' असते. आपले स्वाभाविक कर्म केवळ दुसऱ्यांच्या हितासाठी तत्परतेने आणि उत्साहपूर्वक करण्याने अर्थात् केवळ परोपकारासाठी कर्म करण्याने मनात जी प्रसन्नता होते त्याचे नाव ''अभिरति'' आहे. फलाच्या इच्छेने काही करणे अर्थात् काही मिळविण्यासाठी कर्म करणे ''आसक्ती'' आहे. कर्मातील अभिरतिने कल्याण होते आणि आसक्तीने बंधन होते.

या प्रकरणात ''**स्वे स्वे कर्मणि**'', ''**स्वकर्मणा तमभ्यर्च्य**'', ''**स्वभावनियतं कर्म**'', ''**सहजं कर्म**'' इत्यादी पदांत ''कर्म'' शब्द एकवचनी आला आहे. याचे तात्पर्य हे आहे की, मनुष्याने प्रीती व तत्परतेने एक कर्म केले काय किंवा अनेक कर्म केली काय, त्याचा उद्देश केवळ परमात्मप्राप्ती असल्यामुळे त्याची कर्तव्यनिष्ठा एकच असते. परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने माणूस जितकी काही कर्म करतो ती सर्व कर्म शेवटी त्याच उद्देशात लीन होतात अर्थात् त्याच उद्देशाची पूर्ती करणारी होतात. जसे गंगा हिमालयातून निघून गंगासागराला जाते तर नद, नद्या, झरे, तलाव, पावसाचे पाणी—हे सर्व तिच्या धारेत मिसळून एकरूप होतात. त्याचप्रमाणे उद्देश असणाऱ्याची सर्व कर्म त्याच्या उद्देशात मिसळून जातात. परंतु ज्यांची कर्मात आसक्ती आहे तो एक कर्म करून अनेक फले इच्छितो अथवा अनेक कर्म करून एक फल इच्छितो, म्हणून त्याचा उद्देश एका परमात्मप्राप्तीचा नसल्याने त्याची कर्तव्यनिष्ठा एक नसते. (२।४१)

**स्वकर्मनिरत: सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु**— आपल्या कर्मात प्रीतीपूर्वक तत्परतेने लागलेला मनुष्य परमात्म्याला जसा प्राप्त होतो, ते ऐक अर्थात् केवळ कर्म परमात्मप्राप्तीचे साधन आहे, ही गोष्ट ऐक आणि ऐकून योग्य रीतीने समजून घे.

## विशेष गोष्ट

मालकाची सुख-सुविधेची सामुग्री जुळविणे, मालकाच्या दैनिक व्यवहारात अनुकूलता उपस्थित करणे इत्यादी कार्य तर वेतन घेणारा नोकरही करू शकतो आणि करतही असतो. परंतु त्यात ''क्रिये'' ची (इतके काम करावयाचे आहे) आणि वेळेची (की इतके घंटे काम करावयाचे आहे) प्रधानता राहते. म्हणून तो काम धंदा ''सेवा'' होऊ शकत नाही. जर मालकाचा तो काम-धंदा आदरपूर्वक, सेव्यबुद्धीने, महत्त्वबुद्धीने केला तर ती ''सेवा'' होते.

सेव्यबुद्धी, महत्त्वबुद्धी मग ती जन्माच्या संबंधाने असो अथवा विद्येच्या संबंधाने असो, अथवा वर्णाश्रमाच्या संबंधाने असो, अथवा योग्यता, अधिकार, सद्गुण, सदाचाराच्या संबंधाने असो, ती ज्यांचे ठिकाणी असेल त्या सेव्याला सुख-आराम कसा मिळेल? सेव्याची प्रसन्नता कशात आहे? सेव्याचा कल कोणीकडे आहे? सेव्याला कशाची आवड आहे? असे भाव झाल्यास जे काही काम केले जाईल, ती ''सेवा'' होते.

सेव्याचे तेच काम पूजाबुद्धी, भगवद्बुद्धी, गुरूबुद्धी इत्यादींनी जर केले आणि पूज्यभावाने गंध लावले, पुष्प वाहिले, हार घातला, आरती केली तर ते काम ''पूजन'' होते. त्यामुळे सेव्याच्या चरणस्पर्शाने किंवा दर्शनानेच चित्त प्रसन्न, अंत:करण गद्गद, शरीर रोमांचित होऊन सेव्याविषयी विशेष भाव प्रकट होतात. त्यामुळे सेव्याच्या सेवेत काहीशी शिथिलता येऊ शकते परंतु भाव वृद्धी झाल्यास अंत:करण शुद्धी, भगवत्प्रेम, भगवद्दर्शन इत्यादी होतात.

मालकाचे वेळेवर काम करण्याने नोकराला पैसे मिळतात आणि सेव्याची सेवा करण्याने सेवकाला अंत:-करणशुद्धीपूर्वक भगवत्प्राप्ती होते. परंतु पूज्यभाव वाढला तर पूजकाला तात्काळ भगवत्प्राप्ती होते. तात्पर्य हे आहे की, चरणसेवा तर नोकरही करतो पण त्याला सेवेचा आनंद मिळत नाही कारण त्याची दृष्टी पैशावर राहते परंतु जो सेवाबुद्धीने चरणसेवा करतो त्याला सेवेत विशेष आनंद मिळतो कारण त्याची दृष्टी सेव्याच्या सुखाकडे असते. पूजेत तर केवळ चरणस्पर्शाने शरीर रोमांचित होते आणि अंत:करणात एक पारमार्थिक आनंद मिळतो. त्याची दृष्टी पूज्याच्या महत्तेवर आणि आपल्या लघुतेवर राहते. तसे जर पाहिले तर, नोकराच्या कामापासून मालकाला आराम मिळतो, सेवेत सेव्याला विशेष आराम तसेच सुख मिळते आणि पूजेत पूजकाच्या भावाने पूज्याला प्रसन्नता वाटते. पूजेत शरीराच्या सुख-आरामाची प्रधानता नसते.

आपल्या स्वभावज कर्माद्वारा पूजा करण्याने पूजकाचा भाव वाढतो त्यावेळी त्याच्या स्थूल, सूक्ष्म आणि कारण शरीराने होणाऱ्या (प्रयत्न, चिंतन, समाधी इत्यादी) सर्व लहान

मोठ्या क्रिया सर्व प्राण्यांत व्यापक परमात्म्याची पूजन-सामुग्री बनते. त्याची दिनचर्या अर्थात् खाणे-पिणे इत्यादी सर्व क्रियासुद्धा पूजनसामुग्री बनतात.

ज्याप्रमाणे ज्ञानयोग्याचा "मी काहीही करत नाही" हा भाव नेहमी कायम राहतो, त्याचप्रमाणे अनेक प्रकारच्या क्रिया करूनही भक्ताच्या अंत:करणात एक भगवद्भाव नित्य कायम राहतो. त्या भावाच्या गाढ अवस्थेत त्याचा अहंभावसुद्धा सुटून जातो.

**परिशिष्ट भाव**—आपल्या वर्णाशिवाय ज्याने जी जी कर्मे स्वीकार केली आहेत, ते सर्वही '**स्वे स्वे कर्मणि**' च्या अंतर्गत घ्यावी. जसे मनुष्य स्वत:ला वकील, नोकर, अध्यापक अथवा चिकित्सक इत्यादी मानत असेल तर त्या कर्तव्याचे प्रेमपूर्वक आदरपूर्वक नि:स्वार्थभावाने योग्य रीतीने पालन करणे हेही त्यांच्यासाठी 'स्वकर्म' आहे.

मनुष्य स्वार्थबुद्धी पक्षपात, कामना इत्यादीच्या अनुषंगाने कर्म करतो तर ती 'आसक्ती' होते. त्याने जर प्रेमपूर्वक, निष्कामभावाने आणि लोकहितासाठी कर्म केले तर ती 'अभिरति' होते. भगवंताने कर्मांत 'आसक्ती' चा निषेध केला आहे—'**न कर्मस्वनुषज्जते**' (गीता ६। ४). मनुष्याने जातीच्या अनुषंगाने आपल्याला उच्चही समजू नये किंवा निकृष्टही समजू नये, तर घड्याळाच्या अवयवासारखे आपल्या ठिकाणी योग्य कर्तव्याचे पालन करावे आणि दुसऱ्याची निंदा, तिरस्कार करू नये तसेच स्वत:चा अभिमानही करू नये, तरच 'अभिरति' होईल.

वास्तविक 'कर्मा'ची प्रधानता नाही, तर 'भावा' ची प्रधानता आहे, कर्त्याचा भाव शुद्ध असेल तर तो कल्याणकारक होईल, मग तो कर्ता कोण्याही वर्णाचा का असेना! 'कर्मा'त वर्णाची मुख्यता आहे आणि 'भावा'त दैवी अथवा आसुरी-संपत्तीची मुख्यता आहे. म्हणून दैवी-आसुरी-संपत्ती कोण्या वर्णाच्या अनुषंगाने नसते, तर सर्वात असू शकते. दैवी-संपत्ती मोक्षदायक आणि आसुरी-संपत्ती बंधनकारक आहे. म्हणून जर ब्राह्मणालाही अभिमान झाला तर तो आसुरी-संपत्ती असणारा होईल अर्थात् त्याचे पतन होईल.

**नीच नीच सब तर गये, राम भजन लवलीन।**
**जाति के अभिमान से डूबे सभी कुलीन॥**

## यत: प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्।
## स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानव:॥ ४६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत:** | = ज्या परमात्म्यापासून | **येन** | = ज्याने | **स्वकर्मणा** | = आपल्या कर्माद्वारा |
| **भूतानाम्** | = संपूर्ण प्राण्यांची | **इदम्** | = हा | **अभ्यर्च्य** | = पूजन करून |
| | | **सर्वम्** | = संपूर्ण संसार | **मानव:** | = मनुष्यमात्र |
| **प्रवृत्ति:** | = प्रवृत्ती (उत्पत्ती) होते (आणि) | **ततम्** | = व्याप्त आहे, | **सिद्धिम्** | = सिद्धीला |
| | | **तम्** | = त्या परमात्म्याचे | **विन्दति** | = प्राप्त होतो. |

***व्याख्या*— यत: प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्**—ज्या परमात्म्यापासून संसार उत्पन्न झाला आहे, ज्याच्याकडून संपूर्ण संसाराचे संचालन होते, जो सर्वांचा उत्पादक, आधार आणि प्रकाशक आहे आणि जो सर्वात परिपूर्ण आहे अर्थात् जो परमात्मा अनंत ब्रह्मांडाच्या उत्पत्तीपूर्वीही होता, जो अनंत ब्रह्मांड लीन झाल्यावरही राहील आणि अनंत ब्रह्मांड असतानाही जो राहतो तसेच जो अनंत ब्रह्मांडांमध्ये व्याप्त आहे, त्याच परमात्म्याचे आपापल्या स्वभावज (वर्णोचित स्वाभाविक) कर्मांद्वारा पूजन करावे.

**स्वकर्मणा तमभ्यर्च्य**—मनुस्मृतीमध्ये ब्राह्मणांसाठी सहा कर्म सांगितली गेली आहेत—स्वत: शिकणे आणि दुसऱ्यांना शिकविणे, स्वयं यज्ञ करणे आणि दुसऱ्याकडून यज्ञ करविणे तसेच स्वत: दान घेणे आणि दुसऱ्यांना दान देणे* (यात शिकविणे, यज्ञ करविणे आणि दान घेणे—ही तीन कर्म जीविकेची आहेत आणि शिकणे, दान करणे आणि यज्ञ करणे—ही तीन कर्तव्यकर्म आहेत) उपर्युक्त शास्त्रनियत सहाकर्म आणि शम दमादि नऊ स्वभावज कर्म तसेच या व्यतिरिक्त खाणे-पिणे, उठणे-बसणे इत्यादी जितकी काही कर्म आहेत, त्या कर्माद्वारा ब्राह्मणाने चारही वर्णात व्याप्त परमात्म्याचे पूजन करावे. तात्पर्य हे आहे की, परमात्म्याच्या

* अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा। दानं प्रतिग्रहं चैव ब्राह्मणानामकल्पयत्॥ (मनु० १। ८८)

आज्ञेने, त्यांच्या प्रसन्नतेसाठीच भगवद्‌बुद्धीने निष्कामभावपूर्वक सर्वांची सेवा करावी.

त्याचप्रमाणे क्षत्रियासाठी पाच कर्म सांगितली गेली आहेत—प्रजेचे रक्षण करणे, दान देणे, यज्ञ करणे, अध्ययन करणे आणि विषयांत आसक्त न होणे.* या पाच कर्मांनी तसेच शौर्य, तेज, इत्यादी सात स्वभावज कर्मांद्वारा आणि खाणे-पिणे इत्यादी सर्वच कर्मांद्वारा क्षत्रियाने सर्वत्र व्यापक परमात्म्याचे पूजन करावे.

वैश्याने यज्ञ करणे, अध्ययन करणे, दान देणे आणि व्याज घेणे तसेच कृषी, गोरक्षण आणि व्यापार†—या शास्त्र नियत आणि स्वभावज कर्मांद्वारा आणि शूद्राने शास्त्रविहित तसेच स्वभावज कर्म सेवा द्वारा‡ सर्वत्र व्यापक परमात्म्याचे पूजन करावे अर्थात् आपल्या शास्त्रविहित, स्वभावज आणि खाणे-पिणे, झोपणे-जागणे इत्यादी सर्वच कर्मांद्वारा भगवंताच्या आज्ञेने, भगवंताच्या प्रसन्नतेसाठी भगवद्‌बुद्धीने निष्कामभावपूर्वक सर्वांची सेवा करावी.

शास्त्रांत मनुष्यासाठी आपल्या वर्णाश्रमानुसार जी जी कर्तव्यकर्म सांगितली गेली आहेत ती सर्व संसाररूप परमात्म्याच्या पूजेसाठीच आहेत. जर साधकाने आपल्या कर्मांद्वारा भावाने त्या परमात्म्याचे पूजन केले, तर त्याच्या सर्व क्रिया परमात्म्याची पूजा होतात. जसे पितामह भीष्माचार्यांनी (अर्जुनाशी युद्ध करताना) अर्जुनाचे सारथी बनलेल्या भगवंताची आपल्या युद्धरूप कर्मांद्वारा (बाणांनी) पूजा केली. भीष्माचार्यांच्या बाणाने भगवंताचे कवच तुटले ज्यामुळे भगवंताच्या शरीरात घाव झाले आणि हाताच्या बोटांना लहान लहान बाण लागल्याने बोटांनी लगाम धरणे कठीण झाले. अशी पूजा करून अंतसमयी शरशय्येवर पडलेले पितामह भीष्माचार्य आपल्या बाणद्वारा पूजित भगवंताचे ध्यान करतात—"युद्धांत माझ्या तीक्ष्ण बाणांनी ज्यांचे कवच तुटले आहे, ज्यांची त्वचा विच्छिन्न झाली आहे, परिश्रमामुळे त्यांच्या मुखावर स्वेदकण शोभा देत आहेत, घोड्यांच्या टापाने उडालेली धूळ ज्यांच्या सुंदर केश संभारात लागली आहे. अशा प्रकारे बाणांनी अलंकृत झालेल्या भगवान् कृष्णाच्या ठिकाणी माझी मन-बुद्धी लागावी".$

लौकिक आणि पारमार्थिक कर्मांद्वारा त्या परमात्म्याचे पूजन तर केले पाहिजे परंतु त्या कर्मांत आणि त्यांच्या करण्याच्या करण-उपकरणांत ममता ठेवता कामा नये. कारण ज्या वस्तूं, क्रियां इत्यादीत ममता होते त्या सर्व वस्तू अपवित्र झाल्याने पूजा सामुग्री 卐 राहत नाही (अपवित्र फल, फूल इत्यादी भगवंतांना अर्पण होत नाहीत)। म्हणून "माझ्या जवळ जे काही आहे, ते सर्व त्या सर्वव्यापक परमात्म्याचेच आहे, मला तर केवळ निमित्त बनून त्यांनी दिलेल्या शक्तीने त्यांचे पूजन करावयाचे आहे" या भावनेने जे काही केले जाईल ते सर्वच भगवंताचे पूजन होते. या विपरीत, मनुष्य त्यापैकी जेवढ्या क्रियां, वस्तूं इत्यादींना आपल्या मानतो तेवढ्या त्या (आपल्या मानलेल्या) क्रियां, वस्तूं (अपवित्र झाल्याने) परमात्मपूजनापासून वंचित राहतात.

**सिद्धिं विन्दति मानवः**—सिद्धी प्राप्त होण्याचे तात्पर्य हे आहे की, आपल्या कर्मांनी परमात्म्याचे पूजन करणारा मनुष्य प्रकृतीच्या संबंधाने रहित होऊन आपोआप आपल्या स्वरूपात स्थित होतो. स्वरूपात स्थित झाल्याने पूर्वी जे परमात्म्याला समर्पण केले होते, त्या संस्कारामुळे त्याचे प्रभूच्या ठिकाणी अनन्यप्रेम जागृत होते. मग त्याला काहीही मिळवावयाचे शिल्लक राहत नाही.

येथे "**मानवः**" पदाचे तात्पर्य, केवळ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यास—या वर्ण आणि आश्रम इत्यादीशीच नव्हे उलट हिंदू, मुसलमान, ईसाई, बौद्ध, पारसी, यहूदी इत्यादी सर्वच जाती आणि सांप्रदायाशी आहे. कोणत्याही जाती, सांप्रदाय इत्यादींची कोणतीही व्यक्ती का असेना; सर्वच परमात्म-पूजनाचे अधिकारी आहेत. कारण सर्वच परमात्म्याचे आपले आहेत. जसे कुटुंबात निरनिराळ्या स्वभावाची बालके असतात परंतु त्या सर्वांची आई एकच असते आणि त्या बालकांच्या वेगवेगळ्या जेवढया क्रिया होतात, त्या सर्व क्रियांनी आई प्रसन्न होते कारण त्या सर्व बालकांमध्ये आईची आत्मीयता असते. म्हणून भगवंतांना सम्मुख झालेल्या मनुष्यांच्या सर्व क्रियांना भगवान् आपली पूजा मानतात आणि प्रसन्न होतात.

* प्रजानां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च। विषयेष्वप्रसक्तिश्च क्षत्रियस्य समासतः॥ (मनु० १। ८९)

† पशूनां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च। वणिक्पथं कुसीदं च वैश्यस्य कृषिमेव च॥ (मनु० १। ९०)

‡ एकमेव तु शूद्रस्य प्रभुः कर्म समादिशत्। एतेषामेव वर्णानां शुश्रूषामनसूयया॥ (मनु० १। ९१)

$ युधि तुरगरजोविधूम्रविष्वक्कचलुलितश्रमवार्यलङ्कृतास्ये। मम निशितशरैर्विभिद्यमानत्वचि विलसत्कवचेऽस्तु कृष्ण आत्मा॥ (श्रीमद्भा० १। ९। ३४)

卐 "ममता मल जरि जाइ" (मानस ७। ११७ क)

याच अध्यायाच्या सत्तराव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले आहे की, कोणीही मनुष्य आम्हा दोघांच्या संवादाचे अध्ययन करील तर त्याच्याद्वारा मी ज्ञानयज्ञाने पूजित होईल. यावरून हे सिद्ध होते की, कोणी गीतेचा पाठ करो, अध्ययन करो, तर त्याला भगवान् आपली पूजा मानतात. त्याचप्रमाणे जो उत्पत्ति-विनाशशील वस्तूंशी विमुख होऊन भगवंताना सम्मुख होतो, त्याच्या क्रियांना भगवान् आपले पूजन मानतात.

## विशेष गोष्ट

कर्मयोगात कर्मांद्वारा जडतेशी असंगता होते आणि भक्तियोगात संसाराशी असंगतापूर्वक परमात्म्याविषयी पूज्य-भाव असल्याने परमात्म्याची सम्मुखता राहते.

कर्मयोगी तर आपल्याजवळ असलेले शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी जो काही संसाराचा जड अंश आहे, त्याला स्वार्थ, अभिमान, कामना यांचा त्याग करून, संसाराच्या सेवेत लावतो. त्यामुळे आपल्या मानलेल्या वस्तूंचा आपलेपणा सुटून त्यांच्याशी सर्वथा संबंध-विच्छेद होतो आणि जी स्वतः स्वाभाविक असंगता आहे ती प्रगट होते.

भक्त आपली वर्णोचित स्वाभाविक कर्म आणि वेळोवेळी केली गलेली पारमार्थिक कर्म (जप, ध्यान इत्यादी) याद्वारा संपूर्ण संसारात व्याप्त असलेल्या परमात्म्याचे पूजन करतो.

या दोन्हीत भावाची भिन्नता असल्याने इतकाच फरक होतो की, कर्मयोग्याच्या संपूर्ण क्रियांचा प्रवाह सर्वांना सुख पोहोचविण्याकडे लागतो, त्यामुळे क्रियां करण्याचा वेग समाप्त होऊन स्व मध्ये असंगता येते आणि भक्ताच्या सर्व क्रिया परमात्म्याची पूजनसामुग्री बनल्याने जडतेशी विमुखता होऊन भगवंताशी सम्मुखता येते आणि प्रेमात वाढ होते.

भक्त तर पूर्वीपासूनच भगवंताना सम्मुख होऊन स्वतः आपणाला भगवंतांना समर्पित करून टाकतो. स्वचे अनन्यतापूर्वक भगवंतांना समर्पित झाल्याने खाणे-पिणे काम, धंदा, इत्यादी लौकिक आणि जप, ध्यान, सत्संग, स्वाध्याय इत्यादी पारमार्थिक क्रियांही भगवंतांना अर्पण होतात. त्याच्या लौकिक-पारमार्थिक क्रियांत केवळ बाहेरुन भेद दिसतो परंतु वास्तविक कोणताही भेद राहत नाही.

कर्मयोगी आणि ज्ञानयोगी—हे दोन्ही शेवटी एक होतात. जसे कर्मयोगी कर्मांद्वारा जडतेचा त्याग करतो अर्थात् सेवाद्वारा त्याच्या सर्व क्रियां संसाराला अर्पण होतात आणि स्वतः असंग होतो आणि ज्ञानयोगी विवेकद्वारा जडतेचा त्याग करतो. अर्थात् विवेकद्वारा त्याच्या सर्व क्रियां प्रकृतीला अर्पण होतात आणि स्वतः असंग होतो. तात्पर्य हे आहे की, दोन्हींच्या अर्पण करण्याच्या पद्धतीत फरक आहे परंतु असंगतेत दोन्ही एक होतात*. या असंगतेत कर्मयोगी आणि ज्ञानयोगी—दोन्ही स्वतंत्र होतात. त्यांना कर्माचे बंधन लेशमात्रही राहत नाही. केवळ कर्तव्यपालनासाठीच कर्तव्यकर्म केल्याने कर्मयोग्याची संपूर्ण कर्म लीन होतात (४।२३) आणि ज्ञानरूपी अग्नीने ज्ञानयोग्याची संपूर्ण कर्म भस्म होतात (४।३७). परंतु जेव्हा या स्वतंत्रतेतही ज्याला संतोष होत नाही अर्थात् स्वतंत्रतेपासून ज्याला उपरती होते, तेव्हा त्याच्यात भगवत्कृपेने प्रेम प्रकट होऊ शकते.

**परिशिष्ट भाव**—येथे '**यतः प्रवृत्तिर्भूतानाम्**' पदांत आलेल्या '**प्रवृत्तिः**' पदाचा अर्थ 'उत्पत्ती' घ्यावा. कारण परमात्म्यापासून संपूर्ण प्राण्यांची उत्पत्ती तर होते, परंतु क्रिया होत नाही. क्रिया रजोगुणाने होते—'**लोभः प्रवृत्तिरारम्भः०**' (गीता १४।१२). पंधराव्या अध्यायाच्या चवथ्या श्लोकातही 'प्रवृत्ति' पद 'उत्पत्ति' अर्थात् आला आहे—'**यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी**'.

हा संसार भगवंताचा प्रथम अवतार आहे—'**आद्योवतारः पुरुषः परस्य**' (श्रीमद्भा० २।६।४१). म्हणून हा संसार भगवंताचीच मूर्ती आहे, श्रीविग्रह आहे. जसे आपण मूर्तीत भगवंताचे पूजन करतो, फूल वाहतो, चंदन लावतो, तर आपला भाव मूर्तीत नसून भगवंतात असतो अर्थात् आपण मूर्तीची पूजा न करता भगवंताची पूजा करतो. तसेच आपण आपल्या प्रत्येक क्रियेने संसाररूपी भगवंताचे पूजन करावे. श्रोत्याने ऐकून वक्त्याचे पूजन करावे. वक्त्याने ऐकवून श्रोत्याचे पूजन करावे—अशाप्रकारे सर्वांनी आपापल्या कर्मांद्वारा एक दुसऱ्याचे पूजन करावे. दृष्टीमात्र भगवंताकडेच असावी. ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादी वर्णाकडे नसावी. भगवान् श्रीरामांना ऋषी-मुनी प्रणाम करतात तर भगवंताच्या भावाने प्रणाम करतात,

* तसे पाहिले तर संसाराशी असंग होणे कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—या तिन्ही योगांच्या साधकांसाठी आवश्यक आहे. गीतेत ''सङ्गं त्यक्त्वा'' (५।११) पदांनी कर्मयोग्याला, ''मुक्तसङ्गः'' (१८।२६) पदाने ज्ञानयोग्याला आणि ''सङ्गवर्जितः'' (११।५५) पदाने भक्तीयोग्याला संगरहित होण्यासाठी सांगितले गेले आहे.

क्षत्रियाच्या भावाने नव्हे. पूजनात मुख्य गोष्टही आहे—सर्व काही भगवंताचे आणि भगवंतासाठीच आहे. जसे गंगाजलाने गंगेचे पूजन केले जाते, तसेच भगवंताच्या वस्तूने भगवंताचे पूजन करावे. वास्तविक संपूर्ण क्रिया भगवंताचेच पूजन आहे, आपण केवळ आपली चूक नाहीशी करायची आहे. भगवंताचीच वस्तू भगवंताला अर्पण करण्याने आपली स्वार्थबुद्धी, भोगबुद्धी, फलेच्छा समाप्त होईल तसेच आपल्यात सामर्थ्यसुद्धा भगवंताचेच मानल्याने कर्तृत्वही समाप्त होईल आणि भगवत्प्राप्तीचा अनुभव होईल.

वास्तविक भगवद्भावाने संसाराचे पूजन मूर्तिपूजेपेक्षाही विशेष मूल्यवान् आहे. कारण मूर्तीचे पूजन करण्याने मूर्ती प्रसन्न झालेली दिसत नाही, परंतु प्राण्यांची सेवा करण्याने ते प्रत्यक्ष प्रसन्न (सुखी) झालेले दिसतात.

जर व्यक्तींना भगवंताचे स्वरूप मानून कर्मांनी आणि पदार्थांनी त्यांची सेवा केली जाईल तर संसार लुप्त होईल आणि केवळ एक भगवान्च राहतील अर्थात् 'सर्व काही भगवान्च आहे'—याचा अनुभव येईल. जसे दोरीवर भासलेल्या सापाचा भ्रम नाहीसा झाल्यावर साप तर लुप्त होतो, परंतु दोरी तर राहतेच. तसेच भगवंतात जगताचा भ्रम नाहीसा झाल्यावर जगत् जगत्‌रूपाने लुप्त होते आणि भगवद्‌रूपाने राहते. कारण जगताची तर मान्यता आहे, परंतु 'भगवान् आहेत' ही वास्तविकता आहे. श्रीमद्भागवतात भगवान् म्हणतात—

**नरेष्वभीक्ष्णं मद्भावं पुंसो भावयतोऽचिरात्।**
**स्पर्धासूयातिरस्काराः साहङ्कारा वियन्ति हि॥** (श्रीमद्भा० ११ । २९ । १५)

'जेव्हा भक्ताचा संपूर्ण स्त्री-पुरुषांत निरंतर माझाच भाव होतो आणि त्यात तो मलाच पाहतो*, तेव्हा शीघ्रच त्याच्या चित्तातून ईर्ष्या, दोषदृष्टी, तिरस्कार इत्यादी दोष अहंकारसहित समाप्त होतात.'

गीतेत भगवंताने म्हटले आहे—'**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः**' (१० । २०) 'संपूर्ण प्राण्यांच्या अंतःकरणात स्थित असलेला आत्माही मीच आहे'. म्हणून भगवद्भावाने एखाद्या प्राण्याची सेवा, आदर-सत्कार कराल तर ती भगवंताचीच सेवा होईल. जर एखाद्या प्राण्याचा अनादर-तिरस्कार कराल तर तो भगवंताचाच अनादर-तिरस्कार होईल—'**कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः**' (१७ । ६).

जसे ज्ञानमार्गात गुणच गुणांत वर्तत आहेत ('**गुणा गुणेषु वर्तन्ते**'), तसेच भक्तिमार्गात भगवंताच्या वस्तूंनी भगवंताचेच पूजन होत आहे. परंतु दोन्हीत फार फरक आहे. '**गुणा गुणेषु वर्तन्ते**' यात जडतेची मुख्यता आहे, ज्याचा ज्ञानमार्गी त्याग करतो. परंतु '**स्वकर्मणा तमभ्यर्च्य**' यात चिन्मयतेची मुख्यता आहे, ज्याचे ग्रहण भक्तिमार्गी करतो. म्हणून भक्तिमार्गात जडता समाप्त होते, संसार संसाररूपाने लुप्त होतो आणि भगवत्स्वरूपाने प्रगट होतो. कारण वास्तविक भगवान्च आहेत. साधकाने जगताला जर जगतरूपाने पाहिले तर त्याची 'सेवा' करावी आणि भगवद्‌रूपाने पाहिले तर त्याचे 'पूजन' करावे. आपल्यासाठी काहीही करू नये. केवळ आपल्यासाठी कर्म करणे बन्धन आहे, संसारासाठी करणे सेवा आहे आणि भगवंतासाठी करणे पूजन आहे.

***संबंध***—*स्वभावज (सहज) कर्मांना निष्कामभावपूर्वक आणि पूजाबुद्धीने करत असताना जरी त्यात काही उणीव राहिली तरीही त्याविषयी साधकाने हताश होऊ नये. हे पुढील दोन श्लोकांत सांगत आहेत.*

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥ ४७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **स्वनुष्ठितात्** | = उत्तम तऱ्हेने अनुष्ठान केलेल्या | **स्वधर्मः** | = आपला धर्म | **कर्म** | = स्वधर्मरूपी कर्म |
| **परधर्मात्** | = परधर्मापेक्षा | **श्रेयान्** | = श्रेष्ठ आहे. (कारण) | **कुर्वन्** | = केली असता (मनुष्य) |
| **विगुणः** | = गुणरहित (असा) | **स्वभावनियतम्** | = स्वभावाने नियत केलेली | **किल्बिषम्** | = पापाला |
| | | | | **न, आप्नोति** | = प्राप्त होत नाही. |

* स्त्री-पुरुषांत भगवंताला पाहण्यासाठी यासाठी सांगितले आहे की, आपण फार करून स्त्री-पुरुषांतच गुण-दोष पाहतो, ज्यामुळे त्यांच्यात भगवद्भाव होत नाही. म्हणून स्त्री-पुरुषांत गुण-दोष न पाहता केवळ भगवंताना पाहिल्याने संपूर्ण प्राणी आणि पदार्थ यांच्यात सुगमतेने भगवद्भाव होईल.

*व्याख्या*—**श्रेयान्स्वधर्मोविगुण: परधर्मात्स्वनुष्ठितात्**— येथे ''**स्वधर्म**'' शब्दाने वर्ण धर्मच मुख्यत्वाने घेतला गेला आहे.

परमात्मप्राप्तीचे ध्येय असलेला मनुष्य ''स्व'' ला अर्थात् आपणाला जे मानतो त्याचा धर्म (कर्तव्य) ''स्वधर्म'' आहे. जसे कोणी आपणाला मनुष्य मानतो तर मनुष्यतेचे पालन करणे त्याच्यासाठी स्वधर्म आहे. त्याचप्रमाणे कर्मानुसार आपणाला कोणी विद्यार्थी अथवा अध्यापक मानतो तर शिकणे अथवा शिकविणे त्याचा स्वधर्म होईल. कोणी आपणाला साधक मानतो तर साधन करणे त्याचा स्वधर्म होईल. कोणी आपणाला भक्त, जिज्ञासू आणि सेवक मानतो तर भक्ती, जिज्ञासा आणि सेवा हा त्याचा स्वधर्म होइल. अशा प्रकारे ज्याची ज्या कार्यात नियुक्ती झाली आहे आणि ज्याने ज्या कार्याचा स्वीकार केला आहे, त्याच्यासाठी ते कार्य सांगोपांग करणे स्वधर्म आहे.

त्याचप्रमाणे मनुष्य जन्म आणि कर्मानुसार आपणाला ज्या वर्ण आणि आश्रमाचा मानतो त्याच्यासाठी त्याच वर्ण आणि आश्रमाचा धर्म स्वधर्म होईल. ब्राह्मणवर्णात उत्पन्न झालेला आपणाला ब्राह्मण मानतो तर यज्ञ करविणे, दान घेणे, शिकविणे इत्यादी जीविकासंबंधी कर्म त्याच्यासाठी स्वधर्म आहेत. क्षत्रियासाठी युद्ध करणे, ईश्वरभाव इत्यादी, वैश्यासाठी शेती, गोरक्षण, व्यापार इत्यादी आणि शूद्रासाठी सेवा—हे जीविकासंबंधी कर्म स्वधर्म आहेत. असा आपला स्वधर्म जर दुसऱ्या धर्मापेक्षा गुणरहित असेल अर्थात् आपल्या स्वधर्मात गुणांची उणीव असेल, त्याचे अनुष्ठान करण्यात उणीव राहत असेल तसेच त्याचे अनुष्ठान करण्यास कठीण असेल आणि या उलट दुसऱ्यांचा धर्म गुणांनी परिपूर्ण असेल, धर्माचे अनुष्ठान सांगोपांग असेल आणि करण्यास फार सोपे असेल तरीही आपल्या स्वधर्माचे पालन करणेच सर्वश्रेष्ठ आहे.

ज्या वर्णासाठी शास्त्राने ज्या कर्मांचे विधान केले आहे त्या वर्णासाठी ती कर्म ''स्वधर्म'' आहेत आणि त्याच कर्मांचा ज्या वर्णासाठी निषेध केला आहे त्या वर्णासाठी ती कर्म ''परधर्म'' आहेत. जसे यज्ञ करविणे, दान घेणे इत्यादी कर्म ब्राह्मणासाठी शास्त्राची आज्ञा असल्याने स्वधर्म आहेत परंतु तेच कर्म क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्यासाठी शास्त्राचा निषेध असल्याने परधर्म आहेत. परंतु आपत्काली शास्त्रांनी जीविकासंबंधी ज्या कर्मांचा निषेध केला नाही ती कर्म सर्वच वर्णांसाठी स्वधर्म होतात. जसे आपत्तीचे वेळी वैश्याचे शेती, व्यापार इत्यादी जीविकासंबंधी कर्म ब्राह्मणासाठीही स्वधर्म होतात.*

ब्राह्मणाची शम, दम, इत्यादी जितकी काही स्वभावज कर्म आहेत, ती सामान्य धर्म असल्यामुळे चारही वर्णासाठी स्वधर्म आहेत. कारण त्यांचे सर्वांनी पालन करावे अशी शास्त्राची आज्ञा आहे. त्यांचा कोणासाठीही निषेध नाही.

मनुष्यशरीर केवळ परमात्मप्राप्तीसाठीच मिळालेले आहे. या दृष्टीने प्रत्येक मनुष्य साधक आहे. म्हणून दैवी-संपत्तीचे जितके काही सद्गुण सदाचार आहेत ते सर्वांचे आपले असल्याने सर्व माणसांसाठी स्वधर्म आहेत. परंतु आसुरी-संपत्तीचे जितके काही दुर्गुण दुराचार आहेत ते प्रत्येक मनुष्यासाठी स्वधर्मही नाहीत आणि परधर्मही नाहीत. ते तर सर्वांसाठी निषिद्ध आहेत, त्याज्य आहेत, कारण ते अधर्म आहेत. दैवी-संपत्तीच्या गुणांना धारण करण्यात आणि आसुरी-संपत्तीच्या पाप कर्मांचा त्याग करण्यात सर्वच स्वतंत्र आहेत, सर्वच सबल आहेत, सर्वच अधिकारी आहेत, कोणीही परतंत्र, निर्बल तसेच अनधिकारी नाही. मात्र ही गोष्ट वेगळी आहे की, कोणता सद्गुण एखाद्याच्या स्वभावाला अनुकूल पडतो आणि कोणता सद्गुण दुसऱ्याच्या स्वभावाला अनुकूल होतो. जसे एखाद्याच्या स्वभावामध्ये दया मुख्य असते आणि एखाद्याच्या स्वभावामध्ये उपेक्षा मुख्य असते, एखाद्याचा स्वभाव सहज क्षमाशील असतो आणि कोणाचा स्वभाव मागितल्यावर क्षमा करण्याचा असतो. कोणाच्या स्वभावामध्ये उदारता स्वाभाविक असते आणि कोणाच्या स्वभावात उदारता विचारपूर्वक असते इत्यादी, असा भेद राहू शकतो.

**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्**— शास्त्रांत विहित आणि निषिद्ध—दोन प्रकारची वचने येतात. त्यात विहित कर्म करण्याची आज्ञा असते आणि निषिद्ध कर्म करण्याचा निषेध असतो. त्या विहित कर्मातही शास्त्रांनी ज्या वर्ण, आश्रम, देश, काळ, घटना, परिस्थिती, वस्तू, संयोग, वियोग, इत्यादींना अनुसरून वेगवेगळी जी कर्म नियुक्त केली

* आपत्तीच्या वेळी ब्राह्मण क्षात्रवृत्तीने निर्वाह करू शकतो आणि अधिक आपत्ती, (संकट) आल्यास वैश्यवृत्तीसुद्धा करू शकतो परंतु वैश्य वृत्तीत फरक हा राहील की, ब्राह्मण शेती करेल तर सकाळी आणि सायंकाळी थंड वेळेसच त्याने नांगरटीचे काम करावे आणि दोन बैलांचाच नांगर धरावा, एक बैलाचा नाही. तसेच व्यापार केला तर रसाचा-कसाचा विक्रय करू नये अर्थात् साखर, तूप, तेल मीठ इत्यादींचा व्यापार करू नये. त्याचप्रमाणे क्षत्रिय आपत्तीच्या वेळी वैश्य वृत्ती—गोरक्षण, कृषी आणि व्यापार करू शकतो आणि वैश्य शूद्रवृत्तीही करू शकतो.

आहेत त्या वर्ण, आश्रम, इत्यादीसाठी ती ''नियतकर्म'' म्हटली जातात.

सत्त्व, रज आणि तम—या तिन्ही गुणांनुसार जो स्वभाव बनतो, त्या स्वभावानुसार जी कर्म नियत केली जातात ती ''स्वभावनियत कर्म'' म्हटली जातात. त्यांनाच स्वभावप्रभव, स्वभावज, स्वधर्म, स्वकर्म आणि सहज कर्म म्हटले आहे.

तात्पर्य हे आहे की ज्या वर्ण, जातीत जन्म घेण्यापूर्वी या जीवाचे जसे गुण आणि कर्म राहिले असतील, त्याच गुण आणि कर्मांनुसार त्या वर्णात त्याचा जन्म झाला आहे. कर्म तर केल्यानंतर समाप्त होतात परंतु गुणरूपाने त्याचे संस्कार राहतात. जन्म झाल्यावर त्या गुणांनुसारच त्याच्यात गुण आणि पालनीय आचरण स्वाभाविकच उत्पन्न होतात अर्थात् त्यांना कोठून आणावेही लागत नाही आणि त्यांच्यासाठी काही परिश्रमही करावे लागत नाही. म्हणून त्यांना स्वभावज आणि स्वभावनियत म्हटले आहे.

जरी ''**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः**'' (१८।४८) नुसार प्रत्येक कर्मात दोष येतच असतो तरीपण स्वभावानुसार शास्त्राने ज्या वर्णासाठी ज्या कर्मांची आज्ञा केली आहे, ते कर्म आपल्या स्वार्थाचा आणि अभिमानाचा त्याग करून केवळ दुसऱ्यांच्या हिताच्या दृष्टीने केले गेले तर त्या वर्णाच्या व्यक्तीला त्या कर्मांचा दोष (पाप) लागत नाही. त्याचप्रमाणे जो केवळ शरीरनिर्वाहासाठी कर्म करतो त्यालाही पाप लागत नाही—''**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्**'' (४।२१).

## विशेष गोष्ट

येथे एक फार मोठी शंका उत्पन्न होते की, एक माणूस कसायाच्या घरी जन्माला येतो तर त्याच्यासाठी कसायाचे कर्म सहज (जन्माबरोबर उत्पन्न झालेले) आहे, स्वाभाविक आहे. स्वभावनियत कर्म करत असता मनुष्य पापाला प्राप्त होत नाही तर काय कसायाच्या कर्माचा त्याग करू नये? जर त्याने कसायाच्या कर्माचा त्याग केला नाही तर मग निषिद्ध आचरण कसे सुटेल? कल्याण कसे होईल?

याचे समाधान असे आहे की, स्वभावनियत कर्म ते असते जे विहित आहे, कोणत्याही रीतीने निषिद्ध नसेल अर्थात् त्यापासून कोणाचेही अहित होत नसावे. जी कर्म कोणासाठीही अहितकारक असतात ती सहज कर्मात घेतली जात नाहीत. ती कर्म आसक्ती, कामनेमुळे उत्पन्न होतात. निषिद्ध कर्म मग या जन्मात झाले असो की मागील जन्मात झाले असो ते दोषयुक्तच आहे. दोष-भाग त्याज्य असतो कारण दोष आसुरी-संपत्ती आहे आणि गुण दैवी-संपत्ती आहे. पूर्व जन्माच्या संस्कारानेसुद्धा दुर्गुण-दुराचारात गोडी होऊ शकते परंतु ती गोडी दुर्गुण-दुराचार करण्यास बाध्य करीत नाही. विवेक, सद्विचार, सत्संग, शास्त्र इत्यादीद्वारा त्या गोडीला मिटविले जाऊ शकते.

युक्तीनेही पाहिले तर कोणताही प्राणी आपले अहित इच्छित नाही. आपली हत्या होणे इच्छित नाही. म्हणून कोणाचे अहित करण्याचा, हत्या करण्याचा अधिकार कोणालाही नाही. मनुष्य आपल्यासाठी चांगल्या कामाची इच्छा करतो तर त्याने दुसऱ्यांसाठीही चांगले काम केले पाहिजे. शास्त्रांतही असेच दिसून येते की, ज्यात दोष असतात, पाप असते, अन्याय असतो, ती कर्म ''वैकृत'' आहेत ''प्राकृत'' नव्हेत अर्थात् ती विकाराने उत्पन्न झाली आहेत, स्वभावाने नाहीत. तीसऱ्या अध्यायात अर्जुनाने विचारले होते की, मनुष्य इच्छित नसतानाही कोणाच्या प्रेरणेने पाप कर्म करतो? त्यावेळी भगवंतांनी म्हटले की, कामनेला वश होऊनच मनुष्य पापकर्म करतो (३।३६-३७) कामना, क्रोध, स्वार्थ आणि अभिमान यांना बळीपडून जी कर्म केली जातात ती शुद्ध नसतात, अशुद्ध असतात.

परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने जी कर्म केली जातात, त्या कर्मांत भिन्नता तर राहते पण ते दोषी नसतात. ब्राह्मणाचे घरी जन्म झाला तर ब्राह्मणोचित कर्म होतील, शूद्राच्या घरी जन्म झाला तर शूद्रोचित कर्म होतील परंतु दोषीभाग कोणातही राहणार नाही. दोषीभाग सहज नाही. स्वभावनियत नाही. दोषयुक्त कर्म स्वाभाविक होऊ शकतात, परंतु स्वभावनियत होऊ शकत नाहीत. एखाद्या ब्राह्मणाला परमात्मतत्त्वाची प्राप्ती झाली तर तो प्राप्ती झाल्यानंतरही तो त्याच पवित्रतेने भोजन करील, ज्या पवित्रतेने ब्राह्मणाने राहिले पाहिजे त्याच पवित्रतेने तो राहील. त्याचप्रमाणे एखाद्या अंत्यजाला परमात्मप्राप्ती झाली तर तो उष्टेही खाऊन टाकील, जसे पूर्वी राहत होता, तसाच राहील, परंतु ब्राह्मण असे करणार नाही कारण पवित्रतेने भोजन करणे त्याचे स्वभावनियत कर्म आहे. परंतु अंत्यजासाठी उष्टे खाणे दोष सांगितला गेला नाही. म्हणून शुद्ध महापुरुषात एकापेक्षा एक विचित्र कर्म होतात परंतु ते दोषी नसतात. त्यांचा स्वभाव राग-द्वेषरहित असल्याकारणाने शुद्ध असतो.

पूर्वीच्या एखाद्या पापकर्मामुळे कसायाच्या घरी जन्म

झाला तर तो जन्म पापाचे फल भोगण्यासाठी झाला आहे. पाप करण्यासाठी नव्हे. पापाचे फल जाती, आयू, आणि भोग सांगितले गेले आहे, नवीन कर्म सांगितले गेले नाही. "**सति मूले तद्विपाको जात्यायुर्भोगाः**" (योगदर्शन २।१३) कर्म करण्यात तो स्वतंत्र आहे. जर त्याचे चित्त शुद्ध झाले तर तो कसाई इत्यादीचे काम करू शकणार नाही. एका संताशी एकाने म्हटले की, जर कोणी आपला धर्म पशूंना मारणेच मानतो तर त्याने काय करावे ? तर त्या संताने दृढतेने सांगितले की, "जर त्याने आपल्या धर्मानुसार-च सतत तीन वर्षे भगवंताच्या नामाचा किंवा आपल्या इष्ट देवतेच्या नामाचा जप केला तर मग तो मारू शकणार नाही". कारण त्याचा पूर्वजन्माचा अथवा येथे जो स्वभाव पडलेला आहे तो दोषी आहे. जर अगदी अंत:करणातून एका परमात्मतत्त्वाचीच प्राप्ती इच्छिल तर तो कसायाचे काम करू शकणार नाही. त्यापासून त्याला आपोआप ग्लानी येईल. उपरती होईल. कोणी सांगितल्या ऐकल्यावाचून त्याच्यात सद्‌गुण स्वाभाविक येतील.

रामचरितमानसमध्ये शबरीच्या प्रसंगात श्रीभगवान् रामांनी शबरीला म्हटले "**नवधा भगति कहउँ तोहि पाहीं। सावधान सुनु धरु मन माहीं**"॥ (३।३५।४) नंतर नऊ प्रकारची भक्ती सांगून शेवटी भगवंतांनी म्हटले "**सकल प्रकार भगति दृढ तोरें**" (३।३६।४) तात्पर्य असे आहे की, भक्ती नऊ प्रकारची असते ही गोष्ट शबरीला माहीतच नाही परंतु शबरीत सर्व प्रकारची भक्ती स्वाभाविकच होती. सत्संग, भजन, ध्यान इत्यादी करण्याने ज्या गुणांचे आपल्याला ज्ञान नाही ते गुणही येतात. जे केवळ दुसऱ्यांना सांगण्यासाठी पाठ करतात, ते दुसऱ्यांना तर सांगतील परंतु आचरणांत ते गुण तेव्हाच येतील, जेव्हा ते स्वत:चा स्वभाव शुद्ध करून परमात्म्याकडे वाटचाल करतील. म्हणून मनुष्याने आपले कर्म आणि आपला स्वभाव शुद्ध, निर्मळ बनविला पाहिजे. यात कोणीही परतंत्र नाही, निर्बल नाही, अयोग्य नाही, अपात्र नाही. मनुष्याच्या मनात असे येते की, मी कर्तव्याचे पालन करण्यात आणि सद्‌गुण संपादन करण्यात असमर्थ आहे परंतु वास्तविक तो असमर्थ नाही. सांसारिक भोगांची सवय आणि पदार्थांच्या संग्रहाची आवड असल्याने-च असमर्थतेचा अनुभव येतो.

भगवंतांनी हे मनुष्यशरीर उद्धार करून घेण्याला योग्य असे समजूनच दिले आहे. म्हणून आपल्या स्वभावात सुधारणा करून आपला उद्धार करण्यात प्रत्येक मनुष्य स्वतंत्र आहे, सबल आहे, योग्य आहे, समर्थ आहे. स्वभावाचा सुधार करणे असंभव तर नाहीच, कठीणही नाही. मनुष्याला मुक्तीचे द्वार म्हटले गेले आहे "**साधन धाम मोच्छ कर द्वारा**" (मानस ७।४३।४) जर स्वभाव सुधारणे अशक्य असते तर याला मुक्तीचे द्वार कसे म्हटले जाऊ शकते ? जर मनुष्य आपला स्वभाव सुधारू शकणार नाही तर मग मनुष्य जीवनाची सार्थकता कुठे राहिली ?

**परिशिष्ट भाव**—स्वधर्मरूपी कर्म करण्याने पाप तर होऊ शकते पण लागू शकत नाही—'**कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्**'. पाप लागण्यात मुख्य कारण भाव आहे, क्रिया नव्हे. म्हणून पाप कर्मांनी लागत नाही तर स्वार्थ आणि अभिमान आल्याने लागते.

# सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत्।
# सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुंतीनंदन! | **न, त्यजेत्** | = त्याग करू नये. | | दोषयुक्त असतो) |
| **सदोषम् अपि** | = दोषयुक्त असले तरीही | **हि** | = कारण | **इव** | = तसे (कोणत्या ना कोणत्या) |
| | | **सर्वारम्भाः** | = संपूर्ण कर्म | | |
| **सहजम्** | = सहज | **धूमेन** | = धुराने | **दोषेण** | = दोषाने |
| **कर्म** | = कर्माचा | **अग्निः** | = अग्नी (जसा | **आवृताः** | = युक्त असतात. |

***व्याख्या***— [पूर्व श्लोकात असे म्हटले गेले की, स्वभावानुसार शास्त्रांनी जी कर्म नीयत केली आहेत ती कर्म करण्याने मनुष्य पापाला प्राप्त होत नाही. यावरुन सिद्ध होते की, स्वभावनियत कर्मांमध्येही पाप क्रिया होत असते. जर पाप क्रिया नसती तर "पापाला प्राप्त होत नाही" असे म्हणता आले नसते. म्हणून येथे भगवान् म्हणतात की, "जी सहज कर्म आहेत त्यात एखादा दोष जरी आला तरीही त्याचा त्याग करू नये कारण सर्वच कर्म, अग्नी जसा धुराने आवृत्त असतो तशी दोषाने आवृत्त असतात.]

**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत्**—स्वभाव-

नियत कर्म ही सहज कर्म म्हटली जातात. जसे ब्राह्मणाचे शम, दम इत्यादी, क्षत्रियाचे शौर्य, तेज इत्यादी, वैश्याचे शेती, गोरक्षण इत्यादी आणि शूद्राचे सेवा कर्म—ही सर्व सहज कर्म आहेत. जन्मानंतर शास्त्रांनी पूर्वीच्या गुण-कर्मांनुसार ज्या वर्णासाठी ज्या कर्मांची आज्ञा दिली आहे ती शास्त्रनियत कर्मसुद्धा सहज कर्म म्हटली जातात. जसे ब्राह्मणासाठी यज्ञ करणे आणि करविणे, शिकणे आणि शिकविणे इत्यादी, क्षत्रियासाठी यज्ञ करणे, दान करणे इत्यादी, वैश्यासाठी यज्ञ करणे इत्यादी आणि शूद्रासाठी सेवा.

सहज-कर्मात हे दोष आहेत—

(१) परमात्मा आणि परमात्म्याचा अंश—हे दोन्हीही "स्व" आहेत. तसेच प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीर इत्यादी—हे दोन्हीही "पर" आहेत. परंतु परमात्म्याचा अंश स्वत: प्रकृतीला वश होऊन परतंत्र होतो अर्थात् केवळ क्रिया प्रकृतीत होते आणि हा त्या क्रियेला आपल्यात मानतो. म्हणून तो परतंत्र होतो. असे प्रकृतीमुळे परतंत्र होणे हाच महान् दोष आहे.

(२) प्रत्येक कर्मात काही ना काही अनुषंगिक, अनिवार्य हिंसा इत्यादी दोष होतातच.

(३) कोणतेही कर्म केले, ते कर्म एखाद्याला अनुकूल आणि एखाद्याला प्रतिकूल होतच असते. एखाद्याला प्रतिकूल होणे सुद्धा दोष आहे.

(४) प्रमाद इत्यादी दोषामुळे कर्म करण्यात उणीव राहणे अथवा करण्याच्या विधीत चूक होणे हा देखील दोष आहे.

आपल्या सहज कर्मात दोष असले तरीही ते सोडू नये. याचे तात्पर्य असे आहे की, जसे ब्राह्मणाची कर्म जितकी सौम्य आहेत तितकी ब्राह्मणेतर वर्णांची कर्म सौम्य नाहीत. परंतु सौम्य नसली तरीही ती कर्म दोषी मानली जात नाहीत अर्थात् ब्राह्मणांच्या सहज कर्मांपेक्षा क्षत्रिय, वैश्य इत्यादीच्या सहज कर्मांत गुणांची कमी असली तरीही त्या उणीवेचा दोष लागत नाही आणि अनिवार्य हिंसा इत्यादीही लागत नाही. उलट त्यांचे पालन करण्याने लाभ होतो. कारण ती कर्म त्यांच्या स्वभावानुकूल असल्याने करण्यास सोपी आहेत आणि शास्त्रविहित आहेत.

ब्राह्मणासाठी भिक्षा सांगितली गेली आहे. सकृदर्शनी भिक्षा निर्दोष दिसते. परंतु त्यातही दोष येतात. जसे एखाद्या गृहस्थीच्या दारापुढे भिक्षुक उभा आहे आणि त्याच वेळी दुसरा भिक्षुक तेथे येतो तेव्हा गृहस्थीला भार वाटतो. भिक्षुकामध्ये परस्पर ईर्ष्या उत्पन्न होण्याची शक्यता राहते. गृहस्थीकडे देण्याइतकी सामुग्री नसेल तर त्यालाही दु:ख होते. जो गृहस्थी भिक्षा देऊ इच्छित नाही त्याच्याकडे भिक्षुक गेला तर त्या गृहस्थीला फार कष्ट वाटतात. जर त्याने भिक्षा दिली तर खर्च होतो आणि दिली नाही तर भिक्षुक निराश होऊन निघून जातो. यामुळे त्या गृहस्थीला पाप लागते आणि बिचारा त्यात फसला जातो. अशा प्रकारे जरी भिक्षेतही दोष होत असले तरीपण ब्राह्मणाने त्याचा त्याग करू नये.

क्षत्रियाला न्याययुक्त युद्ध प्राप्त झाले तर ते करण्याने क्षत्रियाला पाप लागत नाही. जरी युद्धरूप कर्मात दोष आहेत, कारण त्यात माणसांना ठार करावे लागते तरीही क्षत्रियासाठी सहज आणि शास्त्रविहित कर्म असल्याने दोष लागत नाही. त्याचप्रमाणे वैश्यासाठी शेती करणे सांगितले आहे. शेती करण्यात अनेक जंतूंची हिंसा होते. परंतु वैश्यासाठी सहज आणि शास्त्रविहित असल्याने हिंसेचा तितका दोष लागत नाही. म्हणून सहज कर्मांचा त्याग करू नये.

सहज कर्म करण्यात दोष (पाप) लागत नाही ही गोष्ट योग्य आहे परंतु या साधारण सहज कर्मांपासून मुक्ती कशी होईल? वास्तविक मुक्ती होण्यात सहज कर्म बाधक नाहीत. कामना, आसक्ती, स्वार्थ, अभिमान इत्यादीनेच बंधन होते आणि पापही या कामना इत्यादीमुळेच होते. म्हणून मनुष्याने निष्कामभावनेने भगवत्प्रीत्यर्थ सहज कर्म केली पाहिजेत, तेव्हाच बंधन सुटेल.

**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः**—जेवढी म्हणून कर्म आहेत ती सर्वची सर्व सदोषच आहेत. जसे सुरवातीला अग्नी पेटविला तर आरंभी धूर होतोच. कर्म करण्यात देश, काळ, घटना, परिस्थिती इत्यादीची परतंत्रता आणि दुसऱ्यांची प्रतिकूलतासुद्धा दोष आहे. परंतु स्वभावानुसार शास्त्रांनी आज्ञा दिली आहे. त्या आज्ञेनुसार निष्कामभावपूर्वक कर्म करण्याने मनुष्य पापाचा भागीदार होत नाही. यामुळेच भगवान् जणू अर्जुनाला हे म्हणत आहेत की, हे सखा! तू जी युद्धरूपी क्रिया घोर कर्म समजत आहेस, तो तुझा धर्म आहे. कारण न्यायाने प्राप्त झालेले युद्ध करणे क्षत्रियांचा धर्म आहे, याशिवाय क्षत्रियासाठी दुसरे कोणतेच श्रेयाचे साधन नाही. (२।३१)

**परिशिष्ट भाव**—निषिद्ध कर्मात आसक्ती झाल्याने अथवा निषिद्ध रीतीने भोग भोगण्यामुळेच विहित कर्म कठीण वाटतात. वास्तविक विहित कर्म सहज स्वाभाविक आहेत, यात परिश्रम नाहीत.

एकेचाळीसाव्या श्लोकापासून येथपर्यंत 'स्वकर्म', 'स्वधर्म' आणि 'सहज कर्म' शब्दांचा प्रयोग झाला आहे. यावरुन

सिद्ध होते की, गीता स्वकर्म आणि सहज कर्मालाच 'स्वधर्म' मानते.

विहित कर्म करण्यात दोष तर होतोच, परंतु कामना, सुखबुद्धी, भोगबुद्धी न राहिल्यास दोष लागत नाही. तात्पर्य हे आहे की, दोष लागणे अथवा न लागणे कर्त्याच्या नियतीवर निर्भर आहे. जसे डॉक्टराची नीयत ठीक असेल, पैशाचा उद्देश नसून सेवेचा उद्देश असेल तर ऑपरेशन यात रोग्याचे अंग कापले तरीही त्याला दोष लागत नाही, तर नि:स्वार्थभाव आणि हिताची दृष्टी असल्याने पुण्य होते.

*संबंध—आता भगवान् सांख्ययोगाचे प्रकरण आरंभ करताना प्रथम सांख्ययोगाच्या अधिकाऱ्याचे वर्णन करतात.*

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति॥ ४९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सर्वत्र,** | = ज्याची बुद्धी | | वश करून | **सन्यासेन** | = सांख्ययोगाद्वारा |
| **असक्तबुद्धिः** | सर्व ठिकाणी | | घेतले आहे, | **परमाम्** | = सर्वश्रेष्ठ |
| | आसक्तिरहित आहे. | **विगतस्पृहः** | = जो स्पृहारहित | **नैष्कर्म्यसिद्धिम्** | = नैष्कर्म्य सिद्धीला |
| **जितात्मा** | = ज्याने शरीर | | आहे (तो मनुष्य) | **अधिगच्छति** | = प्राप्त होतो. |

*व्याख्या*— संन्यास (सांख्य) योगाचा अधिकारी झाल्यानेच सिद्धी होते. म्हणून त्याचा अधिकारी कसा असावा—हे सांगण्यासाठी श्लोकाच्या पूर्वार्धात तीन गोष्टी सांगितल्या आहेत.

**( १ ) असक्तबुद्धिः सर्वत्र**—ज्याची बुद्धी सर्व ठिकाणी आसक्तिरहित आहे अर्थात् देश, काळ, घटना, परिस्थिती, वस्तू, व्यक्ती, क्रिया, पदार्थ इत्यादी कशातच ज्याची बुद्धी लिप्त होत नाही.

**( २ ) जितात्मा**—ज्याने शरीरावर अधिकार मिळविला आहे अर्थात् जो आळस, प्रमाद, इत्यादीने शरीराच्या वशीभूत होत नाही उलट त्याला आपल्या वश ठेवतो. तात्पर्य हे आहे की, तो जेव्हा एखादे कार्य आपल्या सिद्धांतानुसार करू इच्छितो तेव्हा त्याचे शरीर त्या कार्यात तत्परतेने लागते आणि एखाद्या क्रिया, घटना इत्यादीपासून तो हटू इच्छितो तेव्हा तेथून ते हटते. अशा प्रकारे ज्याने शरीरावर विजय मिळविला आहे तो "जितात्मा" म्हटला जातो.

**( ३ ) विगतस्पृहः**—जीवन धारणेसाठी ज्यांची विशेष आवश्यकता असते, त्या वस्तूंच्या सूक्ष्म इच्छेचे नाव "स्पृहा" आहे. जसे भाजी पाला, ओली-सुकी भाकरी मिळाली पाहिजे. काही ना काही खाल्ल्याशिवाय आम्ही कसे जगू शकणार? पाण्याशिवाय आम्ही कसे राहू शकतो? हिवाळ्यात ज्यावेळी कडाक्याची थंडी पडते त्यावेळी वस्त्र नसल्यास आम्ही कसे जगू शकणार? सांख्ययोगाचा साधक या जीवननिर्वाहसंबंधीच्या आवश्यकतांचीसुद्धा परवा करीत नाही.

तात्पर्य हे आहे की, सांख्ययोगाचा मार्ग अवलंब करणाऱ्याला जडतेचा त्याग करावा लागतो. त्या जडतेचा त्याग करण्यात उपर्युक्त तीन गोष्टी आल्या आहेत. असक्तबुद्धी असल्याने तो जितात्मा होतो आणि जितात्मा झाल्याने तो विगतस्पृह होतो, तेव्हा तो सांख्ययोगाचा अधिकारी होतो.

**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति**—असा असक्तबुद्धी, जितात्मा आणि विगतस्पृह पुरुष सांख्ययोगाद्वारा परम नैष्कर्म्यसिद्धीला अर्थात् नैष्कर्म्यरूपी परमात्मतत्त्वाला प्राप्त होतो. कारण संपूर्ण क्रिया प्रकृतीत होतात आणि जेव्हा "स्व" चा त्या क्रियेशी लेशमात्रही संबंध राहत नाही, तेव्हा कोणतीही क्रिया आणि त्याचे फल त्याच्यावर किंचिन्मात्रही लागू होत नाही. म्हणून त्याच्यात जी स्वाभाविक स्वत:सिद्ध नैष्कर्म्यता, निर्लिप्तता आहे ती प्रकट होते.

**परिशिष्ट भाव**—नैष्कर्म्य सिद्धीचा अर्थ आहे—कर्म संपूर्णपणे अकर्म व्हावे, कर्मांशी मुळीच संबंध राहू नये, कर्म होत असूनही लिप्तता नसावी—'**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः**' (गीता ४। १८). कर्म न करणे नैष्कर्म्य (निष्कर्मता) नव्हे (गीता—तीसऱ्या अध्यायाचा चौथा श्लोक), तर कर्म करणे तर साधकासाठी आवश्यक आहे (गीता—सहाव्या अध्यायाच तीसरा श्लोक).

'**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतः स्पृहः**'—ही कर्मयोगाची सिद्धी आहे (गीता—दुसऱ्या अध्यायाचा एकाहत्तरावा श्लोक), जी झाल्यावर कर्मयोगी सांख्ययोगात जातो (गीता—पाचव्या अध्यायाचा सहावा श्लोक) आणि सांख्ययोगाने नैष्कर्म्य सिद्धी प्राप्त करतो. अशाप्रकारे कर्मयोगाने तर 'नैष्कर्म्यसिद्धी' होते—'**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते**'

(गीता ३।४), परंतु भक्तियोगाने 'परम नैष्कर्म्यसिद्धि' होते. कर्मयोग आणि ज्ञानयोग तर 'निष्ठा' आहे—'**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा**' (३।३), परंतु कर्मयोग-ज्ञानयोगाची 'परानिष्ठा' भक्तीनेच होईल—'**निष्ठा ज्ञानस्य या परा**' (१८।५०). तात्पर्य असे आहे की, 'परमनैष्कर्म्यसिद्धि' आणि 'परानिष्ठा'—दोन्ही भक्तीने होतात.

***संबंध****—आता त्या परमसिद्धीला प्राप्त करण्याची विधी सांगण्याची प्रतिज्ञा करीत आहेत.*

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे।**
**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा॥५०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कौन्तेय! | **या** | = जी | **आप्नोति** | = प्राप्त होतो, |
| **सिद्धिम्** | = सिद्धीला (अंतः-करण शुद्धीला) | **ज्ञानस्य** | = ज्ञानाची | **तथा** | = तो प्रकार (तू) |
| | | **परा** | = परा- | **मे** | = माझ्याकडून |
| **प्राप्तः** | = प्राप्त झालेला साधक | **निष्ठा** | = निष्ठा आहे, | **समासेन एव** | = थोडक्यातच |
| **ब्रह्म** | = ब्रह्माला | **यथा** | = ज्याप्रकारे (तिला) | **निबोध** | = समजून घे. |

*व्याख्या*— **सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे**—येथे "सिद्धि" चा अर्थ अंतःकरण शुद्धी असा आहे. ज्याचे वर्णन पूर्व श्लोकात आलेल्या "**असक्तबुद्धिः**", "**जितात्मा**" आणि "**विगतस्पृहः**" पदांनी झाले आहे. ज्याचे अंतःकरण इतके शुद्ध झाले आहे की, त्यात किंचिन्मात्रही कोणत्याही प्रकारची कामना, ममता आणि आसक्ती राहिलेली नसते, त्याला कधीही थोडीसुद्धा वस्तू, व्यक्ती, परिस्थिती इत्यादीची आवश्यकता राहत नाही अर्थात् त्याला काहीही प्राप्त करावयाचे शिल्लक राहिलेले नसते. म्हणून त्याला सिद्धी म्हटले आहे.

लोकामध्ये तर असे म्हटले जाते की, मनोवांच्छित वस्तू मिळाली, अणिमादी सिद्धी मिळाल्या म्हणजे सिद्धी झाली. परंतु वास्तविक ही सिद्धी नाही, कारण यात पराधीनता होते. एखाद्या वस्तूची उणीव राहते आणि एखाद्या वस्तू, परिस्थिती इत्यादींची जरूर पडते. म्हणून ज्या सिद्धीत किंचिन्मात्रही कामना उत्पन्न होत नाही तीच वास्तविक सिद्धी आहे. जी सिद्धी प्राप्त झाल्यावर कामना वाढत असेल तर ती सिद्धी वास्तविक सिद्धी नाही उलट एक बंधनच आहे.

अंतःकरणाच्या शुद्धीरूपी सिद्धीला प्राप्त झालेला साधकच ब्रह्माला प्राप्त होतो. तो ज्या क्रमाने ब्रह्माला प्राप्त होतो, ते माझ्याकडून समजून घे—"**निबोध मे**". कारण सांख्ययोगातील जी सारभूत अशी तत्त्वे आहेत ते सांख्ययोग्यासाठी अत्यंत आवश्यक आहेत आणि त्या गोष्टी समजून घेणे फार आवश्यक आहे.

"**निबोध**" पदाचे तात्पर्य हे आहे की, सांख्ययोगात क्रिया आणि सामुग्रीची प्रधानता नसते. परंतु त्या तत्त्वाला समजण्याची प्रधानता असते. या अध्यायाच्या तेराव्या श्लोकातही सांख्ययोग्याच्या विषयात "**निबोध**" पद आले आहे.

**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा**—सांख्ययोग्याची जी अंतिम स्थिती आहे तिच्यापेक्षा साधकाची अधिक स्थिती कोणतीच होऊ शकत नाही, तीच ज्ञानाची परानिष्ठा म्हटली जाते. त्या परानिष्ठेला अर्थात् ब्रह्माला सांख्ययोगाचा साधक ज्या प्रकारे प्राप्त होतो, ते मी थोडक्यात सांगतो अर्थात् त्यातील मुख्य मुख्य तत्त्वे सांगतो.

**परिशिष्ट भाव**—येथे '**सिद्धिम्**' पदाचा अर्थ आहे—साधनरूपी कर्मयोगाने होणारी अंतःकरणाची पूर्ण शुद्धी, जी प्राप्त झाल्यावर कर्मयोगी ज्ञानयोगात अथवा भक्तियोगात कुठेही जाऊ शकतो—

**तावत् कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता।**
**मत्कथाश्रवणादौ वा श्रद्धा यावन्न जायते॥** (श्रीमद्भा० ११।२०।९)

'तोपर्यंतच कर्म करावे, जोपर्यंत भोगापासून वैराग्य झाले नाही अथवा जोपर्यंत माझ्या लीला-कथाच्या श्रवण-कीर्तन इत्यादीत श्रद्धा झाली नाही.'

जर कर्मयोग्याच्या अंतःकरणात ज्ञानाचे संस्कार असतील तर तो ज्ञानाकडे वळेल आणि जर भक्तीचे संस्कार असतील तर तो भक्तीकडे जाईल.

जर कोणत्याही एकाचा आग्रह नसेल तर कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—तिन्ही 'साधन' रूपानेही राहतील आणि 'साध्य' रूपानेही राहतील.

साधनरूपाने तर तिन्ही वेग-वेगळे आहेत, परंतु साध्यरूपाने तिन्ही एकच आहेत. म्हणून गीतेत कुठे तर भगवंताने भक्तिद्वारा ज्ञानप्राप्ती अर्थात् साधन-भक्तीने साध्य-ज्ञानाची प्राप्ती सांगितली आहे—**'मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी'** (१३।१०), **'मां च योऽव्यभिचारेण..........ब्रह्मभूयाय कल्पते'** (१४।२६) आणि कुठे ज्ञानाने भक्तीची प्राप्ती अर्थात् साधन-ज्ञानाने साध्य-भक्तीची प्राप्ती सांगितली आहे—**'सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र........सर्वभूतहिते रताः'** (१२।४), **'ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा..........मद्भक्तिं लभते पराम्'** (१८।५४).

भगवंताने पूर्वी **'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः'** (१८।४६)—या पदांनी कर्मयोगाद्वारा भक्तीची सिद्धी सांगितली आणि येथे **'सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म'** पदांनी कर्मयोगाद्वारा ज्ञानयोगाची सिद्धी सांगतात. पाचव्या अध्यायातही साधनरूपी कर्मयोगाने ज्ञानयोगाची शीघ्र सिद्धी सांगितली आहे—**'योगयुक्तो मुनिर्ब्रह्म नचिरेणाधिगच्छति'** (५।६).

*संबंध—ज्ञानाची परानिष्ठा प्राप्त करण्यासाठी कोणत्या साधन सामुग्रीची आवश्यकता आहे ते पुढील तीन श्लोकांत सांगतात.*

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च॥ ५१॥**
**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः॥ ५२॥**
**अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम्।**
**विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते॥ ५३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **विशुद्धया** | = (जो) विशुद्ध (सात्त्विकी) | **यतवाक्काय-मानसः** | = शरीर, वाणी, मन यांना वश करून | **दर्पम्** | = दर्प (घमेंड), |
| **बुद्ध्या** | = बुद्धीने | **शब्दादीन्** | = शब्दादी | **कामम्** | = काम, |
| **युक्तः** | = युक्त, | **विषयान्** | = विषयांचा | **क्रोधम्** | = क्रोध |
| **वैराग्यम्** | = वैराग्याच्या | **त्यक्त्वा** | = त्याग करून | **च** | = आणि |
| **समुपाश्रितः** | = आश्रित, | **च** | = आणि | **परिग्रहम्** | = परिग्रह- |
| **विविक्तसेवी** | = एकान्तसेवी (आणि) | **रागद्वेषौ** | = राग-द्वेष | **विमुच्य** | = रहित होऊन (आणि) |
| **लघ्वाशी** | = नियमित भोजन करणारा (साधक) | **व्युदस्य** | = नष्ट करून | **निर्ममः** | = ममतारहित (तसेच) |
| **धृत्या** | = धैर्यपूर्वक | **नित्यम्** | = निरंतर | **शान्तः** | = शांत होऊन |
| **आत्मानम्** | = इंद्रियांचे | **ध्यानयोगपरः** | = ध्यानयोगपरायण होतो, (तो) | **ब्रह्मभूयाय** | = ब्रह्मप्राप्तीचा |
| **नियम्य** | = नियमन करून, | **अहङ्कारम्** | = अहंकार, | **कल्पते** | = अधिकारी होतो. |
| | | **बलम्** | = बल, | | |

*व्याख्या*— **बुद्ध्या विशुद्धया युक्तः**—जो सांख्ययोगी साधक परमात्मतत्त्व प्राप्त करू इच्छितो, त्याची बुद्धी विशुद्ध अर्थात् सात्त्विकी असावी (१८।३०). त्याच्या बुद्धीचा विवेक स्वच्छ असावा त्यात किंचिन्मात्रही संशय नसावा.

या सांख्ययोगाच्या प्रकरणात सर्वात प्रथम बुद्धीचे नाव आले आहे. याचे तात्पर्य असे आहे की, सांख्ययोग्यासाठी ज्या विवेकाची आवश्यकता आहे तो विवेक बुद्धीतच प्रकट होतो. त्या विवेकाने तो जडतेचा त्याग करतो.

**वैराग्यं समुपाश्रितः**—जसे संसारीलोक वस्तू, व्यक्ती इत्यादीच्या रागपूर्वक आश्रित राहतात त्यांना आपला आश्रय, आधार मानतात तसेच सांख्ययोगाचा साधक वैराग्याच्या आश्रित राहतो अर्थात् जनसमुदाय, स्थान इत्यादी विषयीची त्याची स्वाभाविक निर्लिप्तता कायम

राहते. त्याला लौकिक आणि पारलौकिक संपूर्ण भोगांविषयी दृढ वैराग्य असते.

**विविक्तसेवी**—सांख्ययोगाच्या साधकाचा स्वभाव, त्याची आवड स्वतः स्वाभाविक एकांतातच राहण्याची असते. एकांतसेवनाची आवड तर फार उत्तम आहे परंतु त्याचा आग्रह राहू नये अर्थात् एकांत मिळाला नाही तर मनात विक्षेप, चल-बिचल होऊ नये. आग्रह राहिला नाही तर आवड असूनही एकांत मिळाला नाही, उलट समुदायाचा संबंध आला खूप गडबड गोंधळ असेल तरीही साधक उबगणार नाही. अर्थात् सिद्धी-असिद्धीमध्ये सम राहील. परंतु आग्रह असला तर तो वैतागून जाईल, त्याला समुदाय सहन होणार नाही. म्हणून साधकाचा स्वभाव तर एकांतात राहण्याचाच असावा परंतु एकांत मिळाला नाही तर त्याच्या अंतःकरणात चलबिचल होऊ नये. कारण चलबिचल होण्याने अंतःकरणात संसाराची महत्ता येते आणि संसाराची महत्ता आली तर चलबिचल होते, जी ध्यानयोगात बाधक आहे.

"एकांतात राहिल्याने साधन अधिक होईल, मन भगवंतात चांगल्या रीतीने लागेल, अंतःकरण निर्मळ बनेल" इत्यादी अपेक्षांनी मनात होणारी प्रसन्नता साधनेला सहायक होते परंतु "एकांतात गडबड गोंधळ करणारा कोणी नसेल त्यामुळे तिथे झोप शांतपणे येईल, तेथे कसेही बसले तरी तेथे कोणी पहायला येणार नाही, तेथे सर्व प्रकाराने आराम मिळेल, एकांतात राहिल्याने लोकही अधिक आदर सत्कार करतील," अशा इच्छेने मनात होणारी प्रसन्नता साधनेत बाधक होते कारण हा सर्व भोग आहे. साधकाने या सुख-सुविधांमध्ये फसू नये उलट यापासून नेहमी सावध राहिले पाहिजे.

**लघ्वाशी**—साधकाचा स्वभाव स्वल्प अर्थात् नियमित आणि सात्त्विक भोजन करण्याचा असावा. भोजनाच्या विषयात हित, मित आणि मेध्य—ह्या तीन गोष्टी सांगितल्या गेल्या आहेत. "हित" चे तात्पर्य, भोजन शरीराला अनुकूल असावे. "मित" चे तात्पर्य, भोजन अधिकही करू नये आणि कमीही करू नये, उलट जेवढ्या भोजनाने शरीर-निर्वाह होईल तेवढे भोजन करावे (६।१६) भोजनाने शरीर पुष्ट होईल अशा भावनेने भोजन करू नये, उलट केवळ औषधाप्रमाणे क्षुधानिवृत्तीसाठीच भोजन करावे. ज्यामुळे साधनेत विघ्न येणार नाही. "मेध्य" चे तात्पर्य भोजन पवित्र असावे.

**धृत्यात्मानं नियम्य च**—सांसारिक कितीही प्रलोभन समोर आले तरी बुद्धीला आपले ध्येय परमात्मतत्त्व ह्यापासून विचलित होऊ देऊ नये. अशा दृढ सात्त्विकी धृतीद्वारा (१८।३३) इंद्रियांचे नियमन करावे अर्थात् त्यांना मर्यादेत ठेवावे. इंद्रियांकडून साधनेविरुद्ध कोणतीही क्रिया होणार नाही याबद्दल अष्टौप्रहर दक्षता ठेवावी.

**यतवाक्कायमानसः**—शरीर, वाणी आणि मन यांना संयत (ताब्यात) ठेवणेसुद्धा साधकासाठी फार आवश्यक आहे. (१७।१४-१६) म्हणून त्याने विनाकारण भटकू नये, पाहण्या-ऐकण्याच्या चैनीसाठी यात्रा करू नये. आवश्यक असेल तेव्हाच बोलावे, व्यर्थ बडबड करू नये, खोटे बोलू नये, निंदा-चुगली करू नये, मनाने संसाराचे आसक्तिपूर्वक चिंतन करू नये, तर परमात्म्याचे चिंतन करावे.

**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा**—ध्यानाचे वेळी बाह्यसंबंध जेवढे असतील, जे विषयरूपाने येतात आणि ज्याने संयोग-जन्य सुख होते. त्या शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध—या पांचही विषयांचा त्याग करावा. कारण आसक्तिपूर्वक विषय-सेवन करणारा ध्यानयोगाचे साधन करू शकत नाही. जर आसक्तिपूर्वक विषयसेवन करेल तर ध्यानात वृत्ती (बहिर्मुख झाल्याने) लागणार नाही आणि विषयाचे चिंतन होईल.

**रागद्वेषौ व्युदस्य च**—सांसारिक वस्तू महत्त्वाच्या आहेत, आपल्या कामात येणाऱ्या आहेत, उपयोगी आहेत—असा जो भाव आहे त्याचे नाव "राग" आहे. तात्पर्य हे आहे की, अंतःकरणात असत् वस्तूंचा जो प्रभाव पडलेला असतो तो "राग" आहे. असत् वस्तू इत्यादीत आसक्ती असल्यास त्याच्या प्राप्तीत कोणी बाधा आणली तर त्याच्याविषयी द्वेष होतो.

असत् संसाराच्या कोण्या एका अंशात राग झाला तर दुसऱ्या अंशात द्वेष होतो—हा नियम आहे. जसे शरीराविषयी आसक्ती राहिल्यास शरीराच्या अनुकूल पदार्थाविषयी राग होतो आणि प्रतिकूल पदार्थाविषयी द्वेष होतो.

संसाराशी रागानेही संबंध जुळतो आणि द्वेषानेही संबंध जुळतो. आसक्ती असलेल्या विषयाचेही चिंतन होते आणि द्वेष असलेल्या विषयाचेही चिंतन होते. म्हणून साधकाने रागही करू नये आणि द्वेषही करू नये.

**ध्यानयोगपरो नित्यम्**—साधकाने नित्य ध्यानयोग-परायण रहावे. अर्थात् ध्यानाशिवाय दुसरे कोणतेही साधन करू नये. ध्यानाचे वेळी तर ध्यान करावेच, व्यवहार करतानाही अर्थात् चालताना-फिरताना, खाताना-पिताना, काम-धंदा करतानाही नेहमी असा भाव असावा की, वास्तविक एका परमात्म्याशिवाय संसाराची स्वतंत्र सत्ता नाहीच. (१८।२०)

**अहङ्कारं बलं दर्पं....विमुच्य**—गुणांच्या संबंधाने आपल्यात जी विशेषता दिसून येते त्याला "अहङ्कार" म्हणतात. जबरीने; विशेषत्वाने मनमानेल तसे करण्याचा जो हट्ट (आग्रह) असतो त्याला "बल" म्हणतात. जमीन इस्टेट इत्यादी बाह्य पदार्थांच्या विशेषतेने जी घमेंड येते त्याला "दर्प" म्हणतात. भोग, पदार्थ तसेच अनुकूल परिस्थितीची प्राप्ती व्हावी या इच्छेचे नाव "काम" आहे. आपल्या स्वार्थ आणि अभिमानाला ठेस पोहोचली तर दुसऱ्यांचे अनिष्ट करण्याची जी जलनात्मक वृत्ती उत्पन्न होते त्याला "क्रोध" म्हणतात. भोगबुद्धीने, सुख-आरामबुद्धीने वस्तूंचा जो संग्रह केला जातो त्याला "परिग्रह" म्हणतात.*

साधक उपर्युक्त अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध आणि परिग्रह—या सर्वांचा त्याग करतो.

**निर्ममः**—आपल्याजवळ केवळ ज्या निर्वाहाच्या वस्तू आहेत आणि कर्म करण्याची साधने शरीर, इंद्रिये इत्यादी आहेत त्यांच्याविषयी ममता अर्थात् आत्मीयता नसावी.† आपले शरीर, वस्तू इत्यादी जे आम्हाला प्रिय वाटतात, ते कायम रहावेत अशी इच्छा नसणे "निर्मम" होणे आहे.

ज्या वस्तूंना आणि व्यक्तींना आम्ही आपले मानतो, त्या आजपासून शंभर वर्षापूर्वीही आपल्या नव्हत्या आणि शंभर वर्षानंतरही आपल्या राहणार नाहीत. म्हणून ज्या आपल्या राहणार नाहीत, त्यांचा उपयोग अथवा त्यांची सेवा तर करू शकतो परंतु त्यांना आपली समजून आपल्याजवळ कायम ठेवू शकत नाही. जर त्यांना आपण आपल्याजवळ ठेवू शकत नाही तर मग "त्या आपल्या नाहीत" असे मानण्यात काय बाधा आहे ? त्यांना आपले न मानल्याने साधक निर्मम होतो.

**शान्तः**—असत् संसाराशी संबंध ठेवण्यानेच अंतः-करणात अशांती, चलबिचल उत्पन्न होते. जडतेशी सर्वथा संबंध-विच्छेद झाल्यास अशांती कधी आपल्याजवळ फिरकतच नाही. मग राग-द्वेष राहत नसल्याने साधक सदा शांत राहतो.

**ब्रह्मभूयाय कल्पते**—ममतारहित आणि शांत मनुष्य (सांख्ययोगाचा साधक) परमात्मप्राप्तीचा अधिकारी होतो अर्थात् असत्चा सर्वथा संबंध सुटताच त्याच्यात ब्रह्मप्राप्ती-ची योग्यता, सामर्थ्य येते. कारण जोपर्यंत असत् पदार्थांशी संबंध राहतो तोपर्यंत परमात्मप्राप्तीचे सामर्थ्य येत नाही.

***संबंध**—उपर्युक्त साधन-सामुग्रीने निष्ठा प्राप्त झाल्यावर काय होते—हे पुढील श्लोकात सांगतात.*

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्॥५४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ब्रह्मभूतः** | = (तो) ब्रह्मरूप झालेला | **न** | = नाही (आणि) | **भूतेषु** | = प्राण्यांत |
| **प्रसन्नात्मा** | = प्रसन्न मनाचा साधक | **काङ्क्षति** | = कशाचीही इच्छा करीत | **समः** | = समभाव असलेला साधक |
| **शोचति** | = (कोणासाठी) शोक करीतही | **न** | = नाही (असा) | **पराम्, मद्भक्तिम्** | = माझ्या पराभक्तीला |
| | | **सर्वेषु** | = संपूर्ण | **लभते** | = प्राप्त होतो. |

*व्याख्या*— **ब्रह्मभूतः**—जेव्हा अंतःकरणात विनाशशील वस्तूंचे महत्त्व समाप्त होते तेव्हा अंतःकरणाच्या अहंकार, घमेंड इत्यादी वृत्ती शांत होतात अर्थात् त्यांचा त्याग होतो. मग ज्या वस्तू आपल्याजवळ आहेत त्यांतही ममता राहत नाही. ममता न राहिल्याने सुख आणि भोगबुद्धीने पदार्थांचा संग्रह होत नाही. जेव्हा सुखबुद्धी आणि भोगबुद्धी समाप्त होते तेव्हा अंतःकरणात स्वतः स्वाभाविकच शांती प्राप्त होते.

अशा प्रकारे साधक जेव्हा असत्च्या पलीकडे जातो तेव्हा तो ब्रह्मप्राप्तीला पात्र बनतो. पात्र बनल्यावर त्याची ब्रह्मभूत अवस्था आपोआप होते. यासाठी त्याला काही करावे लागत नाही. या अवस्थेत "मी ब्रह्मरूप आहे आणि ब्रह्म माझे स्वरूप आहे" असा त्याला आपल्या दृष्टीने अनुभव होतो. याच अवस्थेला येथे (आणि ५।२४ मध्येही) "**ब्रह्मभूतः**" पदाने म्हटले गेले आहे.

**प्रसन्नात्मा**—जेव्हा अंतःकरणात असत् वस्तूंचे महत्त्व

* ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यासी ह्या सर्वांकरिता तर स्वरूपानेच परिग्रहाचा (संग्रह) त्याग आहे. जर गृहस्थीमध्येसुद्धा एखादा सुख-भोगबुद्धीने संग्रह करीत नसेल, केवळ दुसऱ्यांची सेवा, हितासाठीच संग्रह करत असेल तर तोही परिग्रह होत नाही.

† केवळ सांसारिक व्यवहारासाठी वस्तूंविषयी आपलेपणा असणे दोष नाही तर त्यांना नेहमीसाठी आपले मानणे दोष आहे.

वाटू लागते, तेव्हा त्या वस्तूं प्राप्त करण्याची कामना उत्पन्न होते. कामना उत्पन्न होताच अंत:करणाची शांती भंग होते आणि अशांती (चलबिचल) उत्पन्न होते. परंतु जेव्हा असत् वस्तूंचे महत्त्व समाप्त होते तेव्हा साधकाचे चित्त स्वाभाविकच प्रसन्न राहते. अप्रसन्नतेचे कारण समाप्त झाल्याने पुन्हा केव्हाही अप्रसन्नता होतच नाही. कारण सांख्ययोगी साधकाच्या अंत:करणात आपल्यासहित संसाराचा अभाव आणि परमात्मतत्त्वाचा भाव अटळ राहतो.

**न शोचति न काङ्क्षति**—त्या प्रसन्नतेची ओळख अशी आहे की, तो शोक-चिंता करीत नाही. सांसारिक कितीही मोठी हानी झाली तरीही तो शोक करीत नाही आणि अमुक परिस्थिती प्राप्त व्हावी अशी इच्छाही करीत नाही. तात्पर्य हे आहे की, उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या तसेच येणाऱ्या-जाणाऱ्या परिवर्तनशील परिस्थिती, वस्तू, व्यक्ती, पदार्थ इत्यादींच्या असण्याचा किंवा नष्ट होण्याचा त्याच्यावर मुळीच परिणाम होत नाही. जो परमात्म्यात अटळरूपाने स्थित आहे, त्याच्यावर येणाऱ्या-जाणाऱ्या परिस्थितींचा परिणाम कसा होऊ शकतो?

**समः सर्वेषु भूतेषु**—जोपर्यंत साधकामध्ये किंचिन्मात्र-ही हर्ष-शोक, राग-द्वेष, इत्यादी द्वन्द्व राहतात तोपर्यंत तो सर्वत्र व्याप्त असलेल्या परमात्म्याशी अभिन्नतेचा अनुभव करू शकत नाही. अभिन्नतेचा अनुभव न झाल्याने तो आपणाला संपूर्ण भूतात सम पाहू शकत नाही. परंतु जेव्हा साधक हर्ष-शोकादी द्वन्द्वापासून रहित होतो, तेव्हा त्याला परमात्म्याशी स्वत: स्वाभाविक अभिन्नतेचा (जी नित्यच होती) अनुभव होतो. परमात्म्याशी अभिन्न झाल्याने, आपले स्वत:चे कोणतेही व्यक्तित्व* न राहिल्यामुळे अर्थात् "मी आहे" या रूपाने आपली कोणती वेगळी सत्ता न राहिल्याने तो संपूर्ण प्राण्यांत सम होतो. जसे परमात्मा संपूर्ण प्राण्यात सम आहेत—"**समोऽहं सर्वभूतेषु**" (९।२९) तसेच तोही संपूर्ण प्राण्यात सम होतो.

तो संपूर्ण प्राण्यात कशा प्रकारे सम होतो? जसे मनो-राज्य आणि स्वप्नामध्ये ज्या नाना सृष्टी उत्पन्न होतात त्यात मनच अनेक रूप धारण करते अर्थात् ती सृष्टी मनोमय असते. मनोमयी असल्याने जसे सर्व सृष्टीत मन आहे आणि मनात सर्व सृष्टी आहे तसेच सर्व प्राण्यात (आत्मरूपाने) तो आहे आणि त्याच्यात संपूर्ण प्राणी आहेत (६।२९) यालाच येथे "**समः सर्वेषु भूतेषु**" म्हटले आहे.

**मद्भक्तिं लभते पराम्**—जेव्हा समरूप परमात्म्याशी अभिन्नतेचा अनुभव झाल्याने साधकाचा सर्वत्र समभाव होतो, तेव्हा त्याचे परमात्म्यात प्रतिक्षण वर्धमान एक विलक्षण आकर्षण (ओढ, अनुराग) होते. त्यालाच येथे पराभक्ती म्हटले आहे.

पाचव्या अध्यायाच्या चोवीसाव्या श्लोकात जसे ब्रह्मभूत अवस्थेनंतर ब्रह्मनिर्वाणाची प्राप्ती सांगितली आहे—"**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति**" तसेच येथे ब्रह्मभूत अवस्थेनंतर पराभक्तीची प्राप्ती सांगितली आहे.

**परिशिष्ट भाव**—ज्ञानयोगाच्या ज्या साधकात भक्तीचे संस्कार असतात, जो स्वत:च्या मताचा आग्रह ठेवत नाही, मुक्ती अर्थात् संसाराच्या संबंध-विच्छेदालाच सर्वोपरी मानत नाही आणि भक्तीचे खंडन, निंदा करीत नाही, त्याला मुक्तीत संतोष होत नाही. म्हणून त्याला मुक्ती प्राप्त झाल्यावर भक्तीची (प्रेमाची) प्राप्ती होते.

जो स्वत:च्या दृष्टीने अर्थात् आपल्या मान्यतेने ब्रह्मरूप झाला आहे, ब्रह्म झाला नाही, त्याच्यासाठी येथे '**ब्रह्मभूतः**' पद आले आहे. ब्रह्मभूत झाल्यावर जीवाचा ब्रह्माशी तात्त्विक संबंध (साधर्म्य) होतो—'**मम साधर्म्यमागताः**' (१४।२). तात्त्विक संबंध होणे हीच मुक्ती आहे. मग सर्वत्र परिपूर्ण अनंतब्रह्मांडनायक परमात्म्यात आपण-आपल्याला विलीन (समर्पित) करण्याने परमात्म्याशी आत्मीयसंबंध (अभिन्नता) होतो—'**ज्ञानी त्वात्मैव मे मतम्**' (गीता ७।१८). आत्मीयसंबंध होणे हीच पराभक्तीची (प्रेमाची) प्राप्ती आहे.

ज्ञानमार्गात जडतेचा त्याग मुख्य आहे. जडतेचा त्याग विवेकसाध्य आहे. विवेकपूर्वक जडतेचा त्याग झाल्यास त्याज्य वस्तूचा संस्कार शिल्लक राहू शकतो, ज्यामुळे दार्शनिक मतभेद उत्पन्न होतात. परंतु प्रेमाची प्राप्ती झाल्यास त्याज्य वस्तूचा संस्कार राहत नाही. कारण भक्त त्याग करीत नाही, तर सर्वांना भगवंताचे स्वरूप मानतो—'**सदसच्चाहम्**' (गीता ९।१९). प्रेमप्राप्ती विवेकसाध्य नाही, तर विश्वाससाध्य आहे. विश्वासात केवळ भगवत्कृपेवरच भरवसा असतो. म्हणून ज्याच्या अंत:करणात भक्तीचे संस्कार असतात, त्याला भगवत्कृपा मुक्तीत संतुष्ट राहू देत नाही, तर मुक्तीचा रस (अखंडरस) फिका करून प्रेमरस (अनंतरस) प्रदान करते.

* व्यक्तित्व त्याला म्हणतात ज्यात मनुष्य आपली सत्ता वेगळी मानतो आणि ज्याने बंधन होते.

संसाराच्या संबंधाने अशांती होते, म्हणून कर्मयोगात संसाराशी संबंध-विच्छेद झाल्यास 'शांत आनंद' मिळतो. ज्ञानयोगात निजस्वरूपात स्थिती झाल्याने निजानंद अर्थात् 'अखंड आनंद' मिळतो. भक्तियोगात भगवंताशी अभिन्नता झाल्याने परमानंद अर्थात् 'अनंत आनंद' (प्रतिक्षण वर्धमान प्रेम) प्राप्त होतो.

***संबंध—आता पुढील श्लोकात पराभक्तीचे फल सांगत आहेत.***

## भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः।
## ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्॥५५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भक्त्या** | = (त्या) पराभक्तीने | **अस्मि** | = आहे—(हे) | **तत्त्वतः** | = तत्त्वाने |
| **माम्** | = मला, (तो) | **तत्त्वतः** | = तत्त्वाने | **ज्ञात्वा** | = जाणून (घेतल्याने तो) |
| **यावान्** | = (मी) जितका आहे | **अभिजानाति** | = जाणून घेतो, | **तदनन्तरम्** | = तात्काळ |
| **च** | = आणि | **ततः** | = मग | **विशते** | = (मझ्यात) |
| **यः** | = जसा | **माम्** | = मला | | प्रविष्ट होतो. |

*व्याख्या*— **भक्त्या मामभिजानाति**—जेव्हा परमात्मतत्त्वात आकर्षण, अनुराग होतो तेव्हा साधक स्वतः त्या परमात्म्याला सर्वथा समर्पित होतो, त्या तत्त्वाशी अभिन्न होतो. मग त्याचे वेगळे कोणते (स्वतंत्र) अस्तित्व राहत नाही अर्थात् त्याच्या अहंभावाचा अतिसूक्ष्म अंशही राहत नाही. म्हणून त्याला प्रेमस्वरूपा प्रेमाभक्ती प्राप्त होते. त्या भक्तीने परमात्मतत्त्वाचा वास्तविक बोध होतो.

ब्रह्मभूतअवस्था झाल्यावर संसाराच्या संबंधाचा तर सर्वथा त्याग होतो पण "मी ब्रह्म आहे, मी शांत आहे, मी निर्विकार आहे" असा सूक्ष्म अहंभाव राहतो. हा अहंभाव जोपर्यंत राहतो तोपर्यंत परिच्छिन्नता आणि पराधीनता राहते. कारण हा अहंभाव प्रकृतीचे कार्य आहे आणि प्रकृती "पर" आहे म्हणून पराधीनता राहते. परमात्म्याकडे आकृष्ट झाल्याने, पराभक्ती झाल्यानेच हा अहंभाव समाप्त होतो.* हा अहंभाव सर्वथा समाप्त झाल्यानेच तत्त्वाचा वास्तविक बोध होतो.

**यावान्**—सातव्या अध्यायाच्या आरंभी भगवंतांनी अर्जुनाला "समग्र" रूप ऐकण्याची आज्ञा केली की, माझ्या ठिकाणी ज्याचे मन आसक्त झाले आहे, ज्याला माझाच आश्रय आहे, तो अनन्यभावाने माझ्याशी दृढतापूर्वक संबंध ठेवून माझ्या ज्या समग्ररूपाला जाणतो ते तू ऐक. हीच गोष्ट भगवंतांनी सातव्या अध्यायाच्या शेवटी म्हटली की, जरा-मरण यापासून मुक्ती मिळविण्यासाठी जे माझा आश्रय घेऊन प्रयत्न करतात, ते ब्रह्म, संपूर्ण आध्यात्म आणि संपूर्ण कर्माला अर्थात् संपूर्ण निर्गुण विषयाला जाणून घेतात आणि आधिभूत, आधिदैव आणि आधियज्ञ यांच्यासहित मला अर्थात् संपूर्ण सगुण विषयाला जाणून घेतात.

अशा प्रकारे निर्गुण आणि सगुण याशिवाय राम, कृष्ण, शिव, गणेश, शक्ती, सूर्य इत्यादी अनेक रूपात प्रकट होऊन परमात्मा लीला करतात. त्यांनाही जाणून घेणे हेच पराभक्तीने "**यावान्**" अर्थात् समग्ररूपाला जाणणे आहे.

**यश्चास्मि तत्त्वतः**—तेच परमात्मा अनेक रूपांत अनेक आकृतींत, अनेक शक्तिसह अनेक कार्य करण्यासाठी वारंवार प्रगट होतात आणि तेच परमात्मा अनेक सांप्रदायांत आपापल्या भावनेनुसार अनेक इष्ट देवांच्या रूपात मानले जातात. वास्तविक परमात्मा एकच आहेत. अशा प्रकारे जो मी आहे—त्याला तत्त्वाने जाणून घेतो.

**ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्**—असे मला तत्त्वाने जाणून तात्काळ† माझ्यात प्रविष्ट होतो अर्थात् माझ्याशी जो भिन्नतेचा भाव होता तो सर्व समाप्त होतो. तत्त्वाने जाणल्यास त्याच्यात जे अज्ञान होते ते सर्व समाप्त होते आणि तो त्या तत्त्वात प्रविष्ट होतो. हीच पूर्णता आहे आणि यातच मनुष्यजन्माची सार्थकता आहे.

### विशेष गोष्ट

जीवाचे प्रेम (रती, प्रीती अथवा आकर्षण) परमात्म्यात सहज आहे. परंतु जेव्हा हा जीव प्रकृतीशी संबंध जोडतो तेव्हा तो परमात्मविमुख होतो आणि संसाराकडे आकृष्ट होतो. हे आकर्षणच वासना, स्पृहा, कामना, आशा, तृष्णा इत्यादी

* प्रेम भगति जल बिनु रघुराई। अभिअंतर मल कबहुँ न जाई॥ (मानस ७। ४९। ३)

† जाणण्यात आणि प्राप्त करण्यात काळभेद नसतो.

नावाने म्हटले जाते.

या वासना इत्यादीचा जो विषय (प्रकृतिजन्य पदार्थ) आहे तो क्षणभंगुर आणि परिवर्तनशील आहे. तसेच हा जीवात्मा स्वत: नित्य आणि अपरिवर्तनशील आहे. परंतु असे असतानाही प्रकृतीशी तादात्म्य झाल्याने हा परिवर्तनशीला-मध्ये आकृष्ट होतो. यामुळे त्याला मिळत तर काही नाही परंतु ''काही मिळेल'' या भ्रमाने वासनेमुळे हा जन्म-मरणाच्या चक्रामध्ये पडलेला भयंकर दु:ख भोगत राहतो. यातून सुटण्यासाठी भगवंतांनी योग सांगितला आहे. तो योग जडतेशी संबंध-विच्छेद करून परमात्म्याशी नित्ययोगाचा अनुभव करवितो.

गीतेत मुख्यरूपाने तीन योग आहेत—कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग. या तिन्हींचा विचार केला तर भगवंताचे प्रेम तिन्हीही योगात आहे. कर्मयोगात त्याला ''कर्तव्यरती'' म्हणतात अर्थात् ती रती कर्तव्यात असते—''**स्वे स्वे कर्मण्य भिरत:**'' (१८।४५) [कर्मयोगाची ही रती शेवटी आत्मरतीत परिणत होते. (२।५५, ३।१७) आणि ज्या कर्मयोग्यात भक्तीचे संस्कार असतात त्याची ही रती भगवद्रतीत परिणत होते] ज्ञानयोगात त्याच प्रेमाला ''आत्मरती'' म्हणतात अर्थात् ती रती स्वरूपात होते—''**योऽन्त: सुखोऽन्तराराम:।**'' (५।२४) आणि भक्तियोगात त्याच प्रेमाला ''भगवद्रती'' म्हणतात अर्थात् ती रती भगवंतात असते*—''**तुष्यन्ति च रमन्ति च**।'' (१०।९) अशा प्रकारे या तिन्ही योगात रती असूनही गीतेत ''भगवद्रती'' चा विशेषरूपाने महिमा गायिला आहे.

तपस्वी, ज्ञानी आणि कर्मी—या तिन्हींपेक्षाही योगी (समतायुक्त) श्रेष्ठ आहे. (६।४६) तात्पर्य हे आहे की, जडतेशी संबंध ठेवून खूप मोठे तप करून, अनेक शास्त्रांचे अनेक प्रकारचे ज्ञान मिळवून आणि यज्ञ, दान, तीर्थ इत्यादीची मोठमोठी अनुष्ठाने करून जे काही प्राप्त होते ते सर्व अनित्यच असते, परंतु योग्याला नित्यतत्त्वाची प्राप्ती होते. म्हणून तपस्वी, ज्ञानी आणि कर्मी—या तिन्हींपेक्षा ''योगी'' श्रेष्ठ आहे. अशा प्रकारच्या कर्मयोगी, ज्ञानयोगी, हठयोगी, लययोगी इत्यादी सर्व योग्यांपेक्षा भगवंतांनी भक्तियोगीच सर्वश्रेष्ठ असल्याचे सांगितले आहे. (६।४७) हाच भक्तियोगी भगवंताच्या समग्ररूपाला जाणून घेतो. सांख्ययोगी सुद्धा पराभक्तीद्वारा त्या समग्ररूपाला जाणून घेतो त्याच समगररूपाचे वर्णन येथे ''**यावान्**'' पदाने झाले आहे.†

या प्रकरणाच्या आरंभी ''अंत:करणाच्या शुद्धिरूपी सिद्धीला प्राप्त झालेला साधक ज्या रीतीने ब्रह्माला प्राप्त होतो'' हे सांगण्याची प्रतिज्ञा केली आणि सांगितले की, ध्यानयोग-परायण झाल्याने तो वैराग्याला प्राप्त होतो. वैराग्याने अहंकार इत्यादींचा त्याग करून ममतारहित होऊन शांत होतो. तेव्हा तो ब्रह्मप्राप्तीला पात्र होतो. पात्र होताच त्याची ब्रह्मभूत अवस्था होते. ब्रह्मभूत अवस्था झाल्यास संसाराच्या संबंधाने जे राग-द्वेष, हर्ष-शोक इत्यादी द्वन्द्व होत होते ते सर्वथा समाप्त होतात आणि तो संपूर्ण प्राण्यात ''सम'' होतो. सम झाल्याने पराभक्ती प्राप्त होते. ती पराभक्तीच वास्तविक प्रीती आहे. त्या प्रीतीने परमात्म्याच्या समग्ररूपाचा बोध होतो. बोध होताच त्या तत्त्वात प्रवेश होतो—''**विशते तदनन्तरम्**।''.

अनन्यभक्तीने तर मनुष्य भगवंताना तत्त्वाने जाणू शकतो, त्यांच्यात प्रविष्ट होऊ शकतो आणि त्यांचे दर्शनही

* भगवंतात रती अथवा प्रियता आत्मीयतेने प्रकट होते. परमात्म्याशी जीवाचा अनादिकालापासून स्वत: सिद्ध संबंध आहे. आपली वस्तू आपोआप आपल्याला प्रिय वाटते. म्हणून आत्मीयता प्रकट होताच भगवान् आपोआप प्रिय वाटू लागतात. प्रियतेत कधीही समाप्त न होणारा अलौकिक विलक्षण आनंद आहे. तो आनंद प्राप्त झाल्यास मनुष्यात आपोआप निर्विकारता येते. मग काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर इत्यादी कोणताही विकार उत्पन्न होऊच शकत नाही. पारमार्थिक आनंद मिळाला नसल्यानेच कामादी विकार उत्पन्न होतात अर्थात् आनंद न मिळाल्याने नाशवान् वस्तूंपासून सुख घेण्याची इच्छा होते, त्यापासूनच सर्व विकार उत्पन्न होतात.

उत्पत्ति-विनाशशील वस्तूशी आत्मीयता केल्यानेच हा जीव भगवंतापासून विमुख होतो. विमुखता झाली तरीही भगवंताची प्रियता कधी मिटू शकत नाही. नास्तिकातला नास्तिकसुद्धा संकट कोसळल्यावर धावा करायला लागतो की, ''कोणी ईश्वर असेल तर त्याने माझे रक्षण करावे.''

† गीतेत ''यावान्'' लाच ''वासुदेव: सर्वम्'' (७।१९) म्हटले आहे. त्याच तत्त्वाला सत्-असत्, परा-अपरा, पुरुष-प्रकृती, क्षेत्रज्ञ-क्षेत्र, इत्यादी दोन रूपात सांगितले आहे आणि तेच तत्त्व सत्-असत्च्या पलीकडेही आहे असे सांगितले आहे-''त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्'' (११।३७) त्या तत्त्वाला गीतेत तीन रूपातही सांगितले आहे—अपरा, परा आणि अहम् (७।५-६) क्षेत्र, क्षेत्रज्ञ आणि माम् (१३।१-२) तसेच क्षर, अक्षर आणि पुरुषोत्तम (१५।१६-१७). या तिन्हींचे (आठव्या अध्यायाच्या आरंभी अर्जुनाच्या विचारण्यावरुन) भगवंतांनी सहा प्रकार सांगितले आहेत. ''अपरा''(क्रिया आणि पदार्थ,) ''परा''. (सामान्य जीव आणि कारक पुरुष) आणि ''अहम्'' (निर्गुण आणि सगुण).

वरील सहा प्रकारांना दृष्टांताच्या रूपात अशा रीतीने समजून घेऊ. जलतत्त्व एक असले तरीही त्याचे सहा प्रकार आहेत. त्यापैकी परमाणुरूपाने जल निर्गुणब्रह्म आहे, वाफरूपाने जल सगुण परमात्मा आहे, ढगाच्या रूपाने जल कारक पुरुष (ब्रह्मदेव) आहे, थेंबाच्या रूपाने जल सामान्य जीव आहे, वर्षारूपाने जल सृष्टिरचनारूपी क्रिया आहे आणि बर्फरूपाने जल (पृथ्वी, आप, तेज, वायू इत्यादी) पदार्थ आहे.

करू शकतो. (११।५४) परंतु सांख्ययोगी भगवंतांना तत्त्वाने जाणून त्यांच्यात प्रविष्ट तर होतो परंतु त्याला दर्शन देण्यात भगवान् बाध्य नसतात. कारण त्याची साधना पूर्वीपासूनच विवेकप्रधान असते म्हणून त्याला दर्शनाची इच्छा नसते. दर्शन झाले नाही तरी त्यात कोणती उणीव राहत नाही म्हणून काही कमी समजू नये.

येथे त्या तत्त्वात प्रविष्ट होणे हीच अनिर्वचनीय प्रेमाची प्राप्ती आहे. याच प्रेमाला नारदभक्तिसूत्रात प्रतिक्षण वर्धमान म्हटले आहे.* या प्रेमात संपूर्णपणे पूर्णता होते अर्थात् त्याच्यासाठी करणे, जाणणे आणि मिळविणे काहीही बाकी राहत नाही. म्हणून करण्याची आसक्ती राहत नाही, जाणण्याची जिज्ञासा राहत नाही, जगण्याची आशा राहत नाही, मरण्याचे भय राहत नाही आणि काही मिळविण्याची लालुचही राहत नाही.

जोपर्यंत भगवंतात पराभक्ती अर्थात् परमप्रेम होत नाही, तोपर्यंत ब्रह्मभूत अवस्थेतही ''मी ब्रह्म आहे'' हा सूक्ष्म अहंकार असतो. जोपर्यंत लेशमात्रही अहंकार असतो तोपर्यंत परिच्छिन्नतेचा अत्यंताभाव होत नाही. परंतु ''मी ब्रह्म आहे'' हा सूक्ष्म अहंभाव, जोपर्यंत त्याच्यात प्रकृतिजन्य गुणांचा संग होत नाही तोपर्यंत, जन्म-मरणाला कारण बनत नाही. कारण गुणांचा संग झाल्यानेच बंधन होते—''**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु।**'' (१३।२१) उदाहरणार्थ, गाढ झोपेतून उठल्यावर प्रत्येक मनुष्याला सर्वात प्रथम ''मी आहे'' हा अनुभव होतो. असा अनुभव होताच जेव्हा नाव, जाती, रूप, देश, काळ इत्यादीशी ''स्व'' चा संबंध जडतो, तेव्हा ''मी आहे'' हा अहंभाव शुभाशुभ कर्माचे कारण बनतो, ज्यामुळे जन्म-मरणाचे चक्र चालू होते. परंतु उच्च दर्जाचा जो साधक असतो अर्थात् ज्याची निरंतर ब्रह्मभूत अवस्था असते, त्याच्या सात्त्विक ज्ञानात (१८।२०) सर्वत्रच आपल्या स्वरूपाचा बोध राहतो. परंतु साधकाचा सत्त्वगुणाशी जोपर्यंत संबंध राहतो तोपर्यंत झोपेतून उठल्यावर तात्काळ ''मी ब्रह्म आहे'' अथवा ''सर्व काही एक परमात्माच आहे'' अशी वृत्ती पकडली जाते आणि असे वाटते की, झोपेत ही वृत्ती सुटून गेली होती, जणू काही त्याची चूक झाली होती आणि नंतर त्या तत्त्वाची जागृती, स्मृती झाली. गुणातीत झाल्यास अर्थात् गुणाशी सर्वथा संबंध-विच्छेद झाल्यास विस्मृती आणि स्मृती अशा दोन अवस्था नसतात अर्थात् झोपेत विस्मृती झाली होती आणि आता स्मृती आली—असा अनुभव येत नाही, उलट झोप तर केवळ अंतःकरणात आली होती, आपल्यात नव्हे. आपले स्वरूप तर जसेच्या तसेच राहिले—असा अनुभव राहतो. तात्पर्य हे आहे की, झोप येणे आणि तिच्यातून जागे होणे हे दोन्ही प्रकृतीतच आहे, असा त्याचा स्पष्ट अनुभव राहतो. याच अवस्थेला चौदाव्या अध्यायाच्या बावीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, प्रकाश अर्थात् झोपेतून उठणे आणि मोह अर्थात् झोप येणे—या दोन्हीविषयी गुणातीत पुरुषात थोडे-देखील राग-द्वेष नसतात.

**परिशिष्ट भाव**—'मी जितका आहे आणि जसा आहे', (**यावान् यश्चास्मि**)—ही गोष्ट सगुणाचीच आहे, कारण '**यावान्-तावान्**' निर्गुणात होऊ शकतच नाही, तर सगुणातच होऊ शकते. चतुःश्लोकी भागवतातही भगवंताने '**यावान्**' पदाचा प्रयोग करून ब्रह्माजीला म्हटले आहे—

**यावानहं यथाभावो यद्रूपगुणकर्मकः। तथैव तत्त्वविज्ञानमस्तु ते मदनुग्रहात्॥**

(श्रीमद्भा० २।९।३१)

'मी जितका आहे, ज्या भावाचा आहे, ज्या रूप, गुण आणि कर्मांचा आहे, त्या माझ्या (समग्ररूपाच्या) तत्त्वाचा यथार्थ अनुभव तुला माझ्या कृपेने जसाच्या तसा व्हावा.'

'**यावान् यश्चास्मि**' जे वर्णन भगवंताने सातव्या अध्यायाच्या तीसाव्या श्लोकात '**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः**' पदांत केले होते. यावरुन सगुणाची विशेषता तसेच मुख्यता सिद्ध होते.

ज्ञानमार्गाच्या साधकाला जेव्हा (ज्ञानोत्तरकाळात) भक्ती प्राप्त होते तेव्हा त्यात तत्त्वाने जाणणे (**ज्ञात्वा**) आणि प्रविष्ट होणे (**विशते**)—हे दोनच होतात, दर्शन होत नाही. त्यात कोणती उणीव तर राहत नाही, परंतु दर्शनाची इच्छा त्यांच्यात राहत नाही. परंतु आरंभापासूनच भक्तिमार्गाचा अवलंब करणाऱ्याला तत्त्वाने जाणणे (**ज्ञातुम्**) आणि प्रविष्ट होणे (**प्रवेष्टुम्**) याशिवाय भगवंताचे दर्शनही (**द्रष्टुम्**) होते (गीता—अकराव्या अध्यायाचा चौपन्नावा श्लोक). म्हणून ज्ञानमार्गी संतांत भगवत्प्रेमाची (भक्तीची) गोष्ट तर येते, परंतु दर्शनाची गोष्ट येत नाही.

---

* गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानमविच्छिन्नं सूक्ष्मतरमनुभवरूपम्। (नारदभक्ती सूत्र ५४)
हे प्रेम गुणरहित आहे, कामनारहित आहे, प्रतिक्षण वाढत राहते, विच्छेदरहित आहे, सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्मतर आहे आणि अनुभवरूप आहे.

जसे भिन्न भिन्न मार्गाने येणाऱ्या व्यक्ती दारात प्रविष्ट झाल्यावर परस्पर एकमेकाला मिळतात, तसेच भिन्न भिन्न योगमार्गांचा अवलंब करणारे साधक भगवंतात प्रविष्ट झाल्यावर (**विशते**) एक होतात अर्थात् अहम्‌चा सूक्ष्म गंधही न राहिल्यामुळे त्यांच्यात कोणता मतभेद राहत नाही.

प्रेमाच्या दोन अवस्था असतात—(१) कधी भक्त प्रेमात बुडून जातो, तेव्हा प्रेमी आणि प्रेमास्पद दोन राहत नाहीत, एक होतात आणि (२) कधी भक्तात प्रेमाचा पूर येतो, तेव्हा प्रेमी आणि प्रेमास्पद एक असूनही लीलेसाठी दोन होतात. येथे प्रथम अवस्था सांगण्यासाठी '**विशते**' पद आले आहे.

***संबंध***— *पहिल्या श्लोकात अर्जुनाने संन्यास आणि त्यागाच्या तत्त्वाविषयी विचारले तर त्याच्या उत्तरात भगवंतांनी चौथ्यापासून बाराव्या श्लोकापर्यंत कर्मयोगाचे आणि एकेचाळीसाव्यापासून अठ्ठेचाळीसाव्या श्लोकापर्यंत कर्मयोगाचे तसेच संक्षिप्त भक्तियोगाचे वर्णन केले आणि तेराव्यापासून चाळीसाव्या श्लोकापर्यंत विचारप्रधान सांख्ययोगाचे तसेच एकोण-पन्नासाव्यापासून पंचावन्नाव्या श्लोकापर्यंत ध्यानप्रधान सांख्ययोगाचे तसेच संक्षेपात पराभक्तीच्या प्राप्तीचे वर्णन केले. आता भगवान् शरणागतीची प्रधानता असणाऱ्या भक्तियोगाचे वर्णन आरंभ करतात.*

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्॥ ५६॥**

**मद्व्यपाश्रयः** = माझा आश्रय घेणारा भक्त
**सदा** = सदा
**सर्वकर्माणि** = सर्व कर्म
**कुर्वाणः अपि** = करूनही
**मत्प्रसादात्** = माझ्या कृपेने
**शाश्वतम्** = शाश्वत,
**अव्ययम्** = अविनाशी-
**पदम्** = पदाला
**अवाप्नोति** = प्राप्त होतो.

*व्याख्या*— **मद्व्यपाश्रयः**—कर्मांचा, कर्मफलांचा, कर्म पूर्ण होणे अथवा पूर्ण न होण्याचा, कोणत्याही घटना, परिस्थिती, वस्तू, व्यक्ती इत्यादींचा आश्रय नसावा. केवळ माझाच आश्रय (आधार) असावा. अशा प्रकारे जो संपूर्णपणे मत्परायण होतो, आपले स्वतंत्र काहीही समजत नाही, कोणत्याही वस्तूला आपले मानीत नाही, संपूर्णपणे माझ्या आश्रयाने राहतो, अशा भक्ताला स्वतःच्या उद्धारासाठी काहीही करावे लागत नाही. त्याचा उद्धार मी करतो (१२।७) त्याला त्याच्या जीवननिर्वाहासंबंधी अथवा साधनेसंबंधी कोणत्याही गोष्टीची उणीव राहत नाही. त्या सर्व उणीवेची मी पूर्ती करून टाकतो. (९।२२) मला संपूर्णपणे शरण येणाऱ्या प्रत्येक प्राण्याला माझे हे विधान, माझा हा नियम प्राप्त होऊ शकतो (९।३०-३२)

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणः**—येथे "**कर्माणि**" पदाबरोबर "**सर्व**" आणि "**कुर्वाणः**" पदाबरोबर "**सदा**" पद देण्याचे तात्पर्य हे आहे की, ज्या ध्यानपरायण सांख्य-योग्याने शरीर, वाणी आणि मनाचा संयम केला आहे अर्थात् शरीरादीच्या क्रियांना संकुचित केले आहे आणि एकांतात राहून सदा ध्यानयोगात लागून राहतो, त्याला ज्या पदाची प्राप्ती होते त्याच पदाला; लौकिक, पारलौकिक, सामाजिक, शारीरिक इत्यादी संपूर्ण कर्तव्यकर्मांना नित्य करीत असूनही माझा आश्रय घेणारा भक्त, माझ्या कृपेने प्राप्त करून घेतो.

प्रत्येक व्यक्तीला ही गोष्ट तर समजते की, जो एकांतात राहतो आणि साधन-भजन करतो, त्याचे कल्याण होते. परंतु ही गोष्ट लक्षात येत नाही की, जो नित्य यंत्राप्रमाणे संसाराची सर्व कामे करतो त्याचे कल्याण कसे होईल? त्याचे कल्याण होईल अशी कोणती युक्ती दिसत नाही. कारण तसे तर सर्व लोक कर्म करतच असतात. एवढेच नव्हे तर, संपूर्ण जीव कर्म करतच राहतात पण त्या सर्वांचे कल्याण झालेले दिसत नाही आणि शास्त्रही असे सांगत नाही. याच्या उत्तरात भगवान म्हणतात—"**मत्प्रसादात्**". तात्पर्य हे आहे की, ज्याने केवळ माझाच आश्रय घेतला आहे त्याचे कल्याण माझ्या कृपेने होईल. याला मनाई करणारा कोण आहे ?

जरी संपूर्ण प्राण्यांवर भगवंताची आत्मीयता आणि कृपा सदा सर्वदा स्वतःसिद्ध आहे तरीपण हा मनुष्य जोपर्यंत असत् संसाराचा आश्रय घेऊन भगवंतापासून विमुख राहतो तोपर्यंत त्याच्यासाठी भगवत्कृपा फलीभूत होत नाही अर्थात् त्याच्या कामी येत नाही. परंतु हा मनुष्य भगवंताचा आश्रय घेऊन जस-जसा दुसरा आश्रय सोडत जातो तस-तसा भगवंताचा आश्रय दृढ होत जातो आणि जस-जसा भगवंताचा आश्रय दृढ होत जातो तस-तसा भगवत्कृपेचा अनुभव येत जातो. जेव्हा संपूर्णपणे भगवंताचा आश्रय घेतो तेव्हा त्याला

भगवंताच्या पूर्ण कृपेचा अनुभव येतो.

**अवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्**—स्वत:सिद्ध परम-पदाची प्राप्ती आपल्या कर्माने, आपल्या पुरुषार्थाने, अथवा आपल्या साधनाने होत नाही. ही प्राप्ती तर केवळ भगवत्-कृपेनेच होते. शाश्वत अव्यय पद सर्वोत्कृष्ट आहे. त्याच परमपदाला भक्तिमार्गात परमधाम, सत्यलोक, वैकुंठलोक, गोलोक, साकेतलोक इत्यादी म्हणतात आणि ज्ञानमार्गात विदेहकैवल्य, मुक्ती, स्वरूपस्थिती इत्यादी म्हणतात. ते परमपद तत्त्वाने एक असूनही मार्ग आणि उपासनांचा भेद असल्याने उपासकांच्या दृष्टीने भिन्न भिन्न म्हटले जाते (८।२१; १४।२७). भगवंताचा चिन्मयलोक एका विशिष्ट देशात असूनही सर्व ठिकाणी व्यापकरूपाने परिपूर्ण आहे. जेथे भगवान् आहेत तेथेच त्यांचा लोकही आहे कारण भगवान् आणि त्यांचा लोक तत्त्वाने एकच आहे. भगवान् सर्वत्र विद्यमान आहेत म्हणून त्यांचा लोकही सर्वत्र विद्यमान (सर्वव्यापी) आहे. जेव्हा भक्ताची अनन्यनिष्ठा सिद्ध होते तेव्हा परिच्छिन्नतेचा अत्यंत अभाव होतो आणि तोच लोक त्याचे समोर प्रगट होतो अर्थात् त्याला तेथे जिवंत असतानाच त्या लोकाच्या दिव्य लीलांचा अनुभव येऊ लागतो. परंतु ज्या भक्ताची धारणा अशी असते की, तो दिव्यलोक एका विशिष्ट देशातच असतो, तर त्याला त्या लोकाची प्राप्ती शरीर सोडल्यावरच होते. त्याला घेऊन जाण्याकरिता भगवंताचे पार्षद येतात आणि कधी कधी स्वत: भगवान्ही येतात.

**परिशिष्ट भाव**—ज्ञानयोग्यासाठी तर भगवंताने सांगितले की, त्याने सर्व विषयांचा त्याग करून संयमपूर्वक निरंतर ध्यानपरायण रहावे, तेव्हा तो अहंता, ममता, काम, क्रोध इत्यादीचा त्याग करून ब्रह्मप्राप्तीला पात्र होतो (अठराव्या अध्यायाचा एक्कावन्नावा, बावन्नावा, त्रेपन्नावा श्लोक). परंतु भक्तासाठी येथे सांगितले की, तो आपल्या वर्णाश्रमानुसार सर्व विहित कर्म सदा करूनही माझ्या कृपेने परमपदाला प्राप्त होतो. कारण त्याने माझा आश्रय घेतला आहे—'**मद्व्यपाश्रय:**'. तात्पर्य असे आहे की, भगवंताच्या चरणांचा आश्रय घेतल्यामुळे सुगमतेने कल्याण होते. भक्ताला आपले कल्याण स्वत: करावे लागत नाही, तर आपल्या बल, विद्या इत्यादीचा किंचिन्मात्रही आश्रय न ठेवता केवळ विश्वासपूर्वक भगवंताचाच आश्रय घ्यावा लागतो. मग भगवत्कृपाच त्याचे कारण करते—'**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं परमव्ययम्**'. भगवान्ही भक्ताच्या आश्रयाला पाहतात.* त्याच्या दोषांना पाहत नाहीत. रामायणात आले आहे—

**रहति न प्रभु चित चूक किए की । करत सुरति सय बार हिए की॥**

(बाल० २९।३)

**जन अवगुन प्रभु मान न काऊ । दीन बंधु अति मृदुल सुभाऊ॥**

(उत्तर० १।३)

'**मद्व्यपाश्रय:**' चा अर्थ आहे—माझा विशेष आश्रय अर्थात् अनन्य आश्रय, ज्यात दुसऱ्या कोणाचा किंचिन्मात्रही आश्रय नसावा.

**एक बानि करुनानिधान की । सो प्रिय जाकें गति न आन की॥**

(मानस अरण्य० १०।४)

*संबंध—पूर्व श्लोकात आपले सामान्य विधान (नियम) सांगून आता भगवान् पुढील श्लोकात अर्जुनाला विशेषरूपाने आज्ञा देतात.*

## चेतसा सर्वकर्माणि मयि सन्न्यस्य मत्पर:।
## बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्त: सततं भव॥५७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **चेतसा** | = चित्ताने | **मत्पर:** | = मत्परायण होऊन (तसेच) | **सततम्** | = निरंतर |
| **सर्वकर्माणि** | = संपूर्ण कर्म | | | **मच्चित्त:** | = माझ्यात चित्त असणारा |
| **मयि** | = मला | **बुद्धियोगम्** | = समतेचा | | |
| **सन्न्यस्य** | = अर्पण करून | **उपाश्रित्य** | = आश्रय घेऊन | **भव** | = हो. |

* ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्। (गीता ४।११)

*व्याख्या*— [या श्लोकात भगवंतांनी चार गोष्टी सांगितल्या आहेत-

**( १ ) चेतसा सर्वकर्माणि मयि सन्न्यस्य**—संपूर्ण कर्म चित्ताने मला अर्पण कर.

**( २ ) मत्परः**—स्व ला मला अर्पित कर.

**( ३ ) बुद्धियोगमुपाश्रित्य**—समतेचा आश्रय घेऊन संसाराशी संबंध-विच्छेद कर.

**( ४ ) मच्चित्तः सततं भव**—निरंतर माझ्या ठिकाणी चित्त असणारा हो अर्थात् माझ्याशी अटळ संबंध करून घे.]

**चेतसा सर्वकर्माणि मयि सन्न्यस्य**—चित्ताने कर्मांना अर्पित करण्याचे तात्पर्य असे आहे की, मनुष्याने चित्ताने असे दृढतेने मानावे की, मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर इत्यादी आणि संसारातील व्यक्ती, पदार्थ, घटना, परिस्थिती इत्यादी सर्व भगवंताचेच आहेत. भगवान्‌च या सर्वांचे मालक आहेत. यापैकी कोणतीही वस्तू कोणाची व्यक्तिगत नाही. केवळ या वस्तूंचा सदुपयोग करण्यासाठीच भगवंतांनी व्यक्तिगत अधिकार दिला आहे. या दिलेल्या अधिकारालाही भगवंताला अर्पण करायचे आहे.

शरीर, इंद्रिये, मन इत्यादींनी ज्या काही शास्त्रविहित सांसारिक अथवा पारमार्थिक क्रिया होतात त्या सर्व भगवंताच्या मर्जीनेच होतात. मनुष्य तर केवळ अहंकारामुळे त्यांना आपल्या मानतो. त्या क्रियांत जी आत्मीयता आहे तिला-ही भगवंताला अर्पण करायचे आहे. कारण ही आत्मीयता केवळ मूर्खपणाने मानलेली आहे वास्तविक नाहीच. म्हणून त्यांच्याविषयी असलेला आत्मीयतेचा भाव पूर्णपणे काढून घेतला पाहिजे आणि त्या सर्वांवर भगवंताचा शिक्का मोर्तब केला पाहिजे.

**मत्परः**—भगवंतच माझे परम आश्रय आहेत. त्यांच्या-शिवाय माझे काहीच नाही. मला काही करायचेही नाही, काही मिळवायचेही नाही, कोणाकडून काही घ्यायचेही नाही. अर्थात् देश, काळ, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, इत्यादींशी माझे किंचित्‌मात्र कोणतेही प्रयोजन नाही—असा अनन्यभाव होणे हेच भगवत्परायण होणे आहे.

एक गोष्ट विशेष लक्षात घेण्याची आहे की, रुपये-पैसे, कुटुंब, शरीर इत्यादींना माणसे आपले मानतात आणि मनात असे समजतात की, आम्ही यांचे मालक झालो. आमचे यांच्यावर अधिपत्य आहे परंतु वास्तविक ही गोष्ट अगदी खोटी आहे, निव्वळ भ्रम आहे आणि फार मोठा धोका आहे. जो ज्या वस्तूला आपली मानतो तो त्या वस्तूचा गुलाम बनतो आणि ती वस्तू त्याचा मालक बनते. मग तो त्या वस्तू-शिवाय राहू शकत नाही. म्हणून ज्या वस्तूंना मनुष्य आपली मानतो त्या सर्व त्याच्यावर सवार होतात आणि तो तुच्छ होतो. ती वस्तू मग रुपये असोत अथवा कुटुंबी असोत अथवा शरीर असो अथवा विद्या बुद्धी इत्यादी असोत. ह्या सर्व वस्तू प्राकृत आहेत आणि आपल्याहून भिन्न आहेत परंतु आहेत. यांच्या अधीन होणे म्हणजेच पराधीन होणे आहे.

भगवान् स्वकीय आहेत, आपले आहेत. त्यांना मनुष्य आपले मानेल तर ते मनुष्याला वश होतील. भगवंताच्या मनात भक्ताविषयी जितका आदर आहे तितका आदर करणारा संसारात दुसरा कोणीही नाही. भगवान् भक्ताचे दास बनतात आणि भक्ताला आपला मुकुटमणी बनवितात.—**"मै तो हूँ भगतनका दास भगत मेरे मुकुटमणि।"** परंतु संसार मनुष्याचा दास होऊन त्याला आपला मुकुटमणी बनविणार नाही. तो तर मनुष्याला आपला दास बनवून पद-दलितच करील. म्हणून केवळ भगवंतांना शरण होऊन संपूर्णपणे त्यांच्याच परायण झाले पाहिजे.

**बुद्धियोगमुपाश्रित्य**—संपूर्ण गीतेत पाहिले तर समतेचा फार महिमा गायिला आहे. मनुष्यात एक समता आली तर तो ज्ञानी, ध्यानी, योगी, भक्त इत्यादी सर्व काही बनला, परंतु जर त्याच्यात समता नसेल तर उत्तमोत्तम लक्षणे असूनही भगवान् त्याला पूर्ण मानीत नाहीत. ती समता मनुष्यात स्वाभाविक राहते. केवळ येणाऱ्या-जाणाऱ्या परिस्थितींशी संबंध जोडून तो सुखी-दुःखी होतो. म्हणून मनुष्याने त्यात सावध राहिले पाहिजे की, येणाऱ्या-जाणाऱ्या परिस्थिती-बरोबर मी नाही. सुख प्राप्त झाले, अनुकूल परिस्थिती आली तरीही मी आहे आणि सुख निघून गेले, अनुकूल परिस्थिती निघून गेली तरीही मी आहे. त्याचप्रमाणे दुःख आले, प्रतिकूल परिस्थिती आली तरीही मी आहे आणि दुःख निघून गेले, प्रतिकूल परिस्थिती निघून गेली तरीही मी आहे. म्हणून सुख-दुःखात, अनुकूलता-प्रतिकूलतेत, हानी-लाभात, मी सदैव जसाच्या तसाच राहतो. परिस्थितीं बदलल्या तरीही मी बदलत नाही, सदा तोच राहतो. अशा प्रकारे आपल्या स्वतः-मध्ये स्थित रहावे. आपल्या स्वतःमध्ये स्थित राहिल्याने सुख-दुःख इत्यादींत समता येईल. ही समताच भगवंताची आराधना आहे—**"समत्वमाराधनमच्युतस्य"** (विष्णुपुराण १।१७।९०) म्हणूनच भगवान् येथे बुद्धियोग अर्थात् समतेचा आश्रय घेण्यासाठी सांगत आहेत.

**मच्चित्तः सततं भव**—जो स्वतःला संपूर्णपणे

भगवंताना समर्पित करतो, त्याचे चित्तही संपूर्णपणे भगवंताच्या चरणावर समर्पित होते. मग त्याच्यावर भगवंताचा जो स्वतः स्वाभाविक अधिकार असतो तो प्रकट होतो आणि त्याच्या चित्तात स्वतः भगवान् येऊन विराजमान होतात. हेच "**मच्चित्तः**" होणे आहे.

"**मच्चित्तः**" पदाबरोबर "**सततम्**" पद देण्याचा अर्थ असा आहे की, निरंतर माझ्यात (भगवंतात) चित्त असणारा हो. जेव्हा "मी भगवंताचा आहे" अशा प्रकारे अहंता भगवंतात लागेल तेव्हाच भगवंताचे निरंतर चिंतन होईल. अहंता भगवंतात लागल्यावर चित्त आपोआप भगवंतात लागते. जसे शिष्य बनल्यावर "मी गुरूंचा आहे" अशा प्रकारे अहंता गुरूंत लागली तर गुरूंची आठवण नित्य-निरंतर कायम राहते. गुरूंचा संबंध अहंतेत बसल्यामुळे त्या संबंधाची आठवण आली तरी आठवण आहे आणि न आली तरी आठवण आहे. कारण स्व निरंतर राहतो. यातही विचार केला तर गुरूंशी संबंध त्याने स्वतः जोडलेला असतो परंतु या जीवाचा भगवंताशी स्वतःसिद्ध नित्य संबंध आहे. केवळ संसाराशी संबंध जोडल्यानेच नित्य-संबंधाची विस्मृती झाली आहे. ती विस्मृती मिटविण्यासाठी भगवान् म्हणतात की, निरंतर माझ्यात चित्त असणारा हो.

साधकाने कोणतेही सांसारिक काम करताना अशी दक्षता घ्यावी की, आपले चित्त त्या काम धंद्यात द्रवित होऊ देऊ नये, संसाराशी चित्त एकरूप होऊ देऊ नये, अर्थात् तदाकार होऊ देऊ नये उलट त्यात आपले चित्त कठोर ठेवावे. परंतु भगवन्नामाचा जप, कीर्तन, भगवत्कथा, भगवत्चिंतन इत्यादी भगवत्संबंधी कार्यांत चित्त द्रवित करीत रहावे, तल्लीन करीत रहावे, त्या रसात चित्त बुडवून टाकावे.* अशा प्रकारे करीत राहिल्यास साधक त्वरित भगवंतात चित्त असणारा होईल.

## प्रेमासंबंधी विशेष गोष्ट

चित्ताने सर्व कर्म भगवंताना अर्पण करण्याने संसाराशी नित्य-वियोग होतो† आणि भगवत्परायण झाल्याने नित्ययोग (प्रेम) होतो. नित्ययोगात योग, नित्ययोगात वियोग, वियोगात नित्ययोग आणि वियोगात वियोग या—चार अवस्था चित्तवृत्ती संबंधाने होतात. या चारही अवस्थांना अशा प्रकारे समजून घ्यावे—

जसे श्रीराधा आणि श्रीकृष्णाचे परस्पर मिलन होते त्यावेळी तो "नित्ययोगात योग" आहे. मिलन झाल्यावर-ही श्री राधाजीत असा भाव येतो की, प्रियतम कुठे तरी गेले आहेत आणि, ती एकदम उद्गारते "हे प्रियतम! आपण कोठे गेलात?" तर हा "नित्ययोगात वियोग" आहे. शामसुन्दर समोर नाहीत परंतु मनाने त्यांचेच गाढ चिंतन होत आहे आणि मनाला समोर प्रत्यक्ष भेटत असलेले दिसत आहेत तर हा "वियोगात नित्ययोग" आहे. शामसुन्दर थोडा वेळ समोर आले नाहीत परंतु मनात असा भाव आहे की, किती वेळ लोटला, शामसुन्दर आले नाहीत, काय करू? कोठे जाऊ? शामसुंदर कसे भेटतील? तर हा "वियोगात वियोग" आहे.

वास्तविक या चारही अवस्थेत भगवंताशी नित्ययोग जसाच्या तसा कायम राहतो, वियोग कधी होतच नाही, होऊ शकतच नाही आणि होण्याची संभावनाही नाही. याच नित्ययोगाला "प्रेम" म्हणतात. कारण प्रेमात प्रेमी आणि प्रेमास्पद दोन्ही अभिन्न असतात. तेथे भिन्नता कधी होऊच शकत नाही. प्रेमाचे आदान-प्रदान करण्यासाठीच भक्त आणि भगवान् यांच्यात संयोग-वियोगाची लीला होत असते.

हे प्रेम प्रतिक्षण वर्धमान कशा प्रकारे होते? जेव्हा प्रेमी आणि प्रेमास्पद परस्पर मिळतात तेव्हा "प्रियतम या-पूर्वी निघून गेले होते, त्यांच्याशी वियोग झाला होता. आता पुन्हा कोठे ते निघून तर जाणार नाहीत?" ‡हा भाव असल्यामुळे प्रेमास्पदाच्या मीलनात कधीच तृप्ती, संतोष होत नाही. ते निघून जातील—या भावनेने मन अधिक खेचले जाते. म्हणून या प्रेमाला प्रतिक्षण वर्धमान म्हटले आहे.

* काठिन्यं विषये कुर्याद् द्रवत्वं भगवत्पदे। उपायैः शास्त्रनिर्दिष्टैरनुक्षणमतो बुधः॥ (भक्तीरसायन १।३२)

† वास्तविक संसाराशी कधी संयोग होऊ शकत नाही. त्याचा तर नित्यच वियोग असतो. जसे मनात एखाद्या वस्तूचे चिंतन होते तर तो त्या वस्तूशी मानलेला संबंध आहे त्यामुळेच वस्तू मिळाली नाही तर दुःख होते. जेव्हा वस्तू (बाहेरुन) मिळते तेव्हा त्या वस्तूचा आतून वियोग होतो, त्यामुळे सुख होते. त्याचप्रमाणे एखाद्या कारणाने बाहेरची वस्तू नष्ट झाली तर मनाशी तिचा संयोग झाल्याने दुःख होते आणि विवेक-विचारद्वारा "ही वस्तू आपली नव्हतीच, आपली होऊच शकत नाही" अशा प्रकारे वस्तू मनातून काढून टाकल्यास सुख होते. तात्पर्य, आतून संयोग मानला तर बाहेरुन वियोग आहे आणि बाहेरुन संयोग मानला तर आतून वियोग आहे. म्हणून वास्तविक संसाराशी नित्यवियोगच असतो. मनुष्य केवळ भ्रमाने संसाराशी संबंध मानून घेतो.

‡ योग आणि वियोगात प्रेमरसाची वाढ होते. जर नेहमी योगच राहील, वियोग झाला नाही, तर प्रेमरस वाढणार नाही तर अखंड आणि एकरस राहील. म्हणून प्रेमरस वाढविण्यासाठी भगवान् अंतर्धानही होतात.

"प्रेमा" त (भक्ती) चार प्रकारचा रस अथवा रती असते—दास्य, सख्य, वात्सल्य आणि माधुर्य. या रसांमध्ये दास्यापेक्षा सख्य, सख्यापेक्षा वात्सल्य आणि वात्सल्यापेक्षा माधुर्यरस श्रेष्ठ आहे. कारण यात क्रमाने भगवंताच्या ऐश्वर्याची विस्मृती अधिक होत जाते. परंतु जेव्हा या चारीपैकी कोणत्याही एका रसात पूर्णता होते तेव्हा त्यात दुसऱ्या रसांची कमी राहत नाही अर्थात् त्यात सर्व रस येतात. जसे दास्यरस पूर्णतेला पोहचला तर त्यात सख्य, वात्सल्य आणि माधुर्य—तिन्ही रस येतात. हीच रीत अन्य रसांच्याविषयी समजावी. कारण हे आहे की, भगवान् पूर्ण आहेत, त्यांचे प्रेमही पूर्ण आहे आणि परमात्म्याचा अंश असल्याने जीव स्वतःही पूर्ण आहे. अपूर्णता तर केवळ संसाराच्या संबंधानेच येते. म्हणून भगवंताशी कोणत्याही रीतीने रती झाली तर ती पूर्ण होईल, त्यात कोणतीही कमी राहणार नाही.

**दास्य**—या रतीमध्ये भक्ताचा भगवंताविषयी असा भाव राहतो की, भगवान् माझे स्वामी आहेत आणि मी त्यांचा सेवक आहे. माझ्यावर त्यांचा पूर्ण अधिकार आहे. ते वाटेल ते करोत, वाटेल त्या परिस्थितीत ठेवोत आणि माझ्याकडून वाटेल तसे काम घेवोत. माझ्याशी अत्यधिक आत्मीयता असल्यानेच ते माझ्या सम्मतीशिवायच माझ्यासाठी सर्व विधान करतात.

**सख्य**—या रतीमध्ये भक्ताचा भगवंताविषयी असा भाव राहतो की, भगवान् माझे सखा आहेत आणि मी त्यांचा सखा आहे. ते माझे आवडते आहेत आणि मी त्यांचा आवडता आहे. त्यांचा माझ्यावर पूर्ण अधिकार आहे आणि माझा त्यांच्यावर पूर्ण अधिकार आहे. म्हणून मी त्यांचे ऐकतो. त्यांना ही माझे ऐकावे लागेल.

**वात्सल्य**—या रतीत भक्ताचा आपल्यात स्वामीभाव राहतो की, मी भगवंताची माता आहे अथवा त्यांचा पिता आहे अथवा त्यांचा गुरूआहे आणि तो आमचा पुत्र आहे, अथवा शिष्य आहे. म्हणून त्याचे पालन-पोषण करायचे आहे. त्याच्यावर लक्ष ठेवायचे आहे न जाणो कोठे जाऊन आपले नुकसान करून न घेवो. जसे नन्दबाबा आणि यशोदा माता कन्हैयावर लक्ष ठेवतात आणि तो वनात जातो तेव्हा त्याच्यावर लक्ष ठेवण्यासाठी बलरामदादांना त्याच्याबरोबर पाठवितात.

**माधुर्य**— * या रतीत भक्ताला भगवंताच्या ऐश्वर्याची विशेष विस्मृती राहते, म्हणून या रतीत भक्त भगवंताशी आपली अभिन्नता (घनिष्ट आत्मीयता) मानतो. अभिन्नता मानल्याने "त्यांच्यासाठी सुखदायी सामुग्री जुळवायची आहे. त्यांना सुख-आराम द्यायचा आहे, कोणतीच तकलीफ (त्रास) त्यांना होऊ नये—" असा भाव कायम राहतो.

प्रेमरस अलौकिक आहे, चिन्मय आहे. याचे आस्वादन करणारे केवळ भगवान्च आहेत. प्रेमात प्रेमी आणि प्रेमास्पद दोन्हीही चिन्मय तत्त्व असतात. कधी प्रेमी प्रेमास्पद बनतो तर कधी प्रेमास्पद प्रेमी बनतो. म्हणून एक चिन्मय तत्त्वच प्रेमाचे आस्वादन करण्यासाठी दोन रूपांत होते.

प्रेमाचे तत्त्व न समजल्यामुळे काही लोक सांसारिक "कामा" लाही प्रेम म्हणतात. त्यांचे असे म्हणणे अगदी चूक आहे कारण काम तर चौऱ्यांशी लाख योनींच्या संपूर्ण जीवात राहतो आणि त्या जीवांमध्येही जे भूत, प्रेत, पिशाच्च असतात त्यांच्यात काम (सुखभोगाची इच्छा) अत्यधिक असते. परंतु प्रेमाचे अधिकारी जीवन्मुक्त महापुरुषच असतात.

कामात घेणेच घेणे ही भावना राहते आणि प्रेमात देणेच देणे ही भावना राहते. कामात आपल्या इंद्रियांना तृप्त करण्याची, त्यापासून सुख भोगण्याची भावना राहते आणि प्रेमात आपल्या प्रेमास्पदाला सुख पोहचविणे तसेच सेवापरायण राहण्याचा भाव राहतो. काम केवळ शरीराच्या अनुषंगाने असतो आणि प्रेम स्थूल दृष्टीने शरीरात दिसत असूनही वास्तविक चिन्मय तत्त्वाशीच होते. कामात मोह (मूढभाव) राहतो आणि प्रेमात मोहाचा गंधही नसतो. कामात संसार तसेच संसाराचे दुःख भरलेले राहते आणि प्रेमात मुक्ती, तसेच मुक्तीपेक्षाही विलक्षण आनंद असतो. कामात जडतेची (शरीर, इंद्रिये इत्यादी) मुख्यता राहते आणि प्रेमात चिन्मयतेची (चेतन स्वरूप) मुख्यता राहते. कामात आसक्ती असते आणि प्रेमात त्याग असतो. कामात पारतंत्र्य असते

* लोक प्रायः माधुर्यभावात स्त्री-पुरुषाचा भावच समजतात, परंतु हा भाव स्त्री-पुरुषाच्या संबंधातच होतो असा नियम नाही. माधुर्य म्हणजे मधुरता, गोडी आणि ती गोडी भगवंताशी अभिन्न होण्याने येते. ती अभिन्नता जितकी अधिक राहील, मधुरताही तितकीच अधिक राहील. म्हणून दास्य, सख्य आणि वात्सल्य यापैकी कोणत्याही भावात पूर्णता झाल्यास त्यात मधुरतेची उणीव राहणार नाही. भक्तीच्या सर्व भावात माधुर्य भाव असतो.

अभेद आणि अभिन्नता यात भेद आहे. ज्यात केवळ एक तत्त्वच राहते, द्वैतभाव सर्वथा समाप्त होतो, त्याचे नाव "अभेद" आहे आणि दोन असूनही एक राहणे ही "अभिन्नता" आहे. जसे दोन मित्रात आतून घनिष्ठता असल्याने अभिन्नता राहते. अभिन्नता जितकी गाढ असते, तितकाच माधुर्यरस प्रकट होतो. यालाच प्रेमरस म्हणणात. भगवंतही या प्रेमरसाचे लोभी आहेत. या प्रेमरसाचे आस्वादन करण्यासाठीच भगवान् एकाचे अनेक रूपात प्रकट होतात. "एकाकी न रमते" (बृहदारण्यक १।४।३), "सदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति" (छान्दोग्य० ६।२।३)

आणि प्रेमात पारतंत्र्याचा लेशमात्रही राहत नाही अर्थात् संपूर्णपणे स्वतंत्रता राहते. कामात "तो माझ्या कामी यावा" असा भाव राहतो आणि प्रेमात "मी त्याच्या कामी लागावे" असा भाव राहतो. कामात कामी भोग्य वस्तूचा गुलाम बनतो आणि प्रेमात भगवान् स्वत: प्रेमीचे गुलाम बनतात. कामाचा रस नीरसतेत परिणत होतो आणि प्रेमाचा रस आनंदरूपाने प्रतिक्षण वाढतच राहतो. काम खिन्नतेने उत्पन्न होतो आणि प्रेम प्रेमास्पदाच्या प्रसन्नतेने प्रकट होते. कामात आपल्या प्रसन्नतेचाच उद्देश असतो आणि प्रेमात प्रेमास्पदाच्या प्रसन्नतेचाच उद्देश असतो. काममार्ग नरकाकडे घेऊन जाणारा आहे आणि प्रेममार्ग भगवंताकडे घेऊन जातो. कामात दोन असून दोनच राहतात अर्थात् द्वैधीभाव (भिन्नता अथवा भेद) कधी समाप्त होत नाही आणि प्रेमात एक असून दोन होतात अर्थात् अभिन्नता केव्हाच मिटत नाही.*

**परिशिष्ट भाव**—पूर्व श्लोकात शाश्वत पदाची प्राप्ती सांगून आता त्याचा विधी सांगतात की, ते कसे प्राप्त होईल. साधकासाठी दोनच विशेष काम आहेत—संसाराच्या संबंधाचा त्याग आणि भगवंताशी संबंध (प्रेम). पूर्व श्लोकात आलेल्या '**मद्व्यपाश्रय:**' पदात भगवंताच्या संबंधाची मुख्यता आहे आणि या श्लोकात आलेल्या '**बुद्धियोगमुपाश्रित्य**' पदात संसाराशी संबंध-विच्छेदाची मुख्यता आहे.

'**बुद्धियोगमुपाश्रित्य**' म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, संसाराचा सूक्ष्म संबंधही राहू नये—'**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनञ्जय**' (गीता २। ४९), कोणाविषयी किंचिन्मात्रही राग-द्वेष राहू नये.

एकमात्र भगवंताचे चिंतन करण्याने समता (बुद्धियोग) आपोआप येते, म्हणून '**मच्चित: सततं भव**' म्हटले आहे.

*संबंध—पूर्व श्लोकात दिलेली आज्ञा आता भगवान् पुढील दोन श्लोकांत क्रमाने अन्वय व्यतिरेक पद्धतीने दृढ करतात.*

**मच्चित्त: सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि॥ ५८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मच्चित्त:** | = माझ्यात चित्तवाला होऊन (तू) | **तरिष्यसि** | = तरून जाशील | | (माझी गोष्ट) |
| **मत्प्रसादात्** | = माझ्या कृपेने | **अथ** | = आणि | **श्रोष्यसि** | = ऐकणार |
| **सर्वदुर्गाणि** | = संपूर्ण विघ्ने | **चेत्** | = जर | **न** | = नाहीस (तर) |
| | | **त्वम्** | = तू | **विनङ्क्ष्यसि** | = तुझे पतन होईल. |
| | | **अहङ्कारात्** | = अहंकाराने | | |

*व्याख्या*—**मच्चित्त: सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि**—भगवान् म्हणतात की, माझ्यात चित्त असणारा झाल्यास तू माझ्या कृपेने संपूर्ण विघ्ने, बाधा, शोक, दु:ख इत्यादींना तरून जाशील अर्थात् त्यांना दूर करण्यासाठी तुला काहीही प्रयास करावे लागणार नाहीत.

भगवद्भक्ताने आपल्याकडून सर्व कर्म भगवंताना अर्पण केली, स्वत: भगवदर्पित झाला, समतेचा आश्रय घेऊन सांसारिक संयोगजन्य लोलुपतेपासून सर्वथा विमुख झाला आणि भगवंताशी अटळ संबंध जोडला. हे सर्व करूनही वास्तविक तत्त्वाच्या प्राप्तीत काही कमी राहिली किंवा सांसारिक लोकांपेक्षा आपल्यातील काही विशेषतेमुळे अभिमान आला अथवा अशाच प्रकारचे काही सूक्ष्म दोष राहिले तर त्या दोषांना दूर करण्याची साधकावर कोणतीही जबाबदारी राहत नाही, उलट त्या दोषांना, विघ्न-बाधांना, दूर करण्याची पूर्ण जबाबदारी भगवंताची राहते. म्हणून भगवान् म्हणतात—"**मत्प्रसादात्तरिष्यसि**" अर्थात् माझ्या कृपेने संपूर्ण विघ्ने, बाधा यांना तरून जाशील. याचे तात्पर्य असे निघाले की, भक्ताने आपल्याकडून त्याला जेवढे समजेल तेवढे कार्य सावधानतेने करावे, त्यानंतर जी काही कमतरता राहील ती भगवंताच्या कृपेने पूर्ण होईल.

मनुष्याकडून जो काही अपराध झाला आहे तो हाच झाला आहे की, त्याने संसाराशी आपला संबंध मानून घेतला आणि भगवंतापासून विमुख झाला. आता त्या अपराधाला दूर करण्यासाठी त्याने आपल्याकडून संसाराचा

---

* द्वैतं मोहाय बोधात्प्राग्जाते बोधे मनीषया। भक्त्यर्थं कल्पितं (स्वीकृतं) द्वैतमद्वैतादपि सुन्दरम्॥
पारमार्थिकमद्वैतं द्वैतं भजनहेतवे। तादृशी यदि भक्ति: स्यात्सा तु मुक्तिशताधिका॥ (बोधसार भक्ति० ४२-४३)
"बोधापूर्वीचे द्वैत मोहात पाडू शकते, परंतु बोध झाल्यावर भक्तीसाठी स्वीकृत द्वैत अद्वैतापेक्षाही अधिक सुन्दर असते." "वास्तविक तत्त्व तर अद्वैतच आहे परंतु भजनासाठी द्वैत आहे. अशी जर भक्ती असेल तर ती भक्ती मुक्तीपेक्षाही शतपट श्रेष्ठ आहे."

संबंध तोडून भगवंताना सम्मुख व्हावे. सम्मुख झाल्यास जी काही कमतरता राहील ती भगवंताच्या कृपेने पूर्ण होईल. आता पुढचे सर्व काम भगवान् करतील. तात्पर्य हे झाले की, भगवत्कृपा प्राप्त करण्यात संसाराशी लेशमात्रही संबंध मानणे आणि भगवंताला विमुख होणे—हीच बाधा होती. ही बाधा साधकाने मिटविली तर आता पूर्णतेची प्राप्ती भगवत्कृपा आपोआप करेल.

ज्याचा प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीरादीशी संबंध आहे, त्यालाच शास्त्रांचा विधि-निषेध, आपल्या वर्णाश्रमानुसार कर्तव्याचे पालन इत्यादी नियम लागू होतात आणि त्याने त्या त्या नियमांचे पालन जरूर केले पाहिजे. कारण प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीरादींच्या संबंधानेच पाप पुण्य होतात आणि त्यांचे फल सुख-दुःखही भोगावे लागते. म्हणून त्याचेवर शास्त्रीय मर्यादा आणि नियम विशेषतेने लागू होतात. परंतु जो प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य यांच्याशी संपूर्णपणे विमुख होऊन भगवंताना सम्मुख होतो तो शास्त्रीय विधि-निषेध आणि वर्णाश्रमांच्या मर्यादेचा दास राहत नाही. तो विधि-निषेधाच्याही पलीकडे जातो अर्थात् त्याला विधि-निषेध लागू होत नाहीत कारण विधि-निषेधाची मुख्यता प्रकृतीच्या राज्यातच राहते. प्रभूच्या राज्यात तर शरणागतीचीच मुख्यता राहते.

जीव साक्षात परमात्म्याचा अंश आहे (१५।७) जर त्याने केवळ आपल्या अंशी परमात्म्याकडेच वाटचाल केली तर त्याच्यावर देव, ऋषी, प्राणी, माता-पिता इत्यादी आप्तजन आणि आजोबा पणजोबा इत्यादी पितरांचेही कोणतेही ऋण राहत नाही.* कारण शुद्ध चेतन अंशाने यांच्यापासून कधी काही घेतलेच नाही. जेव्हा तो जड शरीराशी आपला संबंध जोडतो तेव्हा संबंध जोडल्यानेच त्याच्यात उणीव येते नाही तर त्याच्यात कधी उणीव येतच नाही.—**''नाभावो विद्यते सतः''** (२।१६) जर त्याच्यात कधी उणीव येतच नाही, तर मग तो त्यांचा ऋणी कसा होऊ शकतो? हेच संपूर्ण विघ्ने तरून जाणे आहे.

साधन काळात जीवननिर्वाहाची समस्या, शरीरात रोग इत्यादी अनेक विघ्न येणे—अशा बाधा येतात परंतु त्या आल्या असताही भगवत्कृपेचा आश्रय असल्याने साधक विचलित होत नाही. त्याला तर त्या विघ्न-बाधा इत्यादीत भगवंताची विशेष कृपाच दिसते. म्हणून त्याला विघ्न-बाधा बाधारूपाने दिसतच नाहीत उलट कृपारूपानेच दिसतात.

पारमार्थिक साधनात विघ्न-बाधा येण्याची तसेच भगवत्प्राप्तीत रूकावट होण्याची शक्यता राहते त्यासाठी भगवान् म्हणतात की, माझा आश्रय घेणाऱ्याची दोन्हीही कामे मी करीन. अर्थात् आपल्या कृपेने साधनेतील संपूर्ण विघ्न-बाधांनाही दूर करीन आणि त्या साधनाद्वारा आपली प्राप्तीही करून देईन.

**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि**—भगवान् अत्यंत कृपाळू असल्यामुळे आत्मीयतेने अर्जुनास म्हणत आहेत की, **''अथ''** पक्षान्तरात मी जे काही सांगितले आहे त्याला न मानता जर अहंकाराने अर्थात् ''मीही काही जाणतो, करतो, तसेच मी काही समजू शकतो, काही करू शकतो'' इत्यादी भावामुळे तू माझे म्हणणे ऐकले नाहीस, माझ्या संकेतानुसार वागणार नाहीस, माझी आज्ञा पाळणार नाहीस तर तुझे पतन होईल—**''विनङ्क्ष्यसि।''**

जरी अर्जुन भगवंतांनी सांगितलेले मानणार नाही ही गोष्ट किंचितही संभवत नाही तरीपण भगवान् म्हणतात की **''चेत्''**-जर तू माझे म्हणणे ऐकणार नाहीस तर तुझे पतन होईल. तात्पर्य हे आहे की, जर तू अज्ञानाने, अर्थात् अजाणतेपणाने, एखादी चूक झाल्यामुळे माझे म्हणणे ऐकले नाहीस तर ते सर्व क्षम्य आहे परंतु जर तू अहंकाराने माझे म्हणणे ऐकणार नाहीस तर तुझे पतन होईल कारण अहंकाराने माझे म्हणणे न ऐकल्यामुळे तुझा अभिमान वाढेल, जो संपूर्ण आसुरी-संपत्तीचे मूळ आहे.

पूर्वी चौथ्या अध्यायामध्ये भगवंतांनी स्वतः आपल्या श्रीमुखाने अर्जुनाला असे म्हटले आहे की, तू माझा भक्त व प्रिय सखा आहेस-**''भक्तोऽसि मे सखा चेति''** (४।३) आणि पुढे नवव्या अध्यायात त्यांनी म्हटले की, हे अर्जुन! तू प्रतिज्ञा कर की, माझ्या भक्ताचे पतन होत नाही—**''कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति''** (९।३१) यावरुन सिद्ध झाले की, अर्जुन भगवंताचे भक्त आहेत म्हणून ते कधीही भगवंताला विमुख होऊ शकत नाहीत

* देवर्षिभूताप्तनृणां पितृणां न किङ्करो नायमृणी च राजन्।
सर्वात्मना यः शरणं शरण्यं गतो मुकुन्दं परिहृत्य कर्तम्॥ (श्रीमद्भा० ११।५।४१)
''राजन्! जो सर्व कार्ये सोडून संपूर्णपणे शरणागतवत्सल भगवंताना शरण होतो, तो देव, ऋषी, प्राणी, कुटुंबीजन आणि पितृगण—यापैकी कोणाचाही ऋणी आणि सेवक राहत नाही''

आणि त्यांचे पतनही कधी होऊ शकत नाही. परंतु ते अर्जुन-ही जर भगवंताचे म्हणणे ऐकणार नाहीत तर भगवंताना विमुख होतील आणि भगवंताला विमुख झाल्यामुळे त्यांचेही पतन होईल. तात्पर्य असे आहे की, भगवंताना विमुख होण्यामुळेच प्राण्याचे पतन होते अर्थात् तो जन्म-मरणाच्या चक्रात सापडतो. (९।३;१६।२०)

## विशेष गोष्ट

याच अध्यायाच्या छपन्नाव्या श्लोकात भगवंतांनी प्रथम पुरुष "**अवाप्नोति**" चा प्रयोग करून सामान्य रीतीने सर्वांसाठी म्हटले आहे की, माझ्या कृपेने परमपदाची प्राप्ती होते आणि येथे मध्यम पुरुष "**तरिष्यसि**" चा प्रयोग करून अर्जुनासाठी म्हणतात की, माझ्या कृपेने तू सर्व विघ्न बाधांना तरून जाशील. या दोन्हींचे तात्पर्य हे आहे की, भगवंताच्या कृपेत जी शक्ती आहे, ती शक्ती कोणत्याही साधनात नाही. याचा अर्थ असा नाही की, साधन करू नये, उलट परमात्मप्राप्तीसाठी साधन करणे मनुष्याचा स्वाभाविक धर्म असला पाहिजे कारण मनुष्यजन्म केवळ परमात्मप्राप्तीसाठीच मिळाला आहे. मनुष्यजन्म प्राप्त करूनही जो परमात्मप्राप्ती करून घेत नाही, तो जरी उच्चाती उच्च लोकात गेला तरीही त्याला पुन्हा परत संसारात (जन्म-मरण) यावेच लागेल* (८।१६) म्हणून जर हे मनुष्यशरीर प्राप्त झाले आहे तर मग मनुष्याने जिवंतपणीच परमात्मप्राप्ती करून घेतली पाहिजे आणि जन्म-मरणरहित झाले पाहिजे. कर्मयोग्यासाठीही भगवंतांनी म्हटले आहे की, समतायुक्त पुरुष जिवंतपणीच पुण्य आणि पाप दोन्हीपासून रहित होतो. (२।५०) तात्पर्य हे झाले की, सर्वथा कर्मबंधनरहित होणे अर्थात् जन्म-मरणरहित होणे प्रत्येक मानवाचे परम ध्येय आहे.

दहाव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, मी आपल्या कृपेने भक्तांच्या अंतःकरणात ज्ञान प्रकाशित करतो आणि अकराव्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, मी आपल्या कृपेनेच विराटरूप दाखविले आहे. त्याच कृपेच्या संदर्भाने भगवान् येथे म्हणत आहेत की, माझ्या कृपेने परम-पदाची प्राप्ती होईल. (१८।५६) आणि माझ्या कृपेनेच संपूर्ण विघ्नांना तरून जाशील (१८।५८). परमपद प्राप्त झाल्यास कोणत्याही प्रकारची विघ्न-बाधा समोर येण्याची शक्यताच राहत नाही. असे असले तरी संपूर्ण बाधा तरून जाण्याविषयी म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, अर्जुनाच्या मनात असे भय घर करून बसले होते की, युद्ध करण्याने मला पाप लागेल, युद्धामुळे कुलपरंपरा नष्ट होत असल्याने पितरांचे पतन होईल आणि अशा प्रकारे अनर्थ परंपरा वाढतच जाईल. आम्ही राज्य लोभाने असे महान् पाप करण्यास तयार झालो आहोत म्हणून मी शस्त्र खाली ठेवून बसलो आणि धृतराष्ट्राच्या पक्षाच्या लोकांनी मला मारले तरीही माझे कल्याणच होईल. (१।३६-४६) ह्या सर्व गोष्टी आणि अनेक जन्मांचे दोष यांचा संदर्भ लक्षात घेऊन भगवान् अर्जुनाला म्हणतात की, माझ्या कृपेने तू सर्व विघ्ने, पापे तरून जाशील—"**सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि**". भगवंतांनी बहुवचनात "**दुर्गाणि**" पद देऊनही त्याबरोबर "**सर्व**" शब्द आणखी जोडला आहे. याचे तात्पर्य हे आहे की, माझ्या कृपेने तुझे किंचिन्मात्रही पाप राहणार नाही, कोणतेही बंधन राहणार नाही आणि माझ्या कृपेने सर्वथा शुद्ध होऊन तू परमपदाला प्राप्त होशील.

**परिशिष्ट भाव**—भक्ताचे काम केवळ भगवंताचा आश्रय घेणे आहे, भगवंताचेच चिंतन करणे आहे. मग त्याचे सर्व काम भगवान्च करतात. भगवान् भक्तावर विशेष कृपा करून त्याच्या साधनाच्या संपूर्ण विघ्न-बाधांनाही नाहीसे करतात आणि आपली प्राप्तीही करवितात—'**योगक्षेमं वहाम्यहम्**' (गीता ९।२२). म्हणून ब्रह्मसूत्रात आले आहे—'**विशेषानुग्रहश्च**' (३।४।३८). 'भगवंताच्या भक्तीचे अनुष्ठान करण्याने भगवंताचा विशेष अनुग्रह होतो.' वास्तविक मनुष्यावर भगवंताची कृपा तर आहेच, परंतु भगवंताचा आश्रय घेतल्याने भक्ताला त्याचा विशेष अनुभव होतो.

**यदहङ्कारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति॥५९॥**

---

* येऽन्येऽरविन्दाक्ष विमुक्तमानिनस्त्वय्यस्तभावादविशुद्धबुद्धयः। आरुह्य कृच्छ्रेण परं पदं ततः पतन्त्यधोऽनादृतयुष्मदङ्घ्रयः॥
(श्रीमद्भा० १०।२।३२)

"हे कमलनयन! जे लोक आपल्या चरणी शरण आले नाहीत आणि आपल्या भक्तीपासून रहित असल्यामुळे ज्यांची बुद्धीही शुद्ध नाही, ते स्वतःला मुक्त तर मानतात, परंतु वास्तविक ते बद्धच आहेत. ते जरी कष्टपूर्वक साधन करून उच्च पदावर पोहचले तरीही ते तेथून खाली पडतात."

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अहङ्कारम्** | = अहंकाराचा | | की, (मी) | **मिथ्या** | = मिथ्या (खोटा) आहे (कारण) |
| **आश्रित्य** | = आश्रय घेऊन | **न, योत्स्ये** | = युद्ध करणार नाही, | **प्रकृतिः** | = (तुझी) क्षात्रप्रकृती |
| **यत्** | = (तू) जे | **ते** | = तुझा | **त्वाम्** | = तुला |
| **इति** | = असे | **एषः** | = हा | **नियोक्ष्यति** | = युद्ध करायला लावील. |
| **मन्यसे** | = मानीत आहेस | **व्यवसायः** | = निश्चय | | |

*व्याख्या*— **यदहङ्कारमाश्रित्य**—प्रकृतीपासूनच महत्तत्त्व आणि महत्तत्त्वापासून अहंकार उत्पन्न झाला आहे. त्या अहंकाराचाही एक विकृत अंश ''मी शरीर आहे'' हा आहे. या विकृत अहंकाराचा आश्रय घेणारा पुरुष कधीही क्रिया-रहित राहू शकत नाही. कारण प्रकृती नित्य क्रियाशील आहे, बदलणारी आहे म्हणून तिच्या आश्रित राहणारा कोणीही मनुष्य कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. (३।५)

जेव्हा मनुष्य अहंकारपूर्वक क्रियाशील प्रकृतीला वश होतो तेव्हा तो हे कसे म्हणू शकतो की, मी अमुक कर्म करेल आणि अमुक कर्म करणार नाही अर्थात् प्रकृतीच्या परवश झालेला मनुष्य करणे आणि न करणे यातून सुटणार नाही. कारण प्रकृतिपरवश मनुष्याचे तर ''करणे'' ही कर्म आहे आणि ''न करणे'' ही कर्म आहे. परंतु जेव्हा मनुष्य प्रकृतीपरवश नसतो, त्यापासून निर्लिप्त होतो (जे त्याचे वास्तविक स्वरूप आहे) तेव्हा त्याचे करणे आणि न करणे दोन्हीही म्हणता येत नाहीत. तात्पर्य हे आहे की, जो प्रकृतीशी संबंध ठेवतो आणि कर्म करू इच्छित नाही, त्याला ही गोष्ट शक्य नाही. परंतु ज्याने प्रकृतीशी संबंध-विच्छेद केला आहे अथवा जो भगवंताला पूर्णपणे शरण झाला आहे त्याला कर्म करण्यास बाध्य व्हावे लागत नाही.

**न योत्स्य इति मन्यसे**—दुसऱ्या अध्यायात अर्जुनाने भगवंताला शरण होऊन उपदेशाची प्रार्थना केली— ''**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्**'' (२।७) आणि त्यानंतर अर्जुनाने स्पष्ट सांगितले की, ''मी युद्ध करणार नाही''—''**न योत्स्ये**'' (२।९) ही गोष्ट भगवंतांना आवडली नाही. भगवान् मनात विचार करतात की, हा प्रथम तर मला शरण आला आणि नंतर मी काही न म्हणतानाच तो स्वत:हून स्पष्ट म्हणतो की, मी युद्ध करणार नाही, तर मग माझी शरणागती कुठे राहिली ? ही तर अहंकाराची शरणागती झाली. कारण वास्तविक शरणागत झाल्यास ''मी असे करेल, असे करणार नाही'' असे म्हणता येत नाही. भगवंताना शरण झाल्यास भगवान् जसे करा म्हणतील, तसेच करावे लागेल. या गोष्टीचे भगवंताना हसू आले (२।१०) परंतु अर्जुनावर अत्यधिक कृपा आणि स्नेह असल्यामुळे भगवंतांनी उपदेश करणे आरंभ केले, नाही तर भगवान् त्याचवेळी हे म्हटले असते की, ''तुला इच्छा असेल तसे कर''—''**यथेच्छसि तथा कुरु**'' (१८।६३) परंतु अर्जुनाचे हे म्हणणे की, ''मी युद्ध करणार नाही'' भगवंतांना फार खटकले. म्हणून भगवंतांनी येथे अर्जुनाच्या त्याच ''**न योत्स्ये**'' शब्दांचा प्रयोग करून हे म्हटले आहे की, तू अहंकारालाच शरण आहेस, मला शरण नाहीस. जर तू मला शरण झाला असतास तर ''मी युद्ध करणार नाही'' असे म्हणणे शक्यच नव्हते. मला शरण असतास तर करणे वा न करणे याची जबाबदारी माझ्यावर आली असती. याशिवाय मला शरणागत झाल्यास ही प्रकृतीही तुला बाध्य करू शकत नव्हती (७।१४) ही त्रिगुणमयी माया अर्थात् प्रकृती, जो मला शरण झाला नाही त्यालाच बाध्य करते (७।१३) कारण हा नियम आहे की, प्रकृतीच्या प्रवाहात पडलेला प्राणी प्रकृतीच्या गुणांद्वारे सदाच परवश राहतो.

ही एक मोठी मार्मिक गोष्ट आहे की, माणसे ज्या प्राकृत पदार्थांना आपले मानतात त्या पदार्थांचे सदाच परवश (पराधीन) होतात. त्यांना भ्रम तर असा असतो की, आम्ही या पदार्थांचे मालक आहोत परंतु त्यांचे गुलाम होतात. परंतु ज्या पदार्थांना आपले मानत नाहीत त्या पदार्थांच्या परवश होत नाहीत. म्हणून मनुष्याने कोणत्याही प्राकृत पदार्थाला आपले मानू नये कारण ते वास्तविक आपले नाहीतच. आपले तर वास्तविक केवळ भगवानच आहेत. त्या भगवंताना आपले मानल्याने मनुष्याची परवशता कायमची समाप्त होते. तात्पर्य हे झाले की, मनुष्य क्रियां आणि पदार्थांना आपले मानतो त्यावेळी तो सर्वथा परतंत्र होतो आणि भगवंताला आपले मानतो आणि त्यांना अनन्य शरण होतो त्यावेळी सर्वथा स्वतंत्र होतो. प्रभूला शरणागत झाल्यावर परतंत्रता लेशमात्रही राहत नाही—हे शरणागतीचे माहात्म्य आहे परंतु जे प्रभूला शरण न होता अहंकाराला शरण जातात ते मृत्यूमार्गात (संसारात) वाहून जातात.—''**निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि**'' (९।३) याच गोष्टीची जाणीव देऊन भगवान् अर्जुनाला म्हणत आहेत की, तू जे हे म्हणत आहेस की, मी युद्ध करणार नाही, तर तुझे हे म्हणणे, तुझा हा हट्ट चालणार नाही. तुला क्षात्र-प्रकृतीला परवश होऊन युद्ध करावेच लागेल.

**मिथ्यैष व्यवसायस्ते**—व्यवसाय अर्थात् निश्चय दोन प्रकारचा असतो—वास्तविक आणि अवास्तविक! परमात्म्याशी आपला जो नित्यसंबंध आहे त्याचा निश्चय करणे तर वास्तविक आहे आणि प्रकृतीशी मिळून प्राकृत पदार्थांचा निश्चय करणे अवास्तविक आहे. परमात्म्याविषयीच्या निश्चयात स्व ची प्रधानता राहते आणि प्रकृतीविषयक निश्चयात अंत:-करणाची प्रधानता राहते. म्हणून भगवान् येथे अर्जुनाला म्हणत आहेत की, अहंकाराचा अर्थात् प्रकृतीचा आश्रय घेऊन तू जे हे म्हणत आहेस की, मी युद्ध करणार नाही, असा तुझा (क्षात्र-प्रकृतीविरुद्ध) निश्चय अवास्तविक अर्थात् खोटा आहे, मिथ्या आहे. आश्रय परमात्म्याचाच असला पाहिजे, प्रकृती आणि प्रकृतीच्या कार्याचा (संसाराचा) असता कामा नये.

जर प्राण्याने असा निश्चय केला की, मी परमात्म्याचाच आहे आणि मला केवळ परमात्म्याकडेच वाटचाल करावयाची आहे तर त्याचा हा निश्चय वास्तविक अर्थात् सत्य आहे, नित्य आहे. अशा निश्चयाचे माहात्म्य भगवंतांनी नवव्या अध्यायाच्या तीसाव्या श्लोकात सांगितले आहे की, जर दुराचाराती दुराचारी मनुष्यसुद्धा अनन्यभावाने माझे भजन करतो तर त्याला दुराचारी मानू नये उलट साधूच मानावे कारण त्याने वास्तविक निश्चय केला आहे की, मी भगवंताचा आहे आणि भगवंताचेच भजन करीन.

**प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति**—या पदांनी भगवान् म्हणतात की, तुझा क्षात्र-स्वभाव तुला जबरीने युद्ध करायला लावील. क्षत्रियाचा स्वभाव शूरवीरता, युद्धात पाठ न दाखविणे (१८।४३) असा आहे. म्हणून धर्ममय युद्ध समोर आल्यास तू युद्ध केल्याशिवाय राहू शकणार नाहीस.

**परिशिष्ट भाव**—पूर्व श्लोकात ही गोष्ट आली आहे की, अहंकारामुळे 'फल' योग्य मिळणार नाही आणि या श्लोकात ही गोष्ट आली आहे की, अहंकारामुळे 'क्रिया' योग्य होणार नाही. तात्पर्य हे आहे की, ऐकणे किंवा न ऐकणे यामुळे पतन होणार नाही, तर अहंकारामुळे पतन होईल. कर्म करणे अथवा न करणे बाधक नाही, तर अहंकार बाधक आहे.

भगवंताने म्हटले आहे की, मी आपली प्राप्तीही करवील आणि तुझे विघ्नेही नाहीसे करील (अठराव्या अध्यायाच छपन्नावा आणि अठ्ठावन्नावा श्लोक). परंतु एवढे म्हटले तरीही अर्जुन बोलले नाहीत, वास्तविक त्यांनी येथे '**करिष्ये वचनं तव**' म्हणायला पाहिजे होते. तेव्हा भगवान् म्हणतात की, जर तू माझी गोष्ट नासमजीने ऐकिली नाहीस तर काही हरकत नाही, परंतु जर तू माझी गोष्ट अहंकाराने ऐकणार नाहीस तर तुझे पतन होईल. भगवंताचा भाव असा आहे की, जसे भक्ताचे सर्व काम (साधन आणि सिद्धी) जर मी करतो, तर भक्तानेही तसेच सर्व प्रकाराने माझाच आश्रय घ्यावा. परंतु माझा आश्रय न घेता तो अहंकाराचा आश्रय घेईल तर त्याचे पतन होईल. अहंकाराचा आश्रय घेतल्याने '**मद्व्यपाश्रय**' होणार नाही, कारण माझ्या आश्रयाच्या ऐवजी माझ्या अपरा-प्रकृतीचा 'अहंकाराचा' आश्रय घेतला. कर्तव्यकर्मात (युद्धात) एक तर मी लावतो आणि एक प्रकृती लावते. जर तू माझी गोष्ट मानणार नाहीस, तर तुझी क्षात्रप्रकृती तुला युद्धात प्रवृत्त करील. प्रकृती लावील तर जबाबदारी तुझ्यावर राहील आणि माझी गोष्ट ऐकून कर्तव्यात लागशील तर जबाबदारी माझ्यावर राहील. तुझी जबाबदारी झाल्यास तू बद्ध होशील आणि माझ्यावर जबाबदारी राहिल्यास तू मुक्त होशील.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले की, प्रकृती तुला कर्म करावयास लावील, आता पुढील श्लोकात त्याचेच विवेचन करीत आहेत.*

## स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा।
## कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत्॥ ६०॥

**कौन्तेय** = हे कुंतीनंदन!
**स्वेन** = आपल्या
**स्वभावजेन** = स्वभावजन्य
**कर्मणा** = कर्माने
**निबद्धः** = बांधलेला (तू)
**मोहात्** = मोहामुळे
**यत्** = जे युद्ध
**कर्तुम्** = करू
**इच्छसि** = इच्छित
**न** = नाहीस,
**तत् अपि** = तेही (तू)
**अवशः** = (क्षात्र-प्रकृतीला) परवश होऊन
**करिष्यसि** = करशील.

***व्याख्या*— स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा**—पूर्वजन्मात कर्म व गुणांच्या जशा वृत्ती होत्या, या जन्मात माता-पित्याचे जसे संस्कार आहेत, जन्मानंतर जसे पाहिले, ऐकले आहे, जसे शिक्षण मिळाले आहे आणि जशी कर्म केली आहेत—त्या सर्वांमुळे आपली जी कर्म करण्याची सवय बनली आहे, त्याचे नाव स्वभाव आहे.

याला भगवंतांनी स्वभावजन्य स्वकीय कर्म म्हटले आहे. यालाच स्वधर्महीं म्हणतात—"**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितु मर्हसि।**" (२।३१)

**कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत्**—स्वभावजन्य क्षात्र-प्रकृतीने बांधलेला तू मोहामुळे जे करू इच्छित नाहीस, ते तू परवश होऊन करशील. स्वभावानुसार-च शास्त्रांनी कर्तव्यपालनाची आज्ञा दिली आहे. त्या आज्ञेत जरी दुसऱ्यांच्या कर्मांपेक्षा आपल्या कर्मांत काही उणीव अथवा दोष दिसले तरी ते दोष बाधक (पापजनक) होत नाहीत-"**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्**" (३।३५; १८।४७). त्या स्वभावज कर्मानुसार (क्षात्र धर्म) तू युद्ध करण्यासाठी परवश आहेस. तुझा युद्धरूप कर्तव्य न करण्याचा विचार मूढतापूर्वक केलेला आहे.

जे जीवन्मुक्त महापुरुष असतात त्यांचा स्वभाव सर्वथा शुद्ध असतो. म्हणून त्यांच्यावर स्वभावाचे अधिपत्य राहत नाही. अर्थात् ते स्वभावपरवश नसतात. असे असले तरी ते एखाद्या कामात प्रवृत्त झाले तर आपल्या प्रकृतीनुसारच (स्वभाव) काम करतात. परंतु साधारण माणसे प्रकृतीला परवश होतात म्हणून त्यांचा स्वभाव त्यांना जबरीने कर्मामध्ये लावतो. (३।३३) भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तुझा क्षात्रस्वभावसुद्धा तुला जबरीने युद्ध करायला लावील. परंतु त्याचे फल तुला चांगले मिळणार नाही. जर तू शास्त्र, अथवा संत महापुरुषांच्या आज्ञेने किंवा माझ्या आज्ञेने युद्धरूप कर्म केले, तर तेच कर्म तुझ्यासाठी कल्याणकारी होईल. कारण शास्त्र अथवा माझ्या आज्ञेने कर्म करण्याने त्या कर्मात जे राग-द्वेष आहेत, ते स्वाभाविकच समाप्त होत जातील, कारण तुझी दृष्टी आज्ञेकडे राहील, राग-द्वेषाकडे राहणार नाही. म्हणून ते कर्म बंधनकारक न होता कल्याणकारकच होतील.

## विशेष गोष्ट

गीतेत प्रकृतीच्या परवशतेबद्दल विषय सामान्यरूपाने कित्येक ठिकाणी आला आहे. (जसे ३।५; ८।१९; ९।८ इत्यादी) परंतु दोन ठिकाणी प्रकृतीच्या परवशतेबद्दल विषय विशेषरूपाने आला आहे—"**प्रकृतिं यान्ति भूतानि**" (३।३३) आणि येथे "**प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति**" (१८।५९).* यावरुन स्वभावाची प्रबलताच सिद्ध होते कारण कोणताही प्राणी ज्या कोण्या योनीत जन्म घेतो, त्याची प्रकृती अर्थात् स्वभाव त्याच्या बरोबर राहतो. जर त्याचा स्वभाव परम शुद्ध असेल अर्थात् स्वभावात सर्वथा असंगता असेल तर त्याचा जन्मच कशाला होईल? जरी त्याचा जन्म झाला तरी त्यात स्वभावाचीच मुख्यता राहील—"**कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु**" (१३।२१) जर स्वभावाचीच मुख्यता अथवा परवशता राहते आणि प्रत्येक क्रिया स्वभावानुसारच होते, तर मग शास्त्रांचा विधि-निषेध कोणावर लागू होईल? गुरुजनांचा उपदेश कोणाच्या कामी येईल? आणि मनुष्य दुर्गुण-दुराचारांचा त्याग करून सद्गुण-सदाचारांमध्ये कसा प्रवृत्त होईल?

उपर्युक्त प्रश्नाचे उत्तर असे आहे की, जसा मनुष्य गंगेच्या प्रवाहाला तर रोखू शकत नाही परंतु तिच्या प्रवाहाला वळवू शकतो, फिरवू शकतो. त्याचप्रमाणे मनुष्य आपल्या वर्णोचित स्वभावाला सोडू तर शकत नाही परंतु भगवत्-प्राप्तीचा उद्देश ठेवून त्याला राग-द्वेषरहित परम शुद्ध, निर्मळ बनवू शकतो. तात्पर्य हे आहे की, स्वभाव शुद्ध बनविण्यात प्रत्येक मनुष्य संपूर्णपणे सबल आणि स्वतंत्र आहे, निर्बल आणि परतंत्र नाही. निर्बलता आणि परतंत्रता तर केवळ राग-द्वेष झाल्यानेच प्रतीत होते.

आता या स्वभावाला सुधारण्यासाठी भगवंतांनी गीतेत कर्मयोग आणि भक्तियोग यांच्या दृष्टीने दोन उपाय सांगितले आहेत—

(१) **कर्मयोगाच्या दृष्टीने**—तीसऱ्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी सांगितले आहे की, मनुष्याचे मुख्य शत्रू राग-द्वेषच आहेत म्हणून राग-द्वेष यांना वश होऊ नये. अर्थात् राग-द्वेषयुक्त होऊन कोणतेही कर्म करू नये उलट शास्त्राज्ञेनुसारच प्रत्येक कर्म केले पाहिजे. शास्त्राज्ञेनुसार अर्थात् शिष्य गुरूंची, पुत्र माता-पित्याची, पत्नी पतीची, आणि नोकर मालकाच्या आज्ञेनुसार प्रसन्नतापूर्वक सर्व कर्म करत असेल तर त्याच्यात राग-द्वेष राहत नाहीत. कारण आपल्या मनाने कर्म करण्यानेच राग-द्वेष पुष्ट होतात. शास्त्रादीच्या आज्ञेनुसार कार्य करण्याने आणि कधी दुसरे नवीन कार्य करण्याचे मनात आल्यास सुद्धा शास्त्राज्ञा नसल्यामुळे ते कार्य आम्ही केले नाही तर त्यामुळे आमचा "राग" समाप्त होईल आणि कधी एखादे कार्य करावयाचे मनात नसूनही शास्त्राज्ञा असल्यामुळे ते प्रसन्नतापूर्वक करण्याने "द्वेष" नाहीसा होइल.

(२) **भक्तियोगाच्या दृष्टीने**—जेव्हा मनुष्य ममत्व

* ज्ञानयोगात ज्ञानी प्रकृतीशी संबंध-विच्छेद करून घेतो, म्हणून त्याच्यासाठी प्रकृती-परवशतेबद्दल उल्लेख आला नाही.

असलेल्या वस्तूंसह स्वत: भगवंतांना शरण होतो तेव्हा त्याच्याजवळ आपले म्हणून काही राहत नाही. तो भगवंताच्या हातातील कठपुतळी बनतो. मग भगवंताच्या आज्ञेनुसार, त्यांच्या इच्छेनुसारच त्याच्याकडून सर्व कार्य होतात, ज्यामुळे त्याच्या स्वभावात राहणारे राग-द्वेष नष्ट होतात.

तात्पर्य हे झाले की, कर्मयोगामध्ये राग-द्वेषाला वशीभूत न होता कार्य करण्याने स्वभाव शुद्ध होतो (३।३४) आणि भक्तियोगामध्ये भगवंताना संपूर्णपणे अर्पित होण्याने स्वभाव शुद्ध होतो. (१८।६२) स्वभाव शुद्ध झाल्यास बंधनाचा कोणता प्रश्नच राहत नाही.

मनुष्य जे काही कर्म करतो ते कधी राग-द्वेषाला वशीभूत होऊन करतो आणि केव्हा सिद्धांतानुसार करतो. राग-द्वेषयुक्त होऊन कर्म करण्याने राग-द्वेष दृढ होतात आणि मग मनुष्याचा तसाच स्वभाव बनतो. सिद्धांतानुसार कर्म करण्याने त्याचा सिद्धांतानुसारच करण्याचा स्वभाव बनतो. जी माणसे परमात्मप्राप्तीचा उद्देश ठेवून शास्त्र आणि महापुरुषांच्या सिद्धांतानुसार कर्म करतात आणि जी परमात्म्याला प्राप्त झाली आहेत, त्या दोन्हींची (साधक आणि सिद्ध महापुरुष) कर्म जगासाठी आदर्श होतात, अनुकरणीय होतात. (३।२१)

**परिशिष्ट भाव**—स्वभाव दोन प्रकारचा असतो—(१) विहित कर्मांचा स्वभाव आणि (२) निषिद्ध कर्मांचा स्वभाव, यात विहित कर्मांचा स्वभाव तर सहज असल्याने 'स्व-स्वभाव' आहे, परंतु निषिद्ध कर्मांचा स्वभाव आगंतुक असल्याने 'पर-स्वभाव' आहे. विहित कर्मांचा स्वभाव तर सजातीय असल्यामुळे जन्य नाही, परंतु निषिद्ध कर्मांचा स्वभाव विजातीय असल्यामुळे जन्य (आसक्तिजन्य, कुसंगजन्य) आहे. मनुष्याचे मुख्य कर्तव्य आहे—आपला स्वभाव ठीक करणे अर्थात् निषिद्ध कर्मांच्या स्वभावाचा त्याग करून स्वभावानुसार आचरण करणे. भगवंताने विहित कर्मांच्या स्वभावानुसारच आपल्या वर्ण-धर्माचे पालन करण्याची आज्ञा दिली आहे.

भगवान् म्हणतात की, मग तू कर्तव्यमात्र समजून युद्ध कर अथवा माझी आज्ञा मानून युद्ध कर, युद्ध तर तुला करावेच लागेल. माझा आश्रय न घेतल्यास तुझा अहंकार राहील, त्यामुळे विहित कर्म सुद्धा बंधनकारक होईल. परंतु माझा आश्रय घेतल्यास अहंकार राहणार नाही. अहंकारच बंधनकारक असतो. जो प्रकृतीला परवश नसतो, ज्याची प्रकृती महान् शुद्ध असते, असा ज्ञानी पुरुषसुद्धा जर प्रकृतीनुसार क्रिया करतो, मग प्रकृतीला परवश झालेला तसेच अशुद्ध प्रकृतीचा मनुष्य प्रकृतीविरुद्ध कर्म कसे करू शकतो?

***संबंध**—जीव स्वत: परमात्म्याचा अंश आहे आणि स्वभाव प्रकृतीचा अंश आहे. स्व स्वत:सिद्ध आहे आणि स्वभाव स्वत:चा बनविलेला आहे. स्व चेतन आहे आणि स्वभाव जड आहे. असे असूनही जीव स्वभावाला परवश कसा होतो? या प्रश्नाच्या उत्तरात भगवान् पुढील श्लोक सांगतात.*

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।**
**भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया॥ ६१ ॥**

अर्जुन = हे अर्जुन!
ईश्वरः = ईश्वर
सर्वभूतानाम् = संपूर्ण प्राण्यांच्या
हृद्देशे = हृदयात
तिष्ठति = राहतो (आणि)
मायया = आपल्या मायेने
यन्त्रारूढानि = शरीररूपी यंत्रावर आरूढ झालेल्या
सर्वभूतानि = संपूर्ण प्राण्यांना (त्यांच्या स्वभावानुसार)
भ्रामयन् = भ्रमण करवीत राहतो.

*व्याख्या*— **ईश्वरः सर्वभूतानां.........यन्त्रारूढानि मायया**—याचे तात्पर्य हे आहे की, जो ईश्वर सर्वांचा शासक, नियामक, सर्वांचे भरण-पोषण करणारा आणि निरपेक्षरूपाने सर्वांचा संचालक आहे; तो आपल्या शक्तीने ज्यांनी शरीराला ''मी'' आणि ''माझे'' मानले आहे, त्या प्राण्यांना फिरवितो.

ज्याप्रमाणे वीजेवर चालणाऱ्या आगगाडीत कोणी बसला तर त्याला परवशतेने गाडीनुसारच जावे लागते परंतु जेव्हा तो तिच्यातून खाली उतरतो, गाडीत राहत नाही तेव्हा त्याला गाडीनुसार जावे लागत नाही. त्याचप्रमाणे जोपर्यंत मनुष्य शरीररूपी यंत्राशी ''मी'' आणि ''माझे'' पणाचा संबंध ठेवतो तोपर्यंत ईश्वर त्याला त्याच्या स्वभावानुसार* संचालित करीत राहतो आणि तो मनुष्य जन्म-मरणरूपी

* स्वभाव कारणशरीरात राहतो. तोच स्वभाव सूक्ष्म आणि स्थूलशरीरात प्रकट होतो.

संसारचक्रात फिरत राहतो.

शरीराशी ''मी'', ''माझे'' पणाचा संबंध झाल्यानेच राग-द्वेष उत्पन्न होतात, ज्यामुळे स्वभाव अशुद्ध होतो. स्वभाव अशुद्ध झाल्याने मनुष्य प्रकृतीच्या अर्थात् स्वभावाच्या परवश होतो. परंतु शरीराशी सर्वथा संबंध-विच्छेद झाल्यास जेव्हा स्वभाव राग-द्वेषरहित अर्थात् शुद्ध होतो तेव्हा प्रकृतीची परवशता राहत नाही. प्रकृतीची (स्वभाव) परवशता न राहिल्याने ईश्वराची माया त्याला संचालित करीत नाही.

आता येथे शंका येते की, जर ईश्वरच आम्हाला भ्रमण करवितो, क्रिया करवितो, तर मग हे काम करावे आणि हे काम करू नये अशी स्वतंत्रता कोठे राहिली ? कारण यंत्रारूढ झाल्यामुळे आम्ही यंत्राच्या आणि यंत्रसंचालक ईश्वराच्या अधीन झालो, परतंत्र झालो, तर मग यंत्राचा संचालक (प्रेरक) जसे करवील तसेच होईल.

याचे समाधान असे आहे की, जशी वीजेने चालणारी यंत्रे अनेक असतात. एकाच वीजेने संचालित होत असूनही एखाद्या यंत्रात बर्फ तयार होतो, एखाद्या यंत्रामध्ये अग्नी प्रज्वलित होतो, अर्थात् परस्पर विरोधी गोष्टी घडतात. परंतु विजेचा हा आग्रह राहत नाही की, मी तर केवळ बर्फच तयार करील अथवा अग्नीच निर्माण करील. यंत्राचाही असा आग्रह नसतो की, आम्ही तर केवळ बर्फच तयार करणार किंवा अग्नीच निर्माण करणार. परंतु यंत्र बनविणाऱ्या कारागिराने यंत्र जसे बनविले असेल त्यानुसार स्वाभाविकपणे त्या त्या यंत्रात बर्फ तयार होतो आणि अग्नी निर्माण होतो. त्याचप्रमाणे मनुष्य, पशु-पक्षी, देवता, यक्ष, राक्षस इत्यादी जितके काही प्राणी आहेत सर्व शरीररूपी यंत्रावर चढलेले आहेत आणि त्या सर्व यंत्रांना ईश्वर संचालित करतो. त्या वेगवेगळ्या शरीरांतही ज्या शरीराचा जसा स्वभाव असेल त्या स्वभावानुसार ते ईश्वराकडून प्रेरणा प्राप्त करतात आणि कार्य करतात. तात्पर्य हे आहे की, त्या शरीरांशी मी माझेपणाचा संबंध मानणाऱ्यांचा जसा (चांगला-वाईट) स्वभाव असेल, त्याच्याकडून तशाच क्रिया होतात. चांगला स्वभाव असणाऱ्या (सज्जन) मनुष्याकडून श्रेष्ठ क्रिया होतात आणि दुष्ट स्वभाव असलेल्या मनुष्याकडून वाईट क्रिया होतात. म्हणून चांगल्या वा वाईट क्रिया करविण्यात ईश्वराचा हात नाही उलट स्वत:च बनविलेल्या चांगल्या वा वाईट स्वभावाचाच हात आहे.

जसे वीज, यंत्राच्या स्वभावानुसारच त्याचे संचालन करते तसेच ईश्वर प्राण्यांच्या (शरीरात स्थित) स्वभावानुसार त्याचे संचालन करतो. जसा स्वभाव असेल तशीच कर्म होतील. यात एक गोष्ट विशेष विचार करण्याची आहे की, स्वभाव सुधारण्यात आणि बिघडविण्यात सर्व स्वतंत्र आहेत कोणीही परतंत्र नाही. परंतु पशू, पक्षी, देवता इत्यादी जितके काही मनुष्येतर प्राणी आहेत त्यांच्यात आपल्या स्वभावाला सुधारण्याचाही अधिकार नाही आणि स्वतंत्रताही नाही. मनुष्यशरीर आपला उद्धार करण्यासाठीच मिळालेले आहे म्हणून याला आपला स्वभाव सुधारण्याचा पूर्ण अधिकार आहे, पूर्ण स्वतंत्रता आहे. त्या स्वतंत्रतेचा सदुपयोग करून स्वभाव सुधारण्यात आणि स्वतंत्रतेचा दुरुपयोग करून स्वभाव बिघडविण्यात मनुष्य स्वत:च कारणीभूत आहे.

ईश्वर संपूर्ण प्राण्यांच्या हृदय देशात राहतो—या म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, जसे पृथ्वीमध्ये सर्व ठिकाणी पाणी असूनही जेथे विहीर असते तेथूनच पाणी मिळते तसेच परमात्मा सर्व ठिकाणी समान रीतीने परिपूर्ण असूनही हृदयात प्राप्त होतात अर्थात् सर्वव्यापी परमात्म्याच्या प्राप्तीचे विशेष स्थान हृदय आहे. त्याचप्रमाणे तीसऱ्या अध्यायात सर्वव्यापी परमात्म्याला यज्ञात (निष्काम कर्म) स्थित सांगितले गेले आहे—''**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्।**'' (३।१५)

## विशेष गोष्ट

साधकांची प्राय: ही चूक होत असते की, ते भजन, कीर्तन, ध्यान इत्यादी करूनसुद्धा ''भगवान् दूर आहेत, ते आत्ताच मिळणार नाहीत, या ठिकाणी मिळणार नाहीत, मी अजून लायक नाही, भगवंताची कृपा नाही'' इत्यादी भावना करून भगवंताच्या दूरतेची मान्यताच पक्की करीत राहतो. या ठिकाणी साधकाने ही दक्षता घेतली पाहिजे की, जर भगवान् सर्व प्राण्यांमध्ये विद्यमान आहेत तर माझ्यातही आहेत. ते सर्वत्र व्यापक आहेत तर मी जो जप करीत आहे त्या जपातही भगवान् आहेत, मी श्वास घेतो तर त्या श्वासातही भगवान् आहेत, माझ्या मनातही, बुद्धीतही, भगवान् आहेत. मी जो ''मी मी'' म्हणतो त्या ''मी'' तही भगवान् आहेत. त्या ''मी'' चा जो आधार आहे ते आपले स्वरूप भगवंताशी अभिन्न आहे. अर्थात् ''मी'' पणा तर दूर आहे परंतु भगवान् ''मी'' पणा पेक्षाही जवळ आहेत. अशा प्रकारे भगवंताना आपल्यात मानूनच भजन, जप, ध्यान इत्यादी करीत रहावे.

आता शंका अशी होते की आपल्यात परमात्मा मानल्याने मी आणि परमात्मा दोन (वेगवेगळे) आहेत—ही द्वैतापत्ती येईल. याचे समाधान असे आहे की, परमात्म्याला आपल्यात मानल्याने द्वैतापत्ती येत नाही उलट अहंकार (मी पणा) स्वीकार करण्याने जी आपली वेगळी सत्ता प्रतीत होते त्यानेच द्वैतापत्ती प्रतीत होते. परमात्म्याला आपले आणि आपल्यात मानल्याने तर परमात्म्याशी

अभिन्नता होते, ज्यामुळे प्रेम प्रगट होते.

ज्याप्रमाणे गंगेला पूर आला म्हणजे तिची पातळी वाढते आणि पूर ओसरल्यानंतर पाणी कमी होते. परंतु जे पाणी खड्डयात राहून जाते अर्थात् त्याचा गंगेशी संबंध तुटतो त्याला ''गङ्गोज्झ'' म्हणतात. त्या गङ्गोज्झला दारूप्रमाणे फार अपवित्र मानले गेले आहे. गंगेपासून वेगळे झाल्यामुळे ते पाणी घाण होते आणि त्यात अनेक किटाणू उत्पन्न होतात जे रोगांना कारणीभूत होतात. परंतु पुनः जेव्हा पूर येतो तेव्हा ते गङ्गोज्झ गंगेत मिळते. गंगेत मिळताच त्याची एकदेशीयता, अपवित्रता, अशुद्धी इत्यादी सर्व दोष निघून जातात आणि ते पुन्हा महान् पवित्र गंगाजल बनते.

त्याचप्रमाणे हा मनुष्य जेव्हा अहंकार स्वीकार करून परमात्म्याला विमुख होतो तेव्हा त्याच्यात परिच्छिन्नता, पराधीनता, जडता, विषमता, अभाव, अशांती, अपवित्रता, इत्यादी सर्व दोष (विकार) येतात. परंतु जेव्हा हा आपल्या अंशी परमात्म्याला सन्मुख होतो, त्यांनाच शरण होतो अर्थात् आपले कोणते वेगळे व्यक्तित्व ठेवत नाही तेव्हा त्याच्यात आलेले भिन्नता, पराधीनता इत्यादी सर्व दोष समाप्त होतात. कारण स्वमध्ये (चेतन स्वरूप) दोष नाही. दोष तर अहंता (मी पणा) स्वीकार करण्यानेच येतात.

**परिशिष्ट भाव—'भ्रामयन्'** चे तात्पर्य हे आहे की, संपूर्ण संसाराचे संचालन भगवंताच्या शक्तीनेच होत आहे—**'मत्तः सर्वं प्रवर्तते'** (गीता १०।८). भगवान् प्राण्यांना त्यांच्या स्व-स्वभावानुसार कर्म करण्याची प्रेरणा तर करतात. परंतु त्यात आपला आग्रह ठेवीत नाहीत. भगवंताचा आग्रह नसल्यामुळेच मनुष्य आपली कामना-ममता-आसक्ती यांना वशीभूत होऊन पुण्य अथवा पाप करतो आणि त्यांचे फल भोगण्यासाठी स्वर्गादी लोकांत अथवा नरकांत आणि नीच योनीत जातो. परंतु जो भगवंताला शरण होतो, त्याला भगवान् विशेष प्रेरणा देतात. अहंकार न राहिल्यामुळे तो जे काही करतो भगवंताच्या प्रेरणेनुसारच करतो.

***संबंध**—आता भगवान् यंत्रारूढ झालेल्या प्राण्यांची परवशता नाहीशी करण्याचा उपाय सांगतात.*

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत।**
**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्॥ ६२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशोद्भव अर्जुन! (तू) | **गच्छ** | = हो. | | संपूर्णपणे उपरतीला) |
| **सर्वभावेन** | = सर्वभावाने | **तत्प्रसादात्** | = त्याच्या कृपेने (तू) | **शाश्वतम्** | = (आणि) अविनाशी |
| **तम्, एव** | = त्या ईश्वरालाच | **पराम्** | = परम- | **स्थानम्** | = परमपदाला |
| **शरणम्** | = शरण | **शान्तिम्** | = शांतीला (संसारापासून | **प्राप्स्यसि** | = प्राप्त होशील. |

***व्याख्या**—* [मनुष्यात प्रायः एक दुर्बलता राहते की, जेव्हा त्याच्यासमोर संत महापुरुष विद्यमान असतात तेव्हा त्यांच्यावर त्याची श्रद्धा-विश्वास बसत नाही तसेच महत्त्वबुद्धी राहत नाही.* परंतु जेव्हा ते निघून जातात तेव्हा तो रडत बसतो, पश्चात्ताप करतो. त्याचप्रमाणे भगवान् अर्जुनाच्या रथाचे घोडे हाकतात आणि त्यांची (अर्जुन) आज्ञा पालन करतात. तेच भगवान् जेव्हा अर्जुनाला म्हणतात की, शरणागत भक्त माझ्या कृपेने शाश्वत पदाला प्राप्त होतो आणि तूही माझ्यात चित्त असणारा होऊन माझ्या कृपेने संपूर्ण विघ्नांना तरून जाशील. तेव्हा अर्जुन काही बोलले नाहीत. यावरुन हेही होणे शक्य आहे की, अर्जुनाचा भगवंताच्या वचनावर पूर्ण विश्वास बसला नसावा. याच दृष्टीने येथे अर्जुनास अंतर्यामी ईश्वराला शरण जाण्याबद्दल भगवंतांना सांगावे लागले]

**तमेव शरणं गच्छ**—भगवान् म्हणतात की, जो सर्व व्यापक ईश्वर सर्वांच्या हृदयात विराजमान आहे आणि सर्वांचा संचालक आहे, तू त्यालाच शरण जा. तात्पर्य हे आहे की, सांसारिक उत्पत्ति-विनाशशील पदार्थ, वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती इत्यादी कोणाचाही लेशमात्रही आश्रय न घेता केवळ अविनाशी परमात्म्याचाच आश्रय घे.

पूर्व श्लोकात हे म्हटले गेले आहे की, मनुष्य जोपर्यंत शरीररूपी यंत्राशी मी आणि माझेपणाचा संबंध ठेवतो तोपर्यंत ईश्वर आपल्या मायेने त्याला फिरवीत राहतो. आता येथे **''एव''** पदाने त्याचा निषेध करून भगवान् अर्जुनाला म्हणतात की, शरीररूपी यंत्राशी किंचित्मात्रही मी माझे-पणाचा संबंध न ठेवता तू केवळ त्या ईश्वराला शरण जा.

* ''अतिपरिचयादवज्ञा'' अर्थात् जेथे कोणाशी अती परिचय होतो तेथे त्याची अवज्ञा होते.

**सर्वभावेन**—सर्वभावाने शरण जाण्याचे तात्पर्य हे झाले की, मनाने त्याच परमात्म्याचे चिंतन व्हावे, शारीरिक क्रियांनी त्याचेच पूजन व्हावे, त्यांचेच प्रेमपूर्वक भजन व्हावे आणि त्यांच्या प्रत्येक विधानात परम प्रसन्नता रहावी. ते विधान मग शरीर, इंद्रिये, मन इत्यादींच्या अनुकूल असो अथवा प्रतिकूल असो, त्याला भगवंताचेच केलेले मानून खूप प्रसन्न व्हावे आणि असे म्हणावे की, अहो! भगवंताची माझ्यावर किती कृपा आहे की, मला न विचारताच, माझ्या मन, बुद्धी इत्यादीच्या प्रतिकूल जाणूनसुद्धा केवळ माझ्या हित भावनेने माझे परम कल्याण करण्यासाठीच असे विधान केले आहे.

**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्**—भगवंतांनी पूर्वी हे सांगितले होते की, माझ्या कृपेने शाश्वत पदाची प्राप्ती होते (१८।५६) आणि माझ्या कृपेने तू संपूर्ण विघ्ने तरून जाशील (१८।५८) तीच गोष्ट या ठिकाणी म्हणतात की, त्या अन्तर्यामी परमात्म्याच्या कृपेने तू परमशांती आणि शाश्वत स्थान (पद) प्राप्त करशील.

गीतेत अविनाशी परम पदालाच "परा शांती" नावाने म्हटले गेले आहे परंतु येथे भगवंतांनी "परा शांती" आणि "शाश्वत स्थान" (परमपद)—दोन्हींचा प्रयोग एकत्र केलेला आहे म्हणून येथे "परा शांती" चा अर्थ संसारापासून संपूर्णपणे उपरती आणि "शाश्वत स्थान" चा अर्थ परमपद घेतला पाहिजे.

भगवंतांनी "**तमेव शरणं गच्छ**" पदांनी अर्जुनाला सर्वव्यापी ईश्वराला शरण जाण्यासाठी म्हटले आहे. यावरुन ही शंका होऊ शकते की, श्री भगवान् श्रीकृष्ण ईश्वर नाहीत काय? कारण जर भगवान् श्रीकृष्ण ईश्वर असते तर अर्जुनाला "त्यालाच शरण हो" असे (परोक्ष रीतीने) म्हटले नसते.

याचे समाधान असे आहे की, भगवंतांनी सर्वव्यापी ईश्वराच्या शरणागतीला तर "**गुह्याद्गुह्यतरम्**" १८। ६३ अर्थात् गुह्यापेक्षा गुह्य म्हटले आहे परंतु आपल्या शरणागतीला "**सर्वगुह्यतमम्**" (१८।६४) अर्थात् सर्वात गुह्यतम म्हटले आहे. यावरुन सर्वव्यापक ईश्वरापेक्षा भगवान् श्रीकृष्णच श्रेष्ठ सिद्ध झाले.

भगवंतांनी पूर्वी म्हटले आहे की, मी अजन्मा, अविनाशी आणि संपूर्ण प्राण्यांचा ईश्वर असूनही आपल्या प्रकृतीला अधीन करून आपल्या योगमायेने प्रकट होतो (४।६) मी संपूर्ण यज्ञ आणि तप यांचा भोक्ता आहे आणि संपूर्ण प्राण्यांचा सुहृद आहे आणि संपूर्ण लोकांचा महान् ईश्वर आहे—असे मला मानल्याने शांती प्राप्त होते (५।२९) परंतु जो मला संपूर्ण यज्ञांचा भोक्ता आणि सर्वांचा मालक मानीत नाही, त्याचे पतन होते (९।२४) अशा प्रकारे अन्वय-व्यतिरेक पद्धतीनेही भगवान् श्रीकृष्णांचे ईश्वरत्व सिद्ध होते.

या अध्यायात "**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति**" (१८।६१) पदांनी अंतर्यामी ईश्वर सर्व प्राण्यांच्या हृदयात स्थित असल्याचे सांगितले आहे आणि पंधराव्या अध्यायात "**सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः**" (१५।१५) पदांनी आपणाला सर्वांच्या हृदयात स्थित असल्याचे सांगितले आहे. याचे तात्पर्य हे झाले की, अंतर्यामी परमात्मा आणि भगवान् श्रीकृष्ण दोन नाहीत एकच आहेत.

जर अंतर्यामी परमात्मा आणि भगवान् श्रीकृष्ण एकच आहेत तर मग भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनाला "**तमेव शरणं गच्छ**" का म्हटले? याचे कारण असे आहे की, पूर्वी छपन्नाव्या श्लोकात भगवंतांनी आपल्या कृपेने शाश्वत अविनाशी पदाची प्राप्ती होण्याविषयी सांगितले आणि सत्तावन्नाव्या-अठ्ठावन्नाव्या श्लोकांत अर्जुनाला आपल्या परायण होण्याची आज्ञा देऊन "माझ्या कृपेने संपूर्ण विघ्ने तरून जाशील" असे म्हटले. परंतु अर्जुन काही बोलले नाहीत. अर्थात् त्यांनी कशाचाही स्वीकार केला नाही. यावर भगवंतांनी अर्जुनाला धमकावले की, जर अहंकारामुळे माझे म्हणणे ऐकणार नाहीस तर तुझे पतन होईल. एकोण-साठाव्या-साठाव्या श्लोकांत म्हटले की, "मी युद्ध करणार नाही" अशा प्रकारे अहंकाराचा आश्रय घेऊन केलेला तुझा निश्चयही टिकणार नाही आणि तुला स्वभावज कर्माला परवश होऊन युद्ध करावेच लागेल. भगवान् ऐवढे बोलले तरी अर्जुन काहीही बोलले नाहीत. म्हणून शेवटी भगवंतांना असे म्हणावे लागले की, जर तू मला शरण होऊ इच्छित नसशील तर सर्वांच्या हृदयात स्थित असलेला जो अंतर्यामी परमात्मा आहे त्यालाच तू शरण जा.

वास्तविक अंतर्यामी ईश्वर आणि भगवान् श्रीकृष्ण संपूर्णपणे अभिन्न आहेत. अर्थात् सर्वांच्या हृदयात अंतर्यामी-रूपाने विराजमान ईश्वरच भगवान् श्रीकृष्ण आहेत आणि भगवान् श्रीकृष्णच सर्वांच्या हृदयात अंतर्यामीरूपाने विद्यमान ईश्वर आहेत.

**परिशिष्ट भाव**—जीव ईश्वराचाच अंश आहे म्हणून भगवान् ईश्वरालाच शरण जाण्यासाठी सांगतात. ईश्वराला शरण गेल्याने अहंकार राहत नाही. जोपर्यंत जीव ईश्वराच्या वश (शरण) होत नाही तोपर्यंत तो प्रकृतीच्या वश राहतो. तो जस-जसा जडतेकडे

अग्रेसर होतो, तस-तशी आसुरी-संपत्ती येते आणि जस-जसा चिन्मयतेकडे जातो, तस-तशी दैवी-संपत्ती येते.

*संबंध— पूर्व श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला म्हटले, तू त्या अंतर्यामी ईश्वराला शरण जा. असे म्हटले तरी अर्जुन काही बोलले नाहीत. म्हणून भगवान् पुढील श्लोकात अर्जुनाला जागृत करण्यासाठी स्वतंत्रता प्रदान करतात.*

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु॥६३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इति** | = हे | **मया** | = मी | **विमृश्य** | = विचार करून |
| **गुह्यात्** | = गुह्यापेक्षाही | **ते** | = तुला | **यथा** | = जशी |
| **गुह्यतरम्** | = गुह्यतर | **आख्यातम्** | = सांगितले. | **इच्छसि** | = इच्छा असेल |
| **ज्ञानम्** | = (शरणागतीरूपी) ज्ञान | **एतत्** | = (आता तू) यावर | **तथा** | = तसे |
| | | **अशेषेण** | = चांगल्याप्रकारे | **कुरू** | = कर. |

*व्याख्या—* **इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया—**पूर्वश्लोकात सर्वव्यापक अंतर्यामी परमात्म्याची जी शरणागती सांगितली गेली आहे. त्याचेच लक्ष येथे ''**इति**'' पदाने वेधले गेले आहे. भगवान् म्हणतात की, हे गुह्यापेक्षाही गुह्यतर शरणागतीरूपी ज्ञान मी तुला सांगितले आहे. कर्मयोग ''गुह्य'' आहे आणि अंतर्यामी निराकार परमात्म्याची शरणागती ''गुह्यतर'' आहे.*

**विमृश्यैतदशेषेण—**गुह्यापेक्षा गुह्यतर शरणागतीरूपी ज्ञान सांगून भगवान् अर्जुनाला म्हणत आहेत की, मी या पूर्वी भक्तीसंबंधी जो विचार सांगितला आहे त्यावर तू चांगल्या प्रकाराने विचार कर. भगवंतांनी याच अध्यायाच्या सत्तावन्नाव्या, अठ्ठावन्नाव्या श्लोकांत आपल्या भक्तीविषयी (शरणागती) ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्याला ''**एतत्**'' पदाने घेतले पाहिजे. गीतेत जेथे जेथे भक्तीचा विचार आला आहे त्यांना ''**अशेषेण**'' पदाने घेतले पाहिजे.†

''**विमृश्यैतदशेषेण**'' म्हणण्यात भगवंताच्या अत्यधिक कृपाळूपणाची एक गूढाभिसन्धी अशी आहे की, न जाणो माझ्यापासून अर्जुन विमुख होईल म्हणून जर ह्याने मी

---

* योगयुक्तबुद्धी असणारे कर्मफलाचा त्याग करून अनामयपदाला प्राप्त होतात. (२।५१), जी प्राप्ती ज्ञानयोगाने होते ती प्राप्ती कर्मयोगाने होते (४।३८), योगयुक्त मुनी फार लवकर परमात्म्याला प्राप्त होतो (५।६), कर्मफलाचा त्याग केल्यास सदा राहणारी शांती प्राप्त होते (५।१२) इत्यादी श्लोकांनी कर्मयोग परमात्मप्राप्तीचे स्वतंत्र साधन सिद्ध होते. अशा कर्मयोगाला ''गुह्य'' म्हणतात.

जडतेशी संबंध-विच्छेद करून निराकार परमात्म्याला शरण होणे हे कर्मयोगापेक्षाही अधिक महत्त्वाचे आहे म्हणून ह्याला ''गुह्यतर'' म्हणतात.

सूर्याला मीच उपदेश दिला होता, तोच मी तुला सांगत आहे (४।३), संपूर्ण जगत् माझ्यानेच व्याप्त आहे (९।४), क्षराहून अतीत आणि अक्षरापेक्षा उत्तम ''पुरुषोत्तम'' मीच आहे (१५।१८) इत्यादी वचनाने भगवंतांनी आपली भगवत्ता प्रकट केली आहे म्हणून या गोष्टी ''गुह्यतम'' आहेत.

तू केवळ मलाच शरण ये मग तुला काहीही करावयाचे राहणार नाही, मी तुला संपूर्ण पापापासून मुक्त करीन, तू शोक, चिन्ता करू नकोस (१८।६६) अशा प्रकारे आपल्या शरणागतीबद्दल सांगणे ''सर्वगुह्यतम'' आहे.

ज्यात कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग इत्यादी सर्व साधनांचे वर्णन केले जाते त्या योगशास्त्राला ''परमगुह्य'' म्हटले गेले आहे (१८।६८, ७५)

† गीतेत भक्तीबद्दलचे उल्लेख पुढील श्लोकांत आले आहेत—संपूर्ण योग्यात भक्तियोगी श्रेष्ठ आहे (६।४७), मला शरण येणारे माया तरून जातात (७।१४) सर्व काही वासुदेवच आहे. अशा प्रकारे मला (भगवंताला) शरण येणारे महात्मा अत्यंत दुर्लभ आहेत. (७।१९), अनन्यभक्तीने मी सुलभ आहे (८।१४), अनन्यभक्तीने, परम पुरुषाची प्राप्ती होते (८।२२), दैवी-संपत्तीआश्रित महात्मालोक अनन्यभावाने माझे भजन करतात (९।१३), दृढनिश्चयी भक्त निरंतर कीर्तन करीत तसेच मला नमस्कार करीत भक्तिपूर्वक माझी उपासना करतात (९।१४), अनन्यभक्ताचा योगक्षेम मी वहन करतो (९।२२), भक्ताकडून प्रेमपूर्वक अर्पित पत्र, पुष्प, फल इत्यादी मी खातो (९।२६), तू जे काही करतोस, हवन करतोस, दान देतोस आणि तप करतोस, ते सर्व मला अर्पण कर (९।२७), सर्व कर्म मला अर्पण कर म्हणजे तू शुभाशुभ फलरूप बंधनातून मुक्त होशील (९।२८), माझ्यात मन असलेला, माझा भक्त हो, माझे पूजन करणारा हो आणि मला नमस्कार कर (९।३४), सर्व प्रकारे माझ्याच भक्तीत लागलेल्या भक्तांचे अज्ञान मी दूर करतो, त्यामुळे ते मलाच प्राप्त होतात (१०।९-११), अनन्यभक्तीनेच मी पाहिला आणि जाणला जाऊ शकतो तसेच माझ्यात प्रवेश केला जाऊ शकतो (११।५४), अनन्यभक्ती असणारा पुरुष मलाच प्राप्त होतो (११।५५), माझे भजन करणारा भक्त अती उत्तम योगी आहे (१२।२), जे सर्व कर्म मला अर्पण करून मत्परायण झाले आहेत, त्यांचा मी फार लवकर उद्धार करतो (१२।६-७), तू माझ्यातच मन आणि बुद्धी अर्पित कर म्हणजे तुला माझी प्राप्ती होईल (१२।८) अव्यभिचारी भक्तियोगाने मनुष्य गुणातीत होतो (१४।२६), सर्वभावाने माझे भजन करणारा भक्त सर्ववित् असतो (१५।१९) इत्यादी इत्यादी.

सांगितलेल्या विषयाकडे विशेष लक्ष घातले तर त्याला वास्तविक तत्त्व अवश्य समजून येईल आणि मग तो मला विमुख होणार नाही.

**यथेच्छसि तथा कुरु**—पूर्वी सांगितलेल्या सर्व विषयांवर संपूर्ण विचार करून मग तुझ्या मर्जीप्रमाणे कर. तुझी जशी इच्छा असेल तसे कर—असे म्हणण्यातही भगवंताची आत्मीयता, कृपाळूपणा आणि हितैषिताच प्रत्यक्ष दिसत आहे.

अगोदर "**वक्ष्याम्यशेषतः**" (७।२), "**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे**" (९।१) "**वक्ष्यामि हित-काम्यया**" (१०।१) इत्यादी श्लोकांत भगवान् अर्जुनाच्या हिताची गोष्ट सांगत आले आहेत परंतु या वाक्यांत भगवंताची अर्जुनावर "सामान्य कृपा" आहे.

"**न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि**" (१८।५८) या श्लोकांत अर्जुनाला धमकावण्यात भगवंताची "विशेष कृपा" आहे आणि आत्मीयतेचा भाव दिसून येतो.

येथे "**यथेच्छसि तथा कुरु**" म्हणून भगवान् जो आपलेपणाचा त्याग करीत आहेत यामध्ये तर भगवंताची "अत्यधिक" कृपा आहे आणि आत्मीयता भरलेली आहे. कारण भक्त भगवंताचे धमकावणे तर सहन करू शकतो परंतु भगवंताचा त्याग सहन करू शकत नाही. म्हणून "**न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि**" इत्यादी म्हटले तरीही अर्जुनावर एवढा परिणाम झाला नाही, जेवढा "**यथेच्छसि तथा कुरु**" म्हटल्याने झाला. हे ऐकून अर्जुन घाबरले की, भगवान् तर माझा त्याग करीत आहेत. कारण मी ही फार मोठी चूक केली की, भगवंतांनी अत्यंत प्रेमाने समजावून सांगितले, आत्मीयतेने धमकावले आणि अंतर्यामी परमात्म्याला शरण जाण्यासंबंधी सांगितले तरीही मी काही बोललो नाही. त्यामुळे भगवंताना "जशी मर्जी असेल तसे कर" असे म्हणावे लागले. आता तर मी काहीच म्हणण्याच्या लायक राहिलो नाही—असा विचार करून अर्जुन फार दुःखी झाले. तेव्हा भगवान् अर्जुनाने न विचारताच सर्व गुह्यतम तत्त्व सांगतात, ज्याचे वर्णन पुढील श्लोकात केले आहे.

**परिशिष्ट भाव—'यथेच्छसि तथा कुरु'—**हे भगवान् त्याग करण्यासाठी म्हणत नाहीत, तर आपल्याकडे विशेषतेने ओढण्यासाठी म्हणत आहेत. जसे—चेंडू फेकतात तो विशेषतेने परत घेण्यासाठी, त्याग करण्यासाठी नव्हे. तात्पर्य हे आहे की, पूर्व श्लोकात अंतर्यामी निराकार ईश्वराच्या शरणागतीची गोष्ट सांगून आता भगवान् अर्जुनाला आपल्याकडे अर्थात् सगुण-साकाराकडे ओढू इच्छितात, ज्यामुळे अर्जुन समग्राच्या प्राप्तीपासून वंचित राहू नये. निराकारात साकार येत नाही, परंतु साकारात निराकारही येतो.

*संबंध—पूर्व श्लोकात भगवंतांनी "**विमृश्यैतदशेषेण**" पदाने अर्जुनाला म्हटले की, माझ्या ह्या पूर्ण उपदेशाचे सार काढ. परंतु भगवंताच्या संपूर्ण उपदेशाचा सार काढणे ही आर्जुनाच्या अटोक्यातील गोष्ट नव्हती. कारण आपल्या उपदेशाचे सार काढणे जितके वक्ता जाणतो तितके श्रोता जाणत नाही. दुसरी गोष्ट "जशी तुझी मर्जी असेल तसे कर" अशा प्रकारे भगवंताच्या मुखाने आपल्या त्यागाची गोष्ट ऐकून अर्जुन फार घाबरले. म्हणून पुढील दोन श्लोकांत भगवान् आपल्या प्रिय सखा अर्जुनाला आश्वासन देतात.*

**सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम्॥ ६४॥**

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **सर्वगुह्यतमम्** | = | सर्वात अत्यंत गोपनीय | **शृणु** | = | ऐक. (तू) | **ततः** | = | म्हणून |
| **परमम्** | = | सर्वोत्कृष्ट | **मे** | = | माझा | **इति** | = | ही (विशेष) |
| **वचः** | = | वचन (तू) | **दृढम्** | = | अत्यंत | **हितम्** | = | हिताची गोष्ट (मी) |
| **भूयः** | = | पुन्हा | **इष्टः** | = | प्रिय मित्र | **ते** | = | तुला |
| **मे** | = | माझ्याकडून | **असि** | = | आहेस, | **वक्ष्यामि** | = | सांगेन. |

*व्याख्या—* **सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः—**पूर्वी त्रेसष्टाव्या श्लोकात भगवंतांनी गुह्य (कर्मयोगाची) आणि गुह्यतर (अंतर्यामी निराकाराच्या शरणागतीची) गोष्ट सांगितली. आणि "**इदं तु ते गुह्यतमम्**" (९।१) तसेच "**इति गुह्यतमं शास्त्रम्**" (१५।२०) या पदांनी गुह्यतम (आपल्या प्रभावाची) गोष्ट सांगितली परंतु सर्व गुह्यतम गोष्ट पूर्वी कोठेही सांगितली गेली नाही. आता येथे अर्जुनाचा घाबरटपणा पाहून भगवान् म्हणतात की, मी सर्वगुह्यतम अर्थात् सर्वात अत्यंत गोपनीय गोष्ट पुन्हा सांगतो. तू माझी ही परम सर्वश्रेष्ठ वचने ऐक.

या श्लोकात "**सर्वगुह्यतमम्**" पदाने भगवंतांनी सांगितले

की, ही गोष्ट प्रत्येकापुढे सांगण्यासारखी नाही आणि सदुसष्टाव्या श्लोकात "**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन**" पदांनी भगवंतांनी म्हटले आहे की, ही गोष्ट अतपस्वी आणि अभक्त यांना कधीही सांगू नको. अशा प्रकारे दोन्हीकडून निषेध करून मध्यात (सहासष्टाव्या श्लोकात) "**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज**" ही सर्वगुह्यतम गोष्ट ठेवली. दोन्हीकडून निषेध करण्याचे तात्पर्य हे आहे की, संपूर्ण गीतेत रहस्यमय असा हा खास उपदेश आहे*

दुसऱ्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात "**धर्मसम्मूढचेता:**" म्हणून अर्जुन स्वत:ला धर्माचा निर्णय करण्यात अयोग्य समजून भगवंतांना विचारतात, त्यांचे शिष्य होतात आणि उपदेश करण्यासाठी प्रार्थना करतात. म्हणून भगवान् येथे (१८। ६६ मध्ये) म्हणतात की, तू धर्माच्या निर्णयाचा भार आपल्यावर घेऊ नकोस, तो सर्व माझ्यावर सोडून दे, मलाच अर्पण कर आणि अनन्यभावाने केवळ मला शरण हो. मग तुला जी पाप इत्यादीची भीती आहे त्या सर्व पापापासून मी तुला मुक्त करीन. तू सर्व चिंता सोडून दे. हेच भगवंताचे "सर्वगुह्यतम परम वचन" आहे.

"**भूय: श्रृणु**" चे तात्पर्य हे आहे की, मी हीच गोष्ट पूर्वीही दुसऱ्या श्ब्दात सांगितली होती परंतु तू त्याकडे लक्ष दिले नाहीस. म्हणून मी पुन्हा तीच गोष्ट सांगतो. आता त्यावर विशेष लक्ष दे.

ही सर्वगुह्यतम असलेली गोष्ट भगवंतांनी पूर्वी "**मत्पर: ... मच्चित्त: सततं भव**" (१८।५७) आणि "**मच्चित्त: सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि**" (१८।५८) पदांनी सांगितली होती, परंतु "**सर्वगुह्यतमम्**" पद या पूर्वी वापरले नाही. आणि अर्जुनाचेही त्या गोष्टीकडे लक्ष गेले नाही. म्हणून आता पुन्हा अर्जुनाचे लक्ष त्या गोष्टीकडे वेधण्यासाठी आणि त्या गोष्टीचे महत्त्व विषद करण्यासाठी भगवान् येथे "**सर्वगुह्यतमम्**" पद देत आहेत.

**इष्टोऽसि मे दृढमिति**—या पूर्वी भगवंतांनी म्हटले होते की, "तुझ्या मरजीला वाटेल तसे कर". जो अनुयायी आहे, आज्ञापालक आहे, शरणागत आहे, त्याला अशा बोलण्यासारखी दुसरी कोणती शिक्षा दिली जाऊ शकते? म्हणून अर्जुनाच्या मनात ही गोष्ट ऐकून भीती निर्माण झाली की, भगवान् माझा त्याग करीत आहेत. ती भीती दूर करण्यासाठी भगवान् येथे म्हणतात की, तू माझा अत्यंत आवडता सखा आहेस, मित्र आहेस† जर अर्जुनाच्या मनात भीती अथवा शंका नसती तर भगवंतांना "तू माझा अत्यंत आवडता मित्र आहेस" असे म्हणून सफाई देण्याची काय जरूरी होती? सफाई देणे, दुसऱ्याच्या मनात जेव्हा भय असेल, संदेह असेल, चलबिचल असेल, तेव्हाच जरूरी होते.

"**इष्ट**" म्हणण्याचा दुसरा भाव असा आहे की, भगवान् आपल्या शरणागत भक्ताला आपले इष्टदेव मानतात. भक्त सर्व काही सोडून केवळ भगवंताना आपले इष्ट मानतो, तर भगवानही त्याला आपले इष्ट मानतात. कारण भक्ताच्या विषयात हा नियम आहे—"**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्।**" (४।११) अर्थात् जो भक्त जसा मला शरण होतो, मीही त्याला तसाच आश्रय देतो. भगवंताच्या दृष्टीत भक्तासारखा दुसरा कोणी श्रेष्ठ नाही. भागवतात भगवान् उद्धवाला म्हणतात—"तुझ्यासारखे प्रेमी भक्त मला जितके आवडतात तितके ब्रह्मदेव, शंकर, बलराम आवडत नाहीत. इतकेच नव्हे तर माझ्या शरीरात निवास करणारी लक्ष्मी आणि माझा आत्मा सुद्धा तितका मला प्रिय नाही.‡"

---

* दहाव्या अध्यायाच्या आरंभी भगवंतांनी "भूय एव महाबाहो श्रृणु मे परमं वच:" म्हटले आणि येथे "सर्वगुह्यतमं भूय: श्रृणु मे परमं वच:" म्हटले. या दोन्हीत केवळ "एव महाबाहो" ऐवजी "सर्व गुह्यतमम्" पद आले आहे अर्थात् केवळ सहा अक्षरेच बदलली आहेत बाकी दहा अक्षरे जशीच्या तशीच आहेत. तेथे "भूय एव महाबाहो" सांगून "मच्चित्ता:" (१०।९) म्हणतात आणि येथे मच्चित्त: (१८।५७-५८) सांगून "सर्वगुह्यतमं भूय:" म्हणतात. परंतु "मच्चित्ता:" आणि "मच्चित्त:" यात थोडा फरक आहे. तेथे "मच्चित्ता:" यात प्रथम पुरुषी प्रयोग करून सामान्य रीतीने सर्वांसाठी सांगितले आहे आणि येथे "मच्चित्त:" यात मध्यम पुरुषी प्रयोग करून अर्जुनासाठी विशेष आज्ञा केली आहे. तेथेही "माझ्या कृपेने अज्ञान दूर होईल" असे म्हटले आहे आणि येथेही "माझ्या कृपेने तू सर्व विघ्नांना तरून जाशील" असे म्हटले आहे.

तेथे "यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया" (१०।१) म्हटले आहे आणि येथे "ततो वक्ष्यामि ते हितम्" म्हटले आहे. तेथे "मन्मना भव....." (९।३४) म्हणून अव्यवहितरूपाने (निरंतर, जवळच) "भूय एव महाबाहो......." म्हटले आहे आणि येथे "सर्वगुह्यतमं भूय: ......" म्हणून अव्यवहितरूपाने "मन्मना भव ........" (१८।६५) म्हटले आहे.

जसे "सर्वगुह्यतमम्" पद संपूर्ण गीतेत एकाच वेळेस आले आहे, त्याचप्रमाणे "सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरण व्रज" असे वाक्यही एकाच वेळेस आले आहे.

† सासति करि पुनि करहिं पसाऊ। नाथ प्रभुन्ह कर सहज सुभाऊ॥ (मानस १।८९।२)

‡ न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शंकर:। न च संकर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा भवान्॥ (श्रीमद्भा० ११।१४।१५)

"**दृढम्**" म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जर तू एकदा म्हटले की "मी आपणास शरण आलो आहे" (२।७) तर आता तुला अजिबात भिण्याचे कारण नाही कारण जो मला शरण येऊन एक वेळ देखील जर शुद्ध अंत:करणाने म्हणतो की, "मी तुझाच आहे" त्याला मी संपूर्ण प्राण्यांपासून अभय (सुरक्षित) करतो—हे माझे व्रत आहे.*

**ततो वक्ष्यामि ते हितम्**—तू माझा अत्यंत आवडता मित्र आहेस. म्हणून माझ्या अंत:करणातील अत्यंत गोपनीय आणि माझ्या दरबारातील सर्वात श्रेष्ठ तत्त्व तुला सांगेन. दुसरी गोष्ट, मी जे यापुढे शरणागतीचे तत्त्व सांगणार आहे त्याचे तात्पर्य हे नाही की, मला शरण आल्याने मला त्याचा काही लाभ होईल, उलट यात केवळ तुझेच हित होईल. यावरुन सिद्ध होते की, प्राणीमात्राचे हित केवळ याच गोष्टीत आहे की, त्याने दुसऱ्या कोणाचा आश्रय न घेता केवळ भगवंतानाच शरण जावे.

भगवंताना शरण होण्याशिवाय जीवाचे कोठेही, किंचितन्मात्रही हित नाही. कारण हे आहे की जीव साक्षात् परमात्म्याचा अंश आहे. म्हणून त्याने परमात्म्याला सोडून कोणाचाही आश्रय घेतला तर तो आश्रय टिकणार नाही. जर संसाराची कोणतीही वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, अवस्था इत्यादी स्थिर नाही तर मग त्यांचा आश्रय कसा स्थिर राहू शकतो? त्यांचा आश्रय तर राहणार नाही, परंतु चिंता, शोक, दु:ख इत्यादी मात्र राहतील. जसे अग्नीपासून विस्तू काढून बाजूला (विझवला) केला तर तो काळा कोळसा होतो—"**कोयला होय नही उजला, सौमन साबुन लगाय।**" परंतु तोच बनलेला कोळसा जेव्हा पुन्हा अग्नीत टाकला तर अग्नीरूप बनतो आणि चमकतो. त्याचप्रमाणे हा जीव भगवंतांना विमुख होतो तेव्हा पुन्हा पुन्हा जन्मत-मरत, दु:ख भोगत राहतो परंतु जेव्हा हा भगवंतांना सम्मुख होतो अर्थात् अनन्यभावाने भगवंताना शरण होतो तेव्हा हा भगवत्स्वरूप होऊन जातो आणि चमकतो तसेच संपूर्ण संसाराचे कल्याण करणारा होतो.

**परिशिष्ट भाव—'तमेव शरणं गच्छ'** (१८।६२)—यात निराकाराची शरणागती आहे आणि '**मामेकं शरणं व्रज**' (१८।६६)—यात साकाराची शरणागती आहे. निराकाराला शरण होण्याने मुक्ती मिळेल, परंतु साकाराला शरण होण्याने मुक्तीबरोबर प्रेमाचीही प्राप्ती होईल. म्हणून साकाराची शरणागती 'सर्वगुह्यतम' आहे. भगवान् भक्तीच्या प्रसंगातच 'परम वचन' म्हणतात. दहाव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकातही भगवंताने म्हटले आहे—'**शृणु मे परमं वच:**'.

अर्जुनाने भगवंताला म्हटले होते की, मी आपला शिष्य आहे—'**शिष्यस्तेऽहम्**' (२।७), परंतु भगवान् म्हणतात की, तू माझा इष्ट मित्र आहेस—'**इष्टोऽसि**'! तात्पर्य हे आहे की, गुरू तर शिष्य बनवितो परंतु भगवान् शिष्य न बनविता आपला मित्र बनवितात!

भगवंताची तर प्रत्येक गोष्ट हित करणारीच असते, परंतु त्यातही विशेष हिताची गोष्ट असल्याने भगवान् '**ततो वक्ष्यामि ते हितम्**' म्हणतात.

## मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।
## मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे॥६५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मद्भक्त:** | = (तू) माझा भक्त | | (हो आणि) | **ते** | = तुझ्यासमोर |
| **भव** | = हो, | **माम्** | = मला | **सत्यम्** | = सत्य |
| **मन्मना:** | = माझ्यात मन असलेला (हो), | **नमस्कुरु** | = नमस्कार कर. (असे करण्याने तू) | **प्रतिजाने** | = प्रतिज्ञा करतो, (कारण तू) |
| **मद्याजी** | = माझे पूजन करणारा | **माम्, एव** | = मलाच | **मे** | = माझा |
| | | **एष्यसि** | = प्राप्त होशील (—मी ही) | **प्रिय:** | = अत्यंत प्रिय |
| | | | | **असि** | = आहेस. |

*व्याख्या*— **मद्भक्त:**—साधकाने सर्वात प्रथम "मी भगवंताचा आहे" अशा प्रकारे आपली अहंता (मीपणा) बदलून टाकली पाहिजे. कारण अहंता बदलल्याशिवाय साधन सुगमतेने होत नही. अहंता बदलण्याने साधन

* सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते। अभयं सूर्वभूतेभ्यो ददाम्येतद् व्रतं मम॥ (वाल्मिकी० ६।१८।३३)

सुगमतेने, स्वाभाविकच होऊ लागते. म्हणून साधकाने सर्वात प्रथम "**मद्भक्तः**" झाले पाहिजे.

एखाद्याचा शिष्य बनल्यावर व्यक्ती आपली अहंता बदलून टाकतो की, "मी तर गुरू महाराजांचाच आहे." विवाह झाल्यावर कन्या आपली अहंता बदलून टाकते की, "मी तर सासरकडचीच आहे" आणि पित्याच्या घराशी तिचा सर्व संबंध सुटून जातो. त्याचप्रमाणे साधकाने आपली अहंता बदलून टाकली पाहिजे की, "मी तर भगवंताचाच आहे आणि भगवान्‌च माझे आहेत, मी संसाराचा नाही आणि संसार माझा नाही." (अहंता बदलली तर ममताही आपोआप बदलून जाते).

**मन्मना भव**—उपर्युक्त प्रकाराने आपल्याला भगवंताचा मानल्यास भगवंतात स्वाभाविकच मन लागू लागते. कारण जे आपले असते ते स्वाभाविकच प्रिय लागते आणि जेथे प्रियता होते तेथे स्वाभाविकच मन लागते. म्हणून भगवंतांना आपले मानल्याने भगवान् स्वाभाविकच प्रिय लागतात. मग मनाने स्वाभाविकच भगवंताचे नाम, गुण, प्रभाव, लीला, इत्यादीचे चिंतन होते. भगवंताच्या नामाचा जप आणि स्वरूपाचे ध्यान फार तत्परतेने आणि तन्मयतेने होऊ लागते.

**मद्याजी**—अहंता बदलल्यास अर्थात् स्वतः आपल्याला भगवंताचे मानल्यास संसाराचे सर्व काम भगवंताच्या सेवारूपात बदलून जाते अर्थात् साधक पूर्वी जे संसाराचे काम करीत होता तेच काम आता भगवंताचे काम होते. भगवंताचा संबंध जसजसा दृढ होत जातो तसतसे त्याचा सेवाभाव पूजाभावात परिणत होतो. मग तो संसाराचे काम करो, अथवा घरचे काम करो, अथवा शरीराचे काम करो, अथवा उच्च-नीच असे कोणतेही काम करो, त्याच्यात भगवंताच्या पूजेचाच भाव कायम राहतो. त्याची ही दृढ धारणा होते की, भगवंताच्या पूजेशिवाय माझे दूसरे काहीच काम नाही.

**मां नमस्कुरु**—भगवंताच्या चरणावर साष्टांग नमस्कार करून संपूर्णपणे भगवंतांना समर्पित होऊन जावे. मी प्रभूच्या चरणावरच पडलेला आहे—असा मनात भाव ठेवून जी काही अनुकूल अथवा प्रतिकूल परिस्थिती समोर येईल, त्यात भगवंताचे मंगलमय विधान मानून परम प्रसन्न रहावे.

भगवंताकडून माझ्यासाठी जे काही विधान होईल ते मंगलमयच असणार. पूर्ण परिस्थिती माझ्या लक्षात येवो की न येवो, ही गोष्ट वेगळी! परंतु भगवंताचे विधान तर माझ्यासाठी कल्याणकारीच आहे, यात काही संशय नाही. म्हणून जे काही होत आहे ते माझ्या कर्माचे फल नाही, उलट भगवंताकडून कृपा करून केवळ माझ्या हितासाठी पाठविलेले विधान आहे. कारण भगवान् प्राणीमात्राचे परम सुहृद असल्याने जे काही विधान करतात ते जीवांच्या कल्याणाकरिताच करतात. म्हणून भगवान् अनुकूल अथवा प्रतिकूल परिस्थिती पाठवून प्राण्यांच्या पुण्य-पापांचा नाश करून, त्यांना परम शुद्ध करून आपल्या चरणाकडे आकृष्ट करीत आहेत—अशा प्रकारे दृढतेने भाव होणे हेच भगवंताच्या चरणावर नमस्कार करणे आहे.

**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे**—भगवान् म्हणतात की, अशा प्रकारे माझा भक्त झाल्याने, माझ्यात मन असणारा झाल्याने, माझे पूजन करणारा झाल्याने आणि मला नमस्कार करण्याने तू मलाच प्राप्त होशील अर्थात् माझ्यातच निवास करशील*—अशी मी सत्य प्रतिज्ञा करतो कारण तू माझा आवडता आहेस.

"**प्रियोऽसि मे**" म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, भगवंताना जीवमात्र अत्यंत प्रिय आहेत. आपलाच अंश असल्याने कोणताही जीव भगवंताना अप्रिय नाही. भगवान् जीवांना मग चौऱ्यांशी लाख योनीत पाठवोत अथवा नरकात पाठवोत, त्यांचा उद्देश जीवांना पवित्र करण्याचाच असतो. जीवाविषयी भगवंताचे हे जे कृपापूर्वक विधान आहे, हे भगवंताच्या प्रेमाचेच द्योतक आहे. हीच गोष्ट प्रकट करण्यासाठी भगवान् अर्जुनाला सर्व जीवांचा प्रतिनिधी बनवून "**प्रियोऽसि मे**" हे वचन म्हणतात.

जीवमात्र भगवंतांना अत्यंत प्रिय आहे. केवळ जीवच भगवंताना विमुख होऊन प्रतिक्षण वियुक्त होणाऱ्या संसाराला (धन-संपत्ती कुटुंब, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण इत्यादी) आपले मानू लागतो परंतु संसाराने कधीही जीवाला आपले मानले नाही. जीवच आपल्याकडून संसाराशी सबंध जोडतो. संसार प्रतिक्षण परिवर्तनशील आहे आणि जीव नित्य अपरिवर्तनशील आहे. जीवाकडून हीच चूक होते की, तो प्रतिक्षण बदलणाऱ्या संसाराच्या संबंधाला नित्य मानतो. हेच कारण आहे की, संबंधी

* भगवंताचे भक्त होणे, त्यांच्यात मन लावणे, त्यांचे पूजन करणे आणि त्यांना नमस्कार करणे. या चार साधनांपैकी कोणतेही एक साधन योग्य प्रकारे केल्यास बाकीची तिन्ही साधने त्यात आपोआप येतात.

राहिला नाही तरीही त्याच्याशी मानलेला संबंध राहतो. हा मानलेला संबंधच अनर्थाला हेतू आहे. हा संबंध मानणे अथवा न मानणे यात सर्व स्वतंत्र आहेत. म्हणून या मानलेल्या संबंधाचा त्याग करून, ज्यांच्याशी आपला वास्तविक आणि नित्यसंबंध आहे, अशा भगवंतांना शरण झाले पाहिजे.

**परिशिष्ट भाव**—अर्जुन भगवंताला प्राप्तच आहेत. म्हणून येथे **'मामेवैश्यसि'** म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, तुला समग्राची (**'माम्'** ची) प्राप्ती होईल, ज्याच्यासाठी भगवंताने सातव्या अध्यायाच्या आरंभी म्हटले होते—**'असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु'**. मग तुझी माझ्याशी आत्मीयता होईल, ज्याच्यासाठी भगवंताने सातव्या अध्यायात म्हटले होते—**'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्'** (७। १८), **'प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः'** (७। १७).

***संबंध***—*मागील दोन श्लोकात अर्जुनाला आश्वासन देऊन आता भगवान् पुढील श्लोकात आपल्या उपदेशाची अत्यंत गोपनीय सार गोष्ट सांगत आहेत.*

## सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।
## अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सर्वधर्मान्** | = संपूर्ण धर्मांचा आश्रय | **शरणम्** | = शरण | **सर्वपापेभ्यः** | = संपूर्ण पापातून |
| **परित्यज्य** | = सोडून (तू) | **व्रज** | = ये | **मोक्षयिष्यामि** | = मुक्त करीन, |
| **एकम्** | = केवळ | **अहम्** | = मी | **मा, शुचः** | = चिंता करू नकोस. |
| **माम्** | = मला | **त्वा** | = तुला | | |

***व्याख्या*—सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज**—भगवान् म्हणतात की, संपूर्ण धर्मांच्या आश्रयाचा, धर्माच्या निर्णयाचा विचार सोडून अर्थात् काय करावे आणि काय करू नये—हे सोडून केवळ एका मलाच शरण हो.

स्वतः भगवंतांना शरणागत होणे—हे संपूर्ण साधनांचे सार आहे. यात शरणागत भक्ताला आपल्यासाठी काहीही करावयाचे बाकी राहत नाही. जसे पतिव्रतेचे आपले कोणतेच काम राहत नाही. ती पतिव्रता स्वतःच्या शरीराचीही देखरेख पतीच्या नात्याने, पतीसाठीच करत असते. ती घर, कुटुंब, वस्तू, मुल-मुलींना आणि आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीरालाही आपले मानीत नाही तर पतीदेवाचेच मानते. तात्पर्य हे झाले की, ज्याप्रमाणे पतिव्रता पतीपरायण होऊन पतीच्या गोत्रातच आपले गोत्र मिसळून देते आणि पतीच्याच घरी राहते, त्याचप्रमाणे शरणागत भक्तसुद्धा शरीरसंबंधी मानले जाणारे गोत्र, जाती, नाव इत्यादीना भगवंताच्या चरणी अर्पण करून निर्भय, निःशोक, निश्चिन्त आणि निःशंक होतो.

गीतेनुसार येथे "धर्म" शब्द कर्तव्यकर्माचा वाचक आहे. कारण याच अध्यायाच्या एकेचाळीसाव्या श्लोकापासून चव्वेचाळीसाव्या श्लोकापर्यंत "स्वभावज कर्म" शब्द आले आहेत. नंतर सत्तेचाळीसाव्या श्लोकाच्या पूर्वार्धात "स्वधर्म" शब्द आला आहे. त्यानंतर सत्तेचाळीसाव्या श्लोकाच्याच उत्तरार्धात तसेच (प्रकरणाच्या शेवटी) अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात "कर्म" शब्द आला आहे. तात्पर्य हे झाले की, आदी आणी अंती "कर्म" शब्द आला आहे आणि मध्ये "स्वधर्म" शब्द आला आहे, तर यावरुन सहजच "धर्म" शब्द कर्तव्यकर्माचा वाचक सिद्ध होतो.

आता येथे असा प्रश्न येतो की, "**सर्वधर्मान्परित्यज्य**" पदाने धर्माचा अर्थात् कर्तव्यकर्माचा स्वरूपाने त्याग करावा असे मानावयाचे काय? याचे उत्तर असे आहे की, धर्माचा स्वरूपाने त्याग करणे गीतेनुसार योग्य नाही आणि येथील प्रसंगानुसारही योग्य नाही, कारण भगवंताचे हे वचन ऐकून अर्जुनाने कर्तव्यकर्माचा त्याग केला नाही उलट "**करिष्ये वचनं तव**" (१८।७३) म्हणून भगवंताच्या आज्ञेनुसार कर्तव्यकर्माचे पालन करणे स्वीकार केले आहे. केवळ स्वीकारच केला नाही उलट आपल्या क्षात्रधर्मानुसार युद्धसुद्धा केले आहे. म्हणून उपर्युक्त पदात धर्म अर्थात् कर्तव्याचा त्याग करण्याची गोष्ट नाही. भगवान्सुद्धा कर्तव्य त्यागासंबंधी कसे सांगतील? भगवंतांनी याच अध्यायाच्या सहाव्या श्लोकात म्हटले आहे की, यज्ञ, दान, तप आणि आपापल्या वर्णाश्रमानुसार जी कर्तव्ये आहेत त्यांचा कधीही त्याग करू नये उलट ती अवश्य केली पाहिजेत*

* तीसऱ्या अध्यायात तर भगवंतांनी कर्तव्यकर्म सोडू नये म्हणून एक स्वतंत्र प्रकरणच सांगितले आहे. कर्मांचा त्याग केल्याने निष्कर्मतेचीही

गीतेचे पूर्ण अध्ययन केल्यास असे दिसून येते की, मनुष्याने कोणत्याही परिस्थितीत कर्तव्यकर्माचा त्याग करावयास नको. अर्जुन तर युद्धरूप कर्तव्यकर्म सोडून भिक्षा मागणे श्रेष्ठ समजत होते (२-५) परंतु भगवंतांनी त्याचा निषेध केला (२।३१-३८) यावरुनही हेच सिद्ध होते की, येथे स्वरूपाने धर्माचा त्याग अभिप्रेत नाही.

आता विचार हा करावयाचा आहे की, येथे संपूर्ण कर्माचा त्याग करणे याचा अर्थ कसा घ्यावा? गीतेनुसार संपूर्ण धर्मांना अर्थात् कर्मांना भगवंतांना अर्पण करणे हाच सर्वश्रेष्ठ धर्म आहे. यात संपूर्ण धर्मांच्या आश्रयांचा त्याग करणे आणि केवळ भगवंताचा आश्रय घेणे—ह्या दोन्ही गोष्टी सिद्ध होतात. धर्माचा आश्रय घेणारे वारंवार जन्म-मरणाला प्राप्त होतात—''**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते।**'' (९।२१) म्हणून धर्माचा आश्रय सोडून भगवंताचाच आश्रय घेतल्यावर मग आपल्या धर्माचा निर्णय करण्याची जरूरी राहत नाही. पुढे अर्जुनाच्या जीवनात असे झालेही आहे.

अर्जुनाचे कर्णाबरोबर युद्ध चालू होते. मध्येच कर्णाच्या रथाचे चाक पृथ्वीत धसून फसले. कर्ण रथाखाली उतरून ते वर काढण्याचा प्रयत्न करीत होता. तो अर्जुनाला म्हणाला ''जोपर्यंत हे चाक बाहेर निघत नाही तोपर्यंत तू युद्ध थांबव. कारण तू रथावर आहेस आणि मी रथरहित आहे तसेच दुसऱ्या कार्यात लागलो आहे. अशा वेळी रथीने बाण सोडू नयेत हेच उचित आहे. तू सहस्त्रार्जुनाप्रमाणे शस्त्र व शास्त्र जाणणारा आहेस, धर्मज्ञ आहेस. म्हणून अशा वेळी माझ्यावर प्रहार करणे योग्य नाही.'' कर्णाचे हे बोलणे ऐकून अर्जुनाने युद्ध थांबविले. तेव्हा भगवान् कर्णाला म्हणाले. ''तुझ्या-सारख्या आततायीला कोणत्याही रीतीने ठार करणे धर्मच आहे, पाप नव्हे *आणि आत्ता आत्ता तुम्ही सहा महारथींनी मिळून एकट्या अभिमन्यूला वेढून ठार केले. म्हणून धर्माचे प्रमाण देण्यात काही अर्थ नाही. मात्र ही मोठी भाग्याची गोष्ट आहे की, यावेळी तुला धर्माची आठवण येत आहे परंतु जो स्वत: धर्माचे पालन करीत नाही त्याला धर्माचे प्रमाण देण्याचा काही अधिकार नाही.'' असे म्हणून भगवंतांनी अर्जुनाला बाण सोडण्याची आज्ञा केली, तेव्हा अर्जुनाने बाण मारणे सुरू केले.

अशा प्रकारे जर अर्जुनाने आपल्या बुद्धीने धर्माचा निर्णय केला असता तर ते चूक करून बसले असते. म्हणून त्यांनी धर्माचा निर्णय भगवंतावरच सोडला आणि भगवंतांनी धर्माचा निर्णय केलाही!

अर्जुनाच्या मनात असा सशंय होता की, आपण युद्ध करावे की करू नये, यात कोणती गोष्ट श्रेष्ठ आहे (२।६) जर आपण युद्ध केले तर आपल्या कुटुंबाचा नाश होईल आणि आपल्या कुटुंबाचा नाश करणे हे फार मोठे पाप आहे. यामुळे तर अनर्थ परंपराच वाढेल (१।४०-४४) दुसऱ्या बाजूने विचार केला तर, क्षत्रियासाठी युद्धापेक्षा श्रेष्ठ असे कल्याणाचे दुसरे कोणतेच साधन नाही. म्हणून भगवान् म्हणतात की, काय करावे व काय करू नये, धर्म कोणता व अधर्म कोणता या भानगडीत तू पडतोसच कशाला? तू धर्माच्या निर्णयाचा भार माझ्यावर टाकून दे. हेच

---

प्राप्ती होत नाही आणि सिद्धीही प्राप्त होत नाही. (३।४), कोणताही मनुष्य कोणत्याही अवस्थेत क्षणमात्रसुद्धा कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. (३।५), जो बाहेरुन कर्मांचा त्याग करून आतून विषयांचे चिंतन करतो, तो मिथ्याचारी आहे. (३।६), जो मन, इंद्रियांना वश करून कर्तव्यकर्म करतो तोच श्रेष्ठ आहे (३।७), कर्म केल्याशिवाय शरीरनिर्वाहसुद्धा होत नाही म्हणून कर्म केले पाहिजे (३।८), बंधनाच्या भयानेही कर्माचा त्याग करणे उचित नाही, कारण केवळ कर्तव्यपालनासाठी कर्म करणे बंधनकारक नाही, तर कर्तव्यकर्माची परंपरा सुरक्षित ठेवण्याव्यतिरिक्त आपल्यासाठी कोणतेही कर्म करणे हेच बंधनकारक आहे (३।९), ब्रह्मदेवाने कर्तव्यासहित प्रजेची रचना करून म्हटले की, या कर्तव्यकर्मानेच तुम्हा लोकांची वृद्धी होईल आणि हीच कर्तव्यकर्म तुम्हा लोकांना कर्तव्य-सामुग्री देणारी होतील. (३।१०), मनुष्य आणि देवता दोन्हीही कर्तव्याचे पालन करून कल्याणाला प्राप्त होतील. (३।११), जो कर्तव्यपालन केल्याविना प्राप्त सामुग्रीचा उपभोग करतो, तो चोर आहे (३।१२), कर्तव्यकर्म करून आपला निर्वाह करणारा संपूर्ण पापापासून मुक्त होतो आणि जो केवळ आपल्यासाठीच कर्म करतो, तो पापी पापाचेच भक्षण करतो (३।१३), कर्तव्यपालनानेच सृष्टी चक्र चालते परंतु जो सृष्टीत राहून आपल्या कर्तव्याचे पालन करीत नाही, त्याचे जगणे व्यर्थ आहे (३।१६), आसक्तिरहित होऊन कर्तव्यकर्म करणारा मनुष्य परमात्म्याला प्राप्त होतो (३।१९), जनकादी ज्ञानीजनही कर्तव्यकर्म करूनच सिद्धीला प्राप्त झाले आहेत, लोकसंग्रहाच्या दृष्टीनेसुद्धा कर्तव्यकर्म केले पाहिजे (३।२०), भगवान् स्वत:चे उदाहरण देऊन सांगतात की, जर मी सावध राहून कर्तव्यकर्म केले नाही तर वर्ण संकरतेचा उत्पादक व लोकांचा नाश करणारा ठरेन (३।२३-२४), ज्ञानी पुरुषानेही आसक्तिरहित होऊन आस्तिक अज्ञान्याप्रमाणे आपले कर्तव्यकर्म केले पाहिजे (३।२५), ज्ञान्याने अज्ञ लोकांचा बुद्धिभेद करू नये, त्यांनी आपली कर्तव्यकर्म चोखपणे करून त्यांच्याकडूनही तसेच करवावे (३।२६) अशा प्रकारे तीसऱ्या अध्यायात भगवंतांनी कर्तव्यकर्माचे पालन करण्यावर फार भर दिला आहे.

* आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्। नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन॥ (मनु० ८।३५०-३५१)

''आपले अनिष्ट करण्यासाठी आलेल्या आततायीला विचार न करता ठार केले पाहिजे. आततायीला ठार केल्याने मारणारास काहीच दोष लागत नाही.''

''**सर्वधर्मान्परित्यज्य**'' याचे तात्पर्य आहे.

**मामेकं शरणं व्रज**—या पदांत ''**एकम्**'' पद ''**माम्**'' चे विशेषण होऊ शकत नाही कारण ''**माम्**'' (भगवान्) एकच आहेत. अनेक नाही. म्हणून ''**एकम्**'' पदाचा अर्थ ''**अनन्य**'' घेणेच योग्य वाटते. दुसरी गोष्ट अर्जुनाने ''**तदेकं वद निश्चित्य**'' (३।२) आणि ''**यच्छ्रेय एतयोरेकम्**'' (५।१) पदांतही ''**एकम्**'' पदाने सांख्य आणि कर्मयोगाच्या विषयात एका निश्चित श्रेयाचे साधन विचारले आहे. त्याच ''**एकम्**'' पदाच्या संदर्भात भगवान् येथे ही गोष्ट सांगू इच्छितात की, सांख्ययोग, कर्मयोग इत्यादी जितकी काही भगवत्प्राप्तीची साधने आहेत त्या संपूर्ण साधनांपैकी मुख्य साधन एक अनन्य शरणागतीच आहे.

गीतेत अर्जुनाने आपल्या कल्याणाच्या साधनेविषयी अनेक प्रकारचे प्रश्न केले आणि भगवंतांनी त्यांची उत्तरेही दिली. ती सर्व साधने असतानाही गीतेचे पूर्वापर पाहता असे स्पष्ट दिसून येते की, संपूर्ण साधनांचे सार आणि शिरोमणी साधन भगवंतांना अनन्य शरण जाणे हेच आहे.

भगवंतांनी गीतेत ठिकठिकाणी अनन्यभक्तीचा फार महिमा गायिला आहे. जसे दुस्तर माया सुगमतेने तरून जाण्याचा उपाय अनन्य शरणागतीच आहे* (७।१४) अनन्यचेतासाठी मी सुलभ आहे† (८।१४) परम पुरुषाची प्राप्ती अनन्य भक्तीनेच होते. (८।२२) अनन्य भक्तांचा योग-क्षेम मी वहन करतो (९।२२) अनन्य भक्तीनेच भगवंताना जाणले, पाहिले आणि प्राप्त केले जाऊ शकते (११।५४) अनन्य भक्तांचा मी फार लवकर उद्धार करतो (१२।६-७) गुणातीत होण्याचा उपाय अनन्य भक्तीच आहे (१४।२६) अशा प्रकारे अनन्य भक्तीचा महिमा गाऊन भगवान् येथे गीतेचे पूर्ण सार सांगतात ''**मामेकं शरणं व्रज**'' तात्पर्य, उपाय आणि उपेय; साधन आणि साध्य मीच आहे.

''**मामेकं शरणं व्रज**'' चे तात्पर्य मन, बुद्धीद्वारा शरणागती स्वीकार करणे असे नाही तर स्वतः (स्वने) भगवंताना शरण जाणे हे आहे. कारण स्व शरण गेल्यावर मन, बुद्धी, इंद्रिये, शरीर इत्यादी त्यातच येतात, वेगळे राहत नाहीत.

**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः**— येथे एखादा असे मानू शकतो की, पहिल्या अध्यायात अर्जुनाने युद्धामुळे होणाऱ्या पापांची जी परंपरा सांगितली, त्या पापातून मुक्तता करून देण्याचे प्रलोभन भगवान् दाखवित आहेत. परंतु ही मान्यता युक्तिसंगत नाही कारण जर अर्जुन संपूर्णपणे भगवंताना शरण झाले आहेत, तर मग त्यांची पापे कशी राहू शकतील ?‡ आणि त्यांना प्रलोभन कसे दिले जाऊ शकते अर्थात् त्यांना प्रलोभन देणे हे होऊच शकत नाही. मात्र पापातून मुक्त करण्याचे प्रलोभन द्यावयाचे असते तर ते शरणागत होण्याच्या पूर्वीच दिले जाऊ शकत होते, शरणागत झाल्यानंतर नव्हे.

''मी तुला संपूर्ण पापातून मुक्त करीन'' याचा भाव असा आहे की, जरी तू संपूर्ण धर्मांचा आश्रय सोडून मला शरण आलास आणि शरण झाल्यानंतरही तुझे भाव, वृत्ती, आचरण, यात फरक पडला नाही अर्थात् त्यात सुधारणा झाली नाही, भगवत्प्रेम, भगवद्दर्शन इत्यादी झाले नाही आणि आपल्यात अयोग्यता, अनधिकारिता, निर्बलता इत्यादी जाणवत असेल तर त्याविषयी तू चिंता करू नकोस किंवा भय धरू नकोस. कारण एकदा तू मला शरण आल्यावर अनन्य झाल्यावर त्यातील उणीव तुझी कशी राहील ? त्याची पूर्तता करण्याची जबाबदारी तुझ्यावर कशी राहील ? ती उणीव माझी उणीव आहे. आता त्या उणीवेची पूर्तता करणे माझे काम आहे. तुझे तर बस; एकच काम आहे ते म्हणजे निर्भय, निःशोक, निश्चिंत आणि निःशंक होऊन माझ्या चरणावर पडून राहणे.卐 परंतु जर तुझ्यात भय, चिंता, भ्रम इत्यादी दोष येतील तर ते शरणागतीत बाधक ठरतील आणि सर्व भार तुझ्यावरच येईल. शरण होऊनही आपल्यावर भार घेणे शरणागतीत कलंक आहे.

ज्याप्रमाणे बिभीषण भगवान् रामांच्या चरणी शरण आला तेव्हा त्याच्या दोषांना भगवान् आपले दोष मानतात. एकदा बिभीषण समुद्राच्या अलीकडच्या काठावर आला. तेथे विप्रघोष नावाच्या गावात त्याच्याकडून एक अज्ञात ब्रह्महत्या घडली. त्यावेळी तेथील ब्राह्मणांनी एकत्र जमून बिभीषणाला खूप मारले परंतु तो मेला नाही. मग त्या ब्राह्मणांनी त्याला साखळदंडाने बांधून जमीनीतील एका गुहेत बंद करून ठेवले. श्रीरामांना हा वृत्तांत समजला तेव्हा ते पुष्पक विमानाने तात्काळ विप्रघोष गावी गेले आणि तेथे

* या श्लोकात ''एव'' पद ''अनन्यते'' चेच वाचक आहे.

† या श्लोकात ''अनन्यचेताः'' पद अनन्य आश्रयाचे वाचक आहे.

‡ सनमुख होइ जीव मोहि जबहीं। जन्म कोटि अघ नासहिं तब ही॥ (मानस ५।४४।१)

卐 काहू के बल भजन कौ, काहू के आचार। ''व्यास'' भरोसे कुंवरि के, सोवत पाँव पसार॥

बिभीषणाचा पत्ता लावून त्याच्याजवळ गेले. ब्राह्मणांनी रामचंद्रांचा फार आदर सत्कार केला आणि म्हणाले "महाराज! याने ब्रह्महत्या केली आहे. याला आम्ही खूप मारले पण हा मेला नाही" भगवान् राम म्हणाले "हे ब्राह्मणांनो! मी बिभीषणाला कल्पापर्यंतचे आयुष्य आणि राज्य देऊन ठेवले आहे मग तो कसा मारला जाऊ शकेल? आणि त्याला मारण्याची काय जरूरी आहे? तो तर माझा भक्त आहे. भक्तासाठी मी स्वत: मरायला तयार आहे. दासाच्या अपराधाची जबाबदारी त्याच्या स्वामीवरच असते अर्थात् मालकच दंडास पात्र असतो. म्हणून बिभीषणाऐवजी तुम्ही मला शिक्षा करा.* भगवंताची ही शरणागत वत्सलता पाहून सर्व ब्राह्मण आश्चर्य करू लागले आणि त्या सर्वांनी भगवंताची शरणागती पत्करली.

तात्पर्य, "मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत"—या आत्मीयतेसारखी दुसरी योग्यता, पात्रता, अधिकारिता इत्यादी कोणतीच नाही. हे संपूर्ण साधनांचे सार आहे. लहानसे बालक देखील आत्मीयतेच्या बलावरच अर्ध्या रात्री देखील सर्व घराला नाचविते अर्थात् जेव्हा ते रात्री रडते तेव्हा घरचे सर्व लोक जागे होतात आणि त्याला प्रसन्न करतात. म्हणून शरणागत भक्ताने आपली योग्यता इत्यादीकडे लक्ष न देता भगवंताशी आत्मीयता जोडण्याकडेच लक्ष दिले पाहिजे.

"**मा शुचः**" चे तात्पर्य खालील प्रमाणे आहे.

(१) **मला शरण होऊन तू चिंता करतोस हा तू माझा अपराध करतोस, हा तुझा अभिमान आहे आणि शरणागतीत कलंक आहे.**

मला शरण होऊनही माझ्यावर पूर्ण विश्वास, पूर्ण भरवसा न ठेवणे हा माझ्याविषयी केलेला अपराध आहे. आपल्या दोषांविषयी चिंता करणे वास्तविक आपल्या बलाचा अभिमान आहे. कारण दोष मिटविण्यात आपले सामर्थ्य आहे असे वाटल्यानेच त्यांना मिटविण्याची चिंता होते. मात्र जर दोषांना मिटविण्याची चिंता न होता दु:ख होत असेल तर ते दु:ख होणे इतके दोषी नाही. जसे एखाद्या लहान बालकाजवळ कुत्रा आला तर तो कुत्र्याला पाहून रडतो, चिंता करीत नाही. तसेच दोष न आवडणे हा दोष नाही, चिंता करणे दोष आहे, चिंता करण्याचा अर्थ हाच होतो की, आपल्या मनात लपून असलेल्या बलाचा आश्रय आहे.† आणि हाच तुझा अभिमान आहे. माझा भक्त होऊनही तू जर चिंता करीत आहेस तर तुझी चिंता कोठे कशी दूर होईल? लोकही पहतील व म्हणतील की, हा भगवंताचा भक्त आहे आणि चिंता करतो. भगवान् याची चिंता मिटवीत नाहीत. तू माझा विश्वास न करता चिंता करतोस, त्यात विश्वासाची उणीव तर तुझी आहे आणि कलंक मात्र मला लागतो, माझ्या शरणागतीवर लागतो. हे तू सोडून दे.

(२) **तुझे भाव, वृत्ती, आचरण शुद्ध झाले नाही तरीही तू त्यांची चिंता करू नकोस. त्यांची चिंता मी करीन.**

(३) दुसऱ्या अध्यायाच्या सातव्या श्लोकात अर्जुन भगवंतांना शरण होतात आणि नंतर आठव्या श्लोकात म्हणतात की, या भूमंडळाचे धन-धान्याने संपन्न निष्कंटक राज्य मिळाले अथवा देवतांचे अधिपत्य मिळाले तरीही इंद्रियांना सुकविणारा माझा शोक दूर होऊ शकत नाही. भगवान् जणू असे सांगतात की, तुझे म्हणणे अगदी योग्य आहे. कारण भौतिक नाशवान् पदार्थांच्या संबंधाने कोणाचा शोक कधी दूर झाला नाही, होऊ शकत नाही आणि होण्याची शक्यताही नाही. परंतु मला शरण होऊन जो तू शोक करतो आहेस, ही तुझी फार मोठी चूक आहे. **तू मला शरण होऊन-ही भार आपल्या डोक्यावर घेत आहेस.**

(४) शरणागत झाल्यावर भक्ताने लोक-परलोक, सद्गती-दुर्गती इत्यादी कोणत्याही गोष्टीची चिंता करू नये. या विषयात एका भक्ताने म्हटले आहे.

**दिवि वा भुवि वा ममास्तु वासो नरके वा नरकान्तक प्रकामम्।**
**अवधीरितशारदारविन्दौ चरणौ ते मरणेऽपि चिन्तयामि॥**

हे नरकासुराचा अंत करणाऱ्या प्रभू! आपण मला वाटल्यास स्वर्गात ठेवा अथवा पृथ्वीवर ठेवा किंवा यथेच्छ नरकात ठेवा अर्थात् आपणास इच्छा असेल तेथे ठेवा. जे

* वरं ममैव मरणं मद्भक्तो हन्यते कथम्। राज्यमायुर्मया दत्तं तथैव स भविष्यति॥
भृत्यापराधे सर्वत्र स्वामिनो दण्ड इष्यते। रामवाक्यं द्विजाः श्रुत्वा विस्मयादिदमब्रुवन्॥ (पद्मपुराण पाताल० १०४। १५०-१५१)

† कौरवांच्या सभेत द्रौपदीचे वस्त्र ओढले गेले तेव्हा द्रौपदी आपली साडी हातांनी, दातांनी पकडून ठेवीत होती आणि भगवंताचा धावा करीत होती. आपल्या स्वत:च्या बलाचा आश्रय घेऊन भगवंताचा धावा केल्याने भगवंताना येण्यास उशीर लागला. परंतु जेव्हा द्रौपदी आपले स्वरक्षणाचे सर्व उपाय सोडून भगवंतावर निर्भर झाली, तेव्हा दु:शासन वस्त्र ओढून-ओढून थकून जातो आणी वस्त्रांचा ढीग पडतो परंतु द्रौपदीचे कोणतेही अंग उघडे झाले नाही.

काही करायचे असेल ते करा, या विषयात माझे काहीही म्हणणे नाही. माझी तर एकच मागणी आहे की, शरदऋतूतील कमळाच्या शोभेला लाजविणाऱ्या आपल्या अती सुंदर चरण-कमलांचे मृत्यूसारख्या भयंकर अवस्थेतही मी चिंतन करीत रहावे, आपल्या चरणांची विस्मृती होऊ नये.

## शरणागतीसंबंधी विशेष संकेत

शरणागत भक्त "मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत" ही भावना दृढतेने पकडून ठेवतो, स्वीकार करतो, तेव्हा त्याचे भय, शोक, चिंता, शंका इत्यादी दोषांचे मूळच तुटून जाते अर्थात् दोषांचा आधारच नष्ट होतो. कारण भक्तीच्या दृष्टीने सर्व दोष भगवंताच्या विमुखतेवरच टिकून राहतात.

भगवंतांना सम्मुख होऊनही संसार आणि शरीराच्या आश्रयाचे संस्कार राहतात. जे भगवंताच्या संबंधाची दृढता झाल्यावर मिटतात.* ते मिटल्यावर सर्व दोषही मिटतात.

संबंधाचे दृढ होणे म्हणजे काय? भय, शोक, चिंता, शंका, परीक्षा आणि विपरीत भावना न होणे हेच संबंधाचे दृढ होणे आहे. आता यावर विचार करू.

(१) **निर्भय होणे**—आचरणाची उणीव असल्याने आतून भय उत्पन्न होते आणि साप, विंचू, वाघ इत्यादीपासून बाह्य भय उत्पन्न होते. शरणागत भक्ताचे दोन्ही प्रकारचे भय नाहीसे होते. एवढेच नव्हे, तर पातञ्जली महाराजांनी ज्या मृत्यूच्या भयाला पाचवा क्लेश मानले आहे† आणि जे मोठमोठ्या विद्वानांनाही होत असते‡ ते भयसुद्धा संपूर्णपणे मिटते.卐

आता माझ्या वृत्ती खराब होतील—असा भयाचा भावही साधकाने मनातून काढून टाकावा. कारण "मी भगवंताच्या कृपामृतात बुडून गेलो आहे, आता मला कोणत्याही गोष्टीचे भय नाही. या वृत्तींना माझ्या मानल्यानेच, मी त्यांना शुद्ध करू शकलो नाही. कारण यांना माझे मानणे हीच मलीनता आहे "**ममता मल जरि जाइ**" (मानस ७।११७।क) म्हणून आता मी कधीही यांना आपले मानणार नाही. जर वृत्ती माझ्या नाहीतच तर मला भय कोण्या गोष्टीचे? केवळ आता तर भगवंताची कृपाच कृपा आहे. भगवंताची कृपाच सर्वत्र परिपूर्ण होत आहे, ही मोठी खूशीची, प्रसन्नतेची गोष्ट आहे."

कित्येक जण अशी शंका करतात की, भगवंताला शरण होऊन त्यांचे भजन केल्यास द्वैतापत्ती येईल अर्थात् भगवान् आणि भक्त—हे दोन होतील आणि दुसऱ्यापासून भय उत्पन्न होते—"**द्वितीयाद्वै भयं भवति**" (बृहदारण्यक १।४।२) परंतु ही शंका निराधार आहे. भय द्वितीयाने तर होते परंतु आत्मीयतेने भय होत नाही अर्थात् भय दुसऱ्यापासून होते आपल्यापासून नव्हे. प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य शरीर, संसार द्वितीय आहे. म्हणून त्याच्याशी संबंध ठेवल्यावरच भय होते. कारण त्यांच्याशी नित्यसंबंध राहू शकत नाही कारण प्रकृती आणि पुरुषाचा स्वभाव सर्वथा भिन्न-भिन्न आहे. जसे एक जड आहे आणि एक चेतन आहे. एक विकारी आहे आणि एक निर्विकार, एक परिवर्तनशील आहे आणि एक अपरिवर्तनशील आणि एक प्रकाश्य आहे आणि एक प्रकाशक इत्यादी!

भगवान् द्वितीय नाहीत. ते तर आत्मीय आहेत कारण जीव त्यांचा सनातन अंश आहे त्यांचे स्वरूप आहे. म्हणून भगवंताना शरण झाल्यावर त्यांच्यापासून भय कसे होऊ शकते? उलट त्यांना शरण झाल्यावर मनुष्य नेहमीसाठी अभय होतो. स्थूल दृष्टीने पाहिले तर मुलाला आईपासून दूर राहिल्यास भय होते परंतु आईच्या मांडीवर बसल्यावर त्याचे भय संपून जाते कारण आई त्याची आपली आहे. भगवंताचा भक्त यापेक्षा विलक्षण असतो, कारण आई आणि मुलात तरी भेदभाव दिसतो परंतु भक्त आणि भगवंतात भेदभाव शक्यच नाही.

---

* भगवंताच्या संबंधाची दृढता झाल्याने जेव्हा संसाराचा, शरीराचा आश्रय राहत नाही, तेव्हा जगण्याची आशा, मरण्याचे भय, करण्याची आसक्ती आणि मिळविण्याची लालुच—हे चारीही राहत नाहीत.

† अविद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशाः क्लेशाः। (योगदर्शन २।३)

‡ स्वरसवाही विदुषोऽपि तथारूढोऽभिनिवेशः। (योगदर्शन २।९)

卐 तथा न ते माधव तावकाः क्वचिद् भ्रश्यन्ति मार्गात्त्वयि बद्धसौहृदाः।
त्वयाभिगुप्ता विचरन्ति निर्भया विनायकानीकपमूर्धसु प्रभो॥ (श्रीमद्भा० १०।२।३३)

भगवन्! जे आपले भक्त आहेत, ज्यांनी आपल्या चरणी प्रामाणिक प्रीती जोडली आहे ते कधीही ज्ञानाभिमान्याप्रमाणे आपल्या साधनेपासून ढळत नाहीत. प्रभो! ते मोठमोठी विघ्ने उपस्थित करणाऱ्या सैन्याच्या सरदारांच्या डोक्यावर पाय ठेऊन निर्भयपणे वागतात, कोणतेही विघ्न त्यांच्या मार्गात अडथळा उत्पन्न करीत नाही.

(२) **नि: शोक होणे**—जी गोष्ट होऊन गेली आहे तिच्याविषयी शोक होतो. होऊन गेलेल्या गोष्टीबद्दल शोक करणे फार मोठी चूक आहे कारण जे झाले आहे ते अवश्यंभावी होते आणि जे होणारे नाही ते कधी होऊच शकत नाही; तसेच आता जे होत आहे ते देखील नेमके (वास्तविक) होणारेच होत आहे मग त्याविषयी शोक करण्याची गरजच नाही.* प्रभूच्या या मंगलमय विधानाला जाणून शरणागत भक्त नेहमी नि:शोक राहतो. शोक त्याच्याजवळ कधी येतच नाही.

**(३) निश्चिंत होणे**—जेव्हा भक्त आपल्या म्हणविणाऱ्या सर्व वस्तूसहित आपल्या स्वत:ला भगवंताना समर्पित होतो तेव्हा त्याला लौकिक पारलौकिक किंचिन्मात्र-ही चिंता होत नाही अर्थात् आता जीवननिर्वाह कसा होईल? कोठे रहावे लागेल? माझी दशा काय होईल? कशी गती होईल? इत्यादी चिंता अजिबात राहत नाही.†

भगवंताना शरण झाल्यावर शरणागत भक्ताला असे वाटते की, "जर माझे जीवन प्रभूच्या लायक, सुंदर आणि शुद्ध बनले नाही तर भक्ताप्रमाणे माझे आचरण कुठे झाले? अर्थात् झाले नाही. कारण माझ्या वृत्ती ठीक राहत नाहीत." वास्तविक "माझ्या वृत्ती आहेत" असे मानणेच दोष आहे. वृत्ती तेवढ्या दोषी नाहीत. मन, बुद्धी, शरीर, इंद्रिये इत्यादीत जो माझेपणा आहे—हीच चूक आहे. कारण जर मी भगवंताला शरण झालो आणि सर्व काही त्यांना अर्पण केले तर मग मन, बुद्धी इत्यादी माझी कुठे राहिली? म्हणून शरणागतने मन, बुद्धी इत्यादींच्या अशुद्धीविषयी चिंता कधीही करू नये अर्थात् माझ्या वृत्ती ठीक नाहीत—असा भाव कधीही आणू नये. एखाद्या कारणाने अचानक अशी वृत्ती आलीच तर आर्तभावाने प्रभूंना प्रार्थना करावी की, "हे नाथ! हे प्रभो! रक्षण करा, रक्षण करा, रक्षण करा" अशा प्रकारे प्रभूंचा धावा करावा कारण ते माझे स्वामी आहेत, माझे सर्वसमर्थ प्रभू आहेत. तर मग आता चिंता का करू? आणि भगवंतांनीही सांगितले आहे की, "तू चिंता करू नकोस" **(मा शुच:)**. म्हणून निश्चिंत होऊन मनाने भगवंताच्या चरणावर पडावे आणि भगवंताना म्हणावे "हे नाथ! हे सर्व आपल्या हातातील गोष्ट आहे, आपणच जाणा."

सर्वसमर्थ प्रभूला शरणही जावयाचे आणि चिंताही करावयाची—ह्या दोन्ही गोष्टी परस्पर फार विरोधी आहेत. कारण शरण झाल्यास चिंता कशाची? आणि चिंता असेल तर शरणागती कशी? म्हणून शरणागताने असा विचार करावा की, जर भगवान् असे म्हणतात, की, "मी संपूर्ण पापातून मुक्त करीन" तर मग अशा वृत्तीपासून सुटण्यासाठी मला काही करावे लागेल काय? मी तर बस, आपला आहे. हे भगवंता! माझ्यात वृत्तींना आपले मानण्याचा भाव कधीही येऊ नये, हे नाथ! शरीर, इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी—ही सर्व मला माझी दिसूच नयेत. परंतु सर्व काही आपणाला अर्पण करूनही हे शरीर इत्यादी कधी कधी मला माझी वाटतात, आता या अपराधापासून आपणच मला सोडवा—असे म्हणून निश्चिंत व्हावे.

**(४) नि:शंक होणे**—भगवंताच्या संबंधात कधीही असा संशय घेऊ नये की, मी भगवंताचा झालो किंवा नाही? भगवंतांनी माझा स्वीकार केला की नाही? उलट इकडे लक्ष द्यावे की, मी तर अनादिकालापासून भगंताचाच होतो, भगवंताचाच आहे आणि पुढेही सदा भगवंताचाच राहील. मीच आपल्या मूर्खपणाने स्वत:ला भगवंतापासून वेगळे-विमुख मानले होते. परंतु मी कितीही स्वत:ला भगवंतापासून वेगळे मानले तरीही त्यांच्यापासून वेगळा होऊ शकत नाही आणि होणे शक्यही नाही. जरी मी भगवंतापासून वेगळे होऊ इच्छिल तरीही वेगळा कसा होऊ शकेल? कारण भगवंतांनी म्हटले आहे की, हा जीव माझाच अंश आहे "**मम एव अंश:**" (१५।७). अशा प्रकारे "मी भगवंताचा आहे आणि भगवान् माझे आहेत" या वास्तविकतेची स्मृती येताच ही शंका-संशय नाहीसा होतो. शंका-संशयासाठी किंचित्ही अवकाश राहत नाही.

**(५) परीक्षा न करणे**—भगवंताला शरण होऊन अशी परीक्षा घेऊ नये की, "जर मी भगवंताना शरण झालो आहे तर माझ्यात अशी अशी लक्षणे आली पाहिजेत. अशी लक्षणे नसतील तर मी भगवतांना शरण कुठे झालो?" उलट "**अद्वेष्टा**" इत्यादी (१२।१३-१९) गुणांची आपल्यात उणीव दिसली तर आश्चर्य करावे की,

* (१) राम कीन्ह चाहहिं सोइ होई। करै अन्यथा अस नहिं कोइ॥ (मानस १।१२८।१)
(२) होइहि सोइ जो राम रचि राखा। को करि तर्क बढ़ावै साखा॥ (मानस १।५२।७).

† चिन्ता दीनदयालको, मो मन सदा आनंद। जायो सो प्रतिपालसी, रामदास गोविन्द॥

माझ्यात ही उणीव कशी राहिली?* असा भाव येताच ही उणीव राहणार नाही, मिटून जाईल. कारण हा त्याचा प्रत्यक्ष अनुभव आहे की, पूर्वी ''अद्वेष्टा'' इत्यादी गुण जितके कमी होते तितके आता नाहीत. शरणागत झाल्यावर भक्तांची जितकी काही लक्षणे आहेत ती सर्व प्रयत्न न करता येतात.

**(६) विपरीत धारणा न करणे**—भगवंताच्या शरणागत भक्तात अशी विपरीत धारणाही कशी होऊ शकते की, ''मी भगवंताचा नाही'' कारण हे माझ्या मानण्यावर अथवा न मानण्यावर अवलंबून नाही. भगवंताचा आणि माझा जो परस्पर संबंध आहे तो अतूट, अखंड आणि नित्य आहे. मी या संबंधाकडे लक्ष दिले नाही, ही माझी चूक होती. आता ती चूक दुरुस्त झाली, तर मग विपरीत धारणा होऊच कशी शकते?

जो मनुष्य शुद्ध अंत:करणाने प्रभूची शरणागती स्वीकारतो, त्यात भय, शोक, चिंता इत्यादी दोष राहत नाहीत. त्याचा शरण भाव आपोआपच दृढ होत जातो. जसे लग्नानंतर कन्येचा आपल्या पित्याच्या घराशी संबंध-विच्छेद आणि पतीच्या घराचा संबंध आपोआपच दृढ होत जातो. तो संबंध इतका दृढ होतो की, जेव्हा ती कन्या आजी-पणजी बनते, तेव्हा तिला स्वप्नात देखील भाव येत नाही की, मी इथली नाही. तिच्या मनात हा भाव दृढ होतो की, मी तर इथलीच आहे आणि हे सर्व माझेच आहेत. जेव्हा तिच्या नातवाची पत्नी येते आणि घरात उद्दंडता करते आणि मर्यादेने वागत नाही तेव्हा ती (आजी) म्हणते की, ह्या दुसऱ्या घरून आलेल्या मुलीने माझे घर बिघडविले. पण त्या वृद्ध आजीला याची आठवणही राहत नाही की, मीही तर दुसऱ्या घरचीच (दुसऱ्या घरी जन्मलेली) आहे. तात्पर्य, जर कृत्रिम संबंधामध्येही इतकी दृढता होऊ शकते तर भगवंताचाच अंश असलेल्या या प्राण्याचा भगवंताशी जो नित्यसंबंध आहे, तो दृढ होईल, यात काय आश्चर्य! वास्तविक भगवंताचा संबंध दृढ होण्यासाठी केवळ संसाराशी मानलेल्या संबंधाचा त्याग करण्याचीच आवश्यकता आहे.

शुद्ध अंत:करणापासून प्रभूच्या चरणी शरण झाल्यावर त्या शरणागत भक्तात जरी एखादा भाव, आचरण इत्यादींची थोडीशी उणीव राहिली, कधी विपरीत वृत्ती उत्पन्न झाली अथवा एखाद्या परिस्थितीत सापडून (परवशतेने) कधी थोडेसे दुष्कर्म घडले, तर त्याच्या मनात तळमळ होऊ लागेल. म्हणून त्याला अन्य प्रायश्चिताची जरूरी नाही. भगवान् कृपा करून त्याच्या त्या पापाला संपूर्णपणे नष्ट करतात.†

भगवान् भक्ताच्या आत्मीयतेलाच पाहतात, गुण आणि अवगुण यांना नव्हे. ‡अर्थात् भगवंताला भक्ताचे दोष दिसतच

---

* हे समजण्यासाठी एक ग्रामीण कहाणी आहे. एका आईला तीन मुले होती. त्यापैकी दोन मुले मोठी होती आणि काम धंदा करीत होती. तीसरा मुलगा असाच साधा भोळा होता. त्यांची आई वारली. दोन्ही मोठ्या मुलांनी लहान्या भावास म्हटले की, ''आईच्या अस्थी गंगेत सोडून ये.एवढे काम तू कर''. त्याने ''ठीक आहे'' म्हटले. तो आईच्या अस्थी घेऊन निघाला. घरापासून गंगा ३०० कोस दूर होती. तो पायी चालता चालता थकला तेव्हा त्याने एकाला विचारले की, ''गंगा येथून किती दूर आहे?'' त्याने सांगितले की, ''१५० कोसावर गंगा आहे''. त्याला वाटले आता इतक्या दूर जाणे व परत येणे कधी होणार? असा विचार करून त्याने त्या अस्थी जंगलात टाकून दिल्या आणि एका गावाजवळ जाऊन भांड्यात पाणी भरून घेतले (कारण गंगेला गेल्यावर गंगाजळ आणावे लागते.) आणि परत निघाला आणि गावी येऊन पोहचला. मोठा भाऊ विचार करू लागला की, जर हा गंगेपर्यंत गेला असता तर इतक्या लवकर परत येऊ शकत नव्हता. हा तेथपर्यंत गेलाच नसावा. मोठ्या भावाने त्याला विचारले ''तू गंगेला जाऊन आलास काय?'' त्याने उत्तर दिले ''होय मी गंगेला जाऊन आलो. तेथे ब्रह्मकुंडात अस्थी सोडून हे गंगाजल घेऊन आलो'' अशा प्रकारे खोटे बोलला. मोठ्या भावाला त्याचे बोलणे खरे वाटले नाही परंतु तो गप्प बसला. दुसरे दिवशी सकाळी झोपेतून उठल्यावर एक भाऊ लहान्या भावास म्हणाला ''अरे बाबा! तू खरी गोष्ट सांग. तू गंगेला जाऊन अस्थी विसर्जीत केलास काय?'' त्याने म्हटले-''होय नक्की मी गंगेला जाऊन आलो.'' मोठा भाऊ म्हणाला पहा, रात्री माझ्या स्वप्नात आई आली आणि तिने मला सांगितले की ''त्याने मला गंगेत सोडले नाही, मध्येच अस्थी टाकून आला आहे.'' आता तूच सांग की आईचे म्हणणे खरे आहे की तुझे खरे आहे? लहान भाऊ म्हणाला ''आई इकडे कशाला आली, तिकडेच का गेली नाही? १५० कोस तर तिला मी नेले होते, इकडे न येता तेवढीच ती तिकडे गेली असती तर ती गंगेला पोहचली असती.''

या कहाणीचे तात्पर्य, भगवंतांना शरण झाल्यानंतरही कसोटी लावतात, परीक्षा घेतात की ''भक्तांची, संतांची लक्षणे माझ्यात आली नाहीत तर मी भगवंतांना शरण झालो नाही.'' ही आई उलट का इकडे आली, सुलटीच का नाही गेली? ''जर मी भगवंतांना शरण झालो आहे तर आता या लक्षणांची उणीव का राहिली? माझ्यात ही लक्षणे का आली नाहीत.'' असे मानल्यास साधक शरणागत होऊन पूर्णतेलाही पोहचेल परंतु ''माझ्यात लक्षणे नाहीत म्हणून मी शरणागत नाही'' असे मानल्यास धोका होईल.

† स्वपादमूलं भजतः प्रियस्य त्यक्तान्यभावस्य हरिः परेशः।
विकर्म यच्चोत्पतितं कथञ्चिद् धुनोति सर्वं हृदि संनिविष्टः॥ (श्रीमद्भा० ११।५।४२)

''जो प्रेमी भक्त भगवंताच्या चरणांचे अनन्यभावाने भजन करतो, त्याच्याकडून जर अकस्मात् कोणते पाप कर्म जरी घडले तर त्याच्या हृदयात विराजमान असलेले परम पुरुष भगवान् श्रीहरी ते पापकर्म सर्वथा नष्ट करून टाकतात.''

‡ रहति न प्रभु चित चूक किए की। करत सुरति सय बार हिए की॥ (मानस १।२९।३)

नाहीत; त्यांना तर केवळ भक्ताविषयी जी आत्मीयता असते तीच दिसते. कारण स्वरूपाने भक्त नित्यच भगवंताचा आहे. दोष आगंतुक असल्याने येत-जात राहतात आणि तो नित्य निरंतर जसाच्या तसाच राहतो. भगवंताची दृष्टी या वास्तविकतेकडेच कायम राहते. जेव्हा धुळीने, चिखलाने माखलेले मूल आईसमोर येते तेव्हा आईची दृष्टी केवळ आपल्या मुलाकडेच जाते, त्याला लागलेल्या चिखलाकडे जात नाही. मुलाची दृष्टीही चिखलाकडे जात नाही. आई स्वच्छ करो अथवा न करो! परंतु मुलाच्या दृष्टीत चिखल नाहीच, त्याच्या दृष्टीत तर केवळ आईच आहे. द्रौपदीच्या मनात केवढा द्वेष आणि क्रोध भरलेला होता की, जेव्हा दु:शासनाच्या रक्ताने आपले केस धुईन, तेव्हाच केश बांधीन. परंतु द्रौपदी जेव्हा केव्हा भगवंताना आर्त स्वराने हाक मारते, तेव्हा भगवान् त्वरित येतात कारण भगवंताशी द्रौपदीची गाढ आत्मीयता होती.

भगवंताशी आत्मीयता होण्यात दोन भाव राहतात. (१) भगवान् माझे आहेत. (२) मी भगवंताचा आहे. या दोन्हीत भगवंताचा संबंध सारखा दिसत असला तरीही ''भगवान् माझे आहेत'' भावनेत भगवंतापासून आपल्यास अनुकूलतेची इच्छा होऊ शकते की, ''भगवान् जर माझे आहेत तर माझी इच्छापूर्ती का करीत नाहीत ?'' परंतु ''मी भगवंताचा आहे'' या भावनेत भगवंतापासून आपल्या अनुकूलतेची इच्छा होऊ शकत नाही कारण ''मी भगवंताचा आहे तर भगवान् माझ्यासाठी जे योग्य समजतील ते त्यांनी नि:संकोचपणे करावे'' म्हणून साधकाने भगवंताच्या मर्जीतच आपली मर्जी सर्वथा मिळवावी. भगवंतावर आपले किंचितही अधिपत्य मानू नये उलट आपल्यावर त्यांचे पूर्ण अधिपत्य मानावे. कधी भगवंतांनी आपल्या मनोनुकूल केले तर त्याविषयी संकोच वाटावा की, भगवंताना माझ्यासाठी हे करावे लागले. जर आपल्या मनोनुकूल होण्याने संकोच झाला नाही आणि संतोष वाटला तर ती शरणागती नव्हे. शरणागत भक्त शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी यांच्या प्रतिकूल परिस्थितीतही भगवंताची मर्जी समजून प्रसन्न राहतो.

शरणागत भक्ताला आपल्यासाठी कधी किंचिन्मात्रही काही करावयाचे शिल्लक राहत नाही, कारण त्याने संपूर्ण ममता असलेल्या वस्तू ज्या वास्तविक प्रभूच्याच होत्या त्यांच्यासह आपल्या स्वत:ला भगवंतांना अर्पण केलेले असते. आता करणे, करविणे इत्यादी सर्व काम भगवंताकडेच राहिले. अशा अवस्थेत तो कठीणाती कठीण आणि भयंकराती भयंकर घटनेमध्ये, परिस्थितीमध्येही आपल्यावर प्रभूची महान् कृपा पाहून सदा प्रसन्न राहतो, मस्त राहतो. ज्याप्रमाणे गरुडाने विचारल्यावरुन काकभुशुंडींनी आपल्या पूर्वजन्मातील ब्राह्मण-शरीराची कथा सांगितली. त्यात लोमश ऋषीने शाप देऊन त्यांना (ब्राह्मणाला) पक्ष्यामध्ये नीच असलेला चांडाळ पक्षी (कावळा) बनविला. परंतु काकभुशुंडीजीच्या मनात कोणतीही भीती किंवा दीनता आली नाही. त्यांनी त्यात भगवंताचे शुद्ध विधानच समजले. केवळ समजलेच नाही तर ते म्हणाले—**उर प्रेरक रघुबंस बिभूषण** (मानस ७।११३।१). असा भयंकर शाप मिळाल्यावरही जेव्हा काकभुशुंडीच्या प्रसन्नतेत कोणतीही उणीव आली नाही, तेव्हा लोमशऋषींनी त्यांना आपल्या-जवळ बोलवून घेतले आणि बालक रामाचे ध्यान सांगितले. नंतर भगवंताची कथा सांगितली आणि अत्यंत प्रसन्न होऊन त्यांच्या डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद दिला की, ''माझ्या कृपेने तुझ्यात अबाध, अखंड रामभक्ती राहील. तू रामाचा प्रिय होशील. तू संपूर्ण गुणांची खाण होशील. तू इच्छित रूप धारण करू शकशील. तुझ्या निवासस्थानापासून एक योजन-पर्यंत मायेचा किंचित्ही प्रभाव राहणार नाही. इत्यादी'' अशा प्रकारे आशीर्वाद देणे पूर्ण होताच आकाशवाणी झाली की, ''हे ऋषे! आपण जे म्हटले ते सत्य होईल, हा मन, वाणी व कर्माने माझा भक्त आहे'' यालाच अनुसरून भगवंताच्या विधानात सदा प्रसन्न राहणारे काकभुशुंडी यांनी म्हटले आहे—

**भगति पच्छ हठ करि रहेउँ दीन्हि महा रिषि साप।**
**मुनि दुर्लभ बर पायउँ देखहु भजन प्रताप॥**
(मानस ७।११४ ख)

येथे ''भजन प्रताप'' शब्दांचा अर्थ भगवंताच्या विधानात नित्य प्रसन्न राहणे हा आहे. अत्यंत विपरीत अवस्थेतही प्रेमी भक्ताची प्रसन्नता अधिकाधिक वाढत राहते कारण प्रेमाचे स्वरूपच प्रतिक्षण वर्धमान आहे.

जी वस्तू आपली असते ती नेहमीच आपल्याला आवडत असते असा नियम आहे. भगवान् संपूर्ण जीवांना आपले प्रिय मानतात-''**सब मम प्रिय सब मम उपजाए।**'' (मानस ७।८६।२) आणि या जीवालाही प्रभू सहजच प्रिय वाटतात. मात्र, ही गोष्ट वेगळी की, हा जीव परिवर्तनशील संसाराला आणि शरीराला भ्रमाने आपले मानून आपल्या आवडत्या प्रभूला विमुख होतो. हा विमुख झाला तरीही

भगवंतांनी स्वत:हून कोण्याही जीवाचा त्याग केलेला नाही. आणि त्याग कधी करू शकतही नाहीत. कारण जीव सदैव साक्षात् भगवंताचाच अंश आहे. म्हणून संपूर्ण जीवांशी भगवंताची आत्मीयता अक्षुण्ण, अखंडितरूपाने स्वाभाविकच कायम राहते. म्हणून ते सर्व जीवांवर कृपा करण्यासाठी भक्तांचे रक्षण, दुष्टांचा विनाश आणि धर्माची स्थापना या तीन गोष्टींसाठी वेळोवेळी अवतार घेतात. (४।८) या तिन्ही गोष्टींमध्ये केवळ भगवंताची आत्मीयताच दृष्टोत्पत्तीस येत आहे. नाही तर भक्तांचे रक्षण, दुष्टांचा विनाश आणि धर्माची स्थापना हे करण्यात भगवंताचे, काय प्रयोजन सिद्ध होते? अर्थात् काहीही प्रयोजन सिद्ध होत नाही. भगवान् तर ही तिन्हीही कामे केवळ प्राणीमात्राच्या कल्याणासाठीच करतात.ही प्राणीमात्राशी भगवंताची स्वाभाविक आत्मीयता, कृपाळुता, प्रियता, हितैषिता, सुहृत्ता आणि निरपेक्ष उदारताच सिद्ध होते आणि येथेही अर्जुनाला याच दृष्टीने म्हणत आहेत—''**मद्भक्तो भव, मन्मना भव, मद्याजी भव, मां नमस्कुरु**'' या चारही गोष्टीत भगवंताचे तात्पर्य, केवळ जीवाला आपल्या सम्मुख करविण्यातच आहे. त्यामुळे संपूर्ण जीव असत् पदार्थापासून विमुक्त व्हावेत, कारण दु:ख, संताप, वारंवार जन्मणे-मरणे सर्व विपत्ती इत्यादीमध्ये मुख्य हेतू भगवंताशी विमुख होणे हाच आहे.

भगवान् जे काही विधान करतात, ते संसारमात्राच्या; संपूर्ण जीवांच्या कल्याणासाठीच करतात. बस, भगवंताच्या या कृपेकडे जीवाची दृष्टी गेली तर मग त्याला काय करायचे बाकी राहते? जीवांच्या हितासाठी भगवंताच्या हृदयात एक प्रकारची तळमळ आहे म्हणूनच भगवान् ''**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**'' सारखी अत्यंत गोपनीय गोष्ट सांगतात. कारण भगवान् जीवमात्रास आपले मित्र मानतात—''**सुहृदं सर्वभूतानाम्।**'' (५।२९) आणि त्यांना ही स्वतंत्रता देतात की, ते कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग, अष्टांग योग, लययोग, हठयोग, राजयोग, मंत्रयोग इत्यादी जितकी काही साधने आहेत, ती सर्वची सर्व भगवंताकडून आणि भगवत्तत्त्व जाणणाऱ्या महापुरुषांकडूनच प्रकट केली गेली आहेत.* म्हणून या सर्व साधनेत भगवत्कृपाच ओतप्रोत आहे. साधन करण्यात तर साधक निमित्तमात्र होतो परंतु साधनाच्या सिद्धीत भगवत्कृपाच मुख्य असते.

शरणागत भक्ताने तर अशी चिंताही कधी करू नये की, अजून भगवद्दर्शन झाले नाही, भगवच्चरणी प्रेम झाले नाही, अजून वृत्ती योग्य झाली नाही इत्यादी! अशा प्रकारच्या चिंता करणे जणू वानरीचे पिल्लू बनणे आहे. वानरीचे पिल्लू वानरीला स्वत:च घट्ट पकडून ठेवते. मग ती वानरी उडी मारो, कोठेही जावो,ते तिला चिकटून राहते.

भक्तांनी तर आपल्या सर्व चिंता भगवंतावरच सोडून दिल्या पाहिजेत अर्थात् भगवद्दर्शन होवो अथवा न होवो, प्रेम देवोत वा न देवोत, वृत्ती शुद्ध करोत अथवा न करोत, आपल्याला शुद्ध बनवोत अथवा न बनवोत. हे सर्व भगवंताच्या मर्जीवर सोडून दिले पाहिजे. त्याने तर मांजरीचे पिल्लू बनावे. मांजरीचे पिल्लू आपल्या आईवर अवलंबून राहते. ती वाटेल तेथे ठेवो, वाटेल तेथे नेवो, मांजरी आपल्या मर्जीप्रमाणे त्यांना उचलून घेऊन जाते तर ती पिल्ले आपले पाय आखडून घेतात. त्याचप्रमाणे शरणागत भक्त संसारापासून आपले हात-पाय संकोचून घेऊन† केवळ भगवंताचे चिंतन, नाप जप, इत्यादी करीत राहतो, भगवंताकडेच दृष्टी ठेवतो. भगवंताच्या विधानात परम प्रसन्न राहतो आपल्या मनाची कोणतीच इच्छा ठेवीत नाही.

ज्याप्रमाणे कुंभार अगोदर माती डोक्यावर घेऊन येतो तर त्याची मर्जी, मग माती ओली करून पायाखाली तुडवितो, तर त्याची मर्जी, मग चाकावर चढवितो आणि घुमवितो तर त्याची मर्जी. माती कधीच काही म्हणत नाही की, तू घडा बनव, पणती बनब, माठ बनव. कुंभार वाटेल ते बनवो त्याची मर्जी! त्याचप्रमाणे शरणागत भक्त आपली काहीही मर्जी, इच्छा ठेवीत नाही. तो जितका अधिक निश्चिंत आणि निर्भय असतो, भगत्कृपा त्याला आपोआप तितकेच अधिक आपल्या अनुकूल बनवून घेते आणि जितकी तो चिंता करतो, आपले बल मानतो, तितकीच येणाऱ्या भगवत्कृपेत बाधा आणतो. अर्थात् शरणागत झाल्यावर भगवंताकडून जी विलक्षण, विचित्र, अखंड, अतूट कृपा येते, त्या कृपेत आपल्या चिंतेने बाधा येते.

ज्याप्रमाणे कोळी मासे पकडण्यासाठी नदीत जाळे टाकतो तेव्हा जाळ्यात आलेले सर्व मासे पकडले जातात

* हेतु रहित जग जुग उपकारी। तुम्ह तुम्हार सेवक असुरारी॥ (मानस ७।४७।३)

† भक्त जे काही काम करतो, ते भगवंताचेच समजून, भगवंताचीच शक्ती मानून, भगवंतासाठीच करतो, आपल्यासाठी काहीही करीत नाही—हेच त्याचे हातपाय आखडून घेणे आहे.

परंतु जे मासे कोळ्याच्या पायाजवळ असतात ते पकडले जात नाहीत. त्याचप्रमाणे भगवंताच्या मायेत (संसारात) ममता करून जीव फसतात आणि जन्मत-मरत राहतात. परंतु जे जीव मायापती भगवंताच्या चरणाला शरण होतात ते माया तरून जातात—"**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते।**" (७।१४) या दृष्टांताचा एकच अंश ग्रहण केला पाहिजे कारण कोळ्याचा मासे जाळ्यात फसविण्याचाच उद्देश असतो परंतु भगवंताचा जीवांना मायेत फसविण्याचा थोडाही उद्देश नसतो. भगवंताचा भाव तर जीवांना मायाजाळातून मुक्त करून त्यांना आपल्याशी शरणागत करण्याचा असतो. म्हणूनच ते म्हणतात—"**मामेकं शरणं व्रज**" जीव संयोगजन्य सुखाच्या लालसेने स्वतःच मायेत फसून जातात.

ज्याप्रमाणे चालू असलेल्या चक्कीत येणारे सर्व दाणे दळले जातात.* परंतु जाते ज्या खुंट्याच्या आधारावर चालते त्याच्या आसपास राहणारे दाणे जसेच्या तसे सुरक्षित राहतात. त्याचप्रमाणे जन्म-मरणरूपी संसाराच्या फिरणाऱ्या जात्यामध्ये पडलेले सर्वचे सर्व जीव रगडले जातात. अर्थात् दुःख भोगतात. परंतु ज्याच्या आधारावर संसार चक्र चालत असते त्या भगवंताच्या चरणांचा आश्रय घेणारा जीवमात्र दुःखापासून मुक्त होतो—"**कोई हरिजन उबरे, कील माकडी पास**" परंतु हा दृष्टांतही पूर्णपणे लागू होत नाही. कारण दाणे तर स्वाभाविकपणेच आधारभूत खुंट्याजवळ राहतात. ते वाचण्यासाठी कोणताही उपाय करीत नाहीत. भगवद्भक्त संसाराला विमुख होऊन प्रभूच्या चरणांचा आश्रय घेतात. तात्पर्य, जो भगवंताचा अंश असूनही संसाराला आपले मानतो अथवा संसाराकडून काही तरी इच्छितो, तोच जन्म-मरण-रूपी चक्रात सापडून दुःख भोगतो.

संसार आणि भगवान् या दोघांचा संबंध दोन प्रकारचा असतो. संसाराचा संबंध केवळ मानलेला आहे आणि भगवंताचा संबंध वास्तविक आहे. संसाराचा संबंध तर मनुष्याला पराधीन करतो, गुलाम करतो परंतु भगवंताचा संबंध मनुष्याला स्वाधीन करतो, चिन्मय बनवितो आणि भगवंताचाहीं मालक बनवितो!

एखाद्या गोष्टीविषयी आपल्यात जी विशेषता दिसून येते तीच वास्तविक पराधीनता आहे. जर मनुष्याने विद्या, बुद्धी, धन-संपत्ती, त्याग, वैराग्य इत्यादी कोणत्याहीविषयी आपली विशेषता मानली तर ती विद्या इत्यादींची पराधीनता, दासताच आहे. जसे एखादा धनामुळे आपल्यात विशेषता मानीत असेल तर ही विशेषता धनाचीच झाली, स्वतःची नव्हे. तो आपल्याला धनाचा मालक मानतो परंतु वास्तविक तो धनाचा गुलाम असतो.

संसाराचा असा नियम आहे की, सांसारिक पदार्थांमुळे आपल्यात जी काही विशेषता मानतो त्याला हे सांसारिक पदार्थ तुच्छ बनवितात, पद-दलित करतात. परंतु जो भगवंताचा आश्रित होऊन नेहमी भगवंतावरच अवलंबून राहतो, त्याला आपली काही विशेषता दिसतच नाही. उलट भगवंताचीच अलौकिकता, विलक्षणता, विचित्रता दिसते. भगवान् वाटल्यास त्याला आपला मुकुटमणी बनवो की मालक, तरीही त्यात त्याला आपली कोणतीही विशेषता दिसत नाही. प्रभूचा हा नियम आहे की, ज्या भक्ताला आपल्यात काहीही विशेषता दिसत नाही, आपल्यात कोणत्याही गोष्टीचा अभिमान नसतो, त्या भक्तात भगवंताची विलक्षणता उतरते. कोणा कोणात इतकी विलक्षणता उतरते की, त्याचे शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी प्राकृत पदार्थही चिन्मय बनतात. त्यांच्यात जडतेचा अत्यंत अभाव होतो. असे भगवंताचे कित्येक प्रेमी भक्त भगवंतात सामावले, शेवटी त्यांची शरीरे सापडली नाहीत. जसे संत मीराबाई शरीरासह भगवंताच्या श्रीविग्रहात लीन झाली. केवळ ओळखण्यासाठी तिच्या साडीचा एक पदर श्री विग्रहाच्या मुखात राहिला, इतर काहीही शिल्लक राहिले नाही. त्याचप्रमाणे श्री संत तुकाराम महाराज देखील शरीरासह वैकुंठाला गेले.

ज्ञानमार्गात शरीर चिन्मय होत नाही कारण ज्ञानी असत्शी संबंध-विच्छेद करून असत्पासून वेगळा होऊन स्वतः चिन्मय तत्त्वात स्थित होतो. परंतु जेव्हा भक्त भगवंताच्या सम्मुख होतो, तेव्हा त्याचे शरीर, इंद्रिये, मन, प्राण इत्यादी सर्व भगवत्सम्मुख होतात. तात्पर्य, ज्यांची दृष्टी केवळ चिन्मय तत्त्वावरच असते अर्थात् ज्यांच्या दृष्टीत चिन्मय तत्त्वापासून भिन्न जडतेची स्वतंत्र सत्ताच नसते, त्यामुळे ती चिन्मयता त्यांच्या शरीरादीतही उतरते आणि ते शरीरादी चिन्मय होतात. मात्र लोकांच्या दृष्टीत तर त्यांच्या शरीरात जडता दिसते परंतु वास्तविक त्यांची शरीरे चिन्मयच असतात.

भगवंताना सर्वतोपरी शरण झाल्यावर शरणागतासाठी भगवत्कृपा तर विशेषतेने प्रकट होतच असते परंतु संपूर्ण संसाराचा स्नेहपूर्वक पालन करणाऱ्या आणि भगवंताशी

* चलती चक्की देखकर दिया कबीरा रोय। दो पाटन में आयके साबुत बचा न कोय॥

अभिन्न असणाऱ्या वात्सल्यमयी माता लक्ष्मीचा प्रभू-शरणागतावर किती अधिक स्नेह असतो, त्या किती तरी अधिक प्रीती करतात, याचे कोणीही वर्णन करू शकत नाही. लौकिक व्यवहारातही दिसून येते की, पतिव्रता स्त्रीला पितृभक्त पुत्र फार प्रिय वाटतो.

दुसरी गोष्ट, प्रेमभावनेने परिपूर्ण प्रभू जेव्हा भक्ताला पाहण्यासाठी गरुडावर स्वार होऊन येतात तेव्हा माता लक्ष्मी-ही प्रभूबरोबर गरुडावर बसून येतात, त्या गरुडाच्या पंखातून सामवेद मंत्रांचे गान होत असते परंतु जो कोणी भगवंतांना न इच्छिता केवळ माता लक्ष्मीचीच इच्छा करतो, तर त्याच्या स्नेहामुळे माता लक्ष्मी तर येतात परंतु त्यांचे वाहन दिवान्ध घुबड हे असते. अशा वाहनावरील लक्ष्मीला प्राप्त करून मनुष्यही मदान्ध होतो. जर कोणी मातेला भोग्या समजले तर त्याचे फार मोठे पतन होते. कारण तो तर आपल्या मातेकडेच कुदृष्टीने पाहतो, म्हणून तो महान् अधम आहे.

तीसरी गोष्ट, जेथे केवळ भगवंताचे प्रेम असते तेथे तर भगवंताशी अभिन्न राहणारी लक्ष्मी भगवंताबरोबर येतच असते. परंतु जेथे केवळ लक्ष्मीचीच इच्छा असते तेथे लक्ष्मी बरोबर भगवान्ही येतील असा काही नियम नाही.

शरणागतीविषयी एक कथा आहे. श्रीराम, सीता व हनुमान हे जंगलात एका झाडाखाली बसले होते. त्या झाडाच्या फांद्यांवर एक वेली पसरलेली होती. वेलीचे कोमल तंतू पसरले होते. तंतूमधून नव नवीन पालवी निघत होती आणि कोठे कोठे ताम्रवर्णाची पाने निघत होती. पाना-फुलांनी ती लता बहरलेली होती. त्यामुळे झाडाची शोभा सुंदर दिसत होती. झाड फारच शोभायमान व सुंदर दिसत होते. त्या झाडाची शोभा पाहून श्रीराम हनुमंतांना म्हणाले—''हनुमंता! ही लता बघ किती सुंदर आहे. झाडाच्या चहू बाजूंनी कशी पसरलेली आहे. ही लता आपल्या सुंदर फुलाने आणि हिरव्या पानाने या झाडाची शोभा कशी वाढवीत आहे. त्यामुळे या जंगलातील इतर वृक्षांपेक्षा हा वृक्ष किती सुंदर दिसत आहे. एवढेच नव्हे तर ह्या वृक्षामुळेच सर्व जंगल शोभायमान दिसत आहे. ह्या वेलीमुळेच पशु-पक्षी या वृक्षाचा आश्रय घेतात. धन्य आहे ही लता!''

भगवान् श्रीरामांच्या मुखाने वेलीची प्रशंसा ऐकून सीताजी हनुमंतांना म्हणाल्या ''हे बघ हनुमान्! तू लक्ष दिलेस की नाही? या वेलीचे वर चढणे पाना-फुलांनी बहरणे, तंतूंचे पसरणे—हे सर्व वृक्षाच्या आश्रयानेच आहे, वृक्षामुळेच आहे. या वेलीची शोभाही वृक्षामुळेच आहे. म्हणून मूळात महत्त्व वृक्षाचेच आहे. आधार तर वृक्षच आहे. वृक्षाच्या आश्रयाशिवाय वेली स्वतः काय करू शकते? कशी पसरू शकते? आता सांग हनुमंता! तूच सांग महत्त्व वृक्षाचेच झाले की नाही?''

श्रीरामचंद्र म्हणाले—''काय हनुमान्! हा महिमा तर वेलीचाच झाला ना?''

श्री हनुमंत म्हणाले—''मला तर तिसरीच गोष्ट सुचली''

श्री सीताजी म्हणाल्या—''ती गोष्ट कोणती रे बाळा? सांग.''

श्री हनुमंत म्हणाले—''मातोश्री! वृक्ष आणि वेली यांची छाया फार सुंदर आहे. म्हणून मला तर ह्या होघांच्या छायेतच राहणे चांगले वाटत आहे अर्थात् मला तर आपल्या दोघांच्या छायेत (चरणांचा आश्रय) राहणेच चांगले वाटते.''

**सेवक सुत पति मातु भरोसें। रहइ असोच बनइ प्रभु पोसें॥**

(मानस ४।३।२)

त्याचप्रमाणे भगवान् आणि त्यांची दिव्य आल्हादिनी शक्ती दोन्हीही एक दुसऱ्याची शोभा वाढवितात. परंतु कोणी तर त्या दोघांना श्रेष्ठ मानतात, कोणी केवळ भगवंताना श्रेष्ठ म्हणतो आणि कोणी केवळ त्यांच्या आल्हादिनी शक्तीला श्रेष्ठ म्हणतो. शरणागत भक्तासाठी तर प्रभू आणि त्यांची आल्हादिनी शक्ती—दोघांचाही आश्रय श्रेष्ठ आहे.

एकदा एक आंधळे संत (प्रज्ञाचक्षू) हातात काठी घेऊन यमुनेच्या काठाने जात होते. नदीला पूर आलेला होता, त्या पुरामुळे यमुनेचा काठावरचा भाग पाण्यात घसरला होता त्यामुळे संतही पाण्यात पडले. हातातून काठी निघून गेलेली होती. दिसत तर नव्हतेच. आता पोहावे तर कोणीकडे पोहावे? भगवंताच्या शरणागतीची आठवण आली. लगेच त्यांनी आपले सर्व शरीर ढिले सोडून दिले. त्यावेळी त्यांना असे जाणवले की, कोणी तरी आपला हात धरून काठावार आणून सोडले आहे. तेथे दुसरी काठीही मिळाली आणि त्याचा आधार घेऊन ते चालू लागले. तात्पर्य, जो भगवंताना शरण जाऊन त्यांच्यावर निर्भर होतो त्याला आपल्यासाठी काही करावे लागत नाही. भगवंताच्या विधानाने जे होईल त्यात तो प्रसन्न राहतो.

बऱ्याच बकऱ्या जंगलात चरायला गेल्या होत्या. त्यापैकी एक बकरी चरता चरता एका वेलीमध्ये गुंतून पडली. तिला त्या वेलीतून सुटका करून घेण्यास फार वेळ लागला. तोपर्यंत अन्य सर्व बकऱ्या आपल्या घरी पोहचल्या. अंधार पडला होता. ती बकरी फिरत-फिरत एका सरोवरा-

जवळ आली. तेथे काठावर ओल्या जमिनीत सिंहाच्या एका पावलाचे चिन्ह उमटले होते. ती बकरी त्या चरण चिन्हाला शरण होऊन तेथे बसली. रात्री जंगलातील लांडगे, वाघ इत्यादी प्राणी बकरीला खाण्यासाठी जवळ आले त्यावेळी त्या बकरीने सांगितले की, "मी कोणाला शरण झाले आहे ते अगोदर पहा नंतर मला खा" त्या चिन्हाला पाहून ते म्हणू लागले—"अरे ही तर सिंहाच्या चरण चिन्हाला शरण झाली आहे. लवकर पळा नाही तर सिंह येईल आणि आपल्याला मारून टाकील" अशा प्रकारे सर्व प्राणी भयभीत होऊन पळून गेले. शेवटी ज्याचे चरण चिन्ह होते तो सिंह स्वतः आला आणि बकरीला म्हणाला—"तू जंगलात एकटी कशी बसली आहेस?" तिने उत्तर दिले—"हे चरण चिन्ह पहा आणि मग बोला. ज्याचे हे चरण चिन्ह आहे त्यालाच मी शरण होऊन येथे बसली आहे". सिंहाने पाहिले की, हे तर आपल्याच पायाचे चिन्ह आहे. ही तर मलाच शरण आली आहे. मग त्याने तिला आश्वासन दिले की "तू आता निर्भय होऊन रहा."

रात्री जेव्हा पाणी पिण्यासाठी हत्ती आला तेव्हा सिंहाने हत्तीला म्हटले "तू या बकरीला पाठीवर चढवून घे. हिला जंगलातून चारून आणीत जा आणि नेहमी आपल्या पाठीवरच राहू दे नाही तर तुला माहीत आहे ना की मी कोण आहे? मारून टाकील." सिंहाची आज्ञा ऐकून हत्ती थरथर कापू लागला. त्याने आपल्या सोंडेने ताबडतोब बकरीला उचलले व पाठीवर चढवले. आता ती बकरी निर्भय होऊन हत्तीच्या पाठीवर बसून उंच झाडांचा कोवळा पाला खाऊ लागली आणि मजेत राहू लागली.

**खोज पकड़ सैठे रहो, धणी मिलेंगे आय।**
**अजया गज मस्तक चढे, निर्भय कोंपल खाय॥**

त्याचप्रमाणे जेव्हा मनुष्य भगवंतांना शरण होतो, त्यांच्या चरणांचा आश्रय घेतो तेव्हा तो सर्व प्राण्यांपासून, विघ्न बाधेपासून निर्भय होतो. त्याला कोणीही भयभीत करू शकत नाही. कोणीही त्याचे काहीही बिघाडू शकत नाही.

**जो जाको शरणो गहै, ताकहँ ताकी लाज।**
**उलटे जल मछली चले बह्यो जात गजराज॥**

भगवंताशी काम, भय, द्वेष, क्रोध, स्नेह इत्यादींनीही का होईना संबंध जोडला गेला तरी तो जिवाचे कल्याण करणाराच होतो.* तात्पर्य, काम, भय, द्वेष इत्यादी कोणत्याही प्रकारे का होईना ज्यांचा भगवंताशी संबंध जडला त्यांचा तर उद्धार झालाच, परंतु ज्यांनी भगवंताशी संबंध जोडला नाही, उदासीनच राहिले ते भगवत्प्राप्तीपासून वंचित राहिले. भगवंताच्या अनन्य भक्तासाठी नारदांनी म्हटले आहे—"**नास्ति तेषु जातिविद्यारूपकुलधनक्रियादिभेदः**" (नारदभक्तिसूत्र ७२) "त्या भक्तामध्ये जाती, विद्या, रूप, कुल, धन, क्रिया इत्यादींचा भेद नाही."

तात्पर्य स्थूल, सूक्ष्म आणि कारण यासंबंधी सांसारिक जितक्या काही जाती, विद्या इत्यादी भेद होऊ शकतात ते

* (१) कामाद् द्वेषाद् भयात् स्नेहाद् यथा भक्त्येश्वरे मनः। आवेश्य तदघं हित्वा बहवस्तद्गतिं गताः॥
गोप्यः कामाद् भयात् कंसो द्वेषाच्चैद्यादयो नृपाः। सम्बन्धाद् वृष्णयः स्नेहाद् यूयं भक्त्या वयं विभो॥
(श्रीमद्भा० ७।१।२९-३०)

"एक नाही, अनेक माणसे काम, द्वेष, भीती आणि स्नेह यांनी आपले मन भगवंतात लावून तसेच आपली सर्व पापे धुवून, भक्त जसे भक्तीने भगवंतांना प्राप्त होतात, तसे प्राप्त झाले आहेत. जसे गोपींनी कामाने, कंसाने भयाने, शिशुपाल-दन्तवक्त्र इत्यादी राजांनी द्वेषाने, यदुवंशीयांनी नाते संबंधाने, तुम्ही (युधिष्ठिर इत्यादीं) लोकांनी स्नेहाने आणि आम्ही लोकांनी (नारद इत्यादी) भक्तीने आपल्या मनाला भगवंतांत लावले आहे."

(२) सत्सङ्गेन हि दैतेया यातुधाना मृगा खगाः। गन्धर्वाप्सरसो नागाः सिद्धाश्चारणगुह्यकाः॥
विद्याधरा मनुष्येषु वैश्याः शूद्राः स्त्रियोऽन्त्यजाः। रजस्तमःप्रकृतयस्तस्मिंस्तस्मिन् युगेऽनघ॥
बहवो मत्पदं प्राप्तास्त्वाष्ट्रकायाधवादयः। वृषपर्वा बलिर्बाणो मयश्चाथ विभीषणः॥
सुग्रीवो हनुमानृक्षो गजो गृध्रो वणिक्पथः। व्याधः कुब्जा व्रजे गोप्यो यज्ञपत्न्यस्तथापरे॥
ते नाधीतश्रुतिगणा नोपासितमहत्तमाः। अव्रतातप्ततपसः सत्सङ्गान्मामुपागताः॥
(श्रीमद्भा० ११।१२।३-७)

भगवान् म्हणतात "हे निष्पाप उद्धवा! ही एका युगाची नाही तर सर्वच युगांमधील सारखी गोष्ट आहे. सत्संग अर्थात् माझ्या संबंधद्वाराच दैत्य, राक्षस, पशु-पक्षी, गन्धर्व-अप्सरा, नाग-सिद्ध, चारण-गुह्यक आणि विद्याधरांना माझी प्राप्ती झाली आहे. मनुष्यात वैश्य, शूद्र, स्त्री आणि अंत्यज इत्यादी रजोगुणी, तमोगुणी प्रकृतीच्या पुष्कळ जीवांनी माझे परमपद प्राप्त केले आहे. वृत्रासुर, प्रह्लाद, वृषपर्वा, बळी, बाणासुर, मयदानव, बिभीषण, सुग्रीव, हनुमान्, जाम्बवान्, गजेन्द्र, जटायू, तुलाधार वैश्य, धर्मव्याध, कुब्जा, व्रजगोपी, यज्ञपत्न्या आणि दुसरे लोकसुद्धा सत्संगाच्या प्रभावानेच मला प्राप्त करू शकले आहेत."

त्या लोकांनी वेदाचे अध्ययनही केले नव्हते आणि विधीपूर्वक महापुरुषांची उपासनाही केली नव्हती. त्याचप्रमाणे त्यांनी कृच्छ्र चांद्रायण इत्यादी व्रत आणि कोणती तपश्चर्याही केली नव्हती. बस केवळ सत्संग—माझ्या संबंधाच्या प्रभावानेच ते मला प्राप्त झाले."

सर्व जे सर्वथा भगवंताना समर्पित झाले आहेत त्यांच्यावर लागू होत नाहीत. *कारण ते अच्युत भगवंताचेच आहेत— "**यतस्तदीया:**" (नारदभक्तीसूत्र ७३) ते संसाराचे नाहीत. अच्युत भगवंताचे असल्याने ते "अच्युत गोत्राचे" च म्हटले जातात.†

## शरणागतीचे रहस्य

शरणागतीचे रहस्य काय आहे हे तर वास्तविक भगवंतच जाणतात. तरीही आपल्याला त्याविषयी जे काही समजले ते सांगण्याचा प्रयत्न केला जात आहे. कारण प्रत्येक मनुष्य जे बोलतो त्यावरुन तो आपल्या बुद्धीचा परिचय देत असतो. वाचकांना प्रार्थना आहे की, त्यांनी येथे सांगितलेल्या गोष्टींचा उलटा अर्थ काढू नये, कारण प्राय: लोक एखाद्या तात्त्विक रहस्य असणाऱ्या गोष्टीचा अर्थ सखोलतेने समजून न घेता, चटकन उलटा अर्थ काढतात. म्हणून अशी गोष्ट सांगण्या-ऐकण्यासाठी फार कमी पात्र असतात.

भगवंतांनी गीतेत शरणागतीच्या विषयात दोन गोष्टी सांगितल्या आहेत—

(१) "**मामेकं शरणं व्रज**" (१८।६६) "अनन्य-भावाने केवळ मला शरण हो."

(२) "**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत**" (१५।१९) "तो सर्वज्ञ पुरुष सर्वभावाने माझे भजन करतो.", "**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत**" (१८।६२) "तू सर्वभावाने त्या परमात्म्याला शरण जा."

आपण भगवंताना कसे शरण जावे? केवळ एका भगवंताला शरण जावे अर्थात् भगवंताचे गुण, ऐश्वर्य इत्यादी-कडे दृष्टी ठेवू नये आणि सर्वभावाने भगवंताना शरण व्हावे अर्थात् त्याबरोबर कोणतीही सांसारिक कामना ठेवू नये.

केवळ एका भगवंताना शरण होण्याचे रहस्य हे आहे की, भगवंताचे अनंत गुण आहेत, प्रभाव आहे, तत्त्व आहेत, रहस्य आहेत, महिमा आहे, लीला आहेत, नाम आहेत, धाम आहेत. भगवंताचे अनंत ऐश्वर्य आहे, माधुर्य आहे, सौंदर्य आहे. या विभूतींकडे शरणागत भक्त पाहतच नाही. त्याचा हा एकच भाव राहतो की, "मी केवळ भगवंताचा आहे आणि केवळ भगवान्‌च माझे आहेत." जर तो गुण, प्रभाव इत्यादीकडे पाहून भगवंताला शरण गेला तर तो वास्तविक गुण, प्रभाव इत्यादींनाच शरण झाला, भगवंतांना शरण झाला-च नाही. परंतु या गोष्टींचा उलटा अर्थ लावू नये.

उलटा अर्थ घेणे काय आहे ? भगवंताचे गुण, प्रभाव, नाम, धाम, ऐश्वर्य, माधुर्य, सौंदर्य इत्यादींना मानावयाचेच नाही, यांच्याकडे लक्ष द्यावयाचेच नाही. आता काही करायचेच नाही. भजन करायचे नाही, भगवंताचे गुण, प्रभाव, लीला ऐकायच्या नाहीत आणि भगवंताच्या धामाला जायचे नाही. हा उलटा अर्थ लावणे आहे. असा अर्थ लावणे महान् अनर्थ करणे आहे.

केवळ एका भगवंताना शरण होण्याचे तात्पर्य, केवळ भगवान् माझे आहेत, हा आहे. आता ते ऐश्वर्य संपन्न आहेत तर फार चांगली गोष्ट आहे आणि त्यांच्यात काहीही ऐश्वर्य नाही तरीही चांगली गोष्ट आहे. ते फार दयाळू असतील तर फार चांगले आहे आणि इतके कठोर, निष्ठुर आहेत की, त्यांच्यासारखे जगात दुसरे कोणी कठोर नाहीच तरीही चांगले आहे. त्यांचा प्रभाव फार मोठा आहे तर फार चांगले आणि

---

* पुंस्त्वे स्त्रीत्वे विशेषो वा जातिनामाश्रमादय:। न कारणं मद्भजने भक्तिरेव हि कारणम्॥ (अध्यात्म० अरण्य० १०।२०)

"माझ्या भजनात पुरुष, स्त्रीचा भेद अथवा जाती, नाव आणि आश्रम कारण नाही, तर माझी भक्ती एकमात्र कारण आहे."

(२) किं जन्मना सकलवर्णजनोत्तमेन किं विद्यया सकलशास्त्रविचारवत्या।
यस्यास्ति चेतसि सदा परमेशभक्ति: कोऽन्यस्ततस्त्रिभुवने पुरुषोऽस्ति धन्य:॥ (ब्र०सं०भ० १७)

संपूर्ण वर्णात उत्तम अशा ब्राह्मण कुलात जन्म झाला तर काय झाले? सर्व शास्त्रांचे सखोल अध्ययनाने काय झाले? अर्थात् काही झाले नाही. ज्याच्या हृदयात भगवद्‌भक्ती विद्यमान आहे, ह्या त्रैलोक्यात त्याच्यासमान दुसरा कोण मनुष्य धन्य होऊ शकतो?

(३) व्याधस्याचरणं ध्रुवस्य च वयो विद्या गजेन्द्रस्य का का जातिर्विदुरस्य यादवपतेरुग्रस्य किं पौरुषम्। कुब्जाया: किमु नाम रूपमधिकं किं तत्सुदाम्नो धनं भक्त्या तुष्यति केवलं न च गुणैर्भक्तिप्रियो माधव:॥ (पद्यावली)

"व्याधाचे कोणते श्रेष्ठ आचरण होते? ध्रुवाचे वय ते कितीसे मोठे होते? गजेन्द्राजवळ कोणती विद्या होती? विदुराची कोणती उच्च जाती होती? यदुपती उग्रसेनाचा कोणता पराक्रम होता? कुब्जेचे कोणते रूप सुंदर होते? सुदामाजवळ कोणते धन होते? तरीही त्या सर्वांना भगवत्प्राप्ती झाली. कारण भगवंताना केवळ भक्ती प्रिय आहे. ते केवळ भक्तीनेच संतुष्ट होतात, आचरण, विद्या इत्यादी गुणांनी नव्हे."

† पितृगोत्री यथा कन्या स्वामीगोत्रेण गोत्रिका। श्रीरामभक्तिमात्रेणाच्युतगोत्रेण गोत्रक:॥ (नारदपाञ्चरात्र)

त्यांच्यात कोणताही प्रभाव नाही तरीही फार चांगले. शरणागताला या गोष्टींची काहीही परवा राहत नाही. त्याचा तर एकच भाव राहतो की, भगवान् जसे असतील तसे माझे आहेत.* भगवंताच्या या गोष्टीची परवा नसल्याने भगवंताचे ऐश्वर्य, माधुर्य, सौंदर्य, गुण, प्रभाव इत्यादी समाप्त होतील असे नाही. परंतु आपण त्यांची परवा केली नाही तर आपली वास्तविक शरणगती होईल.

जर गुण, प्रभाव, इत्यादी संबंधाने भगवंताना शरण गेले तर केवळ भगवंताना शरण गेले असे होत नाही तर गुण, प्रभाव इत्यादींनाच शरण गेले असे होते. जसे एखाद्या धनवानाचा आदर केला तर तो आदर वास्तविक धनवानाचा होत नाही, धनाचा होतो. एखाद्या मंत्र्याचा कितीही आदर केला गेला तरी त्याचा तो आदर नसतो मंत्रीपदाचा असतो. एखाद्या बलवानाचा आदर केला गेला तर तो आदर त्याचा स्वत:चा आदर नसतो त्याच्या बलाचा आदर असतो. परंतु जर कोणी एखाद्या केवळ व्यक्तीचा (धनी इत्यादी) आदर केला तर त्यामुळे धनवानाचे धन अथवा मंत्र्याचे मंत्रीपद संपून जाते—असे होत नाही. ते तर राहणारच. त्याचप्रमाणे केवळ भगवंताला शरण होण्याने भगवंताचे गुण, प्रभाव इत्यादी राहणार नाहीत—असे होत नाही. परंतु आपली दृष्टी तर केवळ भगवंतावरच राहिली पाहिजे, त्यांच्या गुण इत्यादीवर नसावी.

सप्तऋषींनी जेव्हा पार्वतीसमोर श्रीशंकरांच्या अनेक अवगुणांचे आणि श्रीविष्णूंच्या अनेक सद्गुणांचे वर्णन करून तिला शंकरांचा त्याग करण्याबद्दल सांगितले तेव्हा पार्वतीने त्यांना हेच उत्तर दिले—

**महादेव अवगुन भवन बिष्नु सकल गुन धाम।**
**जेहि कर मनु रम जाहि सन तेहि तेही सन काम॥**
(मानस १।८०)

हीच गोष्ट गोपींनी उद्धवाला सांगितली होती—

**उधौ! मन माने की बात।**
**दाख छोहारा छाडि अमृतफल बिषकीरा बिष खात॥**
**जो चकोर को दै कपूर कोउ, तजि अंगार अघात।**
**मधुप करत घर कोरे काठमें, बंधत कमल के पात॥**
**ज्यों पतंग हित जान आपनो, दीपक सों लपटात॥**
**''सूरदास'' जाको मन जासों, ताको सोइ सुहात॥**

भगवंताच्या प्रभाव इत्यादीकडे पाहणाऱ्याला, त्याच्याशी प्रेम करणाऱ्याला मुक्ती, ऐश्वर्य इत्यादी तर मिळू शकते परंतु भगवान् प्राप्त होऊ शकत नाहीत. भगवंताच्या प्रभावाकडे न पाहणारा भगवत्प्रेमी भक्तच भगवंताना प्राप्त करून घेऊ शकतो. एवढेच नव्हे तर, तो प्रेमी भक्त भगवंताना बांधूही शकतो, त्यांची विक्रीही करू शकतो. भगवान् पाहतात की, तो माझ्यावर प्रेम करतो, माझ्या प्रभावाकडे पाहतही नाही, त्याच्याविषयी भगवंताच्या मनात फार मोठा आदर असतो.

प्रभावाकडे पाहणे हे सिद्ध करते की, आपल्यात काही मिळविण्याची कामना आहे. आपल्या मनात त्या कामना असणाऱ्या पदार्थांचा आदर आहे. जोपर्यंत आपल्या मनात कामना आहे तोपर्यंत आपण प्रभावाला पाहतो. जर आमच्या मनात कोणतीही कामना राहिली नाही तर भगवंताचा प्रभाव, ऐश्वर्य यांच्याकडे आपली दृष्टी जाणार नाही. केवळ भगवंताकडे दृष्टी राहील तर आपण भगवंताला शरण होऊ, भगवंताचे आत्मीय होऊ.

पूतना राक्षसीने विष लावून स्तन मुखात घातले तर तिला भगवंताने मातेची गती दिली.† अर्थात् जी मुक्ती यशोदा मातेला मिळाली, तीच मुक्ती पूतनेला मिळाली. जी मुखात विष घालते तिलाही भगवंतानी मुक्ति दिली. मग जी रोज

* (१) असुन्दरः सुन्दरशेखरो वा गुणैर्विहीनो गुणिनां वरो वा। द्वेषी मयि स्यात् करुणाम्बुधिर्वा श्यामः स एवाद्य गतिर्ममायम्॥

''माझे प्रियतम श्रीकृष्ण असुन्दर असोत की, सुन्दर शिरोमणी असोत की गुणहीन असोत अथवा गुणवानात श्रेष्ठ असोत, माझा द्वेष करीत असोत अथवा करुणासिंधुरूपाने माझ्यावर कृपा करीत असोत, ते कसेही असोत, माझी तर एकमात्र गती तेच आहेत.''

(२) आश्लिष्य वा पादरतां पिनष्टु मामदर्शनान्मर्महतां करोतु वा। यथा तथा वा विदधातु लम्पटो मत्प्राणनाथस्तु स एव नापरः॥ (शिक्षाष्टक ८)

''वाटल्यास ते मला हृदयाशी लावून हर्षित करोत की आपल्या पायाखाली तुडवोत अथवा दर्शन न देता घायाळ करोत. ते परम स्वतंत्र श्रीकृष्ण वाटेल तसे करोत. माझे तर तेच प्राणनाथ आहेत, दुसरा कोणी नाही.''

* (१) अहो बकी यं स्तनकालकूटं जिघांसयापाययदप्यसाध्वी।
लेभे गतिं धात्र्युचितां ततोऽन्यं कं वा दयालुं शरणं व्रजेम॥ (श्रीमद्भा० ३।२।२३)

''अहो! या पापिणी पूतनेने ज्यांना मारून टाकण्याच्या इच्छेने आपल्या स्तनावर लावलेले काळकूट विष पाजून देखील, जी मातेला गती मिळावी ती गती प्राप्त केली. त्यांच्याशिवाय आणखी दुसरा कोण दयाळू आहे की ज्याला शरण जावे?''

(२) गई मारन पूतना कुच कालकूट लगाइ। मातुकी गति दई ताहि कृपालु जादवराइ॥ (विनयपत्रिका २१४।२)

दूध पाजते तिला भगवंतानी काय द्यावे? तर अनंत जीवांना मुक्ती देणारे भगवान् स्वतःच मातेच्या अधीन झाले. त्यांनी मातेला आपल्या स्वतःलाच देऊन टाकले. मातेच्या इतके वशीभूत झाले की, ती ज्यावेळी छडी दाखविते त्यावेळी ते भिऊन रडू लागतात. कारण मातेची भगवंताच्या प्रभाव आणि ऐश्वर्याकडे दृष्टी नसतेच. अशा प्रकारे जो भगवंतापासून मुक्ती इच्छितो त्याला भगवान् मुक्ती देतात परंतु जो काहीही इच्छित नाही त्याला भगवान् तर स्वतःलाच देऊन टाकतात.

सर्वभावाने भगवंताला शरण होण्याचे रहस्य हे आहे की, आपले शरीर चांगले आहे. इंद्रिये वश आहेत, मन शुद्ध, निर्मळ आहे, बुद्धीने आपण योग्य ते जाणतो, आपण सुशिक्षित आहोत, आपण यशस्वी आहोत, आपला संसारात मान आहे. अशा प्रकारे "आपणही काही आहोत" असे मानून भगवंताना शरण होणे शरणागती नव्हे. भगवंतांना शरण झाल्यानंतर शरणागताने असा विचारही करू नये की, आपले शरीर असे असावे, मन असे असावे, बुद्धी अशी असावी, आपले असे ध्यान लागले पाहिजे, आपली भावना अशी असावी, आपल्या जीवनात अशी अशी लक्षणे आली पाहिजेत, आपले असे आचरण असले पाहिजे, आपल्यात असे प्रेम असले पाहिजे की, कथा-कीर्तन ऐकताना अश्रुपात झाला पाहिजे, कंठ गद्‌गद झाला पाहिजे, परंतु असे आपल्या जीवनात झाले नाही तर आपण भगवंताला शरण कसे? इत्यादी इत्यादी ह्या गोष्टी अनन्य शरणागतीची कसोटी नाही. जो अनन्य शरण होतो तो हे पाहतच नाही की, शरीर आजारी आहे का स्वस्थ आहे? मन चंचल आहे का स्थिर आहे? बुद्धीत ज्ञान आहे की अज्ञान? आपल्यात मूर्खपणा आहे की विद्वत्ता आहे? योग्यता आहे की अयोग्यता आहे? इत्यादी. या सर्वांकडे तो स्वप्नातही पाहत नाही कारण त्याच्या दृष्टीत या सर्व वस्तू कचऱ्यासारख्या आहेत, ज्या आपल्याबरोबर घ्यायच्या नाहीत. जर त्याने या गोष्टीकडे लक्ष दिले तर त्याचा अभिमानच वाढेल की, मी भगवंताचा शरणागत भक्त आहे अथवा निराश व्हावे लागेल की, मी तर भगवंताला शरण झालो परंतु भक्तांचे गुण (१२।१३-१९) तर माझ्यात आलेच नाहीत. तात्पर्य, जर आपल्यात भक्ताचे गुण दिसू लागले तर त्यांच्याविषयी अभिमान होईल जर दिसले नाहीत तर निराशा होईल. म्हणून हेच उत्तम आहे की, भगवंतांना शरण झाल्यानंतर या गुणांकडे चुकूनही पाहू नये. याचा उलटा अर्थ असा लावू नये की, पाहिजे तर आपण वैर-विरोध करावा अथवा द्वेष करावा, अथवा ममता करावी अथवा पाहिजे ते करावे. हा अर्थ अजिबात नाही. तात्पर्य, या गुणांकडे लक्षच राहवयास नको. भगवंताच्या शरणागत भक्तांत हे सर्वच गुण आपोआप येतील, परंतु यांच्या येण्या वा न येण्यात याला कसलेच स्वारस्य वाटता कामा नये. आपल्यात अशी कसोटी लावू नये की, आपल्यात ही लक्षणे, हे गुण आहेत किंवा नाहीत.

खरा शरणागत भक्त तर भगवंताच्या गुणांकडेही पाहत नाही आणि आपल्या गुणांकडेही पाहत नाही. तो भगवंताच्या श्रेष्ठ-श्रेष्ठ प्रेमी जनांकडेही पाहत नाही की श्रेष्ठ भक्त असे असे असतात, तत्त्व जाणणारे जीवन्मुक्त असे असे असतात.

बहुधा लोक अशी कसोटी लावतात की, हा भगवंताचे भजन करतो तर मग आजारी कसा पडला? भगवद्भक्त झाला आहे तर मग याला ताप का आला? त्याला दुःख का झाले? त्याचा मुलगा का मृत्यू पावला? त्याचे धन का नाहीसे झाले? त्याला संसारात अपयश का आले? त्याचा निरादर का झाला? इत्यादी इत्यादी. अशी कसोटी लावणेही बिलकुल फालतू गोष्ट आहे, फार निम्न कोटीची गोष्ट आहे. अशा लोकांना कसे समजवावे? ते कधी सत्संगाच्या जवळपासही फिरकले नाहीत. म्हणूनच त्यांना या गोष्टीचा पत्ताच नसतो की, भक्ती काय असते? शरणागती काय असते? ते या विषयाला समजूच शकत नाहीत. परंतु याचा अर्थ असाही नाही की, भगवंताचा भक्त दरिद्री होतच असतो, त्याचा संसारात अपमान होतच असतो, त्याची निंदा होतच असते. शरणागत भक्ताला तर निंदा प्रशंसा, रोग-निरोग अवस्था इत्यादीशी काहीच मतलब नसतो. त्यांच्याकडे तो पाहतच नाही. तो एवढेच पाहतो की, मी आहे आणि भगवान् आहेत. बस! आता संसारात काय आहे आणि काय नाही, त्रैलोक्यात काय आहे काय नाही, प्रभू असे आहेत, ते उत्पत्ती स्थिती आणि प्रलय करणारे आहेत, या गोष्टीकडे त्याची दृष्टी जातच नाही.

एकाने एका संतांना विचारले "आपण कोणत्या देवाचे भक्त आहात? जे उत्पत्ती स्थिती, प्रलय करतात त्या देवांचे भक्त आहात काय?" तेव्हा संतानी उत्तर दिले-"माझ्या भगवंताचा उत्पत्ती, स्थिती, प्रलय याच्याशी कोणताही संबंध नाहीच. हे तर माझ्या प्रभूचे एक ऐश्वर्य आहे. ही काही विशेष गोष्ट नाही." शरणागत असा असला पाहिजे. ऐश्वर्य इत्यादीकडे त्याची दृष्टीच असू नये.

ऋषिकेश येथे गंगेच्या काठी सायंकाळी सत्संग होत होता. गरमी होत होती. तिकडून गंगेची थंड हवेची लहर

आली तेव्हा एक सज्जन म्हणाले ''किती छान थंड हवेची लहर आली!'' जवळ बसलेले दुसरे सज्जन त्यांना म्हणाले ''हवेकडे लक्ष देण्यास तुम्हाला वेळ कसा मिळाला? ही हवा थंड की गरम याकडे तुमचे लक्ष गेलेच कसे?'' भगवंताच्या भजनात लागलेले आहात तर हवा थंड आली अथवा गरम आली, सुख झाले अथवा दु:ख झाले, याकडे जोपर्यंत लक्ष जाते तोपर्यंत भगवंताकडे लक्ष राहीलच कसे? या विषयात मी एक कहाणी ऐकली आहे. कहाणी तर निम्न श्रेणीची आहे पण तिचा निष्कर्ष फार चांगला आहे.

एक कुलटा स्त्री होती, तिला कोण्या पुरुषाकडून निरोप मिळाला होता की, अमुक वेळी अमुक ठिकाणी तू ये. म्हणून ती वेळेवर पोहचण्यासाठी लगबगीने इच्छित ठिकाणी जात होती. रस्त्यात एक मशीद होती. तिच्या भिंती उंचीने फार लहान होत्या. भिंतीजवळच तेथील एक मौलवी नमाज पढत होता. ती कुलटा आपल्या प्रियकराला भेटण्यास इतकी आतुर झाली होती की, ती त्या मौलवीच्या पाठीवर पाय देऊन पुढे गेली. मौलवीला फार क्रोध आला आणि म्हणाला की, काय मूर्ख आहे ही स्त्री! हिने माझ्या पाठीवर चपलेसह पाय ठेवून मला नापाक (अशुद्ध) केले, तो तिची वाट पाहत तेथेच थांबला. ती कुलटा जेव्हा परत आली तेव्हा मौलवीने तिला धमकावले की, ''कशी मूर्ख आहेस तू? मी अल्लाच्या सेवेत होतो, नमाज पढत होतो आणि तू माझ्या पाठीवर पाय देऊन निघून गेलीस'' तेव्हा ती म्हणाली—

**मै नर-राची ना लखी, तुम कस लख्यो सुजान।**
**पढ़ि कुरान बौरा भया, राच्यो नहिं रहमान॥**

अर्थात् एका पुरुषाच्या ध्यानाच्या तंद्रीत असल्यामुळे मला याची जाणीवही झाली नाही की समोर भिंत आहे की माणूस? परंतु तू तर भगवंताच्या ध्यानात होतास मग तू मला कसे ओळखलेस की, ती मीच आहे. तू केवळ कुराणाचे अध्ययन करून बावळट झाला आहेस. जर तू भगवंताच्या ध्यानात मग्न असतास तर तू मला कसे ओळखले असते? कोण आला, कोण गेला, मनुष्य होता का पशू, पक्षी, काय होते काय नाही, कोण वर आला, कोण खाली गेला, कोणी पाय ठेवला इकडे तुझे लक्ष कसे जाणे संभवते? तात्पर्य एका भगवंताशिवाय दुसऱ्याकडे लक्ष कसे जाईल? दुसऱ्या गोष्टींचा पत्ता कसा लागेल? जोपर्यंत दुसऱ्या गोष्टींचा पत्ता लागतो तोपर्यंत तो शरण कुठे झाला?

कौरव-पांडव लहान असताना ते शस्त्रास्त्र विद्या शिकत होते. शिकून जेव्हा तयार झाले त्यावेळी त्यांची परीक्षा घेतली गेली. एका झाडावर एक बनावट चिमणी बसविली होती आणि सर्वांना सांगितले गेले की, त्या चिमणीच्या कंठावर बाण मारून दाखवा. एक एक करीत सगळे येऊ लागले. गुरूजी प्रथम प्रत्येकाला वेगवेगळे विचारीत होते की, तुला तेथे काय दिसते? कोणी म्हणे वृक्ष दिसतो, कोणी म्हणे शाखा दिसते, कोणी म्हणे चिमणी, चोच, पंखही दिसतात. असे म्हणणाऱ्यांना तेथून हटविले गेले जेव्हा अर्जुनाची पाळी आली तेव्हा त्याला विचारले गेले की, तुला काय दिसते, तेव्हा अर्जुनाने म्हटले की, मला तर केवळ चिमणीचा कंठच दिसतो दुसरे काही दिसत नाही. तेव्हा अर्जुनाला बाण मारण्यासाठी सांगितले गेले. अर्जुनाने आपल्या बाणाने त्या पक्ष्याचा कंठ छेदला कारण त्याची दृष्टी केवळ आपल्या लक्ष्यावर होती. जर चिमणी दिसते, वृक्ष, शाखा इत्यादी दिसतात तर लक्ष्य कसे साधले असते? अजून तर दृष्टी पसरलेली आहे. लक्ष असल्यावर जे लक्ष्य असेल तेच फक्त दिसेल, लक्ष्याशिवाय दुसरे काहीच दिसणार नाही. त्याचप्रमाणे जोपर्यंत मनुष्याचे लक्ष्य एक झाले नाही तोपर्यंत तो अनन्य कसा होईल? अव्यभिचारी ''अनन्य योग'' झाला पाहिजे—**''मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी''**। (१३।१०) ''अन्ययोग'' होता कामा नये. अर्थात् शरीर, मन, बुद्धी, अहम् इत्यादींची साहाय्यता असू नये. तेथे तर केवळ एक भगवान्च असले पाहिजेत.

गोस्वामी तुलसीदास महाराजांना कोणी म्हटले ''आपण ज्या श्रीरामचंद्रांची भक्ती करता ते तर बारा कलांचे अवतार आहेत परंतु सूरदासजी ज्या भगवान् श्रीकृष्णाची भक्ती करतात ते सोळा कलांचे अवतार आहेत'' हे ऐकताच गोस्वामीजी महाराजांनी त्या व्यक्तीला साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाले ''वा! आपण फार मोठी कृपा केली. मी तर दशरथांचे लाडके पुत्र एवढे समजूनच रामाची भक्ती करीत होतो. आता समजले की, ते बारा कलांचे अवतार आहेत. ते इतके मोठे आहेत का? आपण आज नवीन गोष्ट सांगून मोठा उपकारच केला आहे'' कृष्ण सोळा कलांचे अवतार आहेत ही गोष्ट त्यांनी ऐकलीच नाही. तिकडे त्यांचे लक्षच गेले नाही.

भगवंताविषयी भक्तांचे वेगवेगळे भाव असतात. कोणी म्हणतो की, दशरथाच्या कडेवर खेळणारे छोटे राम आहेत तेच आमचे इष्ट आहे ''इष्टदेव मम बालक रामा'' (मानस ७।७५।३) राजाधिराज रामचंद्र नव्हेत. छोटासा राम! कोणी भक्त म्हणतो की, माझे इष्ट तर लड्डू गोपाल आहे, नंदाचा

लाला आहे. ते भक्त आपल्या रामलालाला, नंदलालाला संताकडून आशीर्वाद देववितात. ते भगवंताना फार आवडते. तात्पर्य भक्तांची दृष्टी भगवंताच्या ऐश्वर्याकडे जातच नाही.

**या ब्रजरज की परस से, मुकति मिलत है चार।**
**वा रज को नित गोपिका, डारत डगर बुहार॥**

अंगणातल्या ज्या धुळीत कन्हैया खेळतात ती रज (धुळी) कोणी घेतली तर त्याला चारी मुक्ती मिळतील. परंतु यशोदा माता तीच धूळ रोज झाडून बाहेर फेकते. मातेला तर ती धूळ केर-कचरा आहे. आता मुक्ती कोणाला पाहिजे? मातेची केवळ कन्हैयाकडेच दृष्टी आहे. कन्हैयाच्या ऐश्वर्याकडेही दृष्टी नाही आणि योग्यतेकडेही दृष्टी नाही.

संतांनी म्हटले आहे की, जर भगवंताची भेट घ्यावयाची असेल तर बरोबर साथी कोणीही असता कामा नये आणि सामानही असता कामा नये. अर्थात् साथीदाराशिवाय सामाना-शिवाय त्यांची भेट घ्या. जर साथीदार, आश्रय बरोबर असेल तर तुम्ही भगवंताना कसे भेटणार? आणि मन, बुद्धी विद्या, धन इत्यादी सामान बरोबर बांधून घेतले असेल तर त्याचा पडदा (व्यवधान) राहील. पडद्यातून मिलन थोडेच होते? तेथे तर कपड्याचेही व्यवधान होते. कपडाच नव्हे तर माळ देखील आड आली तरी मिलन कसे शक्य आहे? म्हणून बरोबर कोणी-ही साथी व सामान नसावे. मग भगवंताशी होणारे मिलन मोठे दिव्य आणि विलक्षण होईल.

एका महात्म्याला शेतात काम करणारा एक व्रजवासी गवळी भेटला. तो भगवद्भक्त होता. महात्म्याने त्याला विचारले "तुम्ही काय करता?" तो म्हणाला "आम्ही तर आमच्या लाला कन्हैयाचे काम करतो" महात्मा म्हणाले "आम्ही भगवंताचे अनन्य भक्त आहोत तुम्ही कोण आहात?" तो म्हणाला—"आम्ही फनन्य भक्त आहोत" महात्मा—"फनन्य भक्त म्हणजे काय?" तो म्हणाला—"अनन्यभक्त म्हणजे काय?" महात्मा— "अनन्यभक्त त्याला म्हणतात जो सूर्य, शक्ती, गणेश, ब्रह्मदेव इत्यादी कोणालाही मानत नाही केवळ आपल्या कन्हैयालाच मानतो". तो म्हणाला, "बाबाजी! आम्हीतर ह्यांची नावेही ऐकली नाहीत की, ते कोण आहेत. काय आहेत, काय नाहीत. आम्हाला तर ते ठाऊकच नाही तर मग आम्ही फनन्य झालो की नाही?" अशा प्रकारे ब्रह्म म्हणजे काय? आत्मा काय असतो? सगुण-निर्गुण काय असते? साकार आणि निराकार काय असते? इत्यादी गोष्टीकडे शरणागत भक्ताची दृष्टीच जाऊ नये.

व्रजातील एक गोष्ट आहे. एक संत एका विहीरीवर कोणाशी बोलत होते की, ब्रह्म आहे, परमात्मा आहे, जीवात्मा आहे इत्यादी. तेथे एक गोपी पाणी भरण्यासाठी आली. तिने कान देऊन ऐकले की, संत काय बोलत आहेत. जेव्हा ती गोपी दुसऱ्या गोपीला भेटली तेव्हा तिने तिला विचारले "हे सखी ब्रह्म काय असते?" सखी म्हणाली आपल्या लालाचाच कोणी शेजारी-पाजारी सखा-संबंधी असेल. आपण तर त्याबाबत काही जाणत नाही. हे लोक त्याच नादात लागले आहेत ना? म्हणून सर्व जाणतात. आपला तर एक नंदलालाच आहे. काही काम असले तर नंदबाबांना सांगू, गिरीराजाला सांगू की, महाराज! आपण कृपा करा. कन्हैया तर भोळा-भाळा आहे. त्याला काय समजणार आणि तो काय करणार? कन्हैयाकडून काय मिळणार? हे सखी! तो कन्हैया आपला आहे आणखी काय पाहिजे? आपण ही एकट्या आहोत आणि कन्हैया पण एकटाच आहे. आपल्याजवळही काही सामान नाही आणि त्याच्याजवळही काही सामान नाही. बिलकुल नंग धडंग बाबा—"**नगन मूरति-बाल गुपालकी, कतरनी बरनी जग-जालकी**" आता अशा कन्हैयापासून काय मिळणार?

यशोदा माता बलरामांना म्हणते "हे बघ दादा! हा कन्हैया फार भोळा-भाळा आहे तू याच्याकडे लक्ष देत जा की, हा जंगलात दूर तर कोठे जात नाही?" बलरामदादा म्हणतात "मैया! हा कन्हैया फार चंचल आहे. जंगलात माझ्याबरोबर चालतां चालता एखादे सापाचे बिळ पाहिले की, हा त्यात हात घालतो. एखादा साप त्याला चावला तर!" माता म्हणते—"बाळा! अजून हा अबोध लहानसा बालक आहे. तू मोठा आहेस. म्हणून तू याच्यावर लक्ष ठेवीत जा." आता बलरादादा व सर्व गवळ्यांची मुले कन्हैयावर नजर ठेवतात. त्या मुलांना एखाद्याने म्हटले की "कन्हैया तर सर्व जगाचे पालन करतो." तेव्हा ते म्हणतील की "तुमचा असा कोणी भगवान् असेल जो सर्व जगाचे पालन करत असेल, आमचा असा नाही, आमचा लहानसा कन्हैया जगाचे कसे पालन करील?"

एका बाबाजीचे गोपीशी गप्पा गोष्टी करणे चालू होते. बोलता बोलता ते म्हणू लागले की, कृष्ण इतके ऐश्वर्यशाली आहेत, त्यांचे एवढे माधुर्य आहे, त्यांच्याजवळ ऐश्वर्याचा एवढा खजीना आहे इत्यादी. त्यावेळी गोपी म्हणाल्या "महाराज! त्या खजीन्याची चाबी तर आमच्याजवळ आहे. कन्हैयाजवळ काय आहे? त्याच्याजवळ तर काहीच नाही. त्याला कोणी काही

मागेल तर तो त्याला कोठून देणार?'' म्हणून कोणाला काही पाहिजे असेल तर त्याच्याजवळ जाऊ नये. ज्याला कधीच काही नको. त्यांनी कन्हैयाला शरण जावे. कोणत्याही अवस्थेत काहीही इच्छिण्याचा भाव नसावा अर्थात् विपत्ती-मृत्यू इत्यादींच्या अवस्थेतही ''माझी थोडी साहाय्यता करा, रक्षण करा'' असाही भाव नसावा.

भगवान् श्रीरामांना वाल्मीकजी म्हणतात—

**जाहि न चाहिअ कबहुँ कछु तुम्ह सन सहज सनेहु।**
**बसहु निरंतर तासु मन सो राउर निज गेहु॥**

(मानस २।१३१)

काहीही इच्छिण्याचा भाव न राहिल्याने भगवान् स्वाभाविकच प्रिय वाटतात, मधुर वाटतात—''**तुम्ह सन सहज सनेहु**''. जेथे इच्छा नाही ते भगवंताचे खास घर आहे— ''**सो राउर निज गेहु**''. जर इच्छाही ठेवली आणि भगवंतांनाही बरोबर ठेवले तर ते भगवंताचे खास घर नाही. भगवंताशी ''सहज'' स्नेह असावा. स्नेहात काही मिसळ नसावी अर्थात् कशाचीही इच्छा नसावी. जेथे कशाची तरी इच्छा आहे तेथे प्रेम कसे असणार? तेथे तर आसक्ती, वासना, मोह, ममता-च असणार. म्हणून गोपी सावध होण्याविषयी इशारा करतात—

**मा यात पान्थाः पथिभीमरथ्यां दिगम्बरः कोऽपि तमालनीलः।**
**विन्यस्तहस्तोऽपि नितम्बबिम्बे धूतः समाकर्षति चित्तवित्तम्॥**

हे वाटसरूनो! त्या गल्लीने जाऊ नका, ती फार भयावह आहे. तेथे आपल्या नितंब बिंबावर दोन्ही हात ठेवून जो तमालसमान निळ्या रंगाचा एक नंग धडंग बालक उभा आहे. तो असा चोर आहे की, सर्व लुटून खलास करून टाकील. तिकडे जाऊच नका, अगोदर विचार करा. जर तिकडे जाल तर नेहमीसाठी गेलेच म्हणून समजा. ज्याला चांगल्या रीतीने जगायचे असेल तर त्याने तिकडे जाऊ नये. त्याचे नाव कृष्ण आहे ना? आकर्षण करणाऱ्यास कृष्ण म्हणतात. एकदा आकर्षण केले तर मग सोडणारच नाही. त्याची ओळख झाली नाही तोपर्यंत ठीक. जर त्याची ओळख झाली की मामला खतम! मग सर्व कामातून जाल. त्रैलोक्यात टाकावू व्हाल—

**'नारायन' बौरी भई डोलै, रही न काहू काम की॥**
**जाहि लगन लगी घनस्याम की।**

मात्र, जो कोण्याही कामाचा नसतो तो सर्वांसाठी सर्व कामाचा असतो. परंतु त्याला कोणत्याही कामाशी काहीही मतलब नसतो.

शरणागत भक्ताला भजनही करावे लागत नाही. त्याच्याकडून स्वतः स्वाभाविक भजन होत असते. भगवंताचे भजन त्याला स्वाभाविकच फार गोड, प्रिय वाटते. जर कोणी विचारले की, तुम्ही श्वास का घेता? ही हवा आत बाहेर घेण्याचा काय धंदा चालविला आहे? तर हेच म्हणेल की, अरे बाबा! हा धंदा नव्हे, यावाचून आम्ही जिवंतच राहू शकत नाही. त्याचप्रमाणे शरणागत भक्त भजनाशिवाय राहूच शकत नाही. ज्याला सर्व काही समर्पित केले त्याच्या विस्मरणात परम व्याकूळता, महान् तळमळ होऊ लागते—''**तद्विस्मरणे परम व्याकुलतेति**'' (नारदभक्तीसूत्र १९) अशा भक्ताला जर कोणी म्हणेल की, अर्धा क्षण भगवंताना विसरलात तर त्रैलोक्याचे राज्य मिळेल तरी तो ते ठोकरून लावील. भागवतात आले आहे—

**त्रिभुवनविभवहेतवेऽप्य कुण्ठस्मृति-**
**रजितात्मसुरादिभिर्विमृग्यात् ।**
**न चलति भगवत्पदारविन्दाल्ल-**
**वनिमिषार्धमपि यः स वैष्णवाग्र्यः॥**

(श्रीमद्भा० ११।२।५३)

''तिन्ही लोकातील संपूर्ण ऐश्वर्यासाठीही त्या देवदुर्लभ भगवत्चरणकमलांचा जे अर्ध्या निमिषासाठी सुद्धा त्याग करू शकत नाहीत तेच श्रेष्ठ भगवद्भक्त आहेत.''

**न पारमेष्ठ्यं न महेन्द्रधिष्ण्यं**
**न सार्वभौमं न रसाधिपत्यम्।**
**न योगसिद्धीरपुनर्भवं वा**
**मय्यर्पितात्मेच्छति मद् विनान्यत्॥**

(श्रीमद्भागवत् ११।१४।१४)

''भगवान् म्हणतात की, ''स्व'' ला ज्याने मला अर्पण केले आहे तो भक्त मला सोडून ब्रह्मदेवाचे पद, इंद्रपद, संपूर्ण पृथ्वीचे राज्य, पातालादी लोकांचे राज्य योगसिद्धी व मोक्ष देखील इच्छित नाही''

भरतजी म्हणतात—

**अरथ न धरम न काम रुचि, गति न चहउँ निरबान।**
**जनम जनम रति राम पद यह बरदानु न आन॥**

(मानस २।२०४)

**परिशिष्ट भाव**—भगवंताशी कर्मयोगीचा 'नित्य' संबंध असतो, ज्ञानयोगीचा 'तात्त्विक' संबंध असतो आणि शरणागत भक्ताचा 'आत्मीय' संबंध असतो. नित्यसंबंधात संसाराच्या अनित्य संबंधाचा त्याग आहे. तात्त्विक संबंधात तत्त्वाशी ऐक्य (तत्त्वबोध) आहे आणि आत्मीय संबंधात भगवंताशी अभिन्नता (प्रेम) आहे. नित्यसंबंधात शांतरस आहे, तात्त्विक संबंधात

अखंड रस आहे आणि आत्मीस संबंधात अनंतरस आहे. अनंतरसाची प्राप्ती झाल्याविना जीवाची भूक संपूर्णपणे शमन होत नाही. अनंतरसाची प्राप्ती शरणागतीने होते. म्हणून शरणागती सर्वगुह्यतम आणि सर्वश्रेष्ठ साधन आहे.

**'सर्वधर्मान्परित्यज्य'** पदाचा अर्थ 'संपूर्ण धर्मांचा स्वरूपाने त्याग' असा नाही, तर 'संपूर्ण धर्मांच्या आश्रयांचा त्याग' असा आहे. तात्पर्य हे आहे की, कोणत्याही धर्माचा (कर्तव्यकर्माचा) आश्रय नसावा. जसे, पहिल्या अध्यायात आले आहे—**'त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च'** (१।३३). तेथेही **'प्राणांस्त्यक्त्वा'** चा अर्थ 'प्राणांचा त्याग' न घेता 'प्राणांच्या आश्रयाचा (आशेचा) त्याग' हाच घेतला जाऊ शकतो. कारण प्राणांचा त्याग करून कोणी युद्धात कसा उभा राहील? असंभव गोष्ट आहे. त्याचप्रमाणे पहिल्या अध्यायाच्या नवव्या श्लोकात आले आहे—**'अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः'** तर याचा अर्थ असा नाही की, पुष्कळसे अन्य शूरवीर आपल्या जीवनाचा त्याग करून उभे आहेत. याचा अर्थ असा आहे की, ते शूरवीर आपल्या जीवनाच्या आशेचा त्याग करून उभे आहेत अर्थात् त्यांना आपल्या जीवनाची परवा नाही. म्हणून येथेही **'सर्वधर्मान्परित्यज्य'** पदाचा अर्थ 'धर्मांच्या आश्रयाचा त्याग' घ्यावा. जसे शूरवीरांना आपल्या प्राणांची अर्थात् आपल्या जीवनाची परवा नसते, तसेच भक्ताला दुसऱ्या धर्मांची परवा नसते. त्याच्या दृष्टीत दुसऱ्या धर्मांचे (कर्तव्यकर्मांचे) महत्त्व नसते. कारण भगवंताच्या शरणागतीचे जितके महत्त्व आहे, तितके धर्मांचे महत्त्व नाही. धर्मात (कर्तव्यकर्मात) जडतेचा आणि शरणागतीत चिन्मयतेचा संबंध राहतो. कर्तव्यकर्म आपल्या वर्णाश्रमाला अनुसरून असते, म्हणून त्यात शरीराची मुख्यता राहते. परंतु शरणागती स्वयंद्वारा होते म्हणून त्यात भगवंताची मुख्यता राहते.

**'मामेकं शरणं व्रज'** याचे तात्पर्य आहे—बाहेरुन (व्यवहारात) सर्वांशी प्रेम, आदर-सत्काराचा व्यवहार करूनही आतून कोणाचीही गरज नसावी, कोणाचा आश्रय नसावा, केवळ भगवंताचाच आश्रय असावा.

> **यह बिनती रघुबीर गुसाईं।**
> **और आस-बिस्वास-भरोसो, हरौ जीव-जडताई॥** (विनयपत्रिका १०३)
> **एक भरोसो एक बल एक आस बिस्वास।**
> **एक राम घन स्याम हित चातक तुलसीदास॥** (दोहावली २७७)

वास्तविक पूर्ण शरणागती भगवान्च प्रदान करतात. जसे लहान बालक आपला हात उंच करतो, तर आई त्याला उचलून घेते, तसेच भक्त आपल्या शक्तीने भगवंता सम्मुख होतो, शरणागतीची तयारी करतो तर भगवान् त्याला पूर्ण शरणागती प्रदान करतात.

अर्जुन पापापासून सुटू इच्छित होते, म्हणून भगवंतानेही पापातून मुक्त करण्याचा विचार सांगितला आहे. कारण भगवंताचा स्वभाव आहे—**'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्'** (गीता ४। ११). वास्तविक केवळ पापापासून मुक्ती हेच शरणागतीचे फल नव्हे. अनन्य शरणागतीने मनुष्य भगवंताशी अभिन्न होऊन अनंतरस प्राप्त करू शकतो! म्हणून साधकाने पापापासून अथवा दुःखापासून मुक्ती मिळविण्याची इच्छा न करता केवळ भगवंताला शरण जावे. काहीही इच्छिल्याने काही तरीच (अंत असणारे) मिळते, परंतु काहीही न इच्छिल्यास सर्व काही (अनंत) मिळते! भगवान्ही शरणागत भक्ताला वश होतात, त्याचे ऋणी होतात.

ही शरणागती गीतेचा सार आहे, जी भगवंताने विशेष कृपा करून सांगितली आहे. या शरणागतीतच गीतेच्या उपदेशाची पूर्णता होते. याविना गीता अर्धवट राहिली असती! म्हणून अर्जुनद्वारा **'करिष्ये वचनं तव'** वदवून पूर्ण शरणागती स्वीकार केल्यावर मग भगवान् बोलले नाहीत.

*__संबंध__—आता पूर्व श्लोकात सांगितलेले अत्यंत गोपनीय वचन अनधिकाऱ्यासमोर सांगण्याचा निषेध करतात.*

# इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन।
# न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति॥ ६७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इदम्** | = हे सर्वगुह्यतम वचन | **वाच्यम्** | = सांगू | **कदाचन** | = कधीही |
| **ते** | = तू | **न** | = नकोस, | **न** | = सांगू नकोस |
| **अतपस्काय** | = अतपस्व्याला | **अभक्ताय** | = अभक्ताला | **च** | = तसेच |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **अशुश्रूषवे** | = जो ऐकू इच्छित नाही | **च** | = आणि | **अभ्यसूयति** | = दोषदृष्टी करतो (त्यालाही) |
| | | **यः** | = जो | | |
| **न** | = (त्याला) सांगू नकोस | **माम्** | = माझ्यात | **न** | = सांगू नकोस. |

*व्याख्या*— **इदं ते नातपस्काय**—पूर्व श्लोकात आलेले "**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज**" या सर्वगुह्यतम वचनासाठी येथे "**इदम्**" पद आले आहे.

आपल्या कर्तव्याचे पालन करण्याने सहज जे कष्ट होतील, विपरीत परिस्थिती येईल त्याला प्रसन्नतापूर्वक सहन करण्याचे नाव "तप" आहे. तपाशिवाय अंतःकरणात पवित्रता येत नाही आणि पवित्रता आल्याशिवाय चांगल्या गोष्टीची धारणा होत नाही. म्हणून भगवान् म्हणतात की, जो तपस्वी नाही, त्याला हे सर्वगुह्यतम रहस्य सांगू नये.

जो सहिष्णू अर्थात् सहनशील नाही तोसुद्धा अतपस्वी आहे. म्हणून त्यालाही हे सर्वगुह्यतम रहस्य सांगू नये. ही सहिष्णुता चार प्रकारची असते—

( १ ) **द्वन्द्वसहिष्णुता**—राग-द्वेष, हर्ष-शोक, सुख-दुःख, मान-अपमान, निन्दा-स्तुती, इत्यादी द्वन्द्वांपासून रहित होणे—"**ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ताः**" (७।२८) "**द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैः**" (१५।५)

( २ ) **वेगसहिष्णुता**—काम, क्रोध, लोभ, द्वेष यांच्या वेगाना उत्पन्न होऊ न देणे—"**कामक्रोधोद्भवं वेगम्**" (५।२३)।

( ३ ) **परमतसहिष्णुता**—दुसऱ्यांच्या मताचा महीमा ऐकून आपल्या मताविषयी संदेह न होणे आणि त्यांच्या मता-विषयी उद्विग्न न होणे—* "**एकं साख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति**" (५।५)।

( ४ ) **परोत्कर्षसहिष्णुता**—आपल्यात योग्यता, अधिकार, पद, त्याग, तपश्चर्या इत्यादींची उणीव असली तरीही दुसऱ्यांची योग्यता, अधिकार इत्यादीची प्रशंसा ऐकून आपल्यात काहीही विकार न होणे—"**विमत्सरः**" (४। २२) "**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तः**" (१२।१५)

ह्या चारही सहिष्णुतां सिद्धांच्या आहेत. या सहिष्णुतां ज्यांचे उद्दिष्ट असेल तोच तपस्वी आहे आणि ज्याचे उद्दिष्ट नसेल तोच अतपस्वी आहे.

असे अतपस्वी अर्थात् असहिष्णू †यांना सर्वगुह्यतम रहस्य न सांगण्याचे तात्पर्य असे आहे की, "संपूर्ण धर्म माझ्यात अर्पण करून तू अनन्यभावाने मला शरण ये" ही गोष्ट ऐकून त्याच्या मनात एखादी विपरीत भावना अथवा दोष आला तर तो ही सर्वगुह्यतम गोष्ट सहन करू शकणार नाही आणि याचा अनादर करील त्यामुळे त्याचे पतन होईल.

दुसरा भाव असा आहे की, आपल्या वृत्ती, आचरण, भाव इत्यादी शुद्ध करण्याचा ज्याचा उद्देश नाही त्याने जर माझे "तू मला शरण ये म्हणजे मी तुला संपूर्ण पापातून मुक्त करीन, तू चिंता करू नकोस". हे वचन ऐकले तर मग "मी चिंता कशाला करू? चिंता भगवान् करतील" असा उलटा अर्थ समजून घेऊन तो दुर्गुण-दुराचारात प्रवृत्त होईल आणि आपले अहित करून घेईल. त्यामुळे माझ्या सर्वगुह्यतम वचनाचा दुरुपयोग होईल. म्हणून अशा कुपात्राला ही गोष्ट कधी सांगू नकोस.

**नाभक्ताय कदाचन**—जो अभक्त आहे. ज्याचा भगवंतावर भरवसा, श्रद्धा-विश्वास नाही, त्यालासुद्धा ही गोष्ट सांगू नकोस. कारण श्रद्धा-विश्वास आणि भक्ती नसल्याने त्याची अशी विपरीत धारणा होऊ शकते की, "भगवान् तर आत्मश्लाघी आहेत, स्वार्थी आहेत आणि दुसऱ्यांना वश करू इच्छितात. जो दुसऱ्यांना आपल्या आज्ञेत चालवू इच्छितो तो दुसऱ्यांचे काय कल्याण करणार? त्याला शरण होण्याने काय लाभ होणार आहे?" इत्यादी इत्यादी. अशा प्रकारे दुर्भाव करून तो आपले पतन करून घेईल. म्हणून अशा अभक्ताला कधी सांगू नको.

**न चाशुश्रूषवे वाच्यम्**—जो या रहस्याला ऐकू इच्छित नाही, याची उपेक्षा करतो, त्यालाही कधी सांगू नकोस. कारण आवडी शिवाय जबरीने ऐकविल्यास तो या वचनाचा तिरस्कार करील, त्याला ऐकणे चांगले वाटणार नाही, त्याचे मन या गोष्टीला झिडकारील. हाही त्याच्याकडून एक अपराध घडेल. अपराध करणाऱ्याचे कल्याण होत नाही. म्हणून जो ऐकू इच्छित नाही त्याला सांगू नकोस.

**न च मां योऽभ्यसूयति**—जो गुणांमध्ये दोषारोपण करतो, त्यालाही ऐकवू नकोस. कारण त्याचे अंतःकारण

* आपसात मतभेद असणे व आपल्या मतानुसार साधन करून जीवन बनविणे हा दोष नाही तर दुसऱ्यांचे मत वाईट आहे असे वाटणे, त्यांच्या मताचे खंडन करणे त्यांच्या मताविषयी घृणा करणे हा दोष आहे.

† असहिष्णुता आणि असूया यात थोडा फरक आहे. दुसऱ्याची विशेषता सहन न होणे ही "असहिष्णुता" आहे आणि दुसऱ्यांच्या गुणांत दोष पाहणे ही "असूया" आहे.

अत्यंत मलीन असल्यामुळे तो माझी गोष्ट ऐकून उलटे त्यात दोषारोपणच करील.

दोषदृष्टी राहिल्याने मनुष्य महान् लाभापासून वंचित होतो आणि आपले पतन करून घेतो. म्हणून दोषदृष्टी करणे फार मोठा दोष आहे. हा दोष श्रद्धाळू लोकातही राहतो. म्हणून साधकाने सावध होऊन ह्या भयंकर असलेल्या दोषापासून आपला बचाव करून घेतला पाहिजे. भगवंतांनीही (३।३१ मध्ये) जेथे आपले मत सांगितले तेथे "**श्रद्धावन्तः अनसूयन्तः**" पदांनी ही गोष्ट सांगितली की, श्रद्धायुक्त आणि दोषरहित मनुष्य कर्मातून मुक्त होतो. त्याचप्रमाणे गीतेचे माहात्म्य (१८।७१) यामध्येही "**श्रद्धावाननसूयश्च**" पदाने हे सांगितले की, श्रद्धावान आणि दोषदृष्टिरहित मनुष्य केवळ गीता ऐकण्याने वैकुंठादी लोकांना जातो.

हे गोपनीय रहस्य दुसऱ्यांना सांगू नकोस—हे म्हणण्याचे तात्पर्य दुसऱ्यांना या गोपनीय रहस्यापासून वंचित ठेवणे असे नाही उलट ज्याची भगवंतावर आणि त्यांच्या वचनावर श्रद्धा-भक्ती नाही, तो भगवंतांना स्वार्थी समजून (जसे सामान्य मनुष्य आपल्या स्वार्थासाठीच दुसऱ्याचा स्वीकार करतो) भगवंतावर दोषरोपण करून महान् पतनाकडे जाऊ नये, म्हणून त्याला सांगण्याचा निषेध केला आहे.

**परिशिष्ट भाव**—भगवंताने अभक्ताला आणि दोषदृष्टी करणाऱ्याला सर्वगुह्यतम वचन न सांगण्यावर विशेष जोर दिला आहे. अभक्त आणि दोषदृष्टी करणाऱ्याला सांगण्यात जितका दोष आहे, तितका दोष अतपस्वी आणि जो ऐकू इच्छित नाही त्याला सांगण्यात नाही. कारण अभक्त आणि दोषदृष्टी असणाऱ्यात विपरीत बुद्धी असते.

'**अभक्त**' याचा अर्थ आहे—भक्तीचा विरोधी. ज्याच्यात भक्तीचा अभाव आहे त्याला येथे 'अभक्त' म्हटले गेले नाही. जो भक्त आहे त्याच्यातही नासमजमुळे असूया दोष येऊ शकतो.* परंतु भक्तीमुळे तो दोष आपोआप समाप्त होतो.

'**अशुश्रूषवे**' चा अर्थ आहे—जो अहंकारामुळे ऐकू इच्छित नाही. जो नासमजमुळे ऐकू इच्छित नाही त्याला येथे '**अशुश्रूषवे**' म्हटले गेले नाही.

***संबंध***—*गीतेचा हा प्रभाव आहे की, जो याचा प्रचार करील त्यापेक्षा श्रेष्ठ माझा कोणी प्रिय असणार नाही ही गोष्ट भगवान् पुढील दोन श्लोकांत सांगत आहेत.*

## य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति।
## भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः॥ ६८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **मयि** | = माझी | **परमम्** | = परम | **अभिधास्यति** | = सांगेन, (तो) |
| **पराम्, भक्तिम्** | = पराभक्ती | **गुह्यम्** | = गोपनीय संवाद (गीताग्रंथ) | **माम् एव** | = मलाच |
| **कृत्वा** | = करून | | | **एष्यति** | = प्राप्त होईल— |
| **यः** | = जो | | | **असंशयः** | = यात काही सन्देह नाही. |
| **इदम्** | = हा | **मद्भक्तेषु** | = माझ्या भक्तांना | | |

***व्याख्या*—भक्तिं मयि परां कृत्वा**—जो माझी पराभक्ती करून ही गीता सांगेन. तात्पर्य हे आहे की, जो धन, मान, भेट-पूजा, आदर-सत्कार इत्यादी कोणत्याही वस्तूसाठी सांगत नाही. उलट भगवंताच्या ठिकाणी भक्ती व्हावी, भगवद्भावांचे मनन व्हावे या भावांचा प्रचार व्हावा यांची आवृत्ती व्हावी, ऐकून लोकांचे दुःख, संताप, ज्वलन इत्यादी नाहीसे व्हावेत, सर्वांचे कल्याण व्हावे'—अशा उद्देशाने सांगतो. अशा प्रकारे भगवद्भक्तीचा उद्देश ठेवून सांगणे हेच पराभक्ती करून सांगणे आहे.

याच अध्यायाच्या चौपन्नाव्या श्लोकात सांगितल्या गेलेल्या आणि या श्लोकात सांगितल्या गेलेल्या पराभक्तीत अंतर आहे. तेथे "**मद्भक्तिं लभते पराम्**" पदांनी म्हटले गेले आहे की, ब्रह्मभूत झाल्यानंतर सांख्ययोगी पराभक्तीला प्राप्त होतो अर्थात् भगवंताशी जो अनादिकालापासून संबंध आहे त्याची स्मृती होते. परंतु येथे सांसारिक मान, प्रतिष्ठा इत्यादी कशाचीही थोडीसुद्धा कामना न ठेवता केवळ भगवद्भक्तीची, भगवत्प्रेमाची अभिलाषा ठेवणे पराभक्ती आहे म्हणून येथे "**भक्तिं मयि परां कृत्वा**" "माझ्यात पराभक्ती करून" असे म्हटले गेले आहे.

**य इमं परमं गुह्यम्**—या पदांनी संपूर्ण गीतेचा

* श्रद्धा असल्यावरही त्याबरोबर असूया-दोष राहू शकतो. म्हणून भगवंतांनी श्रद्धेबरोबर असूयादोषरहित असण्याविषयीही गोष्ट म्हटली आहे—"श्रद्धावन्तोऽनसूयन्तः" (गीता ३।३१), 'श्रद्धावाननसूयश्च' (गीता १८।७१).

परमगुह्य संवाद गृहीत धरला पाहिजे, जो गीता-ग्रंथ म्हटला जातो. "**परमं गुह्यम्**" पदांतही गुह्य, गुह्यतर गुह्यतम आणि सर्वगुह्यतम—ह्या सर्व गोष्टी येतात.

**मद्भक्तेष्वभिधास्यति**—ज्यांची भगवान् आणि त्यांच्या वचनाविषयी पूज्यबुद्धी आहे; आदर बुद्धीआहे, श्रद्धा-विश्वास आहे आणि ऐकू इच्छितो, तो भक्त होतो. अशा माझ्या भक्तांना जो हा संवाद सांगेल तो मला प्राप्त होईल.

मागील श्लोकात "**नाभक्ताय**" पदात एक वचन दिले आहे आणि येथे "**मद्भक्तेषु**" पदात बहुवचन दिले आहे. याचे तात्पर्य हे आहे की, जेथे पुष्कळ श्रोते ऐकत असतील, तेथे पूर्वोक्त दोष असलेली व्यक्ती बसली असेल तर वक्त्याला पूर्वोक्त निषेध लागू होणार नाही कारण वक्ता केवळ त्या दोषी व्यक्तीलाच गीता ऐकवीत नाही. जसे कबूतरासाठी कोणी दाणे टाकले, ती कबूतरे दाणे टिपत असताना त्यात एखादा कावळा आला तर त्याला थोडेच उडविता येईल ? कारण दाणे टाकणाऱ्याचा उद्देश कबूतरासाठी दाणे टाकण्याचा आहे, कावळ्यासाठी नव्हे. त्याचप्रमाणे कोणी गीतेवर प्रवचन करीत असता मध्येच कोणी नवी व्यक्ती आली अथवा कोणी उठून गेली तर वक्त्याचे लक्ष त्याकडे राहत नाही. वक्त्याचे लक्ष तर ऐकणाऱ्या लोकांकडेच असते आणि तो त्यांनाच ऐकवितो.

**मामेवैष्यत्यसंशयः**—जर गीता ऐकविणाऱ्याचा केवळ माझाच उद्देश असेल तर तो मला प्राप्त होईल, यात शंकाच नाही. कारण गीतेची अशी विचित्र कला आहे की, मनुष्य आपल्या स्वाभाविक कर्मांनीही परमात्म्याचे निष्कामभावपूर्वक पूजन करून परमात्म्याला प्राप्त होतो (१८।४६) आणि जो खाणे-पिणे, शौचस्नान इत्यादी शारीरिक कार्येही भगवंताना अर्पण करतो तोही शुभाशुभ फलरूप कर्मबंधनातून मुक्त होऊन भगवंताला प्राप्त होतो. (९।२७-२८) तर मग जो केवळ भगवद्भक्तीचा उद्देश ठेवून गीतेचा प्रचार करतो, तो भगवंताला प्राप्त होईल. हे काय सांगण्याची गरज आहे ?

## न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः।
## भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि॥ ६९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = त्याच्यासारखा | **कश्चित्** | = कोणीही | **मे** | = माझा |
| **मे** | = माझा | **न** | = नाही | **अन्यः** | = दुसरा कोणी |
| **प्रियकृत्तमः** | = अत्यंत प्रिय कार्य करणारा | **च** | = आणि | **प्रियतरः** | = प्रियतर |
| | | **भुवि** | = या भूमंडळावर | **भविता च** | = होणारही |
| **मनुष्येषु** | = मन्युष्यांत | **तस्मात्** | = त्याच्यासारखा | **न** | = नाही. |

***व्याख्या*— न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः**—आपल्यात लौकिक-पारलौकिक प्राकृत पदार्थांची महत्ता, लिप्सा, आवश्यकता ठेवणारा व ठेवू इच्छिणारा पराभक्तीच्या (१८।६८) अंतर्गत येऊ शकत नाही. ज्याचा प्राकृत पदार्थ प्राप्त करण्याचा किंन्मित्रही उद्देश नाही आणि जो भगवत्प्राप्ती भगवद्दर्शन, भगवत्प्रेम इत्यादी पारमार्थिक उद्देश ठेवून गीतेनुसारच आपले जीवन बनवू इच्छितो तोच पराभक्तीच्या अंतर्गत येऊ शकतो. असा पुरुषच भगवद्गीतेच्या प्रचाराचा अधिकारी होतो. जर त्याच्यात कधी मान-प्रतिष्ठा इत्यादीची इच्छा झाली तरी ती टिकणार नाही. कारण मान-प्रतिष्ठा प्राप्त करण्याचा त्याचा उद्देश नाही.

भगवद्भक्तात गीतेचा प्रचार करणाऱ्या उपर्युक्त अधिकारी मनुष्यासाठीच "**तस्मात्**" पद देऊन भगवान् म्हणतात की, मनुष्यामध्ये त्यासारखा माझा प्रियकृत्तम अर्थात् अत्यंत प्रिय कार्य करणारा कोणीही नाही कारण गीता प्रचारासारखे दुसरे माझे कोणतेही प्रिय कार्य नाहीच.

**प्रियकृत्तमः**—पदात जे "**कृत्**" पद आले आहे त्याचे तात्पर्य हे आहे की, गीतेचा प्रचार करण्यामध्ये त्याचा स्वतःचा कोणताही स्वार्थ नाही, मान-प्रतिष्ठा, आदर-सत्कार, इत्यादीची कोणतीही कामना नाही, केवळ भगवत्प्रीत्यर्थ गीतेच्या भावांचा प्रचार करतो. म्हणून तो प्रियकृत्तम—भगवंताचे अत्यंत प्रिय कार्य करणारा आहे.

मनुष्यांत प्रियकृत्तम म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, भगवंताचा अत्यंत प्रिय बनण्याचा मानवासच अधिकार आहे. संसारात कामनापूर्ती करून घेणे काही महत्त्वाची, शूरत्वाची गोष्ट नाही. देवता, पशु-पक्षी, नारकीय जीव, कीट पतंग, वृक्ष-लता

इत्यादी सर्वच योनीत कामनेची पूर्ती करण्याचा अवसर मिळतो, परंतु कामनेचा त्याग करून परमात्म्याची प्राप्ती करण्याचा अवसर तर केवळ मनुष्ययोनीतच मिळतो. या मनुष्ययोनीला प्राप्त करून परमात्म्याची प्राप्ती करण्यात, परमात्म्याचा अत्यंत आवडता बनण्यातच मनुष्यजन्माची सफलता आहे.

**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि—** ज्याच्यात आपल्या मान प्रतिष्ठेची वासना आहे, काही थोडा स्वार्थभाव-ही आहे आणि ज्याचा आपला उद्धार करण्याचा तसेच गीतेनुसार जीवन बनविण्याचा उद्देश तसा (प्रियकृत्तमासारखा) बनलेला नाही. परंतु ज्याच्या हृदयात गीतेचा विशेष आदर आहे आणि गीतेचा पाठ करविणे, गीता कंठस्थ करविणे, गीता मुद्रित करवून त्याची अल्प किंमतीत विक्री करणे इत्यादी कोणत्याही प्रकारे गीतेचा प्रचार करतो आणि लोकांना गीतेची गोडी लावतो त्याच्यासारखा या जगात माझा दुसरा कोणीही प्रियतर होणार नाही.

आपला धर्म, सांप्रदाय, सिद्धांत इत्यादीचा प्रचार करणारी व्यक्ती भगवंताचा प्रिय तर होऊ शकते परंतु प्रियतर होणार नाही. प्रियतर तर कोणत्याही प्रकाराने गीतेचा प्रचार करणाराच होईल.

भगवद्गीतेमध्ये आपला उद्धार करण्याच्या अशा विलक्षण, सुगम आणि सरळ युक्त्या सांगितल्या गेल्या आहेत, ज्यांना प्रत्येक मनुष्य आपल्या आचरणात आणू शकतो. तात्पर्य असे आहे की, जो गीतेचा आदर करतो, असा मनुष्य हिंदू, मुसलमान, ईसाई, यहूदी, पारसी, बौद्ध इत्यादी कोणत्याही धर्माला मानणारा का असेना , कोणत्याही देश, वेश, वर्ण, आश्रम, सांप्रदाय इत्यादीचा का असेना, आपल्या आवडीनुसार कोणतीही शैली, उपाय, सिद्धांत, साधन याना मानणारा का असेना, तो जर आपल्या स्वतःचा कोणताही आग्रह न ठेवता, पक्षपात-विषमतेचा त्याग करून, कोणत्याही प्राण्याला दुःख पोहचणाऱ्या क्रियेचा त्याग करून, मनात कोणत्याही लौकिक-पारलौकिक उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या वस्तूची कामना न ठेवता, आपला सांप्रदाय, आपला गट बनविण्याचा उद्देश न ठेवता, केवळ आपल्या कल्याणाचा उद्देश ठेवून गीतेनुसार आचरण करतो (अकर्तव्याचा सर्वथा त्याग करून प्राप्त परिस्थितीनुसार आपल्या कर्तव्याचे लोकहितार्थ, निष्कामभावपूर्वक पालन करतो) तर तोही जीविकासंबंधी आणि खाणे-पिणे, झोपणे-जागणे इत्यादी शरीरसंबंधी सर्व कामे करीत असताही परमात्म्याची प्राप्ती करू शकतो, महान आनंद, महान सुख (६।२२) प्राप्त करू शकतो.

गीता वेश, आश्रम, अवस्था, क्रिया इत्यादीचे परिवर्तन करण्यासाठी सांगत नाही, उलट परिमार्जन करण्यासाठी सांगते अर्थात् केवळ आपला भाव आणि उद्देश शुद्ध बनविण्यासाठी सांगते. गीतेच्या अशा युक्त्या भगवद्भक्ती करणाऱ्यांना सांगितल्यास त्यांना पारमार्थिक मार्गात उन्नती करण्याच्या युक्त्या कळतील, शंकांचे समाधान होईल, साधनेतील अडचणी दूर होतील, पारमार्थिक बाधा नाहीशा होतील, त्यामुळे ते उत्साहाने सुगमतापूर्वक फारच लवकर आपल्या उद्देशाला प्राप्त करू शकतील; अशा युक्त्या सांगणारा भगवंताना सर्वात अधिक आवडता होईल कारण भगवान् जीवाच्या उद्धाराने फारच आनंदीत होतात, प्रसन्न होतात.

**परिशिष्ट भाव—**गीतेच्या शिकवणीने मनुष्यमात्राचे प्रत्येक परिस्थितीत सुगमतेने कल्याण होऊ शकते, म्हणून भगवान् हिच्या प्रचाराचा विशेष महिमा सांगतात. गीतेने युद्धासारख्या परिस्थितीतही कल्याण होण्याचा विचार सांगितला आहे—**'सुख दुःखे समे कृत्वा०'** (२।३८), **'यत्करोषि यदश्नासि०'** (९।२७), **'स्व कर्मणा तमभ्यर्च्य०'** (१८।४६) इत्यादी. जर युद्धासारख्या परिस्थितीतही (घोर कर्मातही) कल्याण होऊ शकते, तरमग अन्य परिस्थितीत कसे होणार नाही?

जो मनुष्य भगवंताचा आवडता होतो, त्याला कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—तिन्ही योग प्राप्त होतात.

***संबंध—*** *ज्याच्यात गीतेचा प्रचार करण्याची योग्यता नाही, त्याने काय करावे हे भगवान् पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः।
## ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः॥७०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो मनुष्य | **संवादम्** | = संवादाचे | **इष्टः** | = पूजित |
| **आवयोः** | = आम्हा दोघांच्या | **अध्येष्यते** | = अध्ययन करेल, | **स्याम्** | = होईल— |
| | | **तेन च** | = त्याच्याद्वाराही | **इति** | = असे |
| **इमम्** | = या | **अहम्** | = मी | **मे** | = माझे |
| **धर्म्यम्** | = धर्ममय | **ज्ञानयज्ञेन** | = ज्ञानयज्ञाने | **मतिः** | = मत आहे. |

***व्याख्या*— अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयो:**—तुझा आणि माझा हा संवाद शास्त्र, सिद्धांत यांच्या साररूप धर्माने युक्त आहे. ही गोष्ट मोठी विचित्र आहे की, एकमेकांच्या सहवासात तुझी-माझी कित्येक वर्षे निघून गेली परंतु आपल्या दोघांचा असा संवाद कधी झाला नाही. असा धर्ममय संवाद तर एखादा विलक्षण, अलौकिक अवसर प्राप्त झाला तरच होतो.

जोपर्यंत मनुष्याला संसाराचा वीट येत नाही, वैराग्य अथवा उपरती होत नाही आणि अंत:करणात जोरदार वादळ उठत नाही, तोपर्यंत त्याची वास्तविक जिज्ञासा जागृत होत नाही. एखाद्या कारणाने जेव्हा हा मनुष्य आपल्या कर्तव्य-कर्माचा निर्णय करण्यासाठी व्याकूळ होतो, जेव्हा आपल्या कल्याणाचा कोणता मार्ग दिसत नाही, समाधानावाचून कोणतीही सांसारिक वस्तू, व्यक्ती, घटना, परिस्थिती, इत्यादी किंचिन्मात्रही चांगली वाटत नाही, एकमात्र अंत:-करणातील संदेह दूर करण्याची लगन (चटपटी) लागते, एकच जोरदार जिज्ञासा होते आणि दुसऱ्या बाजूने मन संपूर्णपणे हटते, तेव्हा हा मनुष्य जेथून प्रकाश आणि समाधान मिळण्याची शक्यता असते तेथे आपले अंत:-करण मोकळे करून प्रश्न विचारतो, प्रार्थना करतो, शरण होतो, शिष्य होतो.

विचारणाराच्या मनात जस-जशी उत्कंठा वाढत जाते तस-तशी सांगणाराच्या मनात फार विचित्र व विलक्षण प्रकारे समाधान करणारी तत्त्वे सुचत जातात. ज्याप्रमाणे गायीचे वासरू दूध पितांना तिच्या स्तनांना आपल्या मुखाने वारंवार धक्के मारते आणि स्तनातून दूध ओढते तेव्हा गायीच्या शरीरात असलेले दूध स्तनामध्ये एकदम उतरते. त्याचप्रमाणे मनात जोरदार जिज्ञासा झाल्याने जेव्हा जिज्ञासू वारंवार प्रश्न करतो, तेव्हा सांगणाराच्या मनात नवनवीन उत्तरे निर्माण होतात. ऐकणाराला जस-जशा नवीन गोष्टी मिळतात, तस-तशी त्याच्यात ऐकण्याची नवनवीन उत्कंठा वाढत जाते. असे झाले तरच वक्ता आणि श्रोता या दोघांचा संवाद उत्कृष्ट होतो.

अर्जुनाने अशा उत्कंठेने पूर्वी कधीही प्रश्न विचारला नव्हता आणि भगवंताच्या मनातही अशा गोष्टी सांगण्याचे कधी आले नाही. परंतु अर्जुनाने जिज्ञासापूर्वक जेव्हा "**स्थित प्रज्ञस्य का भाषा....**" (२।५४) येथून विचारण्यास आरंभ केला, तेथूनच त्या दोघांचा प्रश्नोत्तररूपाने संवाद प्रारंभ झाला आहे. या संवादात वेद तसेच उपनिषदे यांचे सार आणि भगवंताच्या हृदयातील वास्तविक भाव आहे, जो धारण केला असता मनुष्य अत्यंत भयंकर परिस्थितीतसुद्धा आपल्या मनुष्यजन्माचे ध्येय सुगमतापूर्वक सिद्ध करू शकतो. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीतही घाबरू नये, उलट प्रतिकूल परिस्थितीचा आदर करून तिचा सदुपयोग करावा अर्थात् अनुकूलतेच्या इच्छेच्या त्याग करावा, कारण प्रतिकूलता पूर्वी केलेल्या पापांचा नाश करण्यासाठी आणि पुढे अनुकूलतेच्या इच्छेचा त्याग करण्यासाठीच येते. अनुकूलतेची इच्छा जितकी जास्त असेल तितकीच प्रतिकूल अवस्था भयंकर राहते. अनुकूलतेच्या इच्छेचा जस-जसा त्याग होत जाईल, तस-तशी अनुकूलतेची आसक्ती आणि प्रतिकूलतेचे भय समाप्त होत जाईल. राग आणि भय दोन्हीही समाप्त झाल्यास समता प्राप्त होईल. समता परमात्म्याचे साक्षात् स्वरूप आहे. गीतेत समतेचा उल्लेख विशेषतेने आला आहे आणि गीतेने यालाच योग म्हटले आहे. अशा प्रकारे ज्ञानयोग, कर्मयोग, भक्तियोग, ध्यानयोग, प्राणायाम इत्यादीच्या विलक्षण गोष्टींचे वर्णन गीतेत आले आहे.

"**अध्येष्यते**" चे तात्पर्य असे आहे की, हा संवाद कोणी जस-जसे पारायण करील, वाचील, स्मरण करील, त्यातील भाव समजून घेण्याचा प्रयत्न करील, तस-तशी त्याच्यात उत्कंठा वाढेल. त्याला जस-जसे समजेल तस-तसे त्याच्या शंकेचे समाधान होईल. जस-जसे समाधान होईल तस-तशी त्याच्यात अधिक आवड उत्पन्न होईल. जस-जशी आवड अधिक होईल तस-तसे सखोल भाव त्याला समजू लागतील आणि मग ते भाव त्याच्या आचरणात, क्रियेत, वर्तनात येऊ लागतील. आदरपूर्वक आचरण झाल्यास तो गीतेची मूर्ती बनून जाईल. त्याचे जीवन गीतारूप होऊन जाईल अर्थात् तो चालती-बोलती भगवद्गीता होईल. त्याला पाहताच लोकांना गीतेची आठवण येऊ लागेल. जसे निषादराज गुहकाला पाहताच मातांना आणि दुसऱ्या लोकांना लक्ष्मणाची आठवण येत असे.*

**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्याम्**—यज्ञ दोन प्रकारचे असतात. द्रव्ययज्ञ आणि ज्ञानयज्ञ. जो यज्ञ पदार्थ आणि क्रियांच्या प्रधानतेने केला जातो तो "द्रव्ययज्ञ" म्हटला जातो आणि उत्कंठेने केवळ आपल्या आवश्यक वास्तविकतेला

* जानि लखन सम देहिं असीसा। जिअहु सुखी सय लाख बरीसा॥
निरखि निषादु नगर नर नारी। भए सुखी जनु लखनु निहारी॥ (मानस २।१९६।३)

जाणण्यासाठी जे प्रश्न केले जातात, विज्ञ पुरुषाकडून त्यांचे समाधान केले जाते, त्यावर सखोल विचार केला जातो, विचारानुसार आपल्या वास्तविक स्थितीचा अनुभव केला जातो. तसेच वास्तविक तत्त्वाला जाणून. जो ज्ञात-ज्ञातव्य होतो त्याला ''ज्ञानयज्ञ'' म्हटले जाते. परंतु येथे भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तुझ्या माझ्या संवादाचा जो कोणी पारायण करील तर मी त्याच्याद्वारासुद्धा ज्ञानयज्ञाने पूजित होईल. याचे कारण जसे एखाद्या प्रेमी भक्ताला कोणी भगवंताची गोष्ट सांगितली, त्यांचे स्मरण दिले तर तो फार प्रसन्न होतो. त्याचप्रमाणे कोणी गीतेचे पारायण केले, अभ्यास केला तर भगवंताना आपल्या अनन्य भक्ताची, त्याच्या उत्कंठापूर्वक जिज्ञासेची आणि त्याला केलेल्या उपदेशाची आठवण येते आणि ते फार प्रसन्न होतात आणि त्या पारायणाला, अभ्यासाला ज्ञानयज्ञ मानून त्यांनी पूजित होतात. कारण पारायण, अभ्यास इत्यादी करणाऱ्याच्या हृदयात त्याच्या भावानुसार भगवंताचे नित्यज्ञान विशेषतेने स्फुरित होऊ लागते.

**इति मे मतिः**—असे म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जेव्हा कोणी गीतेचे पारायण करतो त्यावेळी मी ते ऐकतो कारण मी सर्व ठिकाणी राहतो. ''**मया ततमिदं सर्वम्**'' (९। ४) आणि सर्व ठिकाणी माझे कान आहेत—''**सर्वतः श्रुतिमल्लोके**'' (१३।१३) म्हणून ते पारायण ऐकताच माझ्या हृदयात विशेषत्वाने ज्ञान, प्रेम, दया इत्यादींचा समुद्र लहरू लागतो आणि गीतोपदेशाच्या स्मरणात माझी बुद्धी तरगोळ होते. तो पूजन करतो असे नाही तो तर पारायण करतो परंतु मी त्यामुळे पूजित होतो अर्थात् त्याला ज्ञानयज्ञाचे फल मिळते.

दुसरा भाव असा आहे की, पारायण करणारा जरी तितक्या खोलवरचे भाव समजू शकला नाही केवळ पठण करीत राहिला, स्मरण करीत राहिला तरीसुद्धा त्यामुळे माझ्या हृदयात तुझ्या आणि माझ्या संपूर्ण संवादाची ( तू उत्कंठापूर्वक विचारलेले प्रश्न व मी सखोलपणे दिलेली वास्तविक उत्तरे) एक सखोल मधुर स्मृती वारंवार येऊ लागते. अशा प्रकारे गीतेचे अध्ययन करणारा माझी फार मोठी सेवा करतो असे मी मानतो.

विदेशात एके ठिकाणी उत्सव होत होता. त्यावेळी पुष्कळ लोक जमले होते. एक पाद्री त्या उत्सवात एका मुलाला घेऊन आला. तो मुलगा पूर्वी नाटकात काम करीत होता. त्या पाद्र्याने त्या मुलाला दहा-पंधरा मिनिटाचे एक अत्यंत उत्तम व्याख्यान शिकविले. त्याबरोबरच कशा पद्धतीने उठायचे, बसायचे, उभे रहायचे, इकडे-तिकडे कसे पहायचे, कोणत्या वेळी कोणते हावभाव करायचे इत्यादी व्याख्यानाची कलाही शिकविली. व्याख्यानात इंग्रजीच्या उच्च दर्जाच्या भाषेचा प्रयोग केला होता. व्याख्यानाचा विषयही फार गहन होता. पाद्र्याने व्याख्यान देण्यासाठी त्या मुलाला स्टेजवर पाठवले. मुलगा स्टेजवर उभा राहिला व इकडे तिकडे मोठ्या गांभीर्याने पाहू लागला आणि ज्या पद्धतीने बोलायचे त्या पद्धतीने तसतसे संबोधन देऊन बोलू लागला. त्याने नाटकात काम केलेले होते त्यामुळे त्याला सर्व हावभाव येतच होते. तो गंभीरमुद्रेने जणू काही अर्थ समजत असल्यासारखे अशा मुद्रेत बोलला की, सर्व सदस्य आपापल्या खुर्चीवर आनंदाच्या भरात उड्या मारू लागले. सदस्य इतके प्रसन्न झाले की, त्यांनी व्याख्यान पूर्ण होताच रुपयांचा वर्षाव सुरू केला. ते सर्व त्या मुलाला डोक्यावर घेऊन नाचू लागले परंतु त्या मुलाला याचा पत्ताच नव्हता की, आपण व्याख्यानात काय बोललो. तो फारसा शिकलेला नव्हता त्यामुळे त्या शब्दांचा भाव त्याला समजत नव्हता. परंतु सभेचे सदस्य सर्व जाणत होते त्यामुळे त्यांना आनंद होत होता. त्याचप्रमाणे कोणी गीतेचे अध्ययन करीत असेल, पारायण करीत असेल, त्याला जरी तिचा अर्थ, भाव समजत नसला तरी भगवान् तर तिच्या अर्थाला, भावाला समजतात. म्हणून भगवान् म्हणतात की, मी त्याच्या अध्ययनरूप, पारायणरूपी ज्ञानयज्ञाने पूजित होतो.

सभेत जसे बालकाच्या व्याख्यानाने सभापती तर खूश झालाच परंतु त्याचबरोबर सदस्यही फार खूश झाले आणि उत्साहाने मुलाचा आदर करू लागले. त्याचप्रमाणे गीता पाठकाकडून भगवान् ज्ञानयज्ञाने पूजित होतात तसेच स्वतः तेथे निवास करतात. त्याचबरोबर प्रयागादी तीर्थे, देवता, ऋषी, योगी, दिव्यनाग, गोपाल, गोपिका, नारद, उद्धव इत्यादीही तेथे निवास करतात.*

* गीतायाः पुस्तकं यत्र यत्र पाठः प्रवर्तते।
तत्र सर्वाणि तीर्थानि प्रयागादीनि तत्रवै॥
सर्वे देवाश्च ऋषयो योगिनः पन्नगाश्च ये।
गोपाला गोपिका वापि नारदोद्धवपार्षदैः।
सहायो जायते शीघ्रं यत्र गीता प्रवर्तते॥
यत्र गीताविचारश्च पठनं पाठनं श्रुतम्।
तत्राहं निश्चितं पृथ्वि निवसामि सदैव हि॥

**परिशिष्ट भाव**—भगवान् ज्ञानयज्ञाला द्रव्यमय यज्ञापेक्षाही श्रेष्ठ मानतात—'**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप**' (गीता ४। ३३). जर गीतेच्या अध्यायनाचेच एवढे माहात्म्य आहे तर मग त्यानुसार आचरण केल्यास काय सांगायचे आहे?

*संबंध—जो गीतेचा प्रचार आणि अध्ययनही करू शकत नसेल त्याने काय करावे? यासाठी पुढील श्लोकात उपाय सांगतात.*

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः।**
**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम्॥ ७१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **श्रद्धावान्** | = श्रद्धावान् | | (हा गीताग्रंथ) | **पुण्यकर्मणाम्** | = पुण्य कर्म करणाऱ्यांच्या |
| **च** | = आणि | **शृणुयात्, अपि** | = केवळ ऐकेल, | **शुभान्** | = शुभ |
| **अनसूयः** | = दोषदृष्टिरहित | **सः, अपि** | = तोही | **लोकान्** | = लोकांना |
| **यः** | = जो | **मुक्तः** | = शरीर सुटल्यावर | **प्राप्नुयात्** | = प्राप्त होईल. |
| **नरः** | = मनुष्य | | | | |

*व्याख्या*— **श्रद्धावाननसूयश्च.....पुण्यकर्मणाम्**— गीतेतील गोष्टी जशा ऐकल्या असतील, त्या प्रत्यक्षापेक्षाही श्रेष्ठ पूज्यभावासहित तशाच्या तशाच मानणारास "**श्रद्धावान्**" म्हणतात आणि त्या गोष्टीत कोठेही, कोणत्याही विषयात किंचिन्मात्रही उणीव न पाहणाऱ्यास "**अनसूयः**" म्हणतात. अशा श्रद्धावान् आणि दोषदृष्टिरहित मनुष्याने केवळ गीता श्रवण जरी केली तरी तोही शरीर सुटल्यावर संपूर्ण पापातून मुक्त होऊन पुण्यकर्त्यांच्या शुभलोकांना प्राप्त करून घेतो.

येथे दोन वेळा "**अपि**" पद देण्याचे तात्पर्य हे आहे की, जो गीतेचा प्रचार करतो, अध्ययन करतो, त्याबद्दल तर बोलण्याचे काही कारणच नाही परंतु जो केवळ श्रवण करतो तो मनुष्यही पापातून सुटून शुभलोकांना प्राप्त होतो.

मनुष्याच्या वाणीत प्रायः भ्रम, प्रमाद, लिप्सा आणि करणापाटव हे चार दोष असतात.* म्हणून मनुष्याची वाणी सर्वथा निर्दोष असू शकत नाही. परंतु भगवंताच्या दिव्य वाणीत या चारी दोषांपैकी कोणताही दोष राहू शकत नाही कारण भगवान् निर्दोषतेची परावधी आहेत अर्थात् भगवंतापेक्षा अधिक निर्दोषता कोणात कधी नसतेच. म्हणून भगवंताच्या वचनात कोणत्याही प्रकारच्या संशयाची शक्यताच नाही. म्हणून गीता ऐकणाऱ्याने एखादा विषय समजला नाही तर, विचार करून एखादी गोष्ट पटली नाही तर तो विषय समजण्यात आपली बुद्धी कमी पडते, आपण समजू शकत नाही—हा भाव दृढतेने धारण केला तर असूया दोष नाहीसा होतो. भगवंताविषयी अत्यधिक श्रद्धा-विश्वासपूर्वक भक्ती असल्यासही असूया दोष राहत नाही.

चैतन्य महाप्रभूंचा एक भक्त होता. तो गीतेचे पारायण करीत असता मस्त होत होता, गद्गद होत होता आणि रडू लागत होता. तो शुद्ध पारायण करीत नव्हता. त्याच्या पारायणात अशुद्ध उच्चार होत होते. एकाने चैतन्य महाप्रभूजवळ त्याची तक्रार नोंदवली की, हा फार पाखंड करतो, पारायण तर शुद्ध करीत नाही आणि रडत राहतो. चैतन्य महाप्रभूनी त्याला जवळ बोलावून विचारले—"तू गीतेचे पारायण करतोस तर त्याचा अर्थ तुला समजतो काय?" त्याने म्हटले—"नाही प्रभू!". नंतर पुन्हा विचारले—"तर मग तू रडतोस का?" त्याने म्हटले—"मी जेव्हा '**अर्जुन उवाच**' वाचतो तेव्हा अर्जुन भगवंताना विचारीत आहेत असे मला प्रत्यक्ष दिसते आणि जेव्हा '**श्रीभगवानुवाच**' वाचतो तेव्हा भगवान् अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर देत आहेत असे मला प्रत्यक्ष दिसते. अशा प्रकारे भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचा आपसात संवाद होत आहे असे प्रत्यक्ष दिसते परंतु अर्जुन काय विचारीत आहेत आणि भगवान काय उत्तर देत आहेत हे मला समजत नाही. मी तर त्या दोघांचे दर्शन करीत आनंदीत होतो." त्याची अशी श्रद्धा-भक्ती पाहून चैतन्य महाप्रभू फार प्रसन्न झाले. अशा प्रकारची श्रद्धा-भक्ती असणाऱ्या माणसाने

---

* वक्ता ज्या विषयाचे प्रतिपादन करतो त्या विषयात तो अगदी निःसंदेह नसणे हा "भ्रम" आहे. (२) वक्त्याच्या स्वतःच्या विवेचनात आळस, उपेक्षा, उदासीनता, तत्परतेची उणीव, लोक समजोत अथवा न समजोत याची परवा न करणे हा "प्रमाद" आहे (३) वक्त्याची रुपये-पैसे, मान-प्रतिष्ठा, आदर-सत्कार, सुख-आराम इत्यादी लौकिक-पारलौकिक काहीतरी मिळविण्याची इच्छा असणे तिला "लिप्सा" म्हणतात (४) वक्ता ज्या मन, बुद्धी, इंद्रिये, वाणी, इत्यादींनी आपले भाव प्रकट करतो, त्या त्याच्या करणात पटुता, कुशलता नसणे आणि त्याचे श्रोत्यांची भाषा, भाव, योग्यता न जाणणे हे "करणापाटव" आहे.

गीता नुसती ऐकली तरी त्याच्या मुक्तीत कोणताही संदेह राहत नाही. तो शरीर सुटल्यावर संपूर्ण पापापासून मुक्त होऊन पुण्यकर्त्यांच्या शुभलोकांना प्राप्त होतो.

येथे "**पुण्यकर्मणाम्**" पदाने सकामभावपूर्वक यज्ञ अनुष्ठान इत्यादी पुण्य कर्म करणारांना समजू नये. कारण त्यांना भगवंतांनी श्रेष्ठ मानले नाही उलट त्यांच्याबद्दल असे म्हटले आहे की, ते वारंवार आवागमनाला प्राप्त होतात (९।२१). येथे ते पुण्यकर्मा भक्त समजावेत ज्यांना भगवद्दर्शन, भगवत्प्रेम इत्यादींची प्राप्ती होते. अशा पुण्यकर्मा भक्तांना आपापल्या इष्टानुसार वैकुंठ, साकेत, गोलोक, कैलास, इत्यादी ज्या दिव्य लोकांची प्राप्ती होते, त्याच लोकांची प्राप्ती असूया-दोषरहित श्रद्धावान् पुरुषाला केवळ गीता श्रवणानेच होते.

**परिशिष्ट भाव—'शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम्'**—श्रद्धा-भक्तीच्या तारतम्याने गीता ऐकल्यास सामंजस्य राहते आणि ऐकण्याच्या तारतम्याने श्रोत्याचा स्वर्गादिलोकापासून भगवल्लोकापर्यंतचा अधिकार होतो अर्थात् अधिक श्रद्धा-भक्ती होईल तर तो भगवंताच्या धामाला प्राप्त होईल आणि श्रद्धा-भक्ती कमी राहील तर तो अन्य लोकाला प्राप्त होईल.

गीतेच्या अध्ययन आणि श्रवणाची गोष्ट काय सांगावी गीतेला जवळ ठेवण्याचेही खूप मोठे माहात्म्य आहे. एक शिपाई होता. रात्रीच्या वेळी तो कुठून तरी घरी येत होता. वाटेत त्याने चंद्रमाच्या प्रकाशात एका वृक्षाच्या खाली एक सुंदर स्त्री पाहिली. त्याने त्या स्त्रीशी वार्तालाप केला तेव्हा त्या स्त्रीने म्हटले—मी येऊ काय? शिपाई म्हणाला—होय, ये. शिपायाने असे म्हटल्यावर ती स्त्री, जी वास्तविक हडळ होती, त्याच्या मागे आली. आता ती दररोज रात्री त्या शिपायाकडे येत होती, त्याच्याजवळ झोपत होती, त्याचा संग करत होती आणि सकाळी जात होती. अशाप्रकारे ती त्या शिपायाचे शोषन करू लागली अर्थात् त्याचे रक्त शोषन करू लागली आणि त्याची शक्ती क्षीण करू लागली. एक वेळ ते दोघे रात्री झोपले परंतु दिवा तेवत होता. त्यावेळी शिपायी तिला म्हणाला की, तू दिवा विझव. तिने झोपलेल्या स्थितीतच हात लांब करून दिवा विझविला. आता शिपायाला कळले की, ही कोणी सामान्य स्त्री नव्हे, ही तर हडळ आहे! तो फार घाबरला. त्या हडळने शिपायाला धमकी दिली की, जर तू माझ्या विषयात कोणाला काही सांगशील तर मी तुला मारून टाकीन. अशाप्रकारे ती दररोज रात्री येत होती आणि सकाळी जात होती. शिपायाचे शरीर दिवसेंदिवस सुकत चालले होते. लोक त्याला विचारीत की, काहो! आपण इतके वाळत का चालले आहात? सांगा तर खरे. परंतु हडळीच्या भीतीने तो कुणालाच काही सांगेना. एक दिवस तो दुकानावर औषधी आणण्यास गेला. दुकानदाराने औषधाची पुडी बांधून दिली. शिपायाने ती पुडी खिशात घातली आणि घरी गेला. रात्री जेव्हा ती हडळ आली तेव्हा ती दुरुनच उभ्या उभ्या म्हणाली की, तुझ्या खिशात जी पुडी आहे ती काढून फेकून दे. शिपायाला आता भरवसा आला की, या पुडीमुळेच ती हडळ माझ्याजवळ येऊ शकत नाही. या पुडीत अवश्य काही करामत असली पाहिजे. शिपायी तिला म्हणाला की, मी पुडी फेकणार नाही. तिने खूप आग्रह केला. पण शिपायाने तिचे काही ऐकले नाही. जेव्हा तिचा शिपायावर प्रभाव चालला नाही तेव्हा ती निघून गेली. शिपायाने खिशातून पुडी काढून पाहिली तर ते गीतेचे फाटलेले पान होते! अशाप्रकारे गीतेचा प्रभाव पाहून तो शिपायी नेहमी आपल्या खिशात गीता ठेवू लागला. नंतर ती हडळ पुन्हा कधी त्याच्याजवळ आली नाही.

***संबंध***—*पूर्व श्लोकात गीता ऐकण्याचे माहात्म्य सांगून आता अर्जुनाची काय स्थिती आहे, कोणती दशा आहे इत्यादी सर्व काही जाणत असूनही भगवान् गीताश्रवणाचे माहात्म्य सर्वांसमोर प्रकट करण्याच्या उद्देशाने पुढील श्लोकात अर्जुनाला प्रश्न करतात.*

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा।**
**कच्चिदज्ञानसम्मोहः प्रनष्टस्ते धनञ्जय॥७२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पृथानंदन! | **श्रुतम्** | = ऐकलेस | **अज्ञानसम्मोहः** | = अज्ञानाने उत्पन्न झालेला मोह |
| **त्वया** | = तू | **कच्चित्** | = काय? (आणि) | | |
| **एकाग्रेण** | = एकाग्र- | | | | |
| **चेतसा** | = चित्ताने | **धनञ्जय** | = हे धनंजय! | **प्रनष्टः** | = नष्ट झाला |
| **एतत्** | = हे | **ते** | = तुझा | **कच्चित्** | = काय? |

*व्याख्या*— **कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा** —"एतत्" शब्द अत्यंत समीपचा वाचक असतो आणि **येथे** अत्यंत समीप एकाहत्तरावा श्लोक आहे. एकोणसत्तर-सत्तराव्या श्लोकात जो गीता प्रचार व अध्ययनाचा महीमा सांगितला आहे. त्याचा तर अर्जुनाच्या बाबतीत काही प्रश्नच नव्हता. म्हणून मागील (एकाहत्तराव्या) श्लोकाचा संदर्भ देऊन भगवान् अर्जुनाला म्हणतात की, "मनुष्याने श्रद्धापूर्वक आणि दोषदृष्टिरहित होऊन गीता ऐकावी" ही गोष्ट तू लक्ष लावून ऐकलीस की नाही? अर्थात् तू श्रद्धापूर्वक आणि दोषदृष्टिरहित होऊन गीता ऐकली की नाही?

**एकाग्रेण चेतसा**—हे म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, गीतेतही जे अत्यंत गोपनीय रहस्य यापूर्वी चौसष्टाव्या श्लोकात सांगण्याची प्रतिज्ञा केली, सदुसष्टाव्या श्लोकात "**इदं ते नातपस्काय**" म्हणून निषेध केला आणि माझ्या वचनात ज्याला मी परमवचन म्हटले, त्या सर्वगुह्यतम शरणागतीची गोष्ट (१८। ६६) तू लक्षपूर्वक ऐकली की नाही? त्यावर विचार केलास की नाही?

**कच्चिदज्ञानसम्मोहः प्रनष्टस्ते धनञ्जय**—भगवान् दुसरा प्रश्न करतात की, तुझा अज्ञानाने उत्पन्न झालेला मोह नष्ट झाला की नाही? जर मोह नष्ट झाला असेल तर तू माझा उपदेश ऐकला व मोह नष्ट झाला नसेल तर तू माझा रहस्यमय उपदेश एकाग्रचित्ताने ऐकलाच नाही. कारण हा निश्चित नियम आहे की, जो दोषदृष्टिरहित होऊन श्रद्धापूर्वक गीतेचा उपदेश ऐकतो, त्याचा मोह नष्ट होतोच.

"**पार्थ**" संबोधन देऊन भगवान् आत्मीयतेने, मोठ्या प्रेमाने विचारत आहेत की, तुझा मोह नष्ट झाला की नाही? पहिल्या अध्यायाच्या पंचवीसाव्या श्लोकातसुद्धा भगवंतांनी अर्जुनाला ऐकण्याविषयी उन्मुख करण्यासाठी "**पार्थ**" संबोधन देऊन सर्वात प्रथम बोलणे आरंभ केले आणि म्हटले की, हे पार्थ! युद्धासाठी एकत्र जमलेल्या या कुटुंबियांना पहा. असे म्हणण्याचे तात्पर्य हे होते की, अर्जुनाच्या अंतःकरणात लपलेला जो कुटुंबाचा मोह आहे तो जागृत व्हावा आणि त्या मोहातून सुटण्यासाठी त्याला तळमळ लागावी, त्यामुळे तो केवळ मला सम्मुख होऊन ऐकण्यासाठी तयार व्हावा. आता येथे तोच मोह दूर होण्याबद्दल उपसंहार करत असता भगवान् "**पार्थ**" संबोधन देतात.

"धनञ्जय" संबोधन देऊन भगवान् म्हणतात की, तू लौकिक धनाच्या संबंधाने धनंजय (राजांच्या धनाला जिंकणारा) नाव प्राप्त केले आहेस. आता हे वास्तविक तत्त्वरूप धन प्राप्त करून आपल्या मोहाचा नाश कर आणि खऱ्या अर्थाने "धनंजय" बन.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी जो प्रश्न केला होता त्याचे उत्तर अर्जुन पुढील श्लोकात देत आहेत.*

*अर्जुन उवाच*

## नष्टो मोहः स्मृतिर्लब्ध्वा त्वत्प्रसादान्मयाच्युत।
## स्थितोऽस्मि गतसन्देहः करिष्ये वचनं तव॥ ७३॥

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अच्युत** | = हे अच्युत! | | आहे (आणि) | **स्थितः** | = स्थित |
| **त्वत्प्रसादात्** | = आपल्या कृपेने (माझा) | **मया** | = मी | **अस्मि** | = आहे. |
| | | **स्मृतिः** | = स्मृती | **तव** | = (आता मी) आपल्या |
| | | **लब्ध्वा** | = प्राप्त केली आहे | | |
| **मोहः** | = मोह | **गतसन्देहः** | = (मी) संदेहरहित होऊन | **वचनम्** | = आज्ञेचे |
| **नष्टः** | = नष्ट झाला | | | **करिष्ये** | = पालन करीन. |

*व्याख्या*— **नष्टो मोहः स्मृतिर्लब्ध्वा त्वत्प्रसादान्मयाच्युत** —अर्जुनाने येथे भगवंतासाठी "**अच्युत**" संबोधनाचा प्रयोग केला आहे. याचे तात्पर्य, जीव तर च्युत होतो अर्थात् आपल्या स्वरूपापासून विमुख होतो तसेच पतनाकडे जातो परंतु भगवान् कधीही च्युत होत नाहीत. ते सदा एकरस राहतात. याच गोष्टीचे द्योतन करण्यासाठी गीतेत अर्जुनाने एकूण तीन वेळा "**अच्युत**" संबोधन दिले आहे. पहिल्या वेळी (१।२१ मध्ये) "**अच्युत**" संबोधनाने अर्जुनाने भगवंताशी म्हटले की, दोन्ही सैन्याच्या मध्यभागी माझा रथ उभा करा. अशी आज्ञा दिल्यावरही भगवंतात काही फरक पडला नाही. दुसऱ्या वेळी (११।४२ मध्ये) या संबोधनाने अर्जुनाने भगवंताच्या विश्वरूपाची स्तुति-प्रार्थना केली, तर

भगवंतात कोणताही फरक पडला नाही. शेवटी येथे (१८। ७३ मध्ये) या संबोधनाने अर्जुन संदेहरहित होऊन म्हणत आहेत की, आता मी आज्ञेचे पालन करीन, तरी भगवंतात कोणताही फरक पडला नाही. तात्पर्य हे झाले की, अर्जुनाच्या तर आदी, मध्य आणि अंती अशा तीन प्रकारच्या अवस्था झाल्या परंतु भगवंताची आदी, मध्य आणि अंती एकच अवस्था राहिली अर्थात् ते एकरसच बनून राहिले.

दुसऱ्या अध्यायात अर्जुनाने "**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्**" (२।७) म्हणून भगवंताची शरणागती स्वीकारली होती. या श्लोकात त्या शरणागतीची पूर्णता होते.

दहाव्या अध्यायाच्या शेवटी भगवंतांनी अर्जुनाला असे म्हटले की, "तुला पुष्कळ जाणण्याची काय आवश्यकता आहे, मी संपूर्ण संसाराला एका अंशात व्याप्त करून स्थित आहे." हे ऐकताच अर्जुनाच्या मनात एक विशेष भाव उत्पन्न झाला की, भगवान् किती विलक्षण आहेत! भगवंताच्या विलक्षणतेकडे लक्ष गेल्याने अर्जुनाला एक प्रकाश मिळाला. त्या प्रकाशाच्या प्रसन्नतेत अर्जुनाच्या मुखातून उद्गार निघाले "माझा मोह नाहीसा झाला"—"**मोहोऽयं विगतो मम**" (११।१)। परंतु भगवंताच्या विराटरूपाला पाहून जेव्हा अर्जुनाच्या हृदयात भीतीमुळे चलबिचल उत्पन्न झाली, तेव्हा भगवंतांनी म्हटले की, हा तुझा मूढभाव आहे. तू व्यथित आणि मोहित होऊ नकोस—"**मा ते व्यथा मा च विमूढभावः**" (११।४९). यावरुन सिद्ध होते की, अर्जुनाचा मोह तेव्हा नष्ट झाला नव्हता. आत्ता येथे सर्वज्ञ भगवंताने विचारल्यावरुन अर्जुन म्हणत आहेत की, माझा मोह नष्ट झाला आहे आणि मला तत्त्वाची अनादी स्मृती प्राप्त झाली आहे—"**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा**"*

अंतःकरणाच्या स्मृतीत आणि तत्त्वाच्या स्मृतीत फार फरक आहे. प्रमाणाने प्रमेयाचे ज्ञान होते.† परंतु परमात्मतत्त्व अप्रमेय आहे. म्हणून परमात्मा प्रमाणाने व्याप्य होऊ शकत नाहीत. अर्थात् परमात्मा प्रमाणाच्या अंतर्गत येणारे तत्त्व नाही. परंतु संसार सर्वचा सर्व प्रमाणाच्या अंतर्गत येणारा आहे आणि प्रमाण प्रमात्याच्या अंतर्गत येणारे असते.‡

प्रमाता एक असतो आणि प्रमाण अनेक असतात. प्रमाणांच्या बाबतीत कित्येक प्रत्यक्ष, अनुमान आणि आगम—हे तीन मुख्य प्रमाण मानतात, कित्येक प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, आणि शब्द—हे चार प्रमाण मानतात आणि कित्येक या चारांशिवाय अर्थापत्ती, अनुपलब्धी आणि ऐतिह्य—हे तीन प्रमाण आणखी मानतात. अशा प्रकारे प्रमाणे मानण्यात अनेक मतभेद आहेत परंतु प्रमात्याविषयी कोणाचाही मतभेद नाही. हे प्रत्यक्ष, अनुमान इत्यादी प्रमाण वृत्तिरूप असतात परंतु प्रमाता वृत्तिरूप नसतो, तो तर स्वतः अनुभव-रूप असतो.

आता या "स्मृति" शब्दाची जेथे व्याख्या केली गेली आहे, तिची पुढील लक्षणे सांगितली आहेत.

(१) "**अनुभूतविषयासम्प्रमोषः स्मृतिः**"। (योगदर्शन १।११।) "अनुभूत विषय लपलेला न राहणे, अर्थात् प्रकट होणे, ती "स्मृति" आहे."

(२) "**संस्कारमात्रजन्यं ज्ञानं स्मृतिः**"। (तर्कसंग्रह) "संस्कारमात्रापासून उत्पन्न झालेली असावी आणि ज्ञान असावे तिला "स्मृति" म्हणतात."

ही स्मृती अंतःकरणाची एक "वृत्ती" आहे. ही वृत्ती प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृती—पाच प्रकारची असते. तसेच प्रत्येक प्रकाराच्या वृत्तीचे दोन भेद आहेत—क्लिष्ट आणि अक्लिष्ट. संसाराची वृत्तीरूपी स्मृती "क्लिष्ट" आहे अर्थात् बंधनकारक आहे आणि भगवत्संबंधी वृत्तीरूपी

* येथे अर्जुनाचा कुटुंबाचा (२।५२) आणि शास्त्रीय (२।५३) दोन्ही प्रकारचा मोह नष्ट झाला आहे.

† संसार विवेक-विचाराचा विषय असल्यामुळे आपणास त्या संसाराचे ज्ञान प्रत्यक्ष प्रमाणांनी होते. परंतु जो विवेक-विचाराचा विषय नाही तर विवेक-विचाराचा प्रकाशक आहे. त्याला विवेक-विचाराने जाणले जाऊ शकत नाही. कारण जी वस्तू प्रकाश्य असते ती प्रकाशकाला प्रकाशित करण्यात असमर्थ असते. म्हणून जो सर्वांचा प्रकाशक आणि आश्रय आहे, ते परमात्मतत्त्व श्रद्धा-विश्वासाचा विषय आहे, विवेक-विचाराचा नाही.

ज्या लोकांची शास्त्रावर श्रद्धा असते ते शास्त्रप्रमाणावरुन परमात्म्याला मानतात अथवा ज्यांची श्रद्धा तत्त्वज्ञ जीवन्मुक्त अनुभवी भगवत्प्रेमी संत महापुरुषावर असते, ते त्यांच्या वचनावरुन परमात्म्याला मानतात, स्वीकार करतात. यात त्यांचे अंतःकरण आणि इंद्रिये प्रमाण नाहीत. यात तर शास्त्र आणि संत महापुरुषच प्रमाण आहेत. जे श्रद्धावान् आणि आस्तिक आहेत, त्यांच्यासाठी तर शास्त्र आणि संत महापुरुष प्रमाण होऊ शकतात परंतु जे अश्रद्ध आणि नास्तिक आहेत, त्यांच्यासाठी शास्त्र आणि संत महापुरुष प्रमाण होऊ शकत नाहीत. तात्पर्य हे झाले की, इंद्रिये आणि अंतःकरणाचा जो विषय आहे, ते तर प्रत्यक्ष प्रमाण आहे आणि अनुमान इत्यादी जी प्रमाणे आहेत ते प्रत्यक्षमूलक युक्तिप्रमाणे आहेत. परंतु संत महापुरुष आणि शास्त्र प्रमाणात तर केवळ श्रद्धाच मुख्य हेतू आहे.

‡ ज्याने जाणले जाते ते "प्रमाण" असते. ज्याचे ज्ञान होते ते "प्रमेय" असते. जो जाणणारा असतो तो "प्रमाता" असतो अर्थात् इंद्रिये आणि अंतःकरण "प्रमाण" आहेत, संसार "प्रमेय" आहे आणि स्व (चेतन) "प्रमाता" आहे.

स्मृती ''अक्लिष्ट'' आहे अर्थात् क्लेश दूर करणारी आहे. या सर्व वृत्तीचे कारण ''अविद्या'' आहे. परंतु परमात्मा अविद्यारहित आहेत. म्हणून परमात्म्याची स्मृती ''स्व'' कडूनच होते, वृत्तीकडून अथवा करणाकडून नव्हे. जर परमात्म्याची स्मृती जागृत झाली तर मग तिची कधीच विस्मृती होत नाही. परंतु अंत:करणाच्या वृत्तीत स्मृती आणि विस्मृती—दोन्ही होतात.

परमात्मतत्त्वाची विस्मृत्ती अथवा विस्मरण....तर असत् संसाराला सत्ता आणि महत्ता दिल्यामुळेच झाले आहे. ही विस्मृती अनादिकालापासून आहे. अनादिकालापासून असली तरी हिचा अन्त होतो. जेव्हा हिचा अंत होतो आणि आपल्या स्वरूपाची स्मृती जागृत होते, तेव्हा हिला ''स्मृतिर्लब्धा'' म्हणतात. अर्थात् असत्च्या संबंधामुळे जी स्मृती सुषुप्ति-रूपात होती, ती जागृत झाली. जसा एखादा माणूस झोपलेला आहे आणि एक प्रेत पडलेले आहे. या दोन्हीत फार मोठा फरक आहे. त्याचप्रमाणे अंत:करणाच्या स्मृती-विस्मृती दोन्हीही प्रेतासारख्या जड आहेत, परंतु स्वरूपाची स्मृती सुप्त आहे, जड नाही. केवळ जडाचा आदर केल्यामुळे झोपलेल्या-सारखी ती स्मृती वरुन लुप्त राहते अर्थात् झाकलेली राहते. ते आवरण निघाले की, ती प्रकट होते. तेव्हा तिला ''**स्मृतिर्लब्धा**'' म्हणतात. अर्थात् प्रथमपासून जे तत्त्व अस्तित्वात आहे त्याचे प्रकट होणे ''**स्मृति**'' आहे आणि आवरण हटण्यास ''**लब्धा**'' म्हणतात.

साधकांच्या आवडीप्रमाणे त्या स्मृतीचे तीन भेद होतात (१) कर्मयोग अर्थात् निष्कामभावाची स्मृती (२) ज्ञानयोग अर्थात् आपल्या स्वरूपाची स्मृती आणि (३) भक्तियोग अर्थात् भगवंताच्या संबंधाची स्मृती. अशा प्रकारे हे तिन्ही योग स्वत:सिद्ध व नित्य असल्याकारणाने ह्या तिन्ही योगांची स्मृती जागृत होते. हे तिन्ही योग जेव्हा वृत्तीचे विषय असतात तेव्हा ते साधन म्हणविले जातात परंतु स्वरूपाने हे तिन्ही नित्य आहेत. म्हणून नित्याच्या प्राप्तीला स्मृती म्हणतात. तात्पर्य या साधनांची विस्मृती झाली आहे, अभाव झालेला नाही.

असत् सांसारिक पदार्थांना आदर दिल्याने अर्थात् त्यांना सत्ता आणि महत्ता दिल्याने आसक्ती उत्पन्न झाली—ही ''कर्मयोगा'' ची विस्मृती (आवरण) आहे. असत् पदार्थांच्या संबंधाने आपल्या स्वरूपाची विमुखता झाली अर्थात् अज्ञान झाले—ही ''ज्ञानयोगा'' ची विस्मृती आहे. आपले स्वरूप साक्षात् परमात्म्याचा अंश आहे. त्या परमात्म्यापासून विमुख होऊन संसार-सम्मुख झाल्यामुळे संसारात आसक्ती झाली. त्या आसक्तीमुळे प्रेम झाकले गेले—ही ''भक्तियोगा'' ची विस्मृती आहे.

स्वरूपाच्या विस्मृतीचा अर्थात् विमुखतेचा नाश होणे येथे ''स्मृति'' आहे. त्या स्मृतीचे प्राप्त होणे अप्राप्ताचे प्राप्त होणे नाही उलट नित्यप्राप्ताचे प्राप्त होणे आहे. नित्य स्वरूपाची प्राप्ती झाल्यास मग त्याची विस्मृती होणे शक्य नाही. कारण स्वरूपात कधी परिवर्तन झाले नाही. ते सदा निर्विकार आणि एकरस राहते. परंतु वृत्तिरूपी स्मृतीची विस्मृती होऊ शकते कारण ती प्रकृतीचे कार्य असल्याने परिवर्तनशील आहे.

या सर्वांचे तात्पर्य हे झाले की, संसार व शरीर यांच्याशी आपले स्वरूप मिसळलेले आहे असे समजणे ही ''विस्मृती'' आहे आणि शरीर व संसारापासून वेगळे होऊन आपल्या स्वरूपाचा अनुभव घेणे ही ''स्मृती'' आहे. आपल्या स्वरूपाची स्मृती ''स्व'' कडून होते. यात करणादिकांची अपेक्षा नसते. जसे मनुष्याला आपल्या अस्तित्वाचे जे ज्ञान होते. त्यासाठी कोणत्याही प्रमाणाची आवश्यकता नाही. ज्यात करणादिकांची अपेक्षा असते ती स्मृती अंत:करणाची एक वृत्तीच आहे.

स्मृती तात्काळ प्राप्त होते. तिच्या प्राप्तीत विलंब किंवा परिश्रम लागत नाहीत. कर्ण कुन्तीचे पुत्र होते. परंतु जन्मानंतर जेव्हा कुन्तीने त्यांचा त्याग केला, तेव्हा अधिरथ नावाच्या सूताच्या पत्नीने (राधेने) त्यांचे पालन-पोषण केले. म्हणून ते राधेलाच आपली माता मानू लागले. जेव्हा सूर्यदेवाकडून त्यांना हे कळले की, वास्तविक त्यांची माता कुन्ती आहे तेव्हा त्यांना स्मृती प्राप्त झाली. आता ''मी कुन्तीचा पुत्र आहे'' अशी स्मृती प्राप्त होण्यात किती वेळ लागला? किती परिश्रम अथवा अभ्यास करावा लागला? किती शक्ती खर्च झाली? अगोदर ते माहीत नव्हते, तिकडे लक्ष नव्हते. आता ते कळल्याबरोबर तिकडे लक्ष गेले—केवळ एवढीच गोष्ट आहे.

स्वरूप निष्काम आहे, शुद्ध-बुद्ध-मुक्त आहे आणि भगवंतांचे आहे. स्वरूपाच्या विस्मृतीनेच अर्थात् विमुखतेनेच जीव सकाम, बद्ध आणि सांसारिक होतो. अशा स्वरूपाची स्मृती वृत्तीची अपेक्षा ठेवीत नाही अर्थात् अंत:करणाच्या वृत्तीने स्वरूपाची स्मृती जागृत होणे शक्य नाही. जेव्हा अंत:-करणाशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होईल तेव्हाच स्मृती जागृत होईल. स्मृती आपल्याकडूनच आपल्या स्वत:मध्ये जागृत होते. म्हणून स्मृतीच्या प्राप्तीसाठी कोणाच्याही

सहकार्याची अथवा अभ्यासाची जरूरी नाही. कारण जडतेच्या साहाय्याशिवाय अभ्यास होत नाही परंतु स्वरूपाशी जडतेचा लेशमात्रही संबंध नाही. स्मृती अनुभवसिद्ध आहे, अभ्यास-साध्य नाही. म्हणून एकवेळ स्मृती जागृत झाल्यावर मग त्याची पुनरावृत्ती करावी लागत नाही.

स्मृती भगवत्कृपेने जागृत होते. भगवंताची कृपा भगवंताना सम्मुख झाल्याने होते आणि भगवंताची सम्मुखता संसारापासून संपूर्णपणे विमुख झाल्याने होते. जसे अर्जुनाने म्हटले आहे की, मी केवळ आपल्या आज्ञेचे पालन करीन—''करिष्ये वचनं तव''. त्याचप्रमाणे संसाराचा आश्रय सोडून केवळ भगवंताना शरण होऊन म्हणावे की, ''हे नाथ! आता मी केवळ आपल्या आज्ञेचेच पालन करीन.''

तात्पर्य हे आहे की, या स्मृतीच्या प्राप्तीत साधकाची भगवत् सम्मुखता आणि भगवंताची कृपाच कारण आहे. म्हणून अर्जुनाने स्मृती प्राप्त होण्यात केवळ भगवंताची कृपाच मानली आहे. भगवंताची कृपा तर सर्व प्राणीमात्रावर अपार, अतूट-अखंडरूपाने नित्य आहे. जेव्हा मनुष्य भगवंतांना सम्मुख होतो, तेव्हा त्याला त्या कृपेचा अनुभव होतो.

**त्वत्प्रसादात् मयाच्युत**—या पदांनी अर्जुन म्हणत आहेत की, आपण विशेषतेने जी सर्वगुह्यतम गोष्ट सांगितली, त्याची मला विशेषतेने स्मृती आली की, मी आपलाच होतो, आपलाच आहे आणि आपलाच राहील. ही जी स्मृती, आली आहे, ही माझ्या एकाग्रतेने ऐकल्यामुळे आलेली नाही अर्थात् हे माझ्या एकाग्रतेने ऐकण्याचे फळ नाही तर ही स्मृती आपल्या कृपेनेच आली आहे. पूर्वी मी शरण होऊन उपदेश करण्याची प्रार्थना केली होती आणि पुन्हा हे म्हटले होते की, मी युद्ध करणार नाही परंतु मला जोपर्यंत वास्तविकतेचा बोध झाला नाही, तोपर्यंत आपण माझा पिच्छा सोडला नाही. यात तर केवळ आपली कृपाच कारण आहे. मी जसे सम्मुख व्हावयास हवे होते तसा मी सम्मुख झालो नाही पण आपण माझ्यावर अकारण कृपा केली अर्थात् माझ्यावर कृपा करण्यासाठी आपण आपल्या कृपेला परवश झालात, तिला वशीभूत झालात आणि न विचारताच आपण शरणागतीचे सर्वगुह्यतम तत्त्व सांगितले (१८। ६४-६६) त्याच अहैतुकी कृपेने माझा मोह नष्ट झाला आहे.

**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव**—अर्जुन म्हणतात की, मूळात माझा जो हा संदेह होता की, युद्ध करू की करू नको (''**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयः**'' २। ६), तो माझा सन्देह संपूर्णपणे नष्ट झाला आहे आणि मी आपल्या वास्तविकतेत स्थित झालो आहे. तो संदेह असा नष्ट झाला आहे की, युद्ध करण्याचे किंवा न करण्याचे असे काहीच मनात राहिले नाही. आता तर एवढेच मनात येत आहे की, आपण सांगाल तसे मी करीन. अर्थात् आता तर बस, आपली आज्ञाच पालन करीन—''**करिष्ये वचनं तव**''. आता मला युद्ध करणे वा न करणे याच्याशी कोणत्याही प्रकारचे किंचिन्मात्र सुद्धा प्रयोजन राहिले नाही. आता तर आपल्या आज्ञेनुसार लोकसंग्रहार्थ युद्ध इत्यादी जे कर्तव्यकर्म असेल, ते करीन.

आता लक्ष देण्यासारखी गोष्ट अशी आहे की, पूर्वी कुटुंबाचे स्मरण झाल्याने अर्जुनाला मोह झाला होता. त्या मोहाच्या वर्णनात भगवंतांनी ही प्रक्रिया सांगितली होती की, विषयांच्या चिंतनाने आसक्ती, आसक्तीपासून कामना, कामनेपासून क्रोध, क्रोधापासून मोह, मोहापासून स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश आणि बुद्धिनाशापासून पतन होते. (२। ६२-६३) अर्जुनसुद्धा येथे त्याच प्रक्रियेचे स्मरण करवून म्हणतात की, माझा मोह नष्ट झाला आणि मोहापासून स्मृती भ्रष्ट होत असते, ती स्मृती मला प्राप्त झाली आहे—''**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा**''. स्मृती नष्ट झाल्याने बुद्धिनाश होतो, त्याच्या उत्तरात अर्जुन म्हणतात की, माझा संदेह नष्ट झाला आहे. निघून गेला आहे—''**गतसन्देहः**'' बुद्धिनाशापासून पतन होते याच्या उत्तरात म्हणतात की, मी आपल्या स्वाभाविक स्थितीत स्थित आहे—''**स्थितोऽस्मि**''. अशा प्रकारे ती प्रक्रिया दाखविण्यात अर्जुनाचे तात्पर्य हे आहे की, मी आपल्या मुखाने लक्षपूर्वक गीता ऐकली आहे. म्हणूनच तर आपण सम्मोहाचा कुठे प्रयोग केला आहे आणि सम्मोहाची परंपरा कुठे सांगितली आहे, याची मला अजूनही आठवण आहे. परंतु माझ्या मोहाचा नाश होण्यात तर आपली कृपाच कारण आहे.

जरी तेथील आणि येथील—दोन्ही ठिकाणचा विषय वेगवेगळा दिसतो.कारण तेथे विषयांचे चिंतन करणे इत्यादी क्रमाने सम्मोह होत असल्याबद्दल सांगितले आहे आणि येथे सम्मोह मूळ अज्ञानाचे वाचक आहे. तरीही सखोल विचार केला तर वेगळेपणा दिसणार नाही. तेथील विषयच येथे आला आहे.

दुसऱ्या अध्यायाच्या एकसष्टाव्यापासून त्रेसष्टाव्या श्लोका-पर्यंत भगवंतांनी, ही गोष्ट सांगितली की, इंद्रियांना वश करून अर्थात् संसारापासून सर्वथा विमुख होऊन केवळ मत्परायण होण्याने बुद्धी स्थिर होते. परंतु मत्परायण न झाल्यास मनात स्वाभविकच विषयाचे चिंतन होते. विषयांचे चिंतन झाल्याने पतनच होते. कारण ही आसुरी संपत्ती आहे. परंतु येथे उत्थानाबद्दल सांगितले आहे की, संसाराशी विमुख होऊन

भगवत्सम्मुख होण्याने मोह नष्ट होतो कारण ही दैवी-संपत्ती आहे. तात्पर्य हे झाले ही, तेथे भगवंताशी विमुख होऊन इंद्रिय आणि विषय यांना परायण होणे पतनाला हेतू आहे आणि येथे भगवंतांना सम्मुख झाल्यास भगवंताशी असलेल्या वास्तविक संबंधाची स्मृती येण्यात भगवत्कृपाच हेतू आहे.

भगवत्कृपेने जे काम होते ते श्रवण, मनन, निदिध्यासन, ध्यान, समाधी इत्यादी साधनांनी होत नाही. कारण आपला पुरुषार्थ मानून जे काही साधन केले जाते, त्या साधनेत आपले सूक्ष्म व्यक्तित्व अर्थात् अहंभाव राहतो. ते व्यक्तित्व साधनेत आपला पुरुषार्थ न मानता केवळ भगवत्कृपा मानल्यानेच समाप्त होते.

## मार्मिक गोष्ट

अर्जुनांनी म्हटले की, मला स्मृती प्राप्त झाली— "**स्मृतिर्लब्धा**" तर विस्मृती कोण्या कारणाने झाली होती? जीवाने असत्शी तादात्म्य मानून असत्ची मुख्यता मानली, त्यामुळेच आपल्या सत्स्वरूपाची विस्मृती झाली. विस्मृती झाल्याने याने असत्च्या उणीवेला आपली उणीव मानली. आपल्याला शरीर मानले (मीपणा) तसेच शरीराला आपले मानले (माझेपणा). या कारणामुळे याने असत् असलेल्या शरीराच्या उत्पत्ती आणि विनाशाला आपली उत्पत्ती आणि विनाश मानले आणि ज्यापासून शरीर उत्पन्न झाले त्यालाच आपले उत्पादक मानले.

आता कोणी असा प्रश्न करेला की, भ्रम अगोदर झाला की असत्शी संबंध अगोदर झाला? अर्थात् भ्रम झाल्याने असत्शी संबंध झाला की असत्च्या संबंधाने भ्रम झाला? तर याचे उत्तर असे आहे की, अनादिकालापासून जन्म-मरणाच्या चक्रामध्ये पडलेल्या जीवाला जन्म-मरणातून सोडवून नेहमीसाठी महान् सुखी करण्याकरिता अर्थात् केवळ आपली प्राप्ती करविण्यासाठी भगवंतांनी जीवाला मनुष्यशरीर दिले. भगवंतांचे एकाकीपणात मन लागले नाही—"**एकाकी न रमते**" (बृहदारण्यक १।४।३) म्हणून त्यांनी आपल्याबरोबर खेळण्यासाठी मनुष्यशरीराची रचना केली. जेव्हा दोन्हीकडील खेळाडू स्वतंत्र असतात तेव्हाच खेळ होतो. म्हणून भगवंतांनी मनुष्यशरीराची रचना करतानाच जीवाला स्वतंत्रताही देऊन टाकली आणि विवेकही (सत् -असत्चे ज्ञान) दिला. दुसरी गोष्ट जर याला स्वतंत्रता आणि विवेक मिळाला नसता तर हा पशूसारखाच झाला असता. याच्यात मनुष्यतेची थोडीही कोणतीही विशेषता राहिली नसती. या विवेकामुळेच असत्ला असत् जाणूनही मनुष्याने मिळालेल्या स्वतंत्रतेचा दुरुपयोग केला आणि असत्मध्ये (संसाराच्या भोग आणि संग्रहाच्या सुखात) आसक्त झाला. असत्मध्ये आसक्त झाल्यानेच चूक झाली आहे,

असत्ला असत् जाणूनही हा त्यात आसक्त का होतो? कारण असत्च्या संबंधाने प्रतीत होणाऱ्या तात्कालिक सुखाकडे तर हा दृष्टी ठेवतो पण त्याचा परिणाम काय होईल याकडे आपले लक्ष ठेवीतच नाही. (जे परिणामाकडे दृष्टी ठेवतात ते साधक असतात आणि जे परिणामाकडे दृष्टी ठेवीत नाहीत, ते संसारी असतात) म्हणून असत्च्या संबंधानेच चूक झाली आहे. याचा पत्ता कसा लागतो? जेव्हा हा आपल्या अनुभवात येणाऱ्या असत्च्या आसक्तीचा त्याग करून परमात्म्याला सम्मुख होतो, तेव्हा ही चूक मिटून स्मृती जागृत होते. यावरुन सिद्ध झाले की, परमात्म्याशी विमुख होऊन जाणलेल्या असत्मध्ये आसक्ती झाल्यानेच ही चूक झाली आहे.

असत्ला महत्त्व दिल्याने होणारी चूक स्वाभाविक नाही. ती माणसाने स्वतःच उत्पन्न केली आहे. जी वस्तू स्वाभाविक असते, त्याच्यात जरी परिवर्तन झाले तरी त्याचा अत्यंत अभाव होत नाही. परंतु चुकीचा अत्यंत अभाव होतो. यावरुन हे सिद्ध होते की, ही चूक मनुष्याने स्वतःच निर्माण केली आहे. कारण जी वस्तू नष्ट होणारी असते, ती उत्पन्न होणारीच असते. म्हणून या चुकीला समाप्त करण्याचे दायित्व-सुद्धा मनुष्यावरच आहे. ती चूक तो सुगमतेने समाप्त करू शकतो. तात्पर्य हे आहे की, आपल्याकडून झालेली ही चूक समाप्त करण्यात प्रत्येक मनुष्य समर्थ आणि सबल आहे. चूक समाप्त करण्याचे सामर्थ्य भगवंतांनी पूर्णपणे देऊन ठेवले आहे. चूक समाप्त होताच आपल्या वास्तविक स्वरूपाची स्मृती आपल्या स्वतःतच जागृत होते आणि मनुष्य नेहमी-साठी कृतकृत्य, ज्ञात-ज्ञातव्य आणि प्राप्त-प्राप्तव्य होतो.

आत्तापर्यंत मनुष्याने अनेक वेळा जन्म घेतला आहे आणि अनेक वेळा कित्येक वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, अवस्था, घटना इत्यादींचा मनुष्याला संयोग झाला आहे परंतु त्या सर्वांचा त्यापासून वियोग झाला आणि तो स्वतः तोच राहिला. कारण वियोगाचा संयोग अवश्यंभावी नाही परंतु संयोगाचा वियोग अवश्यंभावी आहे. यावरुन सिद्ध झाले की, संसारापासून वियोगच वियोग आहे, संयोग नाहीच. अनादिकालापासून वस्तू इत्यादिकांचा निरंतर वियोगच होत चालला आहे म्हणून वियोगच खरा आहे. अशा प्रकारे संसारापासून सर्वथा वियोगाचा अनुभव होणे हाच "योग" आहे— "**तं विद्याद् दुःखसंयोगवियोगं योगसञ्ज्ञितम्**"।

(६।२३) हा योग नित्यसिद्ध आहे. स्वरूप अथवा परमात्म्याशी आपला नित्ययोग आहे* आणि शरीर संसाराशी नित्यवियोग आहे. संसाराच्या संयोगाची सद्भावना झाल्यानेच वास्तविक नित्ययोग अनुभवात येत नाही. सद्भावना समाप्त होताच नित्ययोगाचा अनुभव होतो; ज्याचा कधी वियोग झालाच नाही.

संसाराशी संयोग मानणे हीच ''विस्मृती'' आहे आणि संसारापासून नित्यवियोगाचा अनुभव होणे अर्थात् वास्तविक संसाराशी माझा संयोग नव्हताच, नाही, होणार नाही आणि होऊ शकतही नाही—असा अनुभव होणे हीच ''स्मृती'' आहे.

**परिशिष्ट भाव—**लौकिक स्मृती तर विस्मृतीच्या अपेक्षेने म्हटली जाते, परंतु अलौकिक तत्त्वाची स्मृती विस्मृतीच्या अपेक्षेने नव्हे, तर अनुभवरूप आहे. या तत्त्वाची निरपेक्ष स्मृती अर्थात् अनुभव यालाच येथे **'स्मृतिर्लब्धा'** म्हंटले गेले आहे.

वास्तविक तत्त्वाची विस्मृती होत नाही, तर विमुखता होते. तात्पर्य हे आहे की, पूर्वी ज्ञान होते मग त्याची विस्मृती झाली—अशाप्रकारे तत्त्वाची विस्मृती होत नाही.† जर अशी विस्मृती मानली तर स्मृती झाल्यावर मग विस्मृती होईल! म्हणून गीतेत आले आहे—**'यज्ज्ञात्वा न पुनर्मोहम्'** (४।३५) अर्थात् त्याला जाणल्यावर मग मोह होत नाही. अभावरूपी असत्‌ला भावरूप मानून महत्त्व दिल्याने तत्त्वाकडील वृत्ती हटली—यालाच विस्मृती म्हणतात. वृत्तीचे हटणे आणि वृत्तीचे लागणे—हे देखील साधकाच्या दृष्टीने आहे, तत्त्वाच्या दृष्टीने नव्हे. तत्त्वाकडून वृत्ती हटल्यावर अथवा विमुखता झाल्यावरही तत्त्व जसेच्या तसेच आहे. अभावरूपी असत्‌ला अभावरूपच मानले तर भावरूप तत्त्व आपोआप जसेच्या तसे राहील.

विचार दोन प्रकारचा असतो. एक विचार करणे असते आणि एका विचाराचा उदय होतो. जो विचार केला जातो, त्यात तर क्रिया आहे, परंतु ज्या विचाराचा उदय होतो, त्यात क्रिया नसते. विचार करण्यात तर बुद्धीचे प्राधान्य असते परंतु विचाराचा उदय झाल्यास बुद्धीशी संबंध-विच्छेद होतो. म्हणून तत्त्वबोध विचार करण्याने होत नाही, तर विचाराचा उदय झाल्याने होतो. तात्पर्य असे आहे की, तत्त्वप्राप्तीच्या उद्देशाने सत्-असत् याचा विचार करीत-करीत जेव्हा असत्‌चा त्याग होतो, तेव्हा 'संसार नाहीच, झालाच नाही, होणारच नाही, होणे संभवतच नाही'—अशा विचाराचा उदय होतो. विचाराचा उदय होताच विवेक बोधात परिणत होतो अर्थात् संसार लुप्त होतो आणि तत्त्व प्रकट होते. मानलेली वस्तू समाप्त होते आणि वास्तविकता राहते. विचाराचा उदय होणे याला येथे **'स्मृतिर्लब्धा'** म्हटले गेले आहे.

अपरा-प्रकृती भगवंताची आहे. परंतु आपण अशी चूक केली की, अपराशी आपला संबंध जोडला अर्थात् तिला आपले आणि आपल्यासाठी मानले. हा संबंध आपणच जोडला आहे आणि याला सोडण्याची जबाबदारीही आपल्यावरच आहे. अपराशी संबंध मानल्यानेच भगवंताच्या नित्यसंबंधाची विस्मृती झाली आणि आपण बंधनात सापडलो. म्हणून अपराच्या संबंध-विच्छेदानेच आपले कल्याण होईल. अपरापासून संबंध-विच्छेद करण्यासाठी 'शरीर माझे आणि माझ्यासाठी नाही'—या विवेकाला महत्त्व द्यायचे आहे. विवेकाला महत्त्व दिल्याने 'अपरा माझी आणि माझ्यासाठी नाहीच'—अशी स्मृती प्राप्त होते.

अर्जुनाला द्वैत अथवा अद्वैत तत्त्वाचा अनुभव झाला नाही, तर द्वैत-अद्वैताहून अतीत असलेल्या वास्तविक तत्त्वाचा अनुभव झाला आहे. कारण द्वैत-अद्वैत तर मोह आहे,‡ परंतु अर्जुनाचा मोह नष्ट झाला आहे.

जीव अनादिकालापासून स्वतः परमात्म्याचा आहे, केवळ संसाराच्या आश्रयाचा त्याग करायचा आहे. अर्जुनाला मुख्यरूपाने भक्तियोगाची स्मृती झाली आहे. कर्मयोग आणि ज्ञानयोग तर साधन आहेत, परंतु भक्तियोग साध्य आहे. म्हणून भक्तियोगाची स्मृतीच वास्तविक आहे. भक्तियोगाची स्मृती आहे—**'वासुदेवः सर्वम्'** अर्थात् सर्व काही भगवान्‌च आहेत. **'वासुदेवः सर्वम्'** चा अनुभव करणे **'स्मृतिर्लब्धा'** आहे. हा अनुभव केवळ भगवत्कृपेनेच होतो—**'त्वत्प्रसादात्'**. वचन सीमित असतात, परंतु कृपा असीम असते.

चिंतनात तर कर्तृत्व असते, परंतु स्मृतीत कर्तृत्व नसते. कारण चिंतन मनाने होते, मनाच्या पलीकडे बुद्धी आहे, बुद्धीच्या पलीकडे अहम् आहे आणि अहम्‌च्या पलीकडे स्वरूप आहे, त्या स्वरूपात स्मृती होते. चिंतन तर आपण करतो, परंतु स्मृतीत केवळ तिकडे

---

* कर्मयोग व ज्ञानयोग यात स्वरूपाशी नित्ययोग आहे आणि भक्तियोगात भगवंतांशी नित्ययोग आहे.

† ज्ञान झाल्यास नाविण्य काही दिसत नाही अर्थात् पूर्वी अज्ञान होते, आता ज्ञान झाले—असे दिसत नाही. ज्ञान झाल्यास असा अनुभव होतो की, ज्ञान तर नेहमीसाठीच होते, केवळ माझी दृष्टी तिकडे नव्हती. जर पूर्वी अज्ञान होते, नंतर ज्ञान झाले—असे मानले तर ज्ञानात सादित्व येईल, परंतु ज्ञान तर सादी नाही, अनादी आहे. जे सादी असते, ते सान्त असते आणि जे अनादी असते, ते अनंत असते.

‡ 'द्वैताद्वैतमहामोहः' (माहेश्वरतन्त्र)

'अहो माया महामोहौ द्वैताद्वैतविकल्पना॥' (अवधूत गीता १।६१)

दृष्टी होते. विस्मृतीच्या वेळी तत्त्व तर जसेच्या तसेच असते. तत्त्वात विस्मृती नाही, म्हणून तिकडे दृष्टी जाताच स्मृती होते.

**'स्थितोऽस्मि गतसन्देहः'**—पूर्वी क्षात्रधर्माच्या दृष्टीने युद्ध करणे योग्य दिसत होते, मग गुरुजन समोर आल्यामुळे युद्ध करणे पाप दिसू लागले. परंतु स्मृती प्राप्त होताच सर्व चिंता समाप्त झाली. मी काय करू? युद्ध करू कि करू नको—हा संदेह, संशय, शंका काही राहिली नाही. माझ्यासाठी आता काही करणे शिल्लक राहिले नाही, तर केवळ आपल्या आज्ञेचे पालन करणे बाकी राहिले आहे—**'करिष्ये वचनं तव'**. हीच शरणागती आहे.

*संबंध—पहिल्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकात "अथ" पदाने श्रीकृष्णार्जुन संवादाच्या रूपात गीतेला आरंभ झाला होता. आता पुढील श्लोकात "इति" पदाने त्याची समाप्ती करताना संजय त्या संवादाचा महिमा गात आहेत.*

*सञ्जय उवाच*

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः।**
**संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम्॥७४॥**

सञ्जय म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इति** | = अशाप्रकारे | **महात्मनः** | = महात्मा | **रोमहर्षणम्** | = रोमांचित करणारा |
| **अहम्** | = मी | **पार्थस्य** | = पृथानंदन अर्जुन यांचा | **अद्भुतम्** | = अद्भुत |
| **वासुदेवस्य** | = भगवान् वासुदेव | | | **संवादम्** | = संवाद |
| **च** | = आणि | **इमम्** | = हा | **अश्रौषम्** | = ऐकला. |

*व्याख्या*—**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः**—संजय म्हणतात की, अशा प्रकारे मी भगवान् वासुदेव आणि महात्मा पृथानंदन अर्जुन यांचा हा संवाद ऐकला, तो अत्यंत अद्भुत, विलक्षण आहे आणि याची केवळ आठवण सुद्धा आनंदामुळे रोमांचित करणारी आहे.

येथे "**इति**" पदाचे तात्पर्य असे आहे की, पहिल्या अध्यायाच्या वीसाव्या श्लोकात "**अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः**" पदांनी संजय श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादरूपी गीतेचा आरंभ करतात आणि येथे "**इति**" पदाने त्या संवादाची समाप्ती करतात.

अर्जुनासाठी "**महात्मनः**" विशेषण देण्याचे तात्पर्य हे आहे की, अर्जुन केवढे महान् विलक्षण पुरुष आहेत, ज्यांची आज्ञा स्वतः भगवान् पालता करतात. अर्जुन म्हणतात की, हे अच्युत! माझा रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागी उभा करा (१।२१) तर भगवान् दोन्ही सैन्याच्या मध्यभागी रथ उभा करतात (१।२४). गीतेत जेथे-जेथे अर्जुन प्रश्न करतात तेथे-तेथे भगवान् मोठ्या प्रेमाने आणि मोठ्या विलक्षण रीतीने प्रायः विस्तारपूर्वक उत्तर देतात. अशा प्रकारे महात्मा अर्जुन आणि भगवान् वासुदेव यांचा संवाद मी ऐकला आहे.

**संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम्**—या संवादात अद्भुत आणि रोमहर्षणपणा काय आहे? शास्त्रांत प्रायः असे वर्णन येते की, संसाराची निवृत्ती करण्यानेच मनुष्य पारमार्थिक मार्गावर आरूढ होऊ शकतो आणि त्याचे कल्याण होऊ शकते. मनुष्यांतही प्रायः अशीच धारणा बसलेली असते की, घर, कुटुंब इत्यादीचा त्याग करून साधू संन्यासी झाल्यानेच कल्याण होते. परंतु गीता म्हणते की, कोणतीही परिस्थिती अवस्था, घटना, देश, काळ इत्यादी का असेना, त्याच्याच सदुपयोगाने मनुष्याचे कल्याण होऊ शकते. एवढेच नव्हे, ती परिस्थिती कितीही श्रेष्ठ, अती निकृष्ट, अत्यंत सौम्य अथवा अत्यंत घोर, विहित युद्धासारखी प्रवृत्ती असो, ज्यात दिवसभर माणसांचे गळे कापावे लागतात, त्यातही मनुष्याचे कल्याण होऊ शकते, मुक्ती होऊ शकते. *कारण जन्म-मरणरूपी बंधनात संसाराची आसक्तीच कारण आहे. (१३।२१) त्या आसक्तीला

* जर प्रत्येक परिस्थितीशी संबंध-विच्छेद झाल्यानेच कल्याण होते तर मग प्राकृत परिस्थिती उत्कृष्ट अथवा निकृष्ट असणे याचे काही महत्त्व नाही. मात्र यापासून वेगळे होण्याचे उपाय (कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोग इत्यादी) वेगवेगळे असू शकतात. परंतु यात आसक्ती मिटविणे हाच मुख्य उपाय आहे. कारण आसक्ती नाहीशी झाल्याने द्वेष राहत नाही आणि राग-द्वेष समाप्त झाल्यावर संसाराशी संबंध-विच्छेद होतो. संसाराशी संबंध-विच्छेद होणे हीच मुक्ती आहे.

वास्तविक जो बद्ध असतो, तो मुक्त होत नाही आणि जो मुक्त असतो तो मुक्त काय होणार? कारण तो तर मुक्तच आहे. तर मग मुक्त होणे म्हणजे काय आहे? वास्तविक मुक्त असतानाही ज्या बंधनाचा स्वीकार केला आहे त्या बंधनातून सुटण्याला मुक्त होणे म्हणतात.

संपविण्यात परिस्थितीचा सदुपयोग करणे हाच हेतू आहे अर्थात् जो पुरुष परिस्थितीत राग-द्वेष न करता आपल्या कर्तव्याचे पालन करतो तो सुखपूर्वक मुक्त होतो (५।३) हाच त्या संवादात अद्भुतपणा आहे.

भगवंताचे स्वत: अवतार घेऊन मानवासारखी कामे करीत आपल्या स्वत:ला प्रगट करणे आणि "मला शरण ये" अशी अत्यंत गोपनीय रहस्यमय गोष्ट सांगणे—हेच संवादात रोमहर्षण करणारे, प्रसन्न करणारे, आनंद देणारे आहे.

**परिशिष्ट भाव**—गीतेत 'महात्मा' शब्द केवळ भक्तांसाठी आला आहे. येथे संजयाने अर्जुनालाही 'महात्मा' म्हटले आहे. कारण ते अर्जुनाला भक्तच मानतात. भगवंतानेही म्हटले आहे—'**भक्तोऽसि मे**' (गीता ४।३).

***संबंध***—*पारमार्थिक मार्गात उत्कृष्ट साधकाला ज्यापासून लाभ होतो त्याची तो कृतज्ञता प्रकट करतच असतो. म्हणून संजयसुद्धा पुढील तीन श्लोकांत श्रीव्यासांची कृतज्ञता प्रकट करतात.*

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम्।**
**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम्॥ ७५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **व्यासप्रसादात्** | = व्यासजींच्या कृपेने | **परम्** | = परम | **साक्षात्** | = साक्षात् |
| **अहम्** | = मी | **गुह्यम्** | = गोपनीय | **योगेश्वरात्** | = योगेश्वर |
| **स्वयम्** | = स्वत: | **योगम्** | = योग (गीताग्रंथ) | **कृष्णात्** | = भगवान् श्रीकृष्णांकडून |
| **एतत्** | = हा | **कथयतः** | = सांगत असता | **श्रुतवान्** | = ऐकला आहे. |

*व्याख्या*— **व्यासप्रसादात् श्रुतवान्**—संजयांनी जेव्हा भगवान् श्रीकृष्ण आणि महात्मा अर्जुनांचा पूर्ण संवाद ऐकला तेव्हा ते फार प्रसन्न झाले. आता त्याच प्रसन्नतेत म्हणत आहेत की, असा परम गोपनीय योग मी भगवान् श्रीव्यासांच्या कृपेने ऐकला. व्यासांच्या कृपेने ऐकण्याचे तात्पर्य हे आहे की, भगवंतांनी "**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया**" (१०।१), "**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम्**" (१८।६४), "**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे**" (१८।६५), "**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः**" (१८।६६) इत्यादी इत्यादी मधुर व प्रीतीयुक्त वचनांनी आपले अंत:करण मोकळे करून अर्जुनाशी ज्या गोष्टी सांगितल्या त्या गोष्टी ऐकण्याचे भाग्य मला केवळ व्यासांच्या कृपेनेच प्राप्त झाले अर्थात् त्या सर्व गोष्टी मी व्यासांच्या कृपेनेच ऐकल्या.

**एतद् गुह्यं परं योगम्**—समस्त योगांच्या महान ईश्वराद्वारा सांगितल्या गेल्यामुळे हे गीताशास्त्र "योग" अर्थात् "योगशास्त्र" आहे. हे गीताशास्त्र अत्यंत श्रेष्ठ आणि गोपनीय आहे. यासारखा श्रेष्ठ आणि गोपनीय दुसरा कोणताही संवाद पाहण्यात वा ऐकण्यात येत नाही.

जीवाचा भगवंताशी जो नित्यसंबंध आहे, त्याचे नाव "योग" आहे. त्या नित्ययोगाची ओळख करविण्यासाठी कर्मयोग, ज्ञानयोग इत्यादी योग सांगितले गेले आहेत. त्या योगांच्या समुदायांचे वर्णन गीतेत असल्याने गीतासुद्धा "योग" अर्थात् योगशास्त्र आहे.

**योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम्**—संजयाच्या आनंदाची काही सीमा राहिली नाही. म्हणून ते हर्षोल्लसभरित होऊन म्हणत आहेत की, हा योग मी समस्त योगांचे महान् ईश्वर साक्षात् भगवान् श्रीकृष्णांच्या मुखाने ऐकला. संजयांना ह्या पाच शब्दांचा—**योगेश्वरात्, कृष्णात्, साक्षात्, कथयतः, स्वयम्** प्रयोग करण्याची काय आवश्यकता होती? संजय या शब्दांचा प्रयोग करून असे म्हणू इच्छितात की, मी हा संवाद परंपरेने ऐकला नाही आणि आणखी कोणी तरी दुसऱ्याने मला ऐकविला असेही नाही, हा तर मी स्वत: प्रत्यक्ष भगवान् (अर्जुनाला) सांगत असताना ऐकला आहे.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाने '**त्वत्प्रसादात्**' म्हटले आहे (१८।७३) आणि संजयाने '**व्यासप्रसादात्**' म्हटले आहे. अर्जुनाला भगवंताच्या कृपेने दिव्यदृष्टी मिळाली होती आणि संजयाला व्यासजींच्या कृपेने मिळाली होती.

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम्।**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः॥ ७६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **राजन्** | = हे राजन्! | **इमम्** | = हा | **संस्मृत्य,** | = पुन्हा पुन्हा |
| **केशवार्जुनयोः** | = भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुनांचा | **पुण्यम्** | = पवित्र | **संस्मृत्य** | आठवून (मी) |
| | | **च** | = आणि | **मुहुर्मुहुः** | = वारंवार |
| | | **अद्भुतम्** | = अद्भुत | **हृष्यामि** | = हर्षित होत आहे. |
| | | **संवादम्** | = संवाद | | |

*व्याख्या*— **राजन्संस्मृत्य......मुहुर्मुहुः**—संजय म्हणत आहेत की, हे महाराज! भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुनाचा हा अत्यंत अलौकिक, विलक्षण संवाद झाला आहे. यात किती मोठे रहस्य भरले आहे की, भयानकापेक्षाही भयानक अशी युद्धरूपी क्रिया करीत असतानासुद्धा सर्वोच्च पारमार्थिक सिद्धी होऊ शकते. प्रत्येक मनुष्य कोणत्याही परिस्थितीत आपला उद्धार करू शकतो. अशा प्रकारचा संवाद पुन्हा पुन्हा स्मरण करून मी अतिशय हर्षित होत आहे, प्रसन्न होत आहे.

श्रीभगवान् व अर्जुन यांच्या या अद्भुत संवादाचा महिमासुद्धा फार विलक्षण आहे. भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन हे नेहमी बरोबर राहत असूनही दोघांचा असा संवाद (या अगोदर) कधी झाला नाही. युद्धाच्या वेळी अर्जुनाची मनस्थिती द्विधा झाली होती त्यामुळे ते घाबरले होते. एकीकडे कुटुंबाचा मोह त्यांना व्याकूळ करीत होता तर दुसरीकडे क्षात्र धर्माच्या दृष्टीने युद्ध करणे आवश्यक कर्तव्य समजत होते. मनुष्याची कोणत्याही एका सिद्धांतावर जेव्हा दृढ स्थिती राहत नसते तेव्हा त्याची व्याकूळता मोठी विचित्र होते.* अर्जुनालासुद्धा "युद्ध करणे श्रेष्ठ की न करणे श्रेष्ठ"—या दोन्हीपैकी एक निश्चित निर्णय करता येऊ शकला नाही. याच व्याकूळतेमुळे अर्जुन भगवंताकडे आकर्षित झाले, त्यांना सम्मुख झाले. सम्मुख झाल्याने त्यांना भगवत्कृपा विशेषतेने प्राप्त झाली. अर्जुनांची अनन्य भावना, उत्कंठा, यामुळे भगवान् योगात स्थित झाले अर्थात् ऐश्वर्य इत्यादीत स्थित न राहता केवळ आपल्या प्रेमतत्त्वात आकंठ बुडून गेले आणि त्याच अवस्थेत अर्जुनांना समजावून सांगितले. अशा प्रकारे उत्कट अभिलाषा संपन्न अर्जुन आणि अलौकिक अटळ योगात स्थित भगवान् मग यांच्या संवादाचा महिमा काय वर्णन करावा? त्याचा महिमा वर्णन करण्यास कोणीही समर्थ नाही.

**परिशिष्ट भाव**—भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या या संवादात जे तत्त्व भरलेले आहे, ते कोण्या ग्रंथातून, महात्मा इत्यादीकडून ऐकायला मिळाले नाही. हा भगवान् आणि त्यांच्या भक्ताचा फार विलक्षण संवाद आहे. एवढा स्पष्ट विचार इतर कुठे वाचण्यास-ऐकण्यास मिळत नाही. या संवादात युद्धासारख्या घोर कर्मातही कल्याण होण्याचा विचार सांगितला गेला आहे. प्रत्येक वर्ण, आश्रम, संप्रदाय इत्यादीत मनुष्य सर्व परिस्थितीत आपले कल्याण करू शकतो—ही गोष्ट या संवादात सापडते. म्हणून हा संवाद फार अद्भुत आहे—**'संवादमिममद्भुतम्'**. केवळ संवादातच इतकी विलक्षणता आहे, मग त्यानुसार आचरण केल्यास काय सांगायचे आहे!

भगवान् श्रीकृष्णाची वाणी फारच विचित्र आहे.† त्यातही भगवंताने योगात स्थित होऊन गीता सांगितली आहे,‡ मग हिच्या विचित्रते-विलक्षणतेबद्दल काय सांगावे! भगवान्द्वारा कौरवसभेत होणाऱ्या राजनीतिक व्याख्यानातही इतकी विलक्षणता होती की, ऋषि-मुनी ती ऐकण्यासाठी जातात,$ मग ही (गीता) तर पारमार्थिक संवाद आहे! श्रीमद्भागवतातही जेव्हा उद्धवजीने

---

* आजकाल माणसामध्ये पारमार्थिक गोष्टी जाणून घेण्याची विशेष व्याकूळता दिसत नाही कारण माणसे धन, कुटुंब, मान, सन्मान, वर्ण, आश्रम, विद्या, बुद्धी, भोग, ऐश्वर्य इत्यादी क्षणिक सुखातच संतोष मानतात. याचा परिणाम असा होतो की, त्यांची (वास्तविकतेला जाणण्याची) व्याकूळता दबून जाते.

† वाचं तां वचनार्हस्य शिक्षाक्षरसमन्विताम्। अश्रौषमहमिष्टार्थां पश्चाद्धृदयहारिणीम्॥ (महाभारत, उद्योग० ५९। १७)

'(संजय म्हणाले—) त्यानंतर मी संभाषणात कुशल भगवान् श्रीकृष्णाची ही वाणी ऐकली, जिचा एक-एक अक्षर शिकवण देणारा होता. ती अभीष्ट अर्थाचे प्रतिपादन करणारी आणि मनाला आकर्षित करून घेणारी होती.'

‡ न शक्यं तन्मया भूयस्तथा वक्तुमशेषतः। परं हि ब्रह्म कथितं योगयुक्तेन तन्मया। (महाभारत आश्व० १६। १२-१३)

'(भगवान् म्हणाले—) ते सर्वच्या सर्व त्याच रूपात पुन्हा पुनरावृत्ती करणे आता माझ्या ताब्यातील गोष्टही नाही, त्यावेळी योगयुक्त होऊन मी परमात्मतत्त्वाचे वर्णन केले होते.'

$ धर्मार्थसहिता वाचः श्रोतुमिच्छाम माधव॥ त्वयोच्यमानाः कुरुषु राजमध्ये परन्तप। (महाभारत, उद्योग० ८३। ६८-६९)

'(परशुरामजी म्हणाले—) शत्रूंना संताप देणारे माधव! तेथे कौरव आणि अन्य राजेलोकांच्या मंडळीत आपल्याद्वारा सांगितला जाणारा धर्म आणि अर्थयुक्त गोष्टी आम्ही ऐकू इच्छितो.'

पाहिले की, भगवान् प्रश्नांची उत्तरे फार विलक्षण पद्धतीने देतात, तेव्हा त्यांनी एकाच वेळी पस्तीस प्रश्न केले (श्रीमद्भा० अकरावा स्कंध, एकोणीसावा अध्याय, अठ्ठावीसाव्यापासून बत्तीसाव्या श्लोकापर्यंत)!

**'हृष्यामि च मुहुर्मुहु'**—कर्म-ज्ञान-भक्तीच्या अशा विलक्षण गोष्टी इतर ठिकाणी ऐकण्यास मिळाल्याच नाहीत, म्हणून हे ऐकून संजय वारंवार हर्षित होत आहेत.

संजय भगवंताला जाणणारे होते. धृतराष्ट्रद्वारा याचे कारण विचारल्यावरुन संजयाने त्यांना सांगितले होते—

**मायां न सेवे भद्रं ते न वृथा धर्ममाचरे।**
**शुद्धभावं गतो भक्त्या शास्त्राद् वेद्मि जनार्दनम्॥**

(महाभारत, उद्योग० ६९।५)

'महाराज! आपले कल्याण हो, मी कधी मायेचे (छल-कपटाचे) सेवन करीत नाही. व्यर्थ (पाखण्डपूर्ण) धर्माचे आचरण करीत नाही. भगवंताच्या भक्तीने माझे अंतःकरण शुद्ध झाले आहे. म्हणून मी शास्त्राच्या वचनांनुसार भगवान् श्रीकृष्णाच्या स्वरूपाला यथावत् जाणतो.'

अशाप्रकारे पूर्वी तर संजय शास्त्रवचनानुसार भगवंताला जाणत होते, परंतु आता त्यांनी साक्षात् भगवंताच्या वचनांने त्यांना जाणून घेतले.

# तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः।
# विस्मयो मे महान्राजन्हृष्यामि च पुनः पुनः॥७७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **राजन्** | = हे राजन्! | **रूपम् च** | = विराटरूपाचेच | **विस्मयः** | = आश्चर्य (होत) आहे. |
| **हरेः** | = भगवान् श्रीकृष्णांच्या | **संस्मृत्य,** | = स्मरण | | |
| **तत्** | = त्या | **संस्मृत्य** | कर-करून | **च** | = आणि (मी) |
| **अति** | = अत्यंत | **मे** | = मला | **पुनः, पुनः** | = वारंवार |
| **अद्भुतम्** | = अद्भुत | **महान्** | = फार मोठे | **हृष्यामि** | = हर्षित होत आहे. |

***व्याख्या*— तच्च संस्मृत्य......पुनः पुनः**—संजयांनी मागील श्लोकात भगवान् श्रीकृष्ण आणि अर्जुनाच्या संवादाला तर "अद्भुत" सांगितले परंतु येथे भगवंताच्या विराट स्वरूपाला "अत्यंत अद्भुत" म्हणत आहेत. याचे तात्पर्य हे आहे की, संवाद तर आत्तासुद्धा वाचू शकतो, त्यावर विचार करू शकतो, परंतु त्या विराटरूपाचे दर्शन आता होऊ शकत नाही. म्हणून ते रूप अत्यंत अद्भुत आहे.

अकराव्या अध्यायाच्या नवव्या श्लोकात संजयांनी भगवंतांना "**महायोगेश्वरः**" म्हटले होते. येथे "**विस्मयो मे महान्**" पदांनी म्हणतात की, अशा महायोगेश्वर भगवंताच्या रूपाची आठवण केल्याने महान् विस्मय होणारच. दुसरी गोष्ट, अर्जुनाला तर भगवंतांनी कृपेने द्रवित होऊन विश्वरूप दाखविले. परंतु मला तर व्यासांच्या कृपेने पाहण्यास मिळाले.

जरी भगवंतांनी राम अवतारामध्ये कौसल्या मातेला विराटरूप दाखविले आणि कृष्णावतारामध्ये यशोदा मातेला तसेच कौरव सभेत दुर्योधन इत्यादींना विराटरूप दाखविले, तरीपण ते रूप असे अद्भुत नव्हते की, ज्या रूपाच्या विक्राळ दाढात मोठमोठे योध्ये फसून गेले आहेत आणि दोन्ही सैन्याचा मोठा संहार होत आहे. अशा प्रकारचे अत्यंत अद्भुत रूप आठवून संजय म्हणत आहेत की, राजन! हे सर्व तर मला व्यासांच्याच कृपेने पहावयास मिळाले आहे. नाहीतर असे रूप माझ्यासारख्याला कशाला पहायला मिळाले असते?

**परिशिष्ट भाव**—भगवंताने आपले विराट्रूप सीमित दाखविले होते. जर अर्जुन घाबरले नसते तर भगवान् आणखीही रूप दाखवित होते. परंतु तेव्हढ्यानेच संजय फार मोठे आश्चर्य करीत आहेत.

भगवंताच्या विषयात पूर्वी तर संजयाने शास्त्रात वाचले, नंतर अद्भुत संवाद ऐकला आणि मग अती अद्भुत विराटरूप पाहिले. तात्पर्य हे आहे की, शास्त्रापेक्षा श्रीकृष्णार्जुन संवाद अद्भुत होता आणि संवादापेक्षाही विराट्रूप अद्भुत होते. म्हणून संजयाने संवादाला अद्भुत म्हटले—**'संवादमिममद्भुतम्'** (१८।७६) आणि विराट्रूपाला अत्यंत अद्भुत म्हटले—**'रूपमत्यद्भुतम्'**

*संबंध—गीतेच्या आरंभी धृतराष्ट्राचा गूढाभिसन्धिरूपी प्रश्न होता की, युद्धाचा परिणाम काय होईल? अर्थात् माझ्या पुत्रांचा विजय होईल की पांडुपुत्रांचा? पुढील श्लोकात संजय धृतराष्ट्राच्या ह्याच प्रश्नाचे उत्तर देत आहेत.*

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम॥ ७८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यत्र** | = जेथे | **धनुर्धरः** | = गाण्डीव धनुर्धारी | **भूतिः** | = विभूती (आणि) |
| **योगेश्वरः** | = योगेश्वर | **पार्थः** | = अर्जुन आहेत, | **ध्रुवा** | = अचल |
| **कृष्णः** | = भगवान् श्रीकृष्ण आहेत (आणि) | **तत्र** | = तेथेच | **नीतिः** | = नीती आहे— |
| | | **श्रीः** | = श्री, | **मम** | = (असे) माझे |
| **यत्र** | = जेथे | **विजयः** | = विजय, | **मतिः** | = मत आहे. |

*व्याख्या*—**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः**—संजय म्हणत आहेत की, राजन्! जेथे अर्जुनाचे संरक्षण करणारे, त्यांना सम्मती देणारे, संपूर्ण योगांचे महान् ईश्वर, महान् बलशाली, महान् ऐश्वर्यवान्, महान् विद्यावान्, महान् चतुर भगवान् श्रीकृष्ण आहेत आणि जेथे भगवंताची आज्ञा पालन करणारे, भगवंताचे प्रिय सखा तसेच भक्त गाण्डीव धनुर्धारी अर्जुन आहेत, त्याच पक्षात श्री, विजय, विभूती आणि अचल नीती—हे सर्व आहेत आणि माझी सम्मतीही तिकडेच आहे.

भगवंतांनी अर्जुनाला जेव्हा दिव्य दृष्टी दिली, त्यावेळी संजयांनी भगवंतांना ''**महायोगेश्वरः**''* म्हटले होते. आता त्याच महायोगेश्वराची आठवण देताना येथे ''**योगेश्वरः**'' म्हणत आहेत. ते संपूर्ण योगांचे ईश्वर (मालक) भगवान् श्रीकृष्ण तर प्रेरक आहेत आणि त्यांची आज्ञा पालन करणारे धनुर्धारी अर्जुन प्रेर्य आहेत.

गीतेत भगवंतासाठी ''महायोगेश्वर'', ''योगेश्वर'' इत्यादी शब्दांचा प्रयोग झाला आहे. त्यांचे तात्पर्य हे आहे की, भगवान् सर्व योग्यांना शिकविणारे आहेत. भगवंतांना स्वतः शिकावे लागत नाही कारण त्यांचा योग स्वतःसिद्ध आहे. सर्वज्ञता, ऐश्वर्य, सौंदर्य, माधुर्य इत्यादी जितके काही वैभवशाली गुण आहेत ते सर्वचे सर्व भगवंतात सहजच राहतात. ते गुण भगवंतात नित्य राहतात, अमर्याद असतात. जसे पित्याचा पिता, त्याचाही पिता—ही परंपरा जशी शेवटी परम पिता परमात्म्यात जाऊन समाप्त होते, त्याचप्रमाणे जितके काही गुण आहेत त्या संपूर्ण गुणांची समाप्ती परमात्म्यातच होते.

पहिल्या अध्यायात जेव्हा युद्धाच्या घोषणेचा प्रसंग आला तेव्हा कौरवपक्षात सर्वात प्रथम भीष्मांनी शंख वाजविला. भीष्म कौरवसेनेचे अधिपती होते म्हणून त्यांचे शंख वाजविणे उचितच होते. परंतु भगवान् श्रीकृष्ण तर पांडवसेवेत सारथी बनलेले असतात आणि सर्वात प्रथम शंख वाजवून युद्धाची घोषणा करतात. लौकिक दृष्टीने पाहिले तर सर्वात प्रथम शंख वाजविण्याचा भगवंताचा कोणताही अधिकार दिसत नाही. असे असूनही ते शंख वाजवितात तर यावरुन सिद्ध होते की, पांडवसेनेत सर्वात मुख्य भगवान् श्रीकृष्णच आहेत आणि दुसऱ्या नंबरमध्ये अर्जुन आहेत. म्हणून या दोघांनी पांडव सेनेत सर्वात प्रथम शंख वाजवले. तात्पर्य, हे झाले की, संजयांनी जशी आरंभी (शंख वादन क्रियेत) दोघांची मुख्यता प्रकट केली तशीच येथे शेवटीही या दोघांचे नाव घेऊन दोघांची मुख्यता प्रकट करतात.

संपूर्ण गीतेत ''**पार्थ**'' हे संबोधन अडतीस वेळा आले आहे. अर्जुनासाठी इतक्या संख्येने अन्य कोणतेही संबोधन आले नाही. यावरुन असे वाटते की, भगवंतांना ''**पार्थ**'' संबोधन फार प्रिय आहे. त्याचप्रमाणे अर्जुनालाही ''**कृष्ण**'' संबोधन फार प्रिय आहे. म्हणून गीतेत ''**कृष्ण**'' या संबोधनाची आवृत्ती नऊ वेळा झाली आहे. भगवंताच्या संबोधनांमध्ये इतक्या संख्येने दुसऱ्या कोणत्याही संबोधनाची आवृत्ती झाली नाही. शेवटी संजयांनीही गीतेच्या उपसंहारात ''**कृष्ण**'' व ''**पार्थ**'' ही दोन्ही नावे घेतली आहेत.

**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम**—लक्ष्मी, शोभा, संपत्ती—ही सर्व ''**श्री**'' शब्दाच्या अंतर्गत आहेत. जेथे श्रीपती भगवान् श्रीकृष्ण आहेत, तेथे श्री राहणारच.

''**विजय**'' नाव अर्जुनाचेही आहे आणि शूरवीरता

* योगीश्वर अर्थात् योग्यांचे ईश्वर होणे तर सोपी गोष्ट आहे परंतु योगेश्वर अर्थात् संपूर्ण योगांचे ईश्वर होणे, ही अंतिम मर्यादा आहे-''सा काष्ठा सा परा गतिः''

इत्यादींचेही आहे. जेथे विजयरूपी अर्जुन असतील, तेथे शूरवीरता, उत्साह इत्यादी क्षात्र ऐश्वर्य राहणारच.

त्याचप्रमाणे जेथे योगेश्वर भगवान् श्रीकृष्ण असतील, तेथे "**विभूति**"—ऐश्वर्य, महत्ता, प्रभाव, सामर्थ्य, इत्यादी सर्वचे सर्व भगवद्गुण राहणारच आणि जेथे धर्मात्मा अर्जुन असतील, तेथे "**ध्रुवा नीति**"—अटळ नीती, न्याय, धर्म इत्यादी राहणारच.

वास्तविक श्री, विजय, विभूती आणि ध्रुवा नीती—हे सर्व गुण भगवंतात आणि अर्जुनात नित्य विद्यमान राहतात. उपर्युक्त दोन विभाग तर मुख्यतेला धरून केले गेले आहेत. योगेश्वर श्रीकृष्ण आणि धनुर्धारी अर्जुन—हे दोन्ही जेथे राहतील, तेथे अनंत ऐश्वर्य, अनंत माधुर्य, अनंत सौशिल्य, अनंत सौजन्य, अनंत सौंदर्य इत्यादी दिव्य गुण राहणारच.

धृतराष्ट्राच्या विजयाविषयीच्या गूढाभिसन्धिरूपी प्रश्नाचे उत्तर येथे संजय सम्यक् रीतीने देत आहेत. तात्पर्य असे आहे की, पाण्डुपुत्रांचा विजय निश्चित आहे यात काही संदेह नाही.

**ज्ञानयज्ञः सुसम्पन्नः प्रीतये पार्थसारथेः।**
**अङ्गीकरोतु तत्सर्वं मुकुन्दो भक्तवत्सलः॥**
**नेत्रवेदखयुग्मे हि बहुधान्ये च* वत्सरे।**
**संजीवनी मुमुक्षूणां माधवे पूर्णतामियात्॥**

***ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगो नामाष्टादशोऽध्यायः॥ १८॥***

**अशा प्रकारे ॐ तत्, सत् या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात "मोक्षसंन्यासयोग" नावाचा अठरावा अध्याय पूर्ण झाला॥ १८॥**

ज्यात मोक्षाचासुद्धा संन्यास अर्थात् त्याग होतो, अशा भगवद्भक्तीचे वर्णन मुख्य असल्यामुळे या अध्यायाचे नाव "मोक्षसंन्यासयोग" ठेवले गेले आहे.

## अठराव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथाष्टादशोऽध्यायः**" ची तीन, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची आठ, श्लोकांची नऊशे एकोण नव्वद आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग एकहजार तेरा आहे.

(२) या अध्यायात "**अथाष्टादशोऽध्यायः**" ची सात, "**अर्जुन उवाच**" इत्यादींची-पंचवीस, श्लोकांची दोन हजार चारशे शहाण्णव आणि पुष्पिकेची अठ्ठेचाळीस अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग दोन हजार पाचशे शहात्तर आहे. या अध्यायाचे सर्वच श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात चार उवाच आहेत. दोन "**अर्जुन उवाच**" एक "**श्रीभगवानुवाच**" आणि एक "**संजय उवाच**".

## अठराव्या अध्यायात प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या अठ्ठयाहत्तर श्लोकांपैकी बाराव्या, सेहेचाळीसाव्या आणि बावन्नाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म-विपुला**", तेवीसाव्या, बत्तीसाव्या, सदतीसाव्या, एक्केचाळीसाव्या, पंचेचाळीसाव्या, छपन्नाव्या आणि सत्तराव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**न विपुला**", तेहतीसाव्या, छत्तीसाव्या, सत्तेचाळीसाव्या आणि पंच्याहत्तराव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "भगण" प्रयुक्त असल्याने "**भ-विपुला**", तेराव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म-विपुला**", सव्वीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "रगण" प्रयुक्त असल्याने "**र-विपुला**" अडतीसाव्या आणि चौसष्टाव्या श्लोकाच्या तृतीय चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**न-विपुला**", एकोणपन्नासाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म-विपुला**", "आणि तृतीय चरणात भगण प्रयुक्त असल्याने" "**भ-विपुला**" संज्ञेचे छन्द आहेत. बाकीचे एकोणसाठ श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छन्दाच्या लक्षणांनी युक्त आहेत.

* विक्रम संवत्सरे २०४२

# श्रीमद्भगवद्गीतेची आरती

जय भगवद्गीते, जय भगवद्गीते।
हरि-हिय-कमल-विहारिणि सुन्दर सुपुनीते॥ जय०॥
कर्म-सुमर्म-प्रकाशिनि कामासक्तिहरा।
तत्त्वज्ञान-विकाशिनि विद्या ब्रह्म परा॥ जय०॥
निश्चल-भक्ति-विधायिनि निर्मल मलहारी।
शरण-रहस्य-प्रदायिनि सब बिधि सुखकारी॥ जय०॥
राग-द्वेष-विदारिणि कारिणि मोद सदा।
भव-भय-हारिणि तारिणि परमानन्दप्रदा॥ जय०॥
आसुर-भाव-विनाशिनि नाशिनि तम-रजनी।
दैवी सद्‌गुणदायिनि हरि-रसिका सजनी॥ जय०॥
समता, त्याग सिखावनि हरि-मुख की बानी।
सकल शास्त्रकी स्वामिनि श्रुतियोंकी रानी॥ जय०॥
दया-सुधा बरसावनि मातु! कृपा कीजै।
हरि-पद-प्रेम दान कर अपनो कर लीजै॥ जय०॥

